## इंदूर संमेलनाचे उद्घाटनकर्ते



श्रीमंत महाराजाधिराज राजराजेश्वर सवाई
श्री यशवंतराव होळकर बहादुर.

## इंदूर संमेलनाचे स्वागताध्यक्ष



श्रीमंत महाराज सरकार विक्रमसिंहराव नानासाहेब पवार बी. ए., सेनासप्तसहस्री, देवास सीनियर.

# अनुक्रमणिका.

---

# परिचय.

इ. स. १९३५ च्या डिसेंबर महिन्यांत इंदूर येथें औंध संस्थानाधिपति श्रीमंत मेहरबान राजे भवानराव पंतप्रतिनिधि यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेलें मराठी साहित्य संमेलनाचें २० वें अधिवेशन अत्यंत थाटमाटानें व यशस्वी रीतीनें पार पडलें, हें सर्वश्रुतच आहे. इ. स. १९३५ हें वर्ष वास्तविक संमेलनाच्या सुवर्णमहोत्सवाचें असल्यामुळें या प्रसंगाची चिरंतन स्मृति राहील असें एखादें विशिष्ट कार्य करण्याची कल्पना वरील अधिवेशनाच्या पूर्वतयारींतच अगदीं आरंभाला सुचली व त्यावर कार्यकारी मंडळांत विचार होऊन साहित्याचे दोन इतिहास-ग्रंथ प्रकाशित करण्याचें निश्चित झालें. पहिला ग्रंथ अखिल मराठी साहित्याची अद्यावत् उपयुक्त माहिती देणारा असा असावा व दुसरा ग्रंथ तशाच प्रकारची फक्त मध्यहिंदुस्थानांतीलच माहिती देणारा असा असावा असें ठरलें. हे ग्रंथ लिहिण्यास अर्थात्च दीर्घ व्यासंगी व पूर्ण अधिकारी अशा लेखकांची निवड करण्याचा प्रश्न पुढें आला तेव्हां त्याबद्दल बरीच भवति न भवति होऊन शेवटीं संमेलनाचा सुवर्णमहोत्सव साजरा करण्याचा मान ज्याअर्थी इंदुरास लाभला आहे त्याअर्थी आपल्याच इकडच्या स्थानिक किंवा या प्रांतांतील लेखकांची त्या कामासाठीं निवड केली जावी यांत औचित्य आहे असें सर्वानुमतें ठरून तशी निवड कार्यकारी मंडळाकडून करण्यांत आली. पहिला ग्रंथ लिहिण्याची कामगिरी इंदूरचे श्रीयुत वि. सी. सरवटे यांच्याकडे सोंपविली गेली व दुसरा ग्रंथ लिहिण्याच्या कामीं देवासचे श्रीयुत कृ. गं. कवचाळे यांची योजना करण्यांत आली. त्याप्रमाणें श्रीयुत सरवटे यांनीं लिहिलेला 'मराठी साहित्य समालोचन' हा ग्रंथ गेल्या फेब्रुवारी सन १९३८

मध्यें प्रकाशित करण्यांत आला. आज श्रीयुत कवचाळे यांनीं लिहिलेला 'मध्यभारतीय मराठी वाङ्मय' हा ग्रंथ प्रकाशित करण्याचा सुयोग आला आहे, ही खरोखर मोठ्या आनंदाची गोष्ट आहे.

श्रीयुत कवचाळे हे एक अभिजात व उच्च दर्जाचे साहित्यिक असून कवि, लघुकथालेखक व इतिहास-संशोधक या तिहेरी नात्यांनीं ते महाराष्ट्राला आज जवळजवळ दोन तपांपासून परिचित आहेत. प्रस्तुत ग्रंथास त्यांचा अल्प परिचय पृथक् जोडण्यांत आलाच आहे त्यावरून त्यांच्या साहित्यसेवेची स्थूल कल्पना अपरिचितांना होण्यासारखी आहे. आजवर निरनिराळ्या नियतकालिकांतून त्यांचे विविध विषयांवरील लेख व कविता प्रकाशित होऊन त्यांचीं कांहीं स्वतंत्र पुस्तकेंही प्रसिद्ध झालीं आहेत. त्यांच्या काव्य-पुस्तकांपैकीं 'स्मरणी' हें काव्य व उज्जयिनीच्या 'महाराष्ट्र वाङ्मय मंडळा' नें प्रकाशित केलेल्या 'मालविका' नामक माळव्यांतील ठळक कविकवयित्रींच्या कवितासंग्रहांतील राधा--माधव--विनोद ही कविता त्यांच्या ठायीं वसत असलेल्या प्रतिभेची उत्तम प्रकारें साक्ष देणारीं आहेत. तसेंच मागें 'नवयुगा' दि मासिकांतून व श्रीयुत कवचाळे यांच्याच संचालकत्वाखालीं देवासहून निघणाऱ्या 'श्री शिवाजी' साप्ताहिकांतून त्यांच्या प्रसिद्ध झालेल्या लघुकथाही वैशिष्ट्यपूर्ण आहेत; परंतु श्रीयुत कवचाळे यांची यापेक्षां अधिक महत्त्वाची कामगिरी ह्मटली ह्मणजे माळव्याच्या इतिहासावरील त्यांचे अनेक संशोधनपर लेख होत. आपल्या मातृभूमि माळव्याविषयीं त्यांना दृढाभिमान असून एतत्प्रांतीय प्राचीन इतिहाससंबंधींचा त्यांचा व्यासंगही मोठा दांडगा आहे. 'माळव्यांतील प्राचीन विद्वद्रत्नें' हें त्यांचें पुस्तक व माळव्यांतील प्राचीन राजवंश, माळव्याच्या प्राचीन राजधान्या, मेघदूत आणि माळवा वगैरे त्यांच्या लेखमाला त्यांच्या व्यासंगाचें उत्तम द्योतक आहेत. त्यांचा हा व्यासंग पाहूनच प्रस्तुत 'मध्यभारतीय मराठी वाङ्मय' हा ग्रंथ

लिहिण्याची कामगिरी संमेलनाच्या कार्यकारी मंडळानें मुद्दाम त्यांच्याकडे सोपविली व ती त्यांनीं माळव्याविषयीं आपल्या अंतःकरणांत वसत असलेल्या निरतिशय प्रेमामुळेंच व्यावसायिक जबाबदाऱ्यांचा भार आणि प्रकृतीचें अस्वास्थ्य सहन करून मोठ्या आनंदानें, तत्परतेनें आणि निरपेक्षबुद्धीनें उत्तम प्रकारें बजाविली याबद्दल ते केव्हांही धन्यवादास पात्र आहेत.

'मध्यभारतीय मराठी वाङ्मय' या ग्रंथांत श्रीयुत कवचाळे यांनीं इ. स. १८६१ पासून १९३६ पावेतों मध्यहिंदुस्थानांत निर्माण झालेल्या मराठी वाङ्मयाचा विस्तृत परिचय करून देण्याचा प्रयत्न केला आहे. आतांपावेतों समग्र मराठी वाङ्मयनिर्मितीचा त्रोटक किंवा विस्तृत परिचय करून देण्याचे प्रयत्न अनेक लेखकांनीं निरनिराळे दृष्टिकोण धरून केलेले आहेत; परंतु श्रीयुत कवचाळे यांच्यासारखा एखाद्या प्रांतिक मराठी वाङ्मयनिर्मितीचा अभिनिवेशपूर्वक परिचय करून देण्याचा प्रयत्न मात्र कोणी केला असल्याचें, निदान आमच्या तरी, पाहाण्यांत आलेलें नाहीं त्यामुळें सम्मेलनाच्या कार्यकारी मंडळाची कल्पना आणि तिचें दृश्यफल अशी श्रीयुत कवचाळे यांची प्रस्तृत कृति यांची अभिनवता अभिनंदनीय वाटावी यांत आश्चर्य तें कोणतें ? मध्यहिंदुस्थान हा बृहन्महाराष्ट्राचा एक महत्त्वाचा भाग असून दिग्विजयी महाराष्ट्राच्या अस्तंगत स्वराज्याचे मोटमोठे अवशेष या भागांत असल्यामुळें महाराष्ट्राशीं त्याचें नातें विशेष जिव्हाळ्याचें रहावें, हें साहजिक होय. या नात्याच्या योगानेंच मराठी भाषेविषयीं जागृत भक्ति अंतःकरणांत राहून मध्यहिंदुस्थानच्या हातून तिची आजवर सेवा घडत आलेली आहे. त्या सेवेचा शक्य तेवढा पूर्ण व साधार वृत्तांत श्रीयुत कवचाळे यांच्या प्रस्तुत ग्रंथांत पहावयास सांपडेल. या ग्रंथाची पूर्वपीठिका अत्यंत लालित्यपूर्ण भाषेंत लिहिलेली आहे. मालव देशाचा पूर्व लौकिक व त्यांत झालेला प्राचीन

साहित्योत्कर्ष, मराठी भाषेचा पूर्वेतिहास, मध्यहिंदुस्थानांत झालेली मराठी भाषेची प्राणप्रतिष्ठा व वाढ, तेथील राजकुलांनीं केलेली वाङ्मयसेवा व त्यांच्या आश्रयाखालीं निर्माण झालेलें वाङ्मय वगैरे संबंधाची मोठी महत्त्वाची व तितकीच मनोरंजक अशी विविध माहिती या पूर्वपीठिकेंत दिलेली आहे. ती वाचून या प्रांताची पूर्वप्रतिष्ठा वाचकांना कळून येईल व त्या योगानें त्यांच्या अंतःकरणांत या प्रांताविषयीं एक प्रकारचा विशेष आदर उत्पन्न होऊन तेथील साहित्यिकांच्या वाङ्मयसेवेकडे पाहाण्यास ते आकर्षिले जातील अशी आम्हांस खात्री आहे. आमच्या मतें हें प्रकरण अतिशय सुंदर वठलें आहे. यानंतरच्या निरनिराळ्या प्रकरणांत वाङ्मयाच्या विविध शाखांतून जी ग्रंथनिर्मिति मध्यहिंदुस्थानांत झाली आहे तिचा विषयवार विस्तृत आढावा देण्यांत आला आहे. त्यांत कांहीं ग्रंथांच्या नुसत्या अंतरंगांची त्रोटक माहिती दिली गेली आहे, तर कांहींची कथानकें निवेदिलीं गेलीं आहेत आणि कांहींची यथोचित गुणदोष-चिकित्साही केली गेली आहे. ती चिकित्सा समतोल बुद्धीची असल्यामुळें वाचकांस खरोखर उद्बोधक होईल. श्रीयुत कवचाळे यांच्या आढाव्यांतील एकंदर ग्रंथांची संख्या ५०० च्या जवळ जवळ आहे. एवढी ग्रंथनिर्मिति मध्यहिंदुस्थानांत झाली असेल अशी कल्पना एकाएकीं कोणास होणें कठिण आहे. स्वतः श्रीयुत कवचाळे यांचा प्रथम अंदाज २०० पावेतोंच्या ग्रंथांचा होता; परंतु जों जों ते ग्रंथ संशोधनाचा अधिकाधिक प्रयत्न करूं लागले तों तों त्यांना सारखे आणखी आणखी ग्रंथ उपलब्ध होत जाऊन ती संख्या जवळ जवळ अडीच पटीनें वाढून गेली! वास्तविक एवढ्या वाङ्मयवृध्द्यर्थ लागणारी परिस्थिति व साधनें मध्यहिंदुस्थानांतील महाराष्ट्रीयांना अनुकूल नसतांनाहीं केवळ त्यांनीं आपल्या मायभाषेवरील निःसीम प्रेमामुळेंच मराठी सारस्वताच्या मुख्य प्रवाहास आपल्या हातानें इकडील वाङ्मय-

जीवनाचे कलश ओतून बरीच पुष्टता आणली आहे, त्याचें यथातथ्य चित्र श्रीयुत कवचाळे यांच्या प्रस्तुत ग्रंथांत पहावयास सांपडेल. श्रीयुत कवचाळे यांनीं विषयवार शाखा करून प्रत्येक शाखेंतील ग्रंथनिर्मितीचा आढावा देतांना प्रारंभीं त्या शाखेचा पूर्ववृत्तांत थोडक्यांत दिला आहे व नंतर एकेक ग्रंथाचा ओघाओघानें परामर्श घेतला आहे. तो परामर्श त्यांनीं प्रत्येक ग्रंथ वाचून लिहिला असल्याचें दिसून येतें. या कामीं अज्ञात, दुर्मिळ व स्मृतिशेष असे अनेक ग्रंथ मिळविण्यांत, त्यांतील बहुतेक सर्व नजरेखालीं घालण्यांत व महत्त्वाचें तेवढे अभ्यासण्यांत श्रीयुत कवचाळे यांना किती परिश्रम पडले असतील, हें आह्मांस सांगण्याची तादृश्य आवश्यकता नाहीं. कारण 'विद्वानेव हि जानाति विद्वज्जन परिश्रमम्'! ललितरम्य ओघवती भाषा, अभिनव पद्धतीनें केलेली विषयाची मांडणी, चिकित्सा-पूर्वक ग्रंथावलोकन करून त्यांवर प्रकट केलेलीं मतें व अगदीं निःपक्षपात राखलेली दृष्टि यांच्या योग्य मिलाफानें श्रीयुत कवचाळे यांचा हा ग्रंथ सरस उतरला आहे. या ग्रंथांतील कांहीं पुस्तकांवरील ग्रंथकाराचे अभिप्राय व 'समालोचन' कारांनीं त्याच पुस्तकांवर दिलेले अभिप्राय हे कांहींसे भिन्न आहेत; पण रुचिवैचित्र्य व वैयक्तिक दृष्टिकोण यांच्या योगानें असा फरक घडणें साहजिक आहे. तसेंच मूळ महाराष्ट्राचे रहिवासी असून व्यवसायानिमित्त इकडील भागांत येऊन राहिले असतांना कीर्तने, वासुदेवराव आपटे वगैरेसारख्या साहित्यिकांनीं जीं पुस्तकें लिहिलीं आहेत त्यांचा अंतर्भाव मध्यभारतीय वाङ्मयांत व्हावा किंवा नाहीं हाही एक विचारणीय प्रश्न आहे. अस्तु. तथापि एकंदरींत बरेच परिश्रम घेऊन श्रीयुत कवचाळे यांनीं या ग्रंथद्वारें, कल्पनेच्या बाहेर निर्माण झालेल्या, साऱ्या मध्यभारतीय मराठी वाङ्मयाचा खरोखरच सुंदर परिचय करून दिला आहे; इतकेंच नव्हे तर त्या वाङ्मयाचा अखिल मराठी वाङ्मयांत वास्तविक

दर्जा काय आहे हेंही त्याबरोबर निःपक्षपातानें विशद करून दाखविलें आहे. यामुळें आधुनिक समग्र मराठी वाङ्मयाचा इतिहास लिहिणाऱ्या लेखकांस यापुढें मध्यहिंदुस्थानच्या वाङ्मयाविषयीं लिहितांना श्रीयुत कवचाळे यांच्या सदर ग्रंथाचा फारफार उपयोग होईल, अशी आह्मांस पूर्ण खात्री आहे. श्रीयुत कवचाळे यांचा 'उपसंहार' ही 'पूर्वपीठिके' प्रमाणें मोठ्या महत्त्वाचा असून त्यांत त्यांनीं भावि वाङ्मय अधिक प्रभावी व कार्यक्षम व्हावें ह्मणून ज्या विविध सूचना केल्या आहेत त्या निःसंदेह मोलाच्या असून होतकरू लेखकांस योग्य मार्गदर्शक होतील अशा आहेत.

येथें एका नको असलेल्या अप्रिय गोष्टीचाही निर्देश करणें कांहीं कारणामुळें आम्हांस अवश्य वाटतें. ती गोष्ट ह्मणजे आपल्या धाकट्या मालव-बंधूंविषयीं ज्येष्ठ महाराष्ट्र-बंधूंना वाटणारी अनास्था ही होय. महाराष्ट्रांत वर्तमानपत्रें, मासिकें, त्रैमासिकें, माला वगैरे वाङ्मय-प्रसिद्धीचीं विपुल साधनें हाताशीं आहेत; परंतु माळव्यांत तशा साधनांचा पूर्वीपासूनच अभाव रहात गेल्यामुळें इकडील साहित्यिकांची सदाच कुचंबणा होत राहून त्यांना आपला लेखनरूपी माल वाचकां-पुढें मांडण्यास आपल्या ज्येष्ठ महाराष्ट्र-बंधूंकडे धांवावें लागतें व त्यांत अधिकतः निराशाच त्यांच्या वांट्यास येतें. आपल्या कनिष्ठबंधूंच्या कृतींकडे सहानुभूतीनें किंवा प्रेमळदृष्टीनें पाहण्याची सहसा इच्छाच त्यांना होत नाहीं, असा त्यांच्यावर मालव-बंधूंचा आरोप आहे. सबब या मालव-बंधूंच्या वतीनें माझ्या ज्येष्ठ महाराष्ट्र-बंधूंस माझी एवढीच विनंति आहे कीं, कोणत्या ठिकाणीं, कोणत्या परिस्थितींत व कोणत्या वातावरणांत आपले कनिष्ठ बंधु मातृभाषेची जयजयकारपूर्वक सेवा करून वाङ्मय निर्माण करीत आहेत या गोष्टीकडे त्यांनीं लक्ष दिल्यास त्यांच्या कनिष्ठ बंधूंच्या कार्य-कर्तृत्वाबद्दल त्यांना वाटत असलेली एक प्रकारची निष्कारण साशंकता खात्रीनें दूर होईल व त्या बंधूंच्या

कृति त्यांच्या कौतुकास व आदरास पात्र होतील. श्रीयुत कवचाळे यांच्या ग्रंथानें मध्यहिंदुस्थानांतील लेखकांनीं निर्माण केलेलें वाङ्मय बरेंच सकस असून त्यांतील कांहीं कांहीं ग्रंथ तर महाराष्ट्रांतील लेखकांनीं निर्माण केलेल्या ग्रंथांच्या अगदीं जोडीतोडीचे आहेत, असें आमच्या ज्येष्ठ महाराष्ट्र बंधूंस कळून येईल. व्यवहारांत दूरत्वामुळें प्रेम कमी न होता उलट दुणावतें व आपल्या मुलुखापेक्षां पर मुलुखांत गाजविलेले पराक्रम कदाचित् दर्जानें कमीही असले तरी मोलानें अधिक ठरतात. या न्यायानुसार आपले संकुचित विचार व अयोग्य दृष्टिकोण बदलून महाराष्ट्रापासून दूर अंतरावर आपले कनिष्ठबंधु करीत असलेल्या कार्याकडे महाराष्ट्र--बंधूंनीं विशेष प्रेमळ दृष्टीनें व सहानुभूतीनें पहात जावें व या कनिष्ठ बंधूंनीही आपल्या त्या ज्येष्ठ बंधूंच्या गुणांचें योग्य अनुकरण करून त्यांच्या लोभास अधिकाधिक पात्र होत जावें, अशी आमची उभयतांना विनंति आहे.

अस्तु. मराठी साहित्याचे दोन इतिहास-ग्रंथ प्रकाशित करण्याचें संमेलनाच्या कार्यकारी मंडळानें ठरविलें त्यावेळीं मंडळाला पहिल्या ग्रंथाविषयीं विशेष काळजी नव्हती; परंतु दुसऱ्या ग्रंथाविषयीं अतिशय काळजी वाटणें अगदीं साहजिक होतें. कारण पहिल्या ग्रंथासाठीं लागणारी साधनसामुग्री बरीच उपलब्ध होती तशी दुसऱ्या ग्रंथासाठीं लागणारी साधनसामुग्री उपलब्ध नव्हती. इतकेंच नव्हे तर मध्य-हिंदुस्थानांत आतांपावेतों मराठी वाङ्मय किती निर्माण झालें याची जुजबी माहितीही गोळा करण्याचा प्रयत्न कोणाकडून झालेला नव्हता. अर्थात् अशा परिस्थितींत निरलसपणें व चिकाटीनें सर्व साधानसामुग्री स्वतः जातीनें एकत्रित करून ग्रंथ लिहिणारा कष्टाळु, व्यासंगी व विवेचक बुद्धीचा लेखक त्यासाठीं पाहिजे होता. सुदैवानें तसा श्रीयुत कवचाळे यांच्यासारखा सुयोग्य लेखक आढळून कार्यकारी मंडळाला वाटणारी काळजी दूर झाली. मंडळाच्या विनंतीला तत्काळ

मान देऊन श्रीयुत कवचाळे यांनीं तें काम पत्करलें व कोणत्याही अडचणीची दरकार न बाळगतां सतत झटून त्यांनीं तें शेवटीं तडीसही नेलें. श्रीयुत कवचाळे यांचा हा ग्रंथ त्यांच्या अंगीं वसणाऱ्या गुणांची व कर्तृत्वशक्तीची उत्तम साक्ष देणारा आहे. या ग्रंथानें त्यांच्या लौकिकांत खात्रीनें मोठी भर पडेल व असेच निरनिराळ्या प्रांतिक मराठी वाङ्मयाचे इतिहास-ग्रंथ निर्माण करण्यास त्यांचा हा ग्रंथ प्रेरक होईल, असा आम्हांस पूर्ण विश्वास वाटतो. देवासला श्रीयुत कवचाळे यांच्यासारखा गुणी साहित्यिक लाभला आहे त्याच्या गुणांची [illegible] सुविद्य, उदारधी व गुणग्राही अधिपति आणि इंदूरच्या संमेलनाचे स्वागताध्यक्ष श्रीमंत सरकार विक्रमसिंहराव पवार, बी. ए., सेनासप्तसहस्री, महाराजासाहेब बहादुर हे करतीलच. कारण ' गुणी गुणंवेत्ति ' हें सुभाषित सर्वविदित असून विद्वानांचे पोषिंदे व अभिजात साहित्याच्या अभिवृध्द्यर्थ झटणारे म्हणून पवार कुलाची ख्याति पूर्वीपासून परंपरागत चालत आलेली आहे!

आम्हीं २० व्या मराठी साहित्य संमेलनाच्या कार्यकारी मंडळाच्या साहित्य शाखेचे अध्यक्ष व संमेलन चिटणीस असल्यामुळें त्या दोन्ही नात्यांनीं ' मराठी साहित्य समालोचन ' या ग्रंथास ' परिचय ' लिहिण्याचें कार्य आमच्याकडे आलें होतें तसेंच याही ग्रंथास ' परिचय ' लिहिण्याचें कार्य सांप्रत आमच्याकडे आलें तें आम्हीं यथामति पार पाडलें आहे. या ग्रंथाच्या प्रकाशनानंतर संमेलन कार्यकारी मंडळ आपल्या ठरलेल्या जबाबदारींतून मोकळें होईल. श्रीयुत कवचाळे यांच्या प्रस्तुत ग्रंथानें आमच्या मतें मराठी वाङ्मय भांडारांत एका विशिष्ट ग्रंथाची निःसंदेह भर पडणार आहे; तथापि या ग्रंथाची आणखी वास्तविक योग्यता ठरविण्याचें काम ' सारज्ञ ' व ' असूयोज्झित ' अशा वाचकवर्गाचें असल्यानें तें आम्हीं त्यांजवर सोंपवितों.

## संमेलन स्मारकग्रंथाचे पुरस्कर्ते




राज्यभूषण रावबहादुर शेठ कन्हैय्यालाल भंडारी, इंदूर

*

सरते शेवटीं इंदूरचे दानशूर व साहित्यप्रेमी नागरिक राज्यभूषण रा. ब. सेठ कन्हैयालालजी भंडारी यांनीं आपले परम पूज्य वडील कै. सेठ नंदलालजी भंडारी यांच्या नांवानें संमेलनास दिलेल्या उदार देणगीच्या रकमेंतून प्रस्तुतचा ग्रंथ प्रकाशित होत असल्यानें सेठ कन्हैयालालजी यांचे आभार मानून व ज्यांच्या राजवटींत व राजधानींत मराठी साहित्य संमेलनाचा सुवर्णमहोत्सव अपूर्व थाटानें साजरा करण्यांत येऊन प्रस्तुत ग्रंथाच्या प्रकाशनाचा सुयोग लाभत आहे, त्या उदारधी श्रीमंत महाराजाधिराज राजराजेश्वर सवाई श्रीयशवंतराव होळकर बहादुर यांच्याविषयीं थोर कृतज्ञताभाव प्रकट करीत हा 'परिचय' लेख आम्हीं पूर्ण करितों.

शंकरभुवन
२१ शीख मोहल्ला, इंदूर.
कार्तिक शु. १ सं. १९९५
ता. २४ ऑक्टोबर १९३८

नरहर शंकर रहाळकर.

# आत्मनिवेदन

*When at the first I took my pen in hand,*
*Thus for to write I did not understand,*
*That I at all shall make to a little book,*
*In such a mode..........................*

सुप्रसिद्ध आंग्लकवि बॅनिअन् (Banyan) यानें आपल्या प्रथम लेखनाच्या वेळीं झालेल्या मनःस्थितीचें जें वर्णन वरील कवितेंत केलें आहे अगदीं तशीच माझीही मनःस्थिति प्रस्तुत ग्रंथ लिहावयास हातीं घेतांना झालेली होती; परंतु इंदूर येथील २० व्या मराठी साहित्य संमेलनाच्या कार्यकारी मंडळानें हा ग्रंथ लिहिण्याची मला अगत्यानें केलेली आज्ञा व त्या बाबतींत माझ्यामागें एकसारखी लाविलेली निकड यामुळें शेवटीं दृढतेनें कार्यप्रवृत्त होणें मला अगदीं भाग्य पडलें. इ. स. १९३५ च्या डिसेंबरांत संमेलनाच्या प्रसंगीं हा ग्रंथ प्रसिद्ध व्हावा, अशी कार्यकारी मंडळाची फारफार इच्छा होती; परंतु त्याच सुमारास प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें व प्रारंभीं ग्रंथाच्या केलेल्या आंखणींत अगदीं ऐनवेळीं आमूलाग्र बदल करणें अवश्य वाटल्यामुळें तयार झालेलें हस्तलिखित तसेंच बाजूला टाकून मंडळाची इच्छा मला नाइलाजानें पूर्ण करतां आली नाहीं, याबद्दल अत्यंत दिलगिरी वाटते.

एका प्रांतिक मराठी वाङ्मयनिर्मितीचा समग्र वृत्तांत कथन करण्याची या ग्रंथाची कल्पना अगदीं अभिनव असल्यानें हा ग्रंथ शक्य तेवढा पायाशुद्ध, माहितीपूर्ण व उद्‌बोधक व्हावा असें वाटणें कोणालाही साहजिक आहे. या कारणामुळेंच संमेलन कार्यकारी

मंडळाची ग्रंथप्रकाशनासंबंधीं सारखी टोंचणी मागें असतांही मी तिला न जुमानतां, दिरंगाईबद्दलचा राग निमूटपणें सहन करीत, शेवटी आज तीन वर्षांनीं मनाची उद्दिष्टपूर्ति करणारा हा ग्रंथ मंडळाच्या हातून वाचकांस सादर करीत आहे. अर्थात् या दिरंगाई-बद्दल सर्वस्वीं मीच जबाबदार आहे, मंडळ नव्हे. वाचकांचाही ग्रंथप्रकाशनाच्या दिरंगाईबद्दलचा राग व्हावयाचा असल्यास तो मजवरच व्हावा म्हणून हा खुलासा मी येथें मुद्दाम करीत आहे.

मध्यभारत ऊर्फ मध्यहिंदुस्थान हा भाग मराठी भाषा व्यवहारांत असलेल्या प्रांतापासून दुरावलेला आहे. या भागाची सर्व बाजूंनीं कशी परिस्थिति आहे व तशा परिस्थितींतही मराठी भाषेची जोपासना व वाङ्मयनिर्मिति येथें कशी होत आली आहे याची स्पष्ट कल्पना माझ्या प्रस्तुत ग्रंथानें वाचकांस होईल, अशी मला खात्री आहे. वास्तविक मध्यभारतांत आतांपावेतों मराठी वाङ्म किती निर्माण झालें, मध्यभारतीय लेखकांनीं किती वाङ्मयोपासना केली, नियत-कालिकें व वाङ्म-संस्था येथें किती निघाल्या, तसेंच येथील लेखकांनी वैशिष्ट्यपूर्ण अशी कामगिरी कोणती झाली या सर्वांविषयींची माहिती आजवर कोणीच संकलित केलेली नाहीं; तथापि ग्वाल्हेरचे श्रीयुत भा. रा. भालेराव यांनीं मागें 'सहविचार' (आगस्ट १९२२) व 'मालव साहित्य' (वर्ष २ अंक २) या त्रैमासिकांतून अनुक्रमें उत्तर हिंदुस्थानांतील मराठी साहित्य व साहित्यसेवक व उत्तर हिंदुस्थानांतील प्राचीन मराठी सारस्वत आणि तसेंच 'हितचिंतक' मासिकांतून (वर्ष १ अंक १) ग्वाल्हेर येथील मराठी साहित्य व साहित्यसेवक हे लिहिलेले लेख, श्रीयुत ना. कृ. वैद्य यांचा 'महाराष्ट्र साहित्य पत्रिकें' तील (वर्ष ४ अंक २) माळव्याचीं ऐतिहासिक स्थित्यंतरें आणि मराठी साहित्य हा लेख व प्रस्तुत लेखकाचे 'देवास येथील मराठी साहित्य व साहित्यसेवक' हें पुस्तक एवढे कांहींसे त्या दृष्टींचे संकीर्ण

अंत्रीवजा प्रयत्न झालेले आहेत. त्यांचा योग्य तो फायदा घेऊन व त्याशिवाय महाराष्ट्रीय ज्ञानकोश मंडळानें तयार केलेली ‘ महाराष्ट्रीय वाङ्मयसूचि ’, बडोद्याहून प्रसिद्ध झालेलें ‘ अर्वाचीन मराठी वाङ्मय’ व बडोद्याचेच माझे मित्र श्रीयुत ग. रं. दंडवते यांनीं लिहिलेले ‘संक्षिप्त अर्वाचीन मराठी वाङ्मय’, ‘कादंबरीची गोष्ट’ आणि ‘नाट्य व नाट्यवाङ्मय ’, प्रो. द. वा. पोतदार यांच्या लेखणींतून उतरलेला ‘ मराठी गद्याचा इंग्रजी अवतार ’ श्रीयुत रा. भि. जोशी यांनीं निर्मिलेली ‘ मराठी भाषेची घटना ’ हे सर्व ग्रंथ आणि ‘ यशवंत ’ मासिकानें सन १९३० व १९३१ मध्यें काढलेले खास ‘ साहित्य संमेलनांक ’ व श्रीयुत ल. ज. खरे यांनीं ‘ विविधज्ञानविस्तारां ’ तून (पु. ४८ अं. ७-८-९ ) प्रसिद्ध केलेला मराठी वाङ्मयाची गेल्या शंभर वर्षांतील वाढ हा विस्तृत लेख यांच्यापासूनही मी बराच फायदा घेतला आहे; परंतु या सर्व फायद्यांचा उपयोग मला मध्यभारतीय ग्रंथांची विस्तृत सूची तयार करण्यापलिकडे फारसा झालेला नाहीं. सूचींतिल ग्रंथ प्रत्यक्ष मिळविण्यास व त्याशिवाय जुन्या मंडळींच्या आठवणींतून नवीन कळलेले ग्रंथ धुंडाळून काढण्यास मला प्रथम जातीनें किती खटपट करावी लागली, नंतर मिळविलेले ग्रंथ वाचून त्यांचीं टांचणें तयार करणें व मग त्यांचे विषयवार वर्गीकरण करून त्या टांचणांधारें सुसंगत मजकूर लिहून काढणें, या लिहिण्यांत ज्या त्या ग्रंथाच्या महत्त्वाप्रमाणें त्यांतील भाव विशद करून गुणावगुणांचें परीक्षण करणें, अवश्य असल्यास कोठेंकोठें तांत्रिक व त्रोटक माहिती देणें अथवा ग्रंथाच्या अंतरंगाचा परिचय करून देणें वगैरे कामें करतांनाही मला किती परिश्रम घ्यावे लागले, हें मीं सांगण्याची आवश्यकता नाहीं. वाचकांस माझा समग्र ग्रंथ वाचून त्याची कल्पना होण्यासारखी आहे; तथापि या सर्व परिश्रमाबद्दल मला कांहींच वाटत नाहीं. उलट कार्यकारी मंडळानें प्रेरणा करून आणि मध्यभारताचे

प्रथितयश कवि व टीकाकार श्रीयुत न. शं. रहाळकर आणि श्रीयुत वि. ह. आपटे यांनीं आपुलकीनें प्रोत्साहन देऊन हें कार्य माझ्याकडून करवून घेतलें याबद्दल त्यांचें ऋणच मला सदोदित डोळ्यांपुढें दिसत आहे !

हा ग्रंथ लिहिण्यास घेतांनाच मी समोर ठेविलेले उद्देश मर्यादित होते व त्या उद्देशाप्रमाणें मी कोणत्याही प्रकारची तात्त्विक चर्चा या ग्रंथांत न करतां सन १८६१ पासून १९३६ पावेतोंच्या काळांत मध्य-भारतामध्यें व मध्यभारतीय लेखकांकडून निरनिराळ्या वाङ्मयशाखांतून मराठी वाङ्मय किती निर्माण झालें याचा विस्तृत परिचय करून दिला आहे. हा परिचय अगदीं संपूर्ण व निर्दोष आहे, अशी प्रौढी मी मिरवीत नाहीं. कदाचित् स्मरणांतून गळाल्यामुळें कांहीं ग्रंथ राहून गेले असतील तर कांहींचा अनुपलब्धीमुळें नामनिर्देश झाला नसेल. तसेंच कित्येक ग्रंथांचें अंतरंग निवेदितांना त्यांतील भाव बरोबर विशद झाले नसतील अथवा कांहीं ग्रंथांचें गुणदोषदर्शन यथार्थ रीतीनें झालें नसेल. या व्यतिरिक्त आणखींही कांहीं वैगुण्यें राहिलीं असतील; परंतु हा सर्व ' अथ ' पासून 'इति' पावेतोंचा केवळ एकट्या व्यक्तीनेंच जातीनें झटून केलेला प्रयत्न असून एखाद्या प्रांतिक वाङ्मयाचा एवढा स्वतंत्र व विस्तृत वृत्तांत लिहिण्याचा हा नवीन उपक्रमही आहे तेव्हां या गोष्टींकडे अवश्य लक्ष पुरवून वाचकवर्ग माझ्या या ग्रंथांत आढळणाऱ्या दोषांबद्दल क्षमा करतील, असा मला पूर्ण भरंवसा आहे. याबरोबरच येथें आणखी एका गोष्टीची क्षमा मागून घेणें मला उचित वाटतें. ती गोष्ट म्हणजे माझ्या ग्रंथांत कित्येक ठिकाणीं कांहीं प्रमुख ग्रंथकारांच्या कृतींचा परामर्ष घेतांना लिहिण्याच्या भरांत टीका करण्यांत आली आहे किंवा विरुद्ध मतें प्रकट केलीं गेलीं आहेत; परंतु माझी ती टीका किंवा मतें कोणत्याही विपरीत म्हणानें हेतुपुरःसर लिहिलेलीं नाहींत व तीं केव्हांही

निर्णायक असूं शकत नाहींत; फक्त तीं सूचक ह्मणून आहेत; तथापि त्यांत कांहीं उणेंअधिक कोणास आढळल्यास त्याकडे त्यांनी हंसक्षीर दृष्टीनें पहाण्याची अवश्य कृपा करावी, अशी त्यांस माझी नम्र विनंति आहे.

श्रीयुत रहाळकर यांनीं माझ्या प्रस्तुत ग्रंथास जो 'परिचय' लिहिला आहे त्यांत त्यांनीं "मूळ महाराष्ट्राचे रहिवासी असून व्यवसायानिमित्त इकडील भागांत येऊन राहिले असतांना, कीर्तने, वासुदेवराव आपटे वगैरेसारख्या साहित्यिकांनीं जीं पुस्तकें लिहिलीं आहेत त्यांचा अंतर्भाव मध्यभारतीय वाङ्मयांत व्हावा किंवा नाहीं हा विचारणीय प्रश्न आहे" असें एके ठिकाणा ह्मटलें आहे सबब त्या बाबतींत येथें खुलासा करणें अवश्य आहे. कीर्तने ( ह्मणजे विनायक जनार्दन व नीळकंठ जनार्दन ), वासुदेवराव आपटे 'वगैरे' मंडळी मूळचीच पुण्याकडची होती यामुळें मी त्यांच्या सर्व ग्रंथांचा अंतर्भाव मध्यभारतीय वाङ्मयांत करीत नाहीं व केलेलाही नाहीं; परंतु ही मंडळी इंदुरास नोकरीस असतांना त्यांनीं जे इकडे ग्रंथ निर्माण केले त्यांचाच फक्त अंतर्भाव मी मध्यभारतीय वाङ्मयांत केलेला आहे, कारण त्या ग्रंथांची मातृभूमि मध्यभारत असल्यानें मध्यभारताची त्यांवर मालकी राहणें माझ्या मतें योग्य आहे. याच्या उलटही मी जी गोष्ट केली आहे ती देखील याबरोबरच येथें सांगून टाकणें मला उचित वाटते. ही गोष्ट ह्मणजे जगन्नाथ रावजी टुल्लु, अनंत नारायण भागवत, माधवराव व्यंकटेश लेले, डॉ. भास्करराव टेंबे वगैरे मंडळी मध्यभारतांतीलच असल्यामुळें नोकरीनिमित्त किंवा कारणपरत्वें त्यांना मध्यभारताच्या बाहेर जाऊन रहावें लागलें व त्यांनीं तिकडे असतांना जी ग्रंथनिर्मिति केली तिचा मी मध्यभारतीय वाङ्म्यांत निःसंकोचपणें समावेश करून घेतला आहे, कारण ही मंडळी मध्यभारतीय साहित्यिक मंडळाचे मोठमोठे घटक आहेत. मला वाटतें माझी ही विचारसरणी व हा खुलासा योग्य वाटून सर्वांचें समाधान होईल.

अस्तु. हा ग्रंथ लिहावयास हातीं घेतल्यापासून तों पूर्ण लिहून हातावेगळा होईपावेतों तो कसा काय उतरेल, त्याच्यासाठीं लागणारीं साधनें कशीं मिळूं शकतील, जेथें ग्रंथ लिहिण्याच्या कामीं अवश्य लागणाऱ्या सर्वच गोष्टींची उणीव अशा देवाससारख्या ठिकाणीं बसून आपलें उद्दिष्ट कसें साधतां येईल वगैरेबद्दल माझें मन नेहमींच साशंक रहात असे; परंतु माझे सुहृद् श्रीयुत चिंतामण गणेश ओक व श्रीयुत गोविंद लक्ष्मण झोकरकर यांनीं वेळोवेळीं मला धीर देत राहून योग्य सूचना आणि सहाय्य केल्यामुळेंच मला हें अंगीकृत कार्य पुरतें करतां आलें सबब याबद्दल येथें त्यांच्या कृतज्ञतापूर्वक उल्लेख करून ठेवणें मला अवश्य वाटतें.

प्रस्तुत ग्रंथाचा पहिला आराखडा ज्यावेळीं तयार केला गेला त्यावेळीं ग्रंथाचीं १५० पावतों पृष्टें होतील असा अजमास होता व तेवढ्या पृष्टांची मंजुरी संमेलनाच्या कार्यकारी मंडळाकडून देण्यांत आली होती; परंतु जसजसें संशोधन सुरूं करून प्रत्यक्ष ग्रंथ लिहूं लागलों तसतशी पृष्ठसंख्या वाढतच जाऊन ती थेट दुपटीच्यावर पोंचली तेव्हां त्यांत काय कमी करावें हें पाहण्याच्या हेतूनें समग्र हस्तलिखित कसून तपासून पाहिलें असतांहीं कोठें कमी करण्यासारखें न आढळल्यावरून ही गोष्ट कार्यकारी मंडळापुढें मांडली. त्यावर कार्यकारी मंडळांत चर्चा होऊन ग्रंथाच्या हस्तलिखितांत ज्या अर्थी कमी करण्यासारखें कांहीं नाहीं त्या अर्थी संपूर्ण हस्तलिखित छापलें जावें, अशी कार्यकारी मंडळानें सहानुभूतिपूर्वक परवानगी दिली, ही मंडळाची कृपा येथें नमूद करणें मीं माझें कर्तव्य समजतों.

हा ग्रंथ लिहिण्याच्या कामीं मदत देण्याकरितां माझ्या विनंतीला मान देऊन कित्येक लेखकांनीं आपापले ग्रंथ उदार अंतःकरणानें पाठविले, कित्येक वाङ्मयप्रेमी विद्वानांनीं निरनिराळ्या प्रकारची माहिती पुरविली व दुर्लभ ग्रंथही मिळवून दिले; तसेंच माझे ज्येष्ठ

आतेबंधु व ह. भ. प. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर यांनीं आपल्या 'चरित्रचंद्रां' त स्वतःच्या मित्रमंडळामध्यें इतिहाससंशोधक, अभ्यासक व वाङ्मयप्रेमी ह्मणून ज्यांचा गौरव केला ते ती. रा. रा. गोविंद बळवंत माकोडे यांनीं व ग्वाल्हेरच्या 'मातृभूमि कार्यालया' चे चालक श्रीयुत का. गो. पिंगळे यांनीं वेळोवेळीं दुर्मिळ माहिती कळविली, तसेंच 'केसरी', 'महाराष्ट्र', 'ज्ञानप्रकाश', 'जयाजी-प्रताप', 'सेंट्रल इंडिया टाम्स' इत्यादि 'मराठी, हिंदी व इंग्रजी नियत-कालिकांनीं, माझ्या प्रस्तुत ग्रंथासंबंधींचीं विनंति--पत्रकें प्रसिद्ध करून, ग्रंथलेखनास जी मदत केली आणि इंदूरच्या 'श्रीनाथ प्रेस' चे व्यवस्थापक श्रीयुत रा. ना. कुळकर्णी व मॅनेजर श्रीयुत देशमुख यांनीं ग्रंथाची छपाई चांगली करून देऊन महाराष्ट्राचे प्रख्यात चित्रकार व माझे मित्र श्रीयुत वि. ना. गोलिवडेकर यांनीं 'रॅपर' करितां सुबक कलापूर्ण चित्र काढून दिलें याबद्दल मी वरील सर्वांचा अत्यंत आभारी आहे.

शेवटीं हा ग्रंथ मजकडून लिहवून घेतल्याबद्दल इंदूरच्या संमेलन कार्यकारी मंडळाचे पुनः एकवार आभार मानून माझा हा ग्रंथ संशोधकांस, अभ्यासकांस व वाचकांस उपयुक्त, उद्‌बोधक व मनोरंजक होवो व रसिक विद्वानांकडून त्याचा योग्य तो परामर्ष घेतला जाऊन त्यांच्या कौतुकास तो पात्र होवो, असें चिंतीत हें आत्म-निवेदन पुरें करितों.

देवास,
ता. ७-११-३८. इ. } कृष्णाजी गंगाधर कवचाळे

# लेखकाचा अल्प परिचय.

श्रीयुत कृष्णाजी गंगाधर कवचाळे यांचा जन्म देवास येथें शके १८२३ माघ कृष्ण प्रतिपदेस होऊन मॅट्रिकपावेतों यांचें शिक्षणही देवास येथेंच झालें. वयाच्या १७ व्या वर्षापासून यांचे लेख व कविता नियतकालिकांतून प्रसिद्ध होऊं लागल्या. 'मल्लारी मार्तंड विजय', 'मार्तंड' व काव्यरत्नावलि यांतून यांच्या बऱ्याच कविता प्रसिद्ध झाल्या असून 'नवयुग' मासिकांतून व 'श्री शिवाजी' साप्ताहिकांतून यांच्या कांहीं गोष्टीही प्रसिद्ध झाल्या आहेत. तसेंच 'सचित्र करमणूक', 'भारतमित्र', 'हिताचिंतक' वगैरे मासिकांतून यांचे कांहीं विविध स्फुट लेखही आले आहेत. माळव्याच्या इतिहासावरील एक व्यासंगी लेखक म्हणून यांची अलीकडे विशेष ख्यातिं आहे. 'सहविचार' व मालवसाहित्य' या त्रैमासिकांतील यांच्या अनुक्रमें 'माळव्याच्या प्राचीन राजधान्या' व 'माळव्यांतील प्राचीन राजवंश' या लेखमाला आणि 'विविधज्ञानविस्तार', 'चित्रमयजगत्', 'श्री शिवाजी' मधील माळव्याच्या इतिहासावरील अनेक विविध लेख यांच्या व्यासंगाचे उत्तम द्योतक होत. 'माळव्यांतील प्राचीन विद्वद्रत्नें' या यांच्या पुस्तकास इंदूरच्या मराठी ग्रंथोत्तेजक मंडळाकडून पारितोषिक मिळालें होतें. यांच्या कांहीं लेखांचे हिंदी व कानडी भाषांत अनुवाद झाले आहेत. शिवाय यांनीं स्वतःही कांहीं हिंदी लेख हिंदी मासिकांतून लिहिले आहेत. देवासच्या माजी 'श्री शिवाजी' पत्राचे हे संचालक होते. आतांपावेतों यांचीं एकंदर सहा पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत. हल्लीं हे देवास सीनियर संस्थानच्या कौन्सिलचे सेक्रेटरी आहेत.



हें सारस्वताचें गोड ।
तुम्हींचि लाविलें जी झाड ।
तरी अवधानामृतें वाड ।
सिंपौनि कीजौ ॥

* * * *

मग हें रसभावफुलीं फुलैल ।
नाना फळभारें भरैल ।
तुमचेनि प्रसादें होईल ।
उपयोगु जगा ॥

—ज्ञानेश्वर

# विषयानुक्रमणिका

[ विषयांपुढील आंकडे पानांचे आहेत. ]

---

# शुद्धिपत्र

[ यांत सहज समजण्याजोगीं अशुद्धें वर्जून मुख्यमुख्य अशुद्धें निर्देशिलीं आहेत. ]

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ४ | २६ | आदर | आदर, |
| ११ | १७ | धर्मशास्त्रावरलि | धर्मशास्त्रावरील |
| १३ | २४ | पुंड | पुंड्र |
| १३ | २६ | पुंडानंतर | पुंड्रानंतर |
| १९ | २३ | असतात ? | असतात ! |
| ३१ | ११ | लक्ष्यांत | लक्षांत |
| ३७ | २३ | गावे तितके गोडवे | गाडवे गावे तितके |
| ४० | १२ | मानाजीपंताची ' बखर | मानाजीपंताची बखर', |
| ४१ | २६ | प्रथमत; | प्रथमतः |
| ५१ | २६ | खडी | खर्डा |
| ५७ | १० | यश्चयावत् | यच्चयावत् |
| ६४ | ११ | रेनॉल्सच्या | रेनॉल्डसच्या |
| ६४ | २६ | जमनेंने | जमनानें |
| ६५ | २ | रामनंदानें | रामानंदानें |
| ६५ | १२ | ' पुप्पवन ' | ' पुष्पवन ' |
| १०१ | १६ | ऊर्ध्यरेषे | ऊर्ध्वरेषे |
| १०२ | ४ | पुस्तकाच्या नांवावरून | पुस्तकाच्या ' किर्लोस्कर-कृत संगीत नाटकांचे प्रयोग आणि त्यावर चार शब्द ' या नांवावरून |

| | | | |
|---|---|---|---|
| १०६ | २६ | तिला उद्युक्त केलें | उद्युक्त केलें |
| ११४ | ८ | स्वरूपयुग | स्वरूपयुत |
| ११६ | १७ | आठल्ये | आठले |
| ११६ | २३ | झालें आहे. | झालें. |
| ११८ | २३ | निघृर्ण | निर्घृण |
| १२४ | २० | ‘ कामाद्भव ’ | ‘ कामोद्भव ’ |
| १३४ | २६ | उच्छृंखल होत. | उच्छृंखल होत |
| १५३ | १४ | मतप्राय | मृतप्राय |
| १५५ | २ | विलोभनाय | विलोभनीय |
| १५९ | १७ | मांडिता | मांडिती |
| १६० | ४ | वंसू | वसूं |
| १७२ | २१ | ‘ ज्ञानेश्वरी प्रासादिक ’ | ‘ ज्ञानेश्वरी प्रास्ताविक ’ |
| १७६ | २५ | तांबे यांना कलादृष्टि | तांबे यांची कलादृष्टि |
| १७९ | १४ | पडला होता या | पडला होता. या |
| १८६ | ५ | भाग भद्र | भागभद्र |
| १९० | १७ | मध्यभारताच्या तत्कालीन | मध्यभारताचा तत्कालीन |
| १९१ | ३ | तयार करून प्रसिद्ध | तयार करवून प्रसिद्ध |
| १९२ | २० | हाउम | हाउस |
| १९२ | २१ | कर्नेल मॅलेसत | कर्नल मॅलेसन |
| १९२ | २५ | लिहिलें | लिहिलेलें |
| १९२ | २५ | रेशिमवाले यांच्या इंग्रजी चरित्रांत | रेशिमवाले यांचें इंग्रजी चरित्र |
| १९२ | २६ | होळकरशाहीविषयीं | यांत होळकरशाहीविषयीं |
| १९५ | २१ | लेखनपाटवा | लेखनपाटव |
| १९७ | ६ | (टिरला) | (टिरला), |
| २०३ | १३ | प्रकाशीत | प्रकाशित |

| | | | |
|---|---|---|---|
| २१५ | १५ | वाचकांच्या ' सोईसाठीं | वाचकांच्या सोईसाठीं |
| २२४ | ४ | देवावरचा दावा, | देवावर दावा, |
| २२४ | १९ | १९३८ | १९२८ |
| २२८ | २४ | रा. बा. दत्तात्रय बळवंत पारसनीस | रा. ब. दत्तात्रय बळवंत पारसनीस |
| २५६ | २५-२६ | गौरीचें, चरित्र | गौरीचें चरित्र, |
| २५७ | ४ | आलीं | झालीं |
| २६० | ८ | येथील | तेथील |
| २६६ | २६ | कोल्हापूर ' ग्रंथमालें ' तून | कोल्हापूर येथील ' ग्रंथमालें ' तून |
| २६७ | २१ | ' संदेश ' | ' आदेश ' |
| २७१ | २ | आध्यात्मिक वेदांतपर | आध्यात्मिक, वेदांतपर |
| २७८ | १ | ' श्रीभगवद्गीतेवर | ' श्रीभगवद्गीते ' वर |
| २८२ | १२ | सेडकर | सडेकर |
| २८५ | १ | देशाई | देसाई |
| २८७ | ४ | आवश्यकता आहे. | आवश्यकता असते. |
| २८९ | ३ | लिहिलेलीं निर्दिष्ट | लिहिलेलीं उपरिनिर्दिष्ट |
| २९३ | २ | 'एक विषनिदान व चिकित्सा ' | एक 'विषनिदान व चिकित्सा ' |
| ३०३ | २-३ | कर्तव्य अथवा 'शिल्पकलोपयोगी भूमिति ' | ' कर्तव्य अथवा शिल्पकलो-पयोगी भूमिति ' |
| ३०६ | १७ | सन १९०१-०२ | सन १८९५-१९०२ |
| ३११ | २४ | ' संगीत नाट्यविनोद ' | ' संगीत नाट्यगीतविनोद ' |
| ३१६ | ८ | लोकमतीनदर्शन | लोकमतानिदर्शन |
| ३२१ | २ | विद्वानां-कडूनही | विद्वानांकडूनही |
| ३२५ | ४ | 'मराठी वाङ्मयसूचीं' त | 'महाराष्ट्रीय वाङ्मयसूचीं ' त |

| | | | |
|---|---|---|---|
| ३२८ | १८ | बाळगणें | बाळगण्यास |
| ३३१ | २२ | डांगेवाले | डांगवाले |
| ३३१ | २२ | 'बालपिशाची' | 'बालपिशाच' |
| ३३६ | ६ | ऋषि परलोकविद्याशास्त्र-विषयक | ऋषि यांचें परलोकविद्या-विषयक |
| ३४४ | ९ | स्वरूपाचे असले ... चांगले आहेत. | स्वरूपाचा असला ... चांगला आहे. |
| ३४९ | ४ | ग्रंथोत्तेजस | ग्रंथोत्तेजक |
| ३५४ | १७ | फुकल्याबरोबर जुन्या | फुंकल्याबरोबर पाश्चात्त्य राष्ट्रांतील जुन्या |
| ३५६ | ११ | बॉरचेल | बॉस्वेल |

---

सूचनाः–पान २६९ ओळ ९-१० मध्यें 'मराठी प्रायमर' असें नांव दिलें आहे त्या जागीं 'सुलभ शिक्षण अथवा मुलींकरितां पहिलें पुस्तक' असें वाचावें.

# मध्यभारतीय मराठी वाङ्मय

## ( इ. स. १८६१–१९३६ )

## पूर्वपीठिका

**पूर्व दिव्य ज्यांचे त्यांना रम्य भावि काळ ।**

—विनायक

### मध्यभारताची व तदंतर्गत मराठी भाषेची व्याप्ति

'मध्यभारत' या नांवावरूनच भारतवर्षाचा मध्यवर्ती प्रदेश असा त्याचा अगदीं सरळ अर्थ सहज समजून येण्यासारखा आहे. १९ व्या शतकाच्या उत्तरार्धांत इंग्रजांची एकछत्री सत्ता आसेतुहिमाचल स्थापन झाल्यावर सुयंत्रित राज्यकारभाराच्या हेतूनें हिंदुस्थानचे जे निरनिराळे विभाग कायम करण्यांत आले, त्यांत त्याच्या मध्यस्थित प्रदेशाचाही एक स्वतंत्र विभाग कायम केला जाऊन त्यास इंग्रजींत 'सेंट्रल इंडिया' हें यथार्थ नांव दिलें गेलें. त्या सेंट्रल इंडियाचेंच मध्यभारत किंवा मध्यहिंदुस्थान हें अगदीं शब्दशः मराठी भाषांतर होय. या मध्यभारताचा प्रदेश दक्षिणोत्तर तिरपा पसरलेला असून

तो कित्येक लहानमोठ्या देशी संस्थानांनीं व्यापिलेला आहे आणि त्याच्या सीमेवर असलेल्या कांहीं संस्थानांचा मुलुख इतका तुटक व विचित्र रीतीनें पसरलेला आहे कीं, त्यामुळें त्याच्या चतुर्दिक् मर्यादा निश्चितपणें सांगतां येणें दुष्कर झालें आहे! आजपर्यंतच्या कोणत्याही सरकारी पुस्तकांतून मध्यभारताच्या मर्यादा अधिकृत रीत्या बरोबर न दिल्या जाण्याचें कारण बहुधां हेंच असावें; तथापि तशा कांहीं पुस्तकांतील वर्णनांवरून व नकाशांवरून स्थूलमानानें पाहूं जातां या मध्यभारताचा एकंदर प्रदेश संयुक्तप्रांत, बिहार, मध्यप्रांत, मुंबई इलाखा व राजपुताना या पांच प्रांतांनीं परिवेष्टित असल्याचें दिसून येतें. सुमारें पाव शतकापूर्वी इंग्रज सरकारनें शासनसौकर्याच्या दृष्टीनें ग्वाल्हेर संस्थानचा मुलुख पृथक् केल्याबरोबर मध्यभारताचा प्रदेश एकदम दुभंगला जाऊन त्यांतील एका भागांत दतिया, समथर, ओरछा, छत्रपुर, चरखारी, पन्ना, नागोद, अजयगड, मैहर, रीवा वगैरे संस्थानें गेलीं व दुसऱ्या भागांत भोपाळ, इंदूर, देवास उभयपाती, धार, राजगड, नरसिंगगड, बडवाणी, अलिराजपुर, झाबवा, सैलाना, रतलाम, जावरा, सीतामहू वगैरे बाकीचीं संस्थानें राहिलीं. या सर्व संस्थानांत सरसकट अठरा पगड जातींच्या लोकांची वस्ती असून त्यांतील प्रत्येक जातीची भाषा थोडीफार स्वतंत्र आहे, त्यामुळें इतर मुलुखांत एकच भाषा बारा कोसांवर बदललेली आढळते तर येथें मध्यभारतांत त्याच्या उलट अनेक भाषांचा समवाय पावलापावलां-वर पहावयास मिळतो! परंतु त्यांत आपल्या मराठी भाषेला मात्र पूर्वीपासून अगदीं मर्यादित क्षेत्र वांवरण्यास मिळालें असल्याचें दिसून येतें. तें क्षेत्र म्हणजे इंदूर, देवास उभयपाती, धार, व ग्वाल्हेर या महाराष्ट्रीय संस्थानांचा मुलुख होय. त्यामुळें आज राजकीय दृष्ट्या पृथक् असलेल्या ग्वाल्हेरच्या मुलुखाचा मराठी भाषेच्या दृष्टीनें मध्यभारतांतच अंतर्भाव करून घेणें सर्वथा युक्त होईल.

## प्राचीन मालव देश

या मध्यभारताच्या अधिकांश भागाला अति प्राचीन काळीं अवंति देश असें नांव असून त्या अवंति देशाचा साहित्यविषयक लौकिक पूर्वापार चालत आलेला आहे. सूत्रग्रंथ, रामायण, महाभारत, पुराणें आणि प्राचीन संस्कृत व प्राकृत ग्रंथ यांतून अवंति देशाचें वर्णन पुष्कळ ठिकाणीं पहावयास मिळतें व तसेंच तें बौद्ध आणि जैन ग्रंथांतही पण आढळून येतें. भगवान् गौतम बुद्धाच्या वेळीं अतुल बलशाली व महदैश्वर्यसंपन्न समजल्या जाणाऱ्या भारतवर्षांतील ' षोडश जनपदां ' त अवंति देश परिगणित होता आणि त्याची राजधानी अवंति किंवा उज्जयिनी नगरी हिनें सर्वतोपरि दिगंतकीर्ति प्राप्त करून घेतली होती. प्राचीन अनूप देश या अवंति देशाला अगदीं लागून होता. त्याची राजधानी माहिष्मती ऊर्फ महेश्वर नगरी ही जशी कार्तवीर्याची राजधानी ह्मणून पुराणांत प्रसिद्ध आहे तशीच ती देवी अहल्याबाई होळकर यांची प्रिय वास्तव्यभूमि ह्मणून इतिहासांत विख्यात आहे. पुढें मालव जातीच्या लोकांनीं या अवंति देशांत आपल्या राज्याची उभारणी केल्यावर त्यास, त्यांच्या नांवावरून, मालव देश अशी नवीन संज्ञा प्राप्त झाली. सांप्रत प्रचारांत असलेलें ' माळवा ' नांव हें त्याच मालव नांवापासून निघालेलें आहे. मालव देशाचें नांव सर्वांत प्रथम इ. स. च्या ५ व्या शतकांतल्या ' वाराहसंहिता ' ग्रंथांत आढळतें, परंतु त्यांत सध्यां आपण ज्याला माळवा ह्मणून संबोधितों त्या प्रदेशाला अवंति देश असें ह्मटलेलें आहे. त्यावरून असें दिसतें कीं, प्राचीन अवंति देशाच्या पूर्वभागाला प्रथम मालव देश ही संज्ञा मिळाली असावी व पुढें हळुहळू अधिकाधिक मुलुख या संज्ञेखालीं येत गेला असावा. या मालव देशांतच वर सांगितलेल्या अनूप देशाचाही प्रदेश अंतर्भूत झालेला होता. एके काळीं वर्तमान माळव्याच्या पश्चिम भागाला अवंति व

पूर्व भागाला आकर किंवा आकट असेंही म्हणत असल्याचें आढळतें. त्या आकर देशाचा उल्लेख क्षत्रप राजा रूद्रदामन् याच्या जुनागड येथील शिलालेखांत असून त्याची राजधानी विदिशा उर्फ भेलसा नगरी होती, असें इतिहाससंशोधकांचें मत आहे. इ. स. च्या ७ व्या शतकांत भारतपर्यटनास आलेल्या चिनी बौद्ध परिव्राजक ह्युएनत्संगानें आपल्या प्रवासवृत्तांत 'मोलप्पो' ( मालवा ) व 'उ-ज-जे-न' ( उज्जेन ) या दोन देशांचे पृथक् पृथक् वर्णन केलेलें आहे. त्यानें मोलप्पोची राजधानी स्पष्टपणें निर्देशिली नसली तरी ती धारा नगरी असावी, असा इतिहासकारांचा तर्क आहे. पुढें इ. स. च्या १० व्या शतकांत रचिलें गेलेल्या स्कंद पुराणांत भारतीय जनपदांची जी नामावली देण्यांत आली आहे तींत फक्त मालव देशाचेंच नांव आढळतें. त्यावरून कदाचित् अवंति, आकर, अनूप, वगैरे नांवें तेव्हांपासून लुप्त होऊन मालव देश हें एकमेव नांव पुढें प्रचारांत आलें असावें, असें दिसतें.

### मालव देशाचा पूर्वलौकिक

या मालव देशाचा पूर्वलौकिक मोठा उज्वल व अनन्यसाधारण असल्यामुळें साहजिकच तो अभिमानास्पद आहे. धर्म, नीति, कला, शास्त्र, व्यापार, पराक्रम आणि ऐश्वर्य या सर्व बाबतींत अभिवृद्धि करून घेऊन भारतवर्षानें गतकालीं जगांतल्या यच्चयावत् राष्ट्रांत जें अग्रेसरत्व प्राप्त करून घेतलें होतें त्याला या मालव देशाची कर्तृत्वशीलता बऱ्याच अंशीं कारणीभूत झाली होती, ही गोष्ट इतिहासावरून कळून येण्यासारखी आहे. महानुभाव इंद्रसेन, महाहोता रंतिदेव व महारथी विंदानुविंद या पुराण—प्रसिद्ध राजांचें भूभृत्पद येथेंच नांदलें; भगवान् श्रीकृष्ण, बलराम व सुदामा या त्रिवर्गाचें विद्याध्ययन सांदीपनीच्या आश्रमीं येथेंच झालें; प्रतापी प्रद्योतानें आपलें प्रभुत्व येथेंच गाजविलें; सम्राट् अशोकाच्या मनांत बौद्ध धर्माविषयीं आदर

अनुराग येथेंच उत्पन्न झाला; ' वैदिक धर्मप्राण ' पुष्पमित्रानें यज्ञयाग येथेंच केले; वाणीच्या संस्कारार्थ व्याकरणशास्त्र, बुद्धीच्या संस्कारार्थ योगसूत्रें आणि शरीराच्या संस्कारार्थ वैद्यकशास्त्र यांची रचना मुनिवर्य पतंजलीनें येथेंच केली; चक्रवर्ति विक्रमादित्याचा वैभवसूर्य येथेंच तळपला; कविकुलगुरु कालिदासाच्या प्रतिभेनें भुवनमोही विलास येथेंच केले; ' कविबंधु ' मुंजदेव व ' त्रिविधवीरचूडामणि ' ( रणवीर, दानवीर व विद्यावीर ) भोजदेव या नृपतिद्वयाच्या ' नवरत्नसभा ' येथेंच भरल्या; ' भगवतीसूत्र ' श्रवण करतांना त्यांत असलेल्या ३६००० ' गोयमा ' पदांवर तितक्याच सुवर्ण मुद्रा कित्येक वेळां अर्पण करणाऱ्या पृथ्वीधर ऊर्फ पेथडशहाची दानशीलता येथेंच प्रसिद्धीस आली; अविंध सुलतान बाजबहादुर व त्याची हिंदु राणी रूपमती यांचें एकमेकांवरील अलौकिक प्रेम आणि अद्वितीय गायन-वादननैपुण्य येथेंच प्रकट झालें; ' सिंहा सीस नमावियाँ गाडर करी गलार। सब राजन सिर ओढनी तुव सिर ताज मलार ' असें भाटांनीं ज्यांचें ऊर्जस्वल शौर्यगीत गाइलें त्या सुभेदार मल्हारराव होळकरांची मर्दुमकी येथेंच गाजली; समस्त भरतखंडांत अनेक पुण्यकार्यें करून ' जगत्रयांत धन्य ' होणाऱ्या देवी श्रीअहल्याबाईचें ' रामराज्य ' येथेंच नांदलें; ' सवाई यशवंतराव सवाई, सवाई डंका बजाया ' ह्मणून शाहिरांनीं ज्यांची ' वाहवा ' केली त्या यशवंतराव होळकरांच्या विजयी भाल्यानें शत्रुदळाला हतवीर्य येथेंच करून सोडलें आणि ' जिधर उदा उधर खुदा ' असे उद्गार प्रत्यक्ष शत्रुमुखांतून काढविणाऱ्या रणझुंझार उदाजीराव पवारांनीं आपल्या तरवारीचें पाणीही येथेंच चमकविलें ! हीं झालीं मालव देशांतील धर्म, विद्या, शास्त्र व पराक्रम यांचीं उदाहरणें. आतां कला, व्यापार व ऐश्वर्य यांचीं उदाहरणें बाकी राहिलीं. त्यासाठीं बाणाची कादंबरी, सोमदेवाचें कथासरित्सागर, शूद्रकाचें मृच्छकटिक व कालिदासाचें मेघदूत या ग्रंथांकडे पाहिलें

ह्मणजे त्यांतील उज्जयिनीच्या रसभरित वर्णनावरून एकंदर मालव देशाच्या पूर्वकालीन कलेचा व ऐश्वर्याचा भव्य चित्रपट डोळ्यांपुढें उभा राहतो आणि त्याला बेसनगर येथील हेलिओडोरसचा अद्वितीय गरुडध्वज, सांची येथील अशोकाचा प्रचंड स्तूप, बाग येथील प्रेक्षणीय गुंफा, ऊन येथील उत्कृष्ट देवालयें आणि मांडव येथील विशाल शाही महाल या आज अस्तित्वांत असलेल्या पुरातन वास्तुविशेषांवरून प्रामाणिकतेची भरपूर पुष्टि मिळते! मेघदूतांत उज्जयिनीच्या पुरातन व्यापारी पेठांचें मोठें हृदयंगम वर्णन असून इतर कित्येक बौद्ध, जैन, मुसलमान व इंग्रज ग्रंथकारांच्या ग्रंथांमध्येंही उज्जयिनीशिवाय भेलसा, महेश्वर आदि मालव देशांतर्गत अन्य मोठमोठ्या नगरींत पूर्वी होणाऱ्या व्यापाराचें बरेंचसें वर्णन जागोजागीं आढळतें. त्यांतील उज्जयिनीच्या वर्णनावरून असें कळून येतें कीं, गोमेद वगैरे रत्नें, तलम कापड, चिनीमातीचीं भांडीं, निरनिराळीं तैलें, अत्तरें व इतर सुवासिक द्रव्यें यांच्याविषयीं या नगरीची ख्याति फार दूरवर पसरलेली होती व तेथें पश्चिम समुद्रांतून आलेल्या मालाचा क्रयविक्रय अतिशय मोठ्या प्रमाणांत होत होता. शिवाय येथील धनाढ्य व्यापारीही स्वतः जहाजें बाळगून दूरदूरच्या देशांशीं व्यापार करीत होते. अस्तु. या उज्जयिनीच्या वर्णनावरून पर्यायानें एकंदर मालव देशाच्या पूर्वकालीन व्यापारोन्नतीची कल्पना करतां येण्यासारखी आहे.

## मालव देशांतील प्राचीन साहित्योत्कर्ष.

साहित्याच्या दृष्टीनेंही पाहतां या मालव देशाचा लौकिक फार पुरातन व उज्ज्वल असल्याचें दिसून येतें. पूर्वी येथें अनेक मोठमोठे विद्वान् साहित्यिक पुरुष निर्माण होऊन गेले. त्यांच्या परंपरेचा छडा थेट ऋषिवरेण्य सांदीपनीच्या काळापासून, अर्थात् व्यापार युगापासून, लागतो. उज्जयिनीस त्या गतकालांत मालव देशाच्या एकंदर कला,

व्यापार, ऐश्वर्य आदि गोष्टी जशा केंद्रीभूत झालेल्या होत्या तशी त्या देशाची विद्याही पण येथेंच केंद्रीभूत होऊन राहिलेली होती. याला मुख्य कारण ती नगरी राजधानी होती, हें जरी असलें तरी त्याबरोबर तितक्याच महत्त्वाचें दुसरेंही एक कारण होतें. तें कारण ह्मणजे त्या नगरीला द्वादश ज्योतिर्लिंगांपैकीं श्रीमहाकालेश्वराच्या स्थानामुळें व पुण्यसलिला क्षिप्रेच्या सान्निध्यामुळें अनादि कालापासून लाभलेलें तीर्थक्षेत्राचें धार्मिक वैभव हें होय. या वैभवाच्या योगानें उज्जयिनीला मोक्षदायिका सप्तपुरींतील एका पुरीचा मान मिळून ती पूर्वकाळीं निरनिराळ्या शास्त्रांत पारंगत असलेल्या धर्मशील पंडितप्रवरांची वास्तव्यभूमि होऊन राहिली होती. शिवाय भारतीय ज्योतिर्विदांचें प्रथम याम्योत्तर वृत्त या नगरींतूनच जात असल्यामुळें ज्योतिषशास्त्र-दृष्ट्याही तिला बरेंच महत्त्व प्राप्त झालें होतें. या एकंदर कारणांमुळें नानाविध शास्त्रांत निपुण असलेल्या विद्वानांचें एक प्रकारें माहेरघरच होऊन बसलेल्या उज्जयिनीला विद्यापीठाचा लौकिक संपादणें सुकर झालें होतें. वैदिक कालांत उज्जयिनीच्या विद्यापीठाची महती जरी तितकीशी आढळून येत नसली तरी बौद्ध व जैन कालांत मात्र येथील विद्यापीठानें बरीच ख्याति संपादून ती पुढें इ. स. च्या ९ व्या शतकापावेतों तशीच अविरत–अबाधित राखिली होती. प्राचीन बौद्ध व जैन ग्रंथांतूनही त्या विद्यापीठाचें वर्णन बऱ्याच ठिकाणीं आढळतें व तसेंच तें १० व्या शतकांत होऊन गेलेल्या राजशेखराच्या ‘काव्य-मीमांसा’ ग्रंथांतही पण पहावयास मिळतें. पुढें परमारांचें राज्य मालव देशांत स्थापन झाल्यावर उज्जयिनीचें वैभव धारानगरीस गेलें. त्यावेळीं त्याच्या पाठोपाठ विद्येनें–विद्वत्तेनेंही तेथून स्थलांतर केलें. परमार कुलांत विद्योत्कर्ष करणारे व विद्वानांचा परामर्ष घेणारे अनेक नामांकित राजे होऊन गेले. त्यांच्या आश्रयाखालीं धारा नगरीनें उज्जयिनीच्या विद्यापीठाचा पुरातन लौकिक पुढें चालविला. परमार-

वंशावतंस भोजदेवानें धारा नगरींत बांधिलेलें ‘ भारती भवन ’ किंवा ‘ शारदा सदन ’ नांवाचें विद्यामंदिर एके काळीं भारतवर्षांत बरेंच नांवाजलेलें होतें. या विद्यामंदिराचें वर्णन अर्जुनवर्मराजाचा गुरु बालसरस्वती मदन यानें आपल्या ‘ विजयश्री ’ अथवा ‘ पारिजात मंजरी ’ नामक नाटिकेच्या प्रस्तावनेंत मोठ्या बहारीनें केलें आहे. परमारांच्या पश्चात् माळव्यामध्यें मुसलमानी सत्तेचा चांद चमकूं लागल्यावर या विद्यामंदिराला यावनी दीक्षा दिली जाऊन मशिदीचा वेष चढविला गेला. त्याच वेषांत कमालमौला या नांवानें ती इमारत आजतागायत दीनवाण्या दशेंत उभी आहे. या धारा नगरींतील विद्यामंदिराप्रमाणेंच मंडपदुर्ग ऊर्फ मांडवगड येथेंही परमारांनीं स्थापिलेलें एक संस्कृत विद्यालय होतें. त्याला मात्र मुसलमानांनीं विशेष विद्रूप न करतां त्याचें नुसतें फारशी--अरबी ‘ निसाल ’ मध्यें रूपांतर करून टाकलें होतें. या विद्यापीठाच्या लौकिकाबरोबर ग्रंथनिर्मितीचाही लौकिक मालव देशानें गतकालीं संपादिला होता. स्वतः विद्वान् असून विद्वज्जनांचा परामर्ष घेण्यांत कर्णोपम दातृत्व प्रकट करणाऱ्या नृपाळांची परंपरा या भूमीला अहोभाग्यानें लाभल्यामुळें पूर्वीं येथें जो साहित्योत्कर्ष झाला ता खरोखर ‘ न भूतो न भविष्यति ’ असा होता ! त्या नृपाळांच्या ठायीं दातृत्वाबरोबर परधर्मसाहिष्णुता व उदार-मतवादित्व हेही गुण उत्कटत्वानें वास करीत होते व त्यांच्या त्या गुणांचा कीर्तिसौरभ सर्वत्र पसरला होता. त्यामुळें वैदिक, बौद्ध, जैन, आदि निरनिराळ्या धर्मांच्या खास मालव देशांतील ठिक-ठिकाणच्या विद्वद्भृंगांशिवाय इतर अन्यान्य देशांतील विद्वद्भृंगही येथें एकत्रित होऊन या भूमीला जणूं काय त्या काळीं सरस्वतीच्या लीलानिकेतनाचें वैभव प्राप्त झालें होतें ! संस्कृत ही भारतवर्षाची त्या वेळची साहित्यिक राष्ट्रभाषा होती. या भाषेंतील प्राचीन प्रचंड साहित्यभांडाराकडे पाहिलें तर त्यांतील अर्ध्याअधिक ग्रंथसंपत्तीवर

या मालव देशाचेंच स्वामित्व असल्याचें आढळून येतें ! व त्या ग्रंथ-संपत्तीच्या निर्माणकार्यांत न्याय शास्त्राच्या मरुभूमीपासून तें काव्य शास्त्राच्या नंदनवनापावतों लीलेनें संचार करणारे सर्व प्रकारचे उद्भट पंडित असल्यामुळें साहजिकच तींत वैपुल्याबरोबर वैदग्ध्य व विविधत्वही भरपूर पहावयास मिळतें. त्या उद्भट पंडितांपैकीं कांहीं प्रमुख पंडितांचा येथें निर्देश करणें अयुक्त होणार नाहीं. यादवेंद्र श्रीकृष्णाचे गुरु सांदीपनी यांच्यापासून या मालव देशाच्या पंडितांच्या परंपरेचा छडा लागत असल्याचें मागें निवेदिलेंच आहे. हे सांदीपनी ऋषि १४ विद्या व ६४ कला यांत पूर्ण पारंगत होते. त्यांचा आश्रम अवंति नगरींत होता. त्यांच्याप्रमाणेंच कपिल, शृंगी, भृगु, दधीचि, दारुक प्रभृति आणखीही कांहीं पुराण-प्रसिद्ध धीमान् ऋषींचे आश्रम या मालव देशांत असल्याचा शोध लागतो. भगवान् गौतमबुद्धाच्या सच्छिष्यांत अग्रगण्य ठरलेल्या महाकात्यायनानें तर खास अवंतिपति चंडप्रद्योताच्या पुरोहिताच्या पोटीं जन्म घेतला होता. अशोकाचा नातू संप्रति यास जैनधर्मानुयायी बनविण्याचें श्रेय संपादणाऱ्या जैनाचार्य आर्यसुहस्तीची वास्तव्यभूमि अवंतिनगरीच होती. शुंग पुष्पमित्राच्या यज्ञयागांतील मुख्य ऋत्विज व व्याकरण, वैद्यक आणि योग या शास्त्रांवरील प्रमाणभूत ग्रंथांचा कर्ता पतंजलि हा भोपाळ व भेलसा या शहरांच्या मध्यें पूर्वी कोठेंतरी असलेल्या गोनर्द ग्रामचा रहिवासी होता. वैद्यराज धन्वंतरी, फलज्योतिषवेत्ता क्षपणक, अमरकोशकर्ता अमरसिंह, स्थापत्यकोविद शंकू, मंत्रविद्यानिपुण वेतालभट्ट, गुप्तधन दाखविणारा दिव्यदृष्टि घटकर्पर, कविकुलगुरु कालिदास, ज्योतिषज्ञ वराहमिहिर व ‘पत्रकौमुदी’ कार वररुचि या खास विक्रमादित्याश्रित म्हणविणाऱ्या ‘नवरत्नां’च्या समकालीनत्वाचा प्रश्न जरी अद्याप वादास्पद असला तरी त्यांच्या अचाट बुद्धिमत्तेचें अत्युज्वल तेज उज्जयिनींसच झळकलें होतें, ही गोष्ट मात्र निःसंदेह दिसते. त्या

'रत्नां' पैकीं एक रत्न वराहमिहिर याचा जन्म तर उज्जयिनीच्या जवळ असलेल्या कपित्थ ऊर्फ कायथा गांवीं झाला होता. 'षट्पंचाशिका' या जातक ग्रंथाचा कर्ता पृथुयश हा या वराहमिहिराचाच पुत्र होय. उज्जयिनीचें ज्योतिर्माहात्म्य प्रकीर्तित करण्याचें श्रेय प्रथमतः या पितापुत्रांनींच संपादिलें होतें. शृंगार, नीति व वैराग्य या शतकत्र्याचा निर्माता भर्तृहरि हा तर उज्जयिनीचा राजाच होता. बौद्ध धर्माच्या ऐन उत्कर्षकाळांत त्या धर्माची ध्वजा थेट चीन देशांत फडकवून तेंथील भाषेंत आपले धर्मग्रंथ अनुवादित करण्याकरितां भारतवर्षांतून तिकडे गेलेल्या विद्वान् बौद्ध श्रमणांत विशेष विख्यात असलेले गुणभद्र, गुणराट्, उपशून्य व परमार्थ हे चाऱ्ही श्रमण मूळ मालव देशाचेच रहिवासी होते आणि यांतील गुणभद्र व परमार्थ या दोघांचा जन्म तर खास उज्जयिनींतल्या प्रतिष्ठित ब्राह्मण कुळांमध्यें झाला होता. 'कादंबरी'चा जनक बाणभट्ट यानेंही उज्जयिनीस बरेच दिवस वास्तव्य केलें होतें. 'उत्तर रामचरिता'चा कर्ता भवभूति याच्या जन्मभूमीसंबंधाच्या प्रश्नाचा जरी अद्यापि निर्णय लागला नसला तरी मालव देशाच्या सीमांतावर असलेल्या पवाया गांवींच त्याचा जन्म झाला असावा, असें बऱ्याच इतिहाससंशोधकांचें मत आहे. आद्यशंकराचार्यांनीं वादविवादांत जिंकिलेले मंडनमिश्र व भारती हे विद्वान् दांपत्य माहिष्मतीस रहात होतें. या मंडनमिश्राचा 'विधिविवेक' नामक शांकरमीमांसेवरील ग्रंथ अद्वितीय आहे. यानंतर 'सरस्वती युग' हें नांव यथार्थ शोभेल अशी परमार राजवंशाची ५०० वर्षांची कारकीर्द मालव देशांत सुरू झाली. या राजवंशांतील प्रायः सर्वच राजे स्वतः विद्वान् असून विद्वानांचे पोशिंदे म्हणून नांवाजलेले होते. त्यांतील मुंजदेव व भोजदेव या महानुभावांचें उज्ज्वल यशस्तेज तर भारतीय इतिहासाच्या नभःपटावर रविशशिप्रमाणें सदैव झळकत राहणारें आहे. विक्रमादित्याप्रमाणें या

राजांच्याही ‘ सभे ’त ‘ नवरत्नें ’ होतीं. त्या ‘ नवरत्नां ’ मधील ‘ नवसाहसांकचरित्र ’ कार पद्मगुप्त ऊर्फ परिमल, ‘ पाइयलच्छि ’ कोशाचा कर्ता धनपाल, अनेक जैनधर्मीय ग्रंथ तयार करणारा शोभन, नाट्यशास्त्रावर ‘ दशरूप ’ नामक ग्रंथ रचणारा धनंजय व त्या ग्रंथावर ‘ दशरूपावलोक ’ नांवाची टीका लिहिणारा त्याचा बंधु धनिक, ‘ राज्यव्यवहारतत्व ’ व पिंगलछंदसूत्रावर वृत्ति लिहिणारा हलायुध आणि ‘ सुभाषितरत्नसंदोह ’, ‘ धर्मपरीक्षा ’, ‘ श्रावकाचार ’ इत्याद्यनेक जैनधर्मतत्वांसंबंधीं ग्रंथ निर्माण करणारा जैनाचार्य अमितगति ही पंडित मंडळी मोठी विख्यात होऊन गेली. स्वतः मुंजदेव व भोजदेव हे दोन्ही राजे व्युत्पन्न ग्रंथकार होते. दुर्दैवानें मुंजदेवाचा एकही ग्रंथ आजवर उपलब्ध झाला नाहीं; तथापि त्यानें केलेले कांहीं श्लोक सुभाषितसंग्रह ग्रंथांत उध्दृत केलेले आढळतात. भोजदेवाचे ग्रंथ मात्र बरेच उपलब्ध आहेत. जर्मनींतील ऑउफ्रेक्ट-कृत संस्कृत ग्रंथांच्या कॅटलॉगांत या राजानें लिहिलेल्या २३ ग्रंथांचीं नांवें दिलीं आहेत. त्यांपैकीं ज्योतिषशास्त्रावरील ‘ राजमृगांककरण ’ अलंकारशास्त्रावरील ‘ सरस्वतीकंठाभरण ’, योग शास्त्रावरील ‘ राजमार्तंड ’, धर्मशास्त्रावरलि ‘ पूर्तमार्तंड ’, शिल्पशास्त्रावरील ‘ युक्तिकल्पतरु ’, काव्यशास्त्रावरील ‘ विद्याविनोद ’, व वैदिक शास्त्रावरील ‘ आयुर्वेद सर्वस्व ’ हे त्याचे ग्रंथ विशेष महत्वाचे व प्रमाणभूत समजले जातात आणि या सर्व ग्रंथांवरून त्याच्या बुद्धीचें विविधगामित्व प्रतीत होऊन तो प्रतिअरिस्टॉटलच होता, असें वाटूं लागतें. विक्रमादित्य व हरून्-अल्-रशीद या थोर राजांप्रमाणें भोजदेवाच्याही विद्वत्प्रियता आणि औदार्य या गुणांविषयींच्या अनेक आख्यायिका प्रसिद्ध आहेत. त्यांतील कित्येक आख्यायिका अतिशयोक्तीच्या असल्या तरी त्यांत तथ्यांश मुळींच नाहीं असें मात्र ह्मणतां यावयाचें नाहीं. प्रबंधकारांनींसुद्धां मुंजदेव व

भोजदेव या राजांची, त्यांच्या सरस्वत्युपासना आणि दानशूरता या गुणांसंबंधांत, मुक्तकंठानें प्रशंसा केली आहे. मुंजदेवाच्या निधनोत्तर त्यांनीं " गते मुंजे यशःपुंजे निरालम्बा सरस्वती " असे उद्गार काढिले असून भोजदेवाविषयीं " साधितं विहितं दत्तं ज्ञानं तद्यन्न केनचित् ! किमन्यत् कविराजस्य श्री भोजस्य प्रशस्यते " असें ह्मटलें आहे. या मुंजभोजांच्या पश्चात् परमार राजवंशामध्यें साहित्याराधनेंत तत्पर असलेल्या राजांत उदयादित्य, नरवर्मदेव व अर्जुनवर्मदेव या त्रि-वर्गोचीं नांवें विशेष प्रसिद्ध आहेत. नरवर्मदेवाच्या वेळीं जैन पंडित रत्नसूरि व शैव पंडित विद्याशिववादी यांच्यामध्यें उज्जयिनींतील महा-कालेश्वराच्या मंदिरांत धर्मतत्वांसंबंधीं फार मोठा वादविवाद झाला होता. अर्जुनवर्मदेव हा स्वतः ग्रंथकार होता व त्याची गायनकलेवर अतिशय भक्ति होती. त्यानें लिहिलेली अमरुशतकावरील ' रसिक संजीवनी ' नांवाची टीका विद्वन्मान्य असून त्याचा गुरु बालसरस्वती मदन यानें रचिलेल्या ' पारिजात मंजरी ' नामक नाटिकेचा उल्लेख मागें केलाच आहे. या अर्जुनवर्मदेवानंतर धारच्या सिंहासनावर बसलेला देवपाळदेव हाही विद्याप्रेमी होता. याच्या राजवटींत धारा नगरीजवळील नलकच्छपुर ऊर्फ नालछा येथें राहाणारा जैन पंडित आशाधर उदयास आला. या आशाधरानें ' त्रिषष्टिस्मृति ', ' जिन-यज्ञकल्प ', ' सटीक धर्मामृतशास्त्र ' व इतरही अनेक वैद्यक आणि अलंकार या शास्त्रांवर लिहिलेले ग्रंथ प्रसिद्ध आहेत. देवपाळदेवाचा वंशज द्वितीय भोजदेव याच्या ठायींही विद्याभिरुचि असल्याचें कळून येतें. ' हम्मीर महाकाव्या ' मध्यें [ सर्ग ९ श्लोक १८ ] या राजासंबंधांत व याच्या धारा नगरीसंबंधांत ' भोजो भोज इवापरः ' व ' धारां धरा-सारां ' असे प्रशंसोद्गार काढिलेले आहेत. पुढें परमारांचें राज्य अस्तास गेल्यावर सुमारें ५ शतकांपावेतों माळव्यांत घोरी, खिलजी व सूर या तीन मुसलमान राजघराण्यांची सत्ता क्रमशः नांदली. त्या परचक्राच्या

काळांत जरी येथें हिंदूंच्या विद्यावैदग्ध्याला अर्धचंद्र मिळाला असला तरी मुसलमानी विद्यावैदग्ध्याला मात्र भरपूर उत्तेजन मिळालें होतें; परंतु त्याचा आपल्या वाङ्मयाशीं तादृश संबंध नसल्यानें तो भाग वगळून आपण आतां पुढें वळूं.

## आवंतिका भाषा व हिंदी साहित्य

परंतु पुढें वळण्यापूर्वीं येथें आणखी दोन प्रमुख गोष्टींविषयीं चार शब्द लिहून ठेवणें उचित होईल. पहिली गोष्ट ह्मणजे खास माळव्यांतील आवंतिका भाषा व दुसरी गोष्ट ह्मणजे येथें मराठी सत्तेचें पाऊल पडण्यापूर्वीं निर्माण झालेलें हिंदी साहित्य. आवंतिका भाषेचा उत्पत्तिकाल अजून अनिर्णित आहे; परंतु संस्कृत साहित्यशास्त्रकारांनीं नाट्यवाङ्मयाकरितां ‘प्राच्य विदूषिकादिनां धूर्तानां स्यादवन्तिका’ असा घालून दिलेला दंडक व तदनुसार भास कवीच्या वेळेपासूनच्या नाट्यग्रंथांत केला गेलेला आवंतिका भाषेचा उपयोग यांकडे पाहतां सदर भाषेच्या प्राचीनत्वाचा अदमास सहज होऊं शकतो. ‘आवंती-स्यान्महाराष्ट्री शौरसेन्यास्तु संकरात’ या मार्कण्डेय पुराणांतील वचना-प्रमाणें ही आवंतिका भाषा महाराष्ट्री, शौरसेनी आदि प्राकृत भाषांच्या संमिश्रणापासून निर्माण झालेली असून सांप्रत उज्जयिनी व तिच्या आसपासच्या मुलखांत खालच्या वर्गांतील लोकांमध्यें प्रचलित असलेली ‘रांगडी’ भाषा ही तिचीच कन्या असावी, असें विद्वानांचें मत आहे. अस्तु. आतां हिंदी साहित्याकडे दृष्टि फेकतां असें दिसून येतें कीं, मध्यभारतांतील हिंदी साहित्यिकांचीही परंपरा बरीच उज्वल आहे. इ. स. चें ७ वें शतक हा स्थूल मानानें हिंदी भाषेचा जन्म-काळ मानण्यांत येतो व त्या भाषेच्या आदिकवीचा मान पुष्य ऊर्फ पुंड नामक कवीस देण्यांत येतो. हा पुंड कवि ७ व्या शतकांत उज्जयिनीस होऊन गेला. त्यावरून हिंदी काव्यवाङ्मयाच्या बीजा-रोपणाचें श्रेय सर्वथा मध्यभारताकडेच येतें. पुंडानंतर जवळ जवळ

७०० वर्षांचा हिंदी साहित्याचा इतिहास अजून अंधकारांत आहे. तदुपरांत १४ व्या शतकांत एकदम पुढें आलेला हिंदी कवि विष्णुदास हाही मध्यभारतांतच होऊन गेला. ग्वाल्हेरचा तुंवरवंशीय राजा मानसिंह याच्या दरबारीं तो उदयास आला. 'महाभारतकथा', 'स्वर्गारोहण' व 'रुक्मिणी मंगल' हे त्याचे ग्रंथ अद्वितीय आहेत. याशिवाय 'संगीत सार' व 'रागमाला' ग्रंथांचा कर्ता आणि प्रसिद्ध भूगंधर्व तानसेन; अनेक काव्यें रचणारा कविवर बिहारी; 'नायिका भेद', 'सुंदर शृंगार', बारहमास' वगैरे गद्यपद्य ग्रंथांचा कर्ता सुंदर; 'गोपाचलाख्यान' लिहिणारा व हिंदीचा कल्हण म्हणविणारा खड्गसेन; 'हरदौल चरित्रा'चा कर्ता जगन्नाथ; महादजी शिंद्यांनीं पुढें आणलेले सविता व सुरति मिश्र हे कविद्वय आणि दौलतराव शिंद्यांच्या राजवटींत नांवाजलेले 'अलिजाह प्रकाश' कार पद्माकर; 'दौलतबागविलास' कर्ता शिवकवि व 'लक्ष्मणचंद्रिका' निर्माता लक्ष्मणराव हे कवित्रय ग्वाल्हेर येथेंच होऊन गेले. त्याचप्रमाणें नरवर—नरेश छत्रसिंह व रामसिंह हे पितापुत्र उत्तम कवि होते. रामसिंहाचा 'जुगुलविलास' ग्रंथ प्रसिद्ध आहे. या पितापुत्रांच्या आश्रयानें 'रसभेद' कर्ता रामकवि, 'रसमंजरी' कार हरि व 'बिहारी सतसई' वर 'चंद्रिका' नामक टीका लिहिणारा ईसवीखां हे नरवर येथें उदयास आले. ओरछा—नरेश इंद्रजितसिंहाची रक्षा व लोहार जातींत जन्मलेली प्रवीणरायपातुरी ही एक मोठी हिंदी कवयित्री होऊन गेली. तिचा जन्म नरवर येथेंच झाला होता. आंतरीचे गोविंदस्वामी, गुलाब व मुकुंद कवि; कोलारसचा 'दफ्तरनामा' लिहिणारा फत्तेसिंह; 'कांताभूषण' रचणारा रतनेश व 'हाजीवालानामा' तयार करणारा हाजावली; रुणिजाचा 'रामायण' व 'महामुक्तिमार्ग' कर्ता नरसिंहदास आणि पिपलोनचा 'सुधबुध सालंकार' निर्माता नंदलाल ही सर्व मध्यभारतांतील मंडळी म्हणजे हिंदी साहित्याकाशांत झळकणारीं

नक्षत्रेंच होत ! याचप्रमाणें उज्जयिनी येथेंही ‘ खंडरामायण ’ रचयिता मेघराज, ‘ नारायणलीला ’ कार माधवदास, ‘ विक्रमविलास ’ निर्माता गंगेशमिश्र, ‘ गीताज्ञानप्रकाश ’ कर्ता हरिनामजी वगैरे मोठमोठी साहित्यिक मंडळी निर्माण होऊन त्यांनींही हिंदी साहित्येतिहासांत अढळ स्थान प्राप्त करून घेतलें आहे. असो. येथून आतां आपण आपल्या मराठी साहित्याकडे वळूं.

## मराठी भाषेचा पूर्वेतिहास.

वस्तुतः मराठी ही मूळची महाराष्ट्राची भाषा होय. तिचा संबंध मध्यभारताशीं कसा व केव्हां जुळून आला आणि तो उत्तरोत्तर कसा वृद्धिंगत होत गेला हें सांगण्यापूर्वी प्रत्यक्ष त्या भाषेचा प्रारंभिक वृत्तांत थोडक्यांत येथें देणें अस्थानीं होणार नाहीं. भारतवर्षात आज अनेक भाषा प्रचलित आहेत. त्यांतील प्रायः सर्व भाषांची आदिमाता गीर्वाण भाषा होय. ही भाषा मूळ आर्यांची असून त्या लोकांनीं भारतवर्षात वसाहत केल्यावर तिचा प्रचार येथें सर्वत्र झाला व पुढें त्या लोकांच्या यथाक्रम होणाऱ्या उन्नति व स्थित्यंतराबरोबर तिचींहि उन्नति व स्थित्यंतरें होत गेलीं. आरंभीं संस्कृत आणि प्राकृत अशा तिच्या दोन शाखा झाल्या. संस्कृत म्हणजे जिच्यावर व्याकरणादि संस्कार घडलेले आहेत ती भाषा व प्राकृत म्हणजे प्रकृतिसिद्ध अर्थात् जिच्यावर कसलेही संस्कार घडलेले नाहींत ती भाषा, हें त्या भाषांच्या मूळ नांवांवरूनच समजून येण्यासारखें आहे. या दोन्ही भाषा पूर्वी-पासून बरोबरीनें चालू होत्या. पुढें पहिला भारतीय वैयाकरण पाणिनी याच्या कालानंतर ( याचा काल अजून निश्चित झालेला नाहीं; तथापि तो इ. स. पू. ८ व्या शतकाच्या अगोदर फारसा नेतां येत नाहीं. ) संस्कृत भाषेचें क्षेत्र संकुचित होत जाऊन ती केवळ धर्माची, विद्वानांची व वाङ्मयाची भाषा बनत चालली आणि त्याच्या उलट प्राकृत भाषेचें क्षेत्र वाढत जाऊन तिला व्यवहारांत बरेंच वर्धिष्णु स्वरूप

प्राप्त होऊं लागलें. लौकरच तिच्या मागधी, शौरसेनी, पैशाची व महाराष्ट्री अशा चतुर्विध शाखा झाल्या. या शाखा ह्मणजे वास्तविक त्या भाषेचीं प्रादेशिक स्वरूपेंच असून त्यांना तीं नांवेंही त्या त्या विशिष्ट प्रदेशांच्या ( तत्कालीन देशांच्या ) नांवावरून दिलीं गेलेलीं होतीं. पुढें त्या चाऱ्ही शाखांपासूनही आणखी कांहीं अपभ्रंश भाषांचा उगम झाला. त्यांतील महाराष्ट्री अपभ्रंश भाषा हीच मराठी भाषेची जनयित्री होय. या मराठी भाषेचा जन्म केव्हां झाला याचा शोध अजून लागलेला नाहीं; तथापि या भाषेंतलें ' श्री चावुण्डरायें करविएलें ' हें जुन्यांत जुनें असें वाक्य श्रवणवेळगोळ येथील गोमतेश्वराच्या मंदिरांत लागलेल्या इ. स. ९८० च्या शिलालेखांत आढळून येतें व तत्पूर्वी ७ व्या शतकापासूनच्या कित्येक शिलालेखांत व ताम्रपत्रांत कांहीं मराठी शब्दांचीं तुरळक रूपेंही दिसून येतात त्यांवरून या भाषेच्या प्राचीनत्वाचा बराच अदमास होऊं शकतो; परंतु जवळ जवळ १२ व्या शतकाच्या अंतापावेतों ही भाषा आपल्या मायभूमि महाराष्ट्रांत अगदीं सामान्य ' बोलभाषा ' च ह्मणून प्रचलित असावी व पुढें तिला परिणत स्वरूप येत जाऊन तिचा ग्रंथनिविष्टकाळ इ. स. ११८८ मध्यें मुकुंदराजाच्या 'विवेकसिंधु' पासून सुरू झाला असावा असें स्थूलमानानें दिसतें. पण खरें पाहूं जातां, मराठी भाषेचें ग्रांथिक प्रगल्भ स्वरूप इ. स. १२९० च्या सुमारास निर्माण झालेल्या 'पंचतंत्र' व ' ज्ञानेश्वरी ' या अनुक्रमें गद्य व पद्य ग्रंथांतूनच प्रथमतः प्रकट झालेलें आढळून येतें; परंतु तें कसेंही असलें तरी त्यावरून एवढें मात्र निश्चित होतें कीं, मराठी भाषेला आपल्या जन्मापासून जवळ जवळ ५०० वर्षांपर्यंतचा काळ निव्वळ दैन्यांत काढावा लागला होता. याला वास्तविक कारण ह्मणजे त्या काळच्या महाराष्ट्रांतील राजांकडून व विद्वानांकडून संस्कृत भाषेच्या अभिमानातिरेकामुळें या भाषेची झालेली अवहेलना हेंच होय. कारण इतिहास पाहतां असें

दिसून येतें कीं, १२ व्या शतकांत देवगिरीच्या यादव राजांचा कृपा-कटाक्ष या भाषेकडे वळतांच हिचें दैन्य तत्काळ दूर होऊन हिला एकदम ऊर्जित काळ प्राप्त झाला. राजप्रासादांत, राजदरबारांत, विद्वानांत, व्यवहारांत जिकडे पहाल तिकडे हिला आस्थापूर्वक मान्यता मिळूं लागली आणि या हिच्या सुदैवांत जणुं काय भर घालण्याकरितांच ज्ञानोबारायासारखा लोकोत्तर कवीश्वरही त्याच वेळीं निर्माण झाला ! या कवीश्वराच्या प्रतिभा–प्रसादानें अमृताशींही पैजा जिंकण्याइतकी मराठी भाषा एकदम समृद्ध व सुस्वादु बनली ! तिच्यांत ग्रंथनिर्मिति होऊं लागली व पुढें नामदेव, एकनाथ, मुक्तेश्वर, आनंदतनय, रघुनाथ पंडित, तुकाराम, रामदास, वामन, श्रीधर, अमृतराय, महीपति, मोरोपंत वगैरेसारख्या अनेक अभिजात संत कवींनीं व पंडित कवींनीं तिला वेळोवेळीं आपला अमूल्य व अलोट ग्रंथसंभार समर्पण करून तिची साहित्यसंपन्नता दिगंतविख्यात केली ! याप्रमाणें महाराष्ट्रांत मराठीचें वैभव व कीर्ति हीं शुक्लेंदुवत् वाढत असतांनाच उत्तर भारतांतही तिचा प्रवेश होऊन तिकडेही तिनें त्यावेळीं बराच ‘ दिग्विजय ’ गाजविला तो आतां आपण पाहूं.

## मराठीचा उत्तर–दिग्विजय

वस्तुतः मध्यभारत आणि महाराष्ट्र यांचा परस्पर संबंध अलीकडचा नसून तो फार पुरातन–पूर्वापर चालत आलेला आहे. या गोष्टीच्या पुष्ट्यर्थ प्रमाणेंही उपलब्ध आहेत. बौद्धांच्या सुविख्यात ‘ महावंश ’ ग्रंथांत ( इ. स. चें ५ वें शतक ) तर मध्यभारताचा बराच मोठा भाग प्रत्यक्ष महाराष्ट्रांत अंतर्भूत असल्याचें वर्णिलें आहे व तसेंच दंडकारण्य, दक्षिणापथ आणि महाराष्ट्र या महाराष्ट्राच्या नामपरिवर्तनपरंपरेंतील दक्षिणापथाची उत्तर मर्यादा आणि अवंतीची दक्षिण मर्यादा रेवा ऊर्फ नर्मदानदी असल्याचें राजशेखरानें ( इ. स. ९०० ) ह्मटलें आहे. त्यावरून या दोन्ही देशांच्या एकमेकांशीं

असलेल्या संलग्नतेमुळें त्यांच्यांत पूर्वकाळीं शेजारधर्माचें नातें राहणें साहजिक दिसतें व त्याचप्रमाणें काशी, प्रयागाबरोबर सनातन पुण्य-क्षेत्राचें वैभव पावलेल्या उज्जयिनी, ओंकारेश्वर या नगऱ्या मध्य-भारतांतर्गत असल्यामुळें धर्मप्रवण महाराष्ट्रियांचें तीर्थयात्रेनिमित्त या भागांत पूर्वीपासून येणेंजाणें राहून त्यांची संस्कृति आणि भाषा यांचा परिचय अनायासें या भागाला सातत्यानें होत राहिला असावा, हेंही उघड होतें. ही गोष्ट सिद्ध करावयाला एक आणखीही सबळ पुरावा आहे. तो पुरावा ह्मणजे मध्यभारतीय, किंबहुना समस्त उत्तरभारतीय, प्राचीन हिंदी कवींच्या ग्रंथांत दिसून येणारे मराठी वळणाचे कित्येक शब्द व महाराष्ट्रीय संस्कृतीचें थोडेंफार प्रतिबिंब! हिंदी भाषेला सदैव ललामभूत असलेल्या प्रथितयश तुळसीदासांच्याच नुसत्या रामायणांत पाहिलें तर जनु ( जणुं ), केतिक ( कित्येक ), बूड (बूड), पावस ( पाऊस ), बहिनी ( बहीण ), महतारी ( म्हातारी ), दिअटी ( दिवटी ) असे किती तरी शब्द आढळून येतात कीं ज्यांचें मराठी शब्दांशीं जितक्या निकटचें नातें असल्याचें दिसून येतें तितकें तें हिंदी शब्दांशीं असल्याचें सहसा दिसून येत नाहीं. शिवाय तीर्थयात्रादि धार्मिक कारणांबरोबर इतरही कांहीं कारणांनीं महाराष्ट्र आणि उत्तर-भारत ( अर्थात् तदंगभूत मध्यभारत ) यांच्यांत पूर्वकाळीं दळणवळण राहून येथील विद्वानांनीं आपापल्या संस्कृतीची, विद्वत्तेची व भाषेची छाप परस्परांवर बसविली असल्याचेंदेखील नजरेस येतें. उदाहरणार्थ श्रीक्षेत्रकाशीला संस्कृत विद्येचें आदिपीठ ह्मणून जगद्विख्यात करावयाला व श्रीक्षेत्र उज्जयिनीच्या पुरातन संस्कृत विद्यापीठाची महती वाढ-वावयाला जसे अनेक वेदविद् व साहित्यप्राज्ञ महाराष्ट्रीय पंडित कारणीभूत झाले होते, तसेंच महाराष्ट्रालाही मराठी भाषेच्या आदि-पीठाचा मान मिळवून द्यावयाला उत्तरभारतीय रामानंद प्रभृति पंडित कारणीभूत झाले होते. विठ्ठलपंत आपेगांवकरांना संन्याशाचा संसारी

बनवून मराठी भाषेच्या महान् पुरस्कर्त्या निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई या चौरत्नांचा लाभ महाराष्ट्राला करून देण्याचा उपकार सर्वस्वीं रामानंदाचाच होय! महाराष्ट्रांत एकेकाळीं जोरांत असलेला व ज्ञानोबारायांचे आजे गोविंदपंतांपासून तों एकनाथांचे गुरु जनार्दन-स्वामीपर्यंत अनेक महाराष्ट्रीय कुलीन व विद्वान् श्रद्धावंतांना प्रिय होणारा नाथ संप्रदाय हा मूळ उत्तरभारतांतूनच तिकडे गेला होता व वास्तविक याच संप्रदायांतून पुढें महाराष्ट्रांत भागवत धर्माचा उदय होऊन तेथील वारकरी पंथानें त्याचा प्रसार आसेतुहिमाचल भारतवर्षांत केला होता. या वारकरी पंथाच्या मुख्य आचार्यांचा मान जरी ज्ञानोबारायांला असला व त्यांची 'ज्ञानेश्वरी' तत्पंथीयांकडून भक्तीनें 'आई' ह्मणविली जात असली तरी त्या पंथाच्या प्रचाराचें अतिव्यापक कार्य करून दाखविणारा व पंजाबांत आपल्या कार्याची महती अद्यावधि अविस्मरणीय राखून शिखांच्या पूज्य 'ग्रंथसाहेबां' त स्वरचित हिंदी अभंगांना सादर सन्निविष्ट होऊन बसण्याचा बहुमान मिळवून देणारा उद्धवाचा अवतार नामदेवच होय! विसोबा खेचराच्या हृदयाला पान्हा फोडणारी या नामदेवाची प्रासादिक वाणी सात्विक प्रेमभरानें गुणगुणणारे हजारों भक्तभृंग आज सहा शतकांनंतरही हिंदुस्थानच्या अखेर सरहद्दीपर्यंत सारखे पसरलेले दिसून येतात! तसेंच पंजाबांतील घोमान व मोमान या गांवीं नामदेवाच्या पादुकांची आणि 'नामदेव की मुखबानी' व 'नामदेव की जन्मसाखी' या नामदेवरचित हिंदी कवितांच्या गुरुमुखी भाषेंत अनुवादिलेल्या ग्रंथांची पूजाअर्चा तिकडील 'बाबा नामदेवायी' (अर्थात् नामदेवाचे अनुयायी) लोक अजूनही भक्तिभावानें करीत असतात! उत्तर-भारतीयांचें प्रेम संपादण्यासाठीं त्यांच्या हिंदी भाषेंत काव्यरचना करण्याची प्रथा महाराष्ट्रीय कविमंडळांत या नामदेवापासूनच नव्हे तर त्याच्याही पूर्वी थेट ज्ञानोबा—मुक्ताईपासून सुरू झाली असल्याचें

आढळून येतें व ती परंपरेनें आजमितीपावेतों अव्याहत चालू असल्याचेंही नजरेस येतें; परंतु हिंदी वाङ्मयेतिहासाकडे पाहतां मराठींत काव्य-रचना करणाऱ्या उत्तरभारतीय हिंदी कविमंडळाची परंपरा मात्र तितकी उज्ज्वल व अखंड स्वरूपांत असल्याचें दिसून येत नाहीं; तथापि त्यावरून मराठी भाषेविषयीं किंवा महाराष्ट्रीय संतकवींविषयीं उत्तरभारतीय हिंदी कवींना आदर वाटत नव्हता किंवा नाहीं, असें मात्र कदापि ह्मणतां यावयाचें नाहीं. कारण, एकट्या हिंदी कवि नाभाजीनेंच नामदेवादि मराठी संतकवींच्या अभिजात भक्तिरसाला व वाग्वैभवाला भुलून आपल्या 'भक्तमाल' ग्रंथांत त्यांचा आदरानें इतका गौरव केला आहे कीं, तो पाहून आजही महाराष्ट्रियांचें अंतःकरण अभिमानानें फुलल्यावांचून राहणार नाहीं !

## महानुभावांची कामगिरी

अशा प्रकारें वारकरी संतकवींनीं आपल्या पंथाबरोबर आपल्या भाषेचीही छाप उत्तरभारतावर जरी बसविली असली तरी त्यांच्या-पूर्वी इकडे मराठी भाषेचा मूळ पाया घालण्याचें श्रेय मात्र महानु-भावांनींच संपादिलें होतें. मराठी भाषेचा खराखुरा अभिमान वाह-णाऱ्या व त्या भाषेला आपली पवित्र धर्मभाषा मानणाऱ्या या लोकांच्या ग्रंथरचनेला ज्ञानोबारायांच्या पूर्वींपासून सुरवात झाली होती. 'लीळा चरित्र' हा त्या लोकांचा अगदीं पहिला ग्रंथ महींद्र-व्यास यानें 'ज्ञानेश्वरी'च्या ३० वर्षें अगोदर ह्मणजे इ. स. १२६० मध्यें रचिला होता. त्याच्या नंतर या लोकांचे आणखीही दहाबारा ग्रंथ 'ज्ञानेश्वरी' पूर्वी निर्माण झाले असल्याचे आढळतात. त्यांत या महानुभाव पंथाचा मूळ संस्थापक चक्रधर यांची 'चौपदी' (१२६४); कवीश्वर भास्कर भट्टाचे 'शिशुपाल वध' (१२७०), 'एकादश स्कंध' (१२७१) आणि 'श्रीकृष्ण चरित्र' (१२७२); भावे देवव्यासाचे 'पूजावसह'; गायनाचार्य दामोदर पंडिताचें 'वच्छहरण' (१२७५);

केशव व्यास आणि गोपाळ पंडित यांचा 'सिद्धांत सूत्रपाठ'; केशव व्यासाचा 'मूर्तिप्रकाश' (१२८५) आणि नरेंद्र आयाचितार्चे 'रुक्मिणी स्वयंवर' ( १२८५ ) हे गद्य-पद्य ग्रंथ विशेष उल्लेखनीय आहेत. यांपैकीं कांहीं ग्रंथांची रचना उत्तरभारतांतच झालेली आहे. वस्तुतः पाहूं जातां या पंथाचे प्रचारक मोठे बुद्धिमान, धूर्त व समयज्ञ पुरुष होते. कोणत्याही धर्मपंथांशीं सख्य न ठेवितां किंवा प्रत्यक्ष वितुष्टही न येऊं देतां आपला पंथ वाढविण्यासाठीं व तगविण्यासाठीं त्यांनीं केलेले प्रयत्न जरी बाह्यतः वेतसवृत्तीचे किंवा छद्मी असले तरी त्यांनीं केलेल्या एकंदर महत्कार्याकडे पाहतां ते एक प्रकारें श्लाघ्य होते, असें म्हणणें वावगें होणार नाहीं. प्रथमतः या प्रचारकांनीं उत्तर-भारतांत विदर्भामध्यें आपलें बस्तान बसविलें व तदुपरांत मोठ्या धिमाईनें आपले हातपाय थेट काबूल कंदाहारसारख्या दूरवरच्या यवन-प्रधान प्रदेशांपर्यंतों पसरले! काबूलचा अमीर दोस्तमहंमद याचा वजीर चरणदास, काश्मीरचा राजा गुलाबसिंह याचा सेनापति सरदार सुजनराय आणि पंजाबांतील धनिक कृष्णराज पंजाबी व विधिचंद्र शर्मा हे प्रतिष्ठित नामांकित पुरुष या पंथाचे त्या त्या भागांतील एकनिष्ठ अनुयायी होते व त्यांच्या वैयक्तिक सहानुभूतीमुळेंच त्या सर्व परकीय भागांत या पंथाचा प्रवेश व प्रसार होऊन तेथें श्रीकृष्णमंदिरें व मठ यांची उभारणी होऊं शकली. त्यांपैकीं काबूल (कपिश,) पेशावर ( पुरुषपुर ), मुल्तान ( मूलस्थान ), लाहोर आदि ठिकाणची मंदिरें व मठ अजूनही सुस्थितींत असून त्या ठिकाणीं एतत्पंथीयांचे विविध सांकेतिक लिपींत लिहिलेले अनेक प्राचीन हस्तलिखित मराठी ग्रंथ उत्तम रतीनें जतन करून ठेविलेले आहेत व त्याबरोबरच तत्प्रांतीय लोकांसाठीं या पंथांतल्या कांहीं कवींनीं हिंदी भाषेत लिहिलेले काव्यग्रंथही संग्राहित केलेले आहेत. त्यावरून असें उघड दिसून येतें कीं, महाराष्ट्रियांच्या ऊर्फ मराठ्यांच्या शौर्यसिंधूनें गिरिराज विंध्याद्रीचा

दुर्भेद्य तट फोडण्यापूर्वींच त्यांच्या मराठी वाग्गंगेनें तो तट पार फोडून टाकिला होता व अटकेपार भगवा झेंडा फडकण्यापूर्वींच तेथें मराठी भाषेचा झेंडा फडकून चुकला होता! वस्तुतः ही महानुभावांची उत्तरभारतांतील मराठी भाषेसंबंधाची कामगिरी मराठी वाङ्मयाच्या प्राक्कालीन इतिहासांत केव्हांही सुवर्णाक्षरांकित होणारी आहे. आपल्या मध्यभारतांतही या महानुभावांनीं पदार्पण केलें असल्याचे दाखले सांपडतात. प्रत्यक्ष चक्रधरानेंच आपलें अवतारकार्य संपवून बदरिकाश्रमास जातांना मार्गांत उज्जयिनीस मुक्काम केल्याचें व त्यावेळीं तेथील सुभेदार महंमद याच्याकडून त्याच्या कैदेंत असलेल्या कवीश्वर भास्करभट्टाची सुटका करविल्याचें प्रसिद्ध आहे; परंतु महानुभावांचें दळणवळण जरी मध्यभारतांत पूर्वीं रहात गेलें होतें तरी त्यांचे ग्रंथ मात्र इकडे उपलब्ध झाल्याचें अजून कोठें ऐकिवांत नाहीं; तथापि उज्जयिनी व ग्वाल्हेरकडील भागांत शोध केल्यास तेथें ते ग्रंथ उपलब्ध होण्याचा बराच संभव आहे. इंदुरास राजवाड्याजवळ असलेलें श्रीकृष्णमंदिर महानुभावांचेंच असून त्या पंथाविषयीं सहानुभूति प्रकट करणाऱ्या कित्येक स्त्रियांचा होळकर राजघराण्याशीं संबंध असल्याचेंही आढळून येतें. सुभेदार मल्हारराव होळकरांची खांडाराणी हरकूबाई ऊर्फ मावशीबाई व यशवंतराव होळकरांची उपपत्नी तुळसाबाई या त्यांपैकींच होत्या.

**माळव्यांतील मराठी सत्तेची प्राणप्रतिष्ठा.**

अशा प्रकारें धार्मिक कारणांमुळें महाराष्ट्रांतून उत्तरभारतांत आलेले महानुभाव लोक, वारकरी संत, यात्रिक जनता, क्षेत्रस्थ धार्मिक व काशी–उज्जयिनीवासी शास्त्रज्ञ पंडित यांनीं मराठी भाषेला प्रथम इकडे आणून थेट काबूल-कंदाहारपावेतों जरी आपल्याबरोबर नेलें होतें तरी तिचा प्रचार करणें हें केव्हांही त्यांनीं आपलें ध्येयीभूत किंवा अंगीकृत कार्य न मानल्यामुळें व त्यांचें वास्तव्यही इकडील

भागांत प्रायः अस्थायी स्वरूपाचें रहात गेल्यामुळें त्यांच्या हातून या भाषेच्या अभ्युदयार्थ प्रयत्न मात्र झाले नाहींत. शिवाय कोणत्याही परप्रांतांत एखाद्या नवीन गोष्टीचा उपक्रम होण्यास राजकीय सत्तेचा पाठिंबा हें एक बलवत्तर साधन असतें त्या साधनाचादेखील लाभ त्या काळीं मराठी भाषेला इकडे न झाल्यामुळें ती स्वतःही अभ्युदयोन्मुख होऊं शकली नाहीं. ही परिस्थिति १७ व्या शतकापावेतों अशीच अविरत राहून पुढें १८ व्या शतकापासून मात्र तिच्यांत उत्तरोत्तर बदल होण्यास आरंभ झाला. हा बदल घडवून आणण्याचें श्रेय सर्वथा महाराष्ट्रस्थ मराठ्यांना आहे. या मराठ्यांचा उत्तरभारताशीं संबंध वास्तविक त्यांच्या इतिहासाचे उत्पादक श्रीछत्रपति शिवाजी महाराजांपासूनच जुळून आलेला होता. आपल्या स्वराज्योद्योगांत शनिवत् आडव्या येणाऱ्या औरंगजेब बादशहाला जेरीस आणून उलट त्याच्याच अंतःकरणांत शल्यवत् दुःसह होऊन बसलेल्या महाराजांनीं त्याच्या मायावी निमंत्रणावरून आग्ऱ्याचा केलेला प्रवास सर्वश्रुतच आहे. यानंतर सुमारें दोन तपांनीं मराठ्यांचा उत्तरभारताशीं प्रत्यक्ष राजकीय संबंध सुरू झाला व त्याच्या अगदीं सुरुवातीलाच एकीकडे त्यांच्या भावी छत्रपति शाहूमहाराजांना शाही कैदी ह्मणून उत्तरभारताच्या साम्राज्यधानींत (दिल्लींत) निवास करावा लागला तर दुसरीकडे त्यांच्या फौजांना उत्तरभारतांचें सिंहद्वार अशा माळवा प्रांतांत शिरून चौथवसूलीनें शाही सत्तेवर एक प्रकारें जेतृत्वाचा छाप मारतां आला! या मराठ्यांच्या फौजेचें माळव्यांत अगदीं पहिल्यानें पाऊल छत्रपति राजारामाच्या राजवटींत इ. स. १६९० मध्यें पडलें. त्यावेळीं त्या फौजेनें सांप्रत धार संस्थानांत असलेल्या धर्मपुरी महालापावेतों येऊन तेथून चौथ वसूल करून नेला. याचीच पुनरावृत्ति इ. स. १६९४ त झाली व नंतर इ. स. १६९६ त मात्र त्या फौजेनें आणखी पुढें जाऊन मांडव व धार हीं दोन्हीं शहरें

काबीज करून घेतलीं. नंतर राजारामाच्या पश्चात् त्याची पत्नी ताराबाई हिनें इ. स. १७०२-१७०३ मध्यें माळव्यांत फौज पाठवून चौथवसूलीबरोबर सिरोंज, भेलसा, उज्जैन वगैरे भागांत आपला वचक बसविला व त्याच सुमारास भाऊराव कृष्ण नांवाच्या कोणी एका मराठी सेनानीनेंही सागर प्रांतावर स्वारी करून कांहीं महाल हस्तगत करून घेतले. याप्रमाणें सुमारें २७।२८ वर्षें मराठ्यांच्या स्वाऱ्या उत्तर-भारताच्या दक्षिण सीमाप्रांतांवर मधूनमधून होत राहिल्या आणि त्यांचा त्या बाजूला चांगला दराराही पण बसत चालला; इतक्यांत त्यांच्या मर्दुमकीला व मुत्सद्देगिरीला कळसास पोंचविणारी पेशवाई उदयास आली. या पेशवाईत बाळाजी विश्वनाथ, बाजीराव बल्लाळ, चिमाजी अप्पा, राघोबादादा, सदाशिवराव भाऊ प्रभृति राजनीतिज्ञ व प्रौढ प्रताप 'श्रीमंत–धन्यां'नीं आणि त्यांच्या पदरच्या शिंदे, होळकर, पवार आदि रणधुरीण सरदारांनीं अपूर्व पराक्रम गाजविला. त्यामुळें उत्तरभारतांतील इतर लहानमोठ्या राजसत्ता तर राहोच पण प्रत्यक्ष दिल्लीची जगड्व्याळ बादशाही सत्ताही कांहीं काळपावेतों मराठ्यांच्या मुठींत राहिली! या मराठ्यांचा, नर्मदोत्तर आपलें प्रभुत्व प्रस्थापित करण्याच्या सुरुवातीपासूनच, माळव्यावर विशेष डोळा होता व त्याला कारणेंही पण तशींच सबळ होतीं. एक तर तो प्रदेश महाराष्ट्रांतून उत्तरभारताकडे जातांना वाटेवर लागत होता आणि दुसरें त्याच्या इतका धनधान्यसंपन्न, हिंदु संस्कृतिमंडित आणि बहुप्रज असा अन्य प्रदेश तिकडे नव्हता. शिवाय त्याचें स्थानही भारत-वर्षाच्या अगदीं मध्यगत असल्यामुळें तो पुढेंमागें त्यांच्या आकांक्षा-भूत मराठी साम्राज्याचें केंद्र बनण्यासारखा होता. यावेळीं दैवयोगानें माळव्यांतील राजकीय वातावरणही मराठ्यांना अनुकूल असें होतें. मदांध मोगल सुभेदारांच्या सैतानी जांचामुळें माळव्यांतील हिंदु प्रजा अगदीं हवालदिल झाली होती. त्यामुळें इकडे जसा मराठ्यांचा

जयाभिलाषी डोळा माळव्यावर खिळून राहिला होता तसेंच तिकडे तेथील हिंदु प्रजेचेही आश्रयापेक्षी डोळे मराठ्यांकडे लागून राहिले होते! सरते शेवटीं त्या प्रजेच्या वतीनें इंदूरच्या राव नंदलाल मंडलोईनें पुढें होऊन मराठ्यांशीं संगनमत केलें व त्यांच्याकडून इ. स. १७३१ त भैरव घाटाच्या गुप्त मार्गानें माळव्यावर स्वारी करविली. त्यावेळीं धार जवळील तिरला येथें मराठे व मुसलमान यांची गांठ पडून निकराची लढाई झाली. या लढाईत माळव्याचा मोगल सुभेदार दयाबहादुर मारला गेला व माळवा मराठ्यांच्या सत्तेखालीं कायमचा आला. नंतर थोरले बाजीरावांनीं शिंदे, होळकर व पवार या आपल्या त्रिवर्ग सरदारांना तो सबंध मुलुख वांटून देऊन त्या ठिकाणीं मराठी सत्तेचे उपवृक्षच लावून दिले! हे उपवृक्ष सुदैवानें आजतागायत जेथल्या तेथें उभे असल्याचे आपण पहात आहोंत.

### मराठशाहींतील उत्तरभारतांतलें मराठी भाषेचें वैभव.

अशा प्रकारें १८ व्या शतकांत मराठ्यांनीं माळवा स्वांकित करून उत्तरभारतांत सर्वत्र आपला दरारा बसविला व तिकडील राजकारणांतही बराच हात शिरकावून 'कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुम्' असें आपलें प्रभुत्व प्रस्थापित केलें. त्यामुळें साहजिकच शिपाईप्याद्यांपासून तों मुत्सद्यांपर्यंत सर्व दर्जाच्या महाराष्ट्रीय लोकांच्या निरनिराळ्या कामगिऱ्यांनिमित्त निरनिराळ्या ठिकाणीं वसाहती होऊं लागून त्यांच्या मराठी भाषेला, जेत्यांची भाषा म्हणून, आजच्या इंग्रजी भाषेसारखें महत्त्व प्राप्त झालें व जिकडेतिकडे तिचा झपाट्यानें प्रसार झाला. त्या वेळच्या मराठी भाषेच्या वैभवाचें वर्णन 'रियासतकार' गोविंद सखाराम सरदेसाई यांनीं आपल्या "मराठशाहींतील गद्यरचना" * या निबंधांत पुढील-प्रमाणें केलें आहेः—" मराठी भाषा व मोडी लिपि, मराठी फडांतील हिशेबाची पद्धत हे प्रकार [ त्यावेळीं ] ठिकठिकाणीं

* 'महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका' (त्रैमासिक) वर्ष ४ अंक २ पृष्ठ ५५.

सुरू झाले. बुंदेलखंडांत किंवा दिल्लीस लहानशी पावती अगर अर्जसुद्धां मोडींतच लिहिणें लोकांस भाग पडूं लागलें. मराठ्यांचे हिशेबनीस आपली राज्यपद्धति व नियम सर्व ठिकाणीं अमलांत आणूं लागले. न्यायमनसुबा मराठींत होऊं लागला. मराठी लेखकांस मोठा दर चढला. जो तो मराठी कारकुनांचीं आर्जवें करूं लागला. मोठमोठीं वेतनें देऊन पदरीं मराठी लेखक बाळगणें लोकांस भाग पडूं लागलें. पेशव्यांकडे किंवा त्यांच्या सरदारांकडे दाद मागावयाची म्हणजे सर्व व्यवहार मराठींत व मोडींत व्हावा लागे. गुजराथ, बंगाल, दुआब व पुढेंपुढें पंजाबकडेसुद्धां हा प्रकार थोड्याबहुत अंशानें सुरू झाला. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे मराठी भाषा राज्य करूं लागली!" अस्तु.

## शिंदे, होळकर व पवार राजकुलांची वाङ्मयोपासना

अशा प्रकारें त्याकाळीं मराठी भाषा उत्तरभारतांत जरी सर्वत्र वैभवाच्या शिखरावर चढली तरी मागें सांगितल्याप्रमाणें मराठी साम्राज्याची मुहूर्तमेढ प्रथम माळव्यांत किंबहुना मध्यभारतांत रोंविली गेल्यामुळें व त्या साम्राज्याच्या उच्छेदानंतरही त्याचीं अवशेषरूप अशीं शिंदे, होळकर व पवार यांचीं संस्थानें येथेंच टिकून राहिल्यामुळें हा मुलूख मराठी भाषेला एक प्रकारें माहेरघरासारखा होऊन राहिला व या मुलुखाच्या साहित्याभिरुचीच्या उपजत गुणामुळेंच जणूं काय, शिंदे, होळकर व पवार यांच्या अंतःकरणांत यदृच्छेनें प्रेरणा होऊन त्यांनीं महाराष्ट्रांतले वैदिक, याज्ञिक, भिषक्, ज्योतिषी, नैयायिक, वैयाकरण, शास्त्री, कवि, गायक, हरिदास, रामदासी, वारकरी वगैरे सर्व शास्त्रांचे विद्वान् इकडे आणले व त्यांना उदार आश्रय देऊन त्यांच्या करवीं इकडील जनतेंत विद्येचा हळुहळू प्रचार करीत मराठी साहित्यमंदिराचा पाया रचून दिला! शिवाय त्या कामीं प्रत्यक्ष त्या कुळांतील कित्येक राजांनीं येथील पूर्वीच्या मुंजभोजादि राजांप्रमाणें मुक्तहस्तानें अपरिमित द्रव्याचा सद्व्यय करण्याबरोबर स्वतः ग्रंथ-

निर्मितीही केली. ती त्यांची परंपरा त्यांच्या वंशजांनीं आजतागायत चालू ठेविली आहे. त्यांपैकीं शिंदे कुळांतील राजांच्या कामगिरीकडे पाहतां महाराष्ट्रापासून अतिशय दूर व पंजाब, राजपुताना, बुंदेलखंड, रोहिलखंड यांसारख्या विसदृश व परस्परभिन्न संस्कृतींच्या लोकांनीं वेढिलेल्या, किंबहुना एक प्रकारें त्यांच्या कोंडींतच सांपडल्यासारखें झालेल्या, ग्वाल्हेरमध्यें अनेक महाराष्ट्रीय संतांच्या निरनिराळ्या संस्था व वाङ्मय यांच्या प्रवर्तनाला त्यांनीं अव्याहत दिलेलें पाठबळ निःसंशय प्रशंसनीय आहे. तसें इतिहासावरून पाहूं गेलें तर महाराष्ट्रीय संस्कृतीनें बऱ्याच काळापूर्वी पादाक्रांत केलेल्या प्रदेशाचें उत्तर टोंक ग्वाल्हेर हेंच असल्याचें आढळून येतें व तेथील महाराष्ट्रीय पंडितांची परंपरा शिंदे कुलोदयाच्या पूर्वीपासूनची असल्याचेंही नजरेस येतें. काशी, उज्जयिनीप्रमाणें तेथेंही पूर्वी न्याय, मीमांसा, व्याकरण, साहित्य, धर्मशास्त्र, ज्योतिष, योग, सांख्य, वेदांत इत्याद्यनेक विषयांत पारंगततेच्या परीक्षा घेतल्या जात असल्याचें दाखले सांपडतात; परंतु त्या वेळीं या सर्व गोष्टींना राजकीय पाठबळ नव्हतें, तें प्रथम शिंदे कुळाकडून मिळून तेथील जुन्या सांस्कृतिक व साहित्यिक महात्म्यांला राजकीय महात्म्याची आणखी नवीन जोड मिळाली व या त्रिवेणीसंगमामुळें ग्वाल्हेरचें भाग्य पूर्णोदयाला आलें. संगीतादि कलांचें माहेरघर म्हणून नांवाजण्याचाही योग त्यास प्राप्त झाला. शिंद्यांच्या राज्याची स्थापना करणारे व उत्तरमराठेशाहींत मराठी सत्तेचा डोलारा सांवरतांना रणांगणांत आणि राजकारणांत अग्रेसरत्वानें चमकणारे महादजी शिंदे ऊर्फ पाटीलबाबा यांनीं 'असि' लगत 'मसि' क्षेत्रांतही आपलें नांव अजरामर करून ठेविलें आहे! ते उत्तम भक्त कवि होते. रोज नियमानें पदें व अभंग रचून कृष्णभजन केल्याशिवाय निद्रा न करण्याचा त्यांचा परिपाठ होता. कीर्तनाची आणि संतसमागमाची त्यांना फार हौस असे. मल्लाप्पा वासकर,

सोहिरोबा आंबिये, रामदासी लक्ष्मण महाराज शिरगांवकर, पैठण येथील नाथमहाराज, रामकृष्णबुवा हरिदास श्रीगोंदेकर इत्यादि सत्पुरुषांचा सहवास त्यांना लाभला होता. मंसूरशा बीडकर या अविंध साधूस त्यांनीं गुरु केलें होतें व संतकवि दत्तनाथ राक्षसभुवनकरास लढाईवर जातांनाही ते बरोबर घेत होते. या पाटीलबाबांची अधिकांश पद्यरचना ' माधव विलास ' नामक पुस्तकरूपानें ग्वाल्हेरचे भास्कर रामचंद्र भालेराव यांनीं इ. स. १९२१ मध्यें प्रसिद्ध केली आहे. भावनांचा सलील उद्रेक हें जें कवितेचें मूळ लक्षण तें पाटिलबाबांच्या पद्यरचनेंत स्पष्टतेनें पहावयास मिळतें! पाटिलबाबांचे सत्पुत्र दौलतरावही कवि होते. उज्जनीहून ग्वाल्हेरला राजधानी नेऊन तेथें साहित्य–संगीत कलेचें उन्नयन करण्याचें श्रेय दौलतरावांनाच आहे. ' मराठी मिताक्षरी' चे कर्ते रघुनाथदेव काशीकर, 'दौलतेश्वर चरित्रा' चे कर्ते बाळकृष्णनाथ राजुरकर, निर्वाणीच्या फटक्यांचे कर्ते महिपतिनाथ ढोलीबुवा वगैरे मराठी कवि व शृंगाररसाचार्य पद्माकरासारखे हिंदी कवि दौलतरावांच्या पदरीं होते. ' अलिजाह प्रकाश ' नामक काव्याबद्दल पद्माकराला त्यांनीं एक लक्ष रुपये व एक हत्ती बक्षिस दिल्याबद्दलची आख्यायिका प्रसिद्ध आहे. दौलतरावांच्या अंतःपुरांतही मराठी साहित्याभिरुचि उत्पन्न झाल्याचें आढळून येतें. त्यांच्या राणी बायजाबाईसाठीं मुद्दाम त्यांचे पुराणिक रामशास्त्री यांनीं ' तत्त्वविवेक ' नामक ग्रंथ लिहिला होता. स्वतः दौलतरावांचीही कांहीं मराठी व हिंदी कविता अलीकडे उपलब्ध झाली असल्याचें सांगतात. महमदखां, कादरबक्ष, हद्दूखां, हस्सूखां, यांसारख्या संगीत कलापटूंना आश्रय देऊन त्यांच्या करवीं दौलतरावांनीं ग्वाल्हेरच्या संगीतकलेचा लौकिक वाढविला होता. त्यांच्या पश्चात् जनकोजीराव व जयाजीराव या उभयतांच्याही हृदयांतून साहित्य–संगीताच्या रसिकतेचा स्रोत गयेच्या फल्गुनदीप्रमाणें गुप्त रूपांत वाहिला. प्रसिद्ध ज्योतिर्विद् विसाजी रघुनाथ लेले हे जयाजीराव

महाराजांच्या आश्रयास होते. हे लेले व महाराष्ट्रांतील दुसरे नामांकित ज्योतिर्विद् जनार्दन बाळाजी मोडक आणि शंकर बाळकृष्ण दीक्षित या त्रिवर्गांनीं मिळून उज्जनीच्या पलभा व रेखा धरून कांहीं वर्षे श्रुतिस्मृतिपुराणविहित कालदर्शकें—सायन पंचांगें—प्रकाशित केलीं होतीं. जयाजीरावांचे दुसरे आश्रित आबा महाराज यांचें कवित्व व पांडित्य आणि कुप्पाशास्त्री यांचे विस्तृत धार्मिक निवाडे पाहून मन अगदीं थक्क होऊन जातें. यापुढें माधवराव महाराज व बळवंतराव भैया यांना साहित्याविषयीं वाटणारा आदर आणि त्यांनीं स्वतः केलेली साहित्यनिर्मिती सर्वश्रुतच आहे. बळवंतराव भैयांचें अंतःकरण स्वभावतःच भक्तिप्रवण असून त्यांच्या वाणींत रसाळता ओतप्रोत भरलेली होती. त्यांनीं मराठी व हिंदी या दोन्ही भाषांत विपुल पद्यरचना केली आहे. तिचा परिचय पुढें यथास्थानीं करून दिला जाईल. माधवराव महाराजांनीं इ. स. १९०० मध्यें 'चंद्रहास—रूपावती' नांवाचें एक मराठी नाटक लिहिलें असल्याचें 'महाराष्ट्रीय वाङ्मयसूची' वरून समजतें. त्यांचे हिंदी व इंग्रजी भाषेंतील ग्रंथ फार नांवाजलेले आहेत. 'सुख की कुंजी,' 'जमींदार हितकारी', 'तिब्बे हैवानात', 'हिदायतुल इस्लाम', 'दरबार पॉलिसी' वगैरे त्यांच्या ग्रंथांचे विषय जात्याच रुक्ष असले तरी वाचकांना त्या ग्रंथांतून जागोजागीं, वाळवंटांतल्या हिरवळीप्रमाणें, साहित्यिक दृष्ट्या आल्हादक असे भाग आढळून येतात. याशिवाय मराठी लेखकांना व साहित्यनिर्मात्या संस्थांना वेळोवेळीं मुक्तहस्तानें देणग्या देण्यांतही महाराजांची तत्परता नेहमीं दिसून येत होती. अस्तु.

आतां होळकरांकडे वळतां त्यांच्या घराण्यांत शिंद्यांप्रमाणें प्रत्यक्ष ग्रंथरचयिते राजे झाले असल्याचें जरी दिसून येत नसलें तरी विद्वानांचा यथोचित परामर्ष घेऊन मराठी साहित्याच्या संसारास सक्रिय सहानु-भूतीनें हातभार लावणारे उदारधी नृपाळ मात्र पुष्कळ झालेले

आढळतात. औदार्य हा जणुं काय या घराण्याचा आनुवंशिक गुणच दिसतो. या घराण्याचा पहिल्यानें पुढें आलेला पुरुष सुभेदार मल्हारराव हा मोठा लढवय्या होता व तो काळही मराठ्यांना रणांगणावर समशेर गाजविण्याचा होता, त्यामुळें साहजिकच साहित्यासारख्या शांततेच्या काळांत विकास पावणाऱ्या विषयाकडे सुभेदारांचा काणा डोळा होऊन त्यांचें औदार्य केवळ रणमर्दांना शौर्याबद्दल ढाल भरून रुपये देण्यांत प्रकट व्हावें यांत नवल नाहीं! सुभेदारांची सून देवी अहल्याबाई यांच्या औदार्याचा डंका तर अद्यापि सर्वत्र गाजतच आहे. आसेतुहिमाचल भरतखंडांत महत्वाचीं जेवढीं तीर्थक्षेत्रें व देवस्थानें आहेत तेवढ्या सर्व ठिकाणीं त्या साध्वीनें आपल्या अपरिमित औदार्याचीं स्मारकें निरनिराळ्या धार्मिक कार्यरूपांत उभारून आपलें नांव अजरामर करून ठेविलें आहे. विद्वानांचा परामर्ष घेण्यासही अहल्याबाई फार तत्पर असत. कविवर्य मोरोपंताचा त्यांनी केलेला सत्कार व रामजोशी आणि अनंतफंदी यांस वेळोवेळीं दिलेलें उत्तेजन सर्वश्रुत असून खुशालीरामाला मुद्दाम आश्रय देऊन त्याच्याकडून लिहविलेला 'अहल्याकामधेनु' हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. या ग्रंथांत धर्मशास्त्र व होळकर घराण्यांत होणारे सणवार यांची माहिती दिलेली आहे. अहल्याबाईच्या पश्चात् पहिल्या तुकोजीरावांपासून तों मार्तंडरावांपावेतों जवळजवळ ४० वर्षांचा काळ होळकरांच्या घराण्याला अत्यंत दगदगीचा व धालमेलीचा गेला. या काळांत अंतःशत्रू व बहिःशत्रू यांनीं पिसाळल्यासारखें करून होळकरांची दौलत बुडविण्याचे नानातऱ्हांनीं घाट घातले; परंतु श्रीमार्तंडानेंच त्या दुर्धर संकटांतून ती दौलत सहीसलामत तारली. अर्थात् या अवधींत होळकरांच्या दानगंगेचा ओघ अनेक अडथळ्यांनीं आडून ती विद्याकलांच्या संवर्धनास असमर्थ ठरली होती; तथापि त्यांतल्या त्यांत यशवंतराव होळकरांनीं ढोलीबुवांच्या गुरूपदेशानें मधूनमधून चित्तशांति ठेवून व दानधर्माचरण

करून महेश्वरच्या टोलेजंग छत्रीच्या उभारणीस आरंभ करून दिला होता. या सुमारास आक्रोडाच्या झाडाप्रमाणें वाढणारा व पुढें संकट-काळीं होळकरांच्या राज्याची भिस्त सांभाळणारा प्रसिद्ध राजकारणी पुरुष तात्या जोग पुढें आला. त्याच्या सल्लेनें इ. स. १८१८ मध्यें मंदोसर येथें होळकरांचा इंग्रजांशीं तह झाल्यावर व होळकरशाहींतील बहुतेक सर्व कलिपुरुषांचा अंतही त्याच सुमारास झाल्यावर पुढें राज्याला हळुहळूं स्थैर्य प्राप्त होऊं लागलें व सर्वत्र शांतता नांदूं लागली. मार्तंडरावांना पदच्युत करून गादीवर येणारे हरिराव होळकर स्वतः सुशिक्षित नव्हते. खजिन्यांत बंद करून ठेविलेले रुपये किडतील ह्मणून ते त्या रुपयांना बाहेर काढून उन्हांत वाळत घालवित असत व रुपये भरलेल्या तोड्यांचा हिशेब लक्ष्यांत रहावा ह्मणून रेशमाच्या लांब काढणीस गांठी घालून ती काढणी अहोरात्र हातांत बाळगीत असत, अशी त्यांच्या संबंधांत आख्यायिका सांगतात! ती खरी असो किंवा खोटी असो एवढें मात्र खरें कीं, आज इंदुरांत ज्या ज्या नवीन सुधारणा ह्मणून दिसत आहेत त्यांचें बीजारोपण या हरिरावांच्या कारकीर्दींत त्यांच्या दरबारीं असलेल्या मोठमोठ्या कर्तबगार मुत्सद्यांच्या प्रोत्साहनामुळेंच झालें इ. स. १८४१ त सरकारी शाळांचा उपक्रम करण्यांत आला. हा उपक्रम ह्मणजे इंदुरांतील पुढील वाङ्मयविषयक चळवळीचा पायाच होता. कारण त्या शाळांकरितां अध्यापक ह्मणून कीर्तनेबंधु, श्रीकृष्ण बापूजी फाटक, रावजी वासुदेव टुल्लु यांच्यासारख्या विद्वान् साहित्यप्रेमी मंडळीला पुढें महाराष्ट्रांतून मुद्दाम इकडे बोला-विण्यांत आलें. मराठी भाषेचे पाणिनी व जावऱ्याच्या नबाबाचे शिक्षक दादोबा पांडुरंग तर्खडकर आणि त्यांचे मित्र नानाजी नारायण यांनीं मराठींत तयार केलेलें जगांतल्या सर्व देशांच्या रंगीत नकाशांचें पहिलें पुस्तक याच हरिराव होळकरांच्या आश्रयानें इ. स. १८३६ मध्यें प्रसिद्ध झालें पुढें दुसरे तुकोजीराव गादीवर आले. त्यांची कारकीर्द

म्हणजे होळकर घराण्याच्या वाढत्या दौलतींत, प्रगतींत व कीर्तींत स्पृहणीय भर घालणारी अशी अत्यंत यशस्वी कारकीर्द होय. त्यावेळीं इंदुरांत स्थापन झालेल्या इंग्लिश मदरेसा, मेडिकल स्कूल, वेदशाळा, जनरल लायब्ररी आदि विद्याप्रसारक संस्था आज सुस्थितींत आहेत. मराठी भाषेविषयीं तुकोजीरावांना अत्यंत आदर वाटत असे. आपल्या संस्थानांतील सर्व अंतर्गत कारभार मराठींत होण्याबद्दल त्यांनीं सक्त नियम केले त्यामुळें मराठी भाषेला चांगलें महत्त्व येऊन कायदे-कानूंसुद्धां मराठींत तयार झाले आणि त्याबरोबरच आपली एक प्रकारें स्टेनॉग्राफी असलेली मोडी लिपीहि उर्जितावस्थेस आली. ही लिपि जलद व वळणदार लिहिणारे अनेक लोक, त्यावेळीं गणेश गुरुजी, गोविंद गुरुजी व नारायण गुरुजी यांच्या शाळेंत, तयार झाले. तुकोजीराव आधींच कुशाग्र बुद्धीचे होते व त्यांतून हिंदुस्थानांत केलेल्या पर्यटनामुळें, त्यांना नवी दृष्टि प्राप्त झाली होती. शिवाय त्यांच्या दरबारांत राव रामचंद्रराव भाऊ रेशिमवाले, राजा सर टी. माधवराव, दि. ब. आर. रघुनाथराव, रा. ब. कृष्णराव वासुदेव मुळ्ये, रा. ब. विष्णु केशव कुंटे, श्रीनिवासराव, खुमानसिंह बक्षी, गणेश सीताराम-शास्त्री गोळवलकर यांसारखे कर्तृत्ववान्, राजकारणपटु, अनुभवी, साहित्यभक्त व प्रगतिप्रिय पुरुष अनेक होते त्यामुळें इंदुरांतील कित्येक संस्था व चळवळी यांना रायकीय पाठिंबा सहज लाभूं शकला. सनातन धर्मरक्षिणी सभा, सत्यबोधिनी सभा, ब्राह्मसमाज, जंटलमेन्स क्लब आणि विद्यार्थीजनसमूह सभा या संस्था व ‘ पूर्णचंद्रोदय ’ आणि ‘ माळवा अखबार ’ हीं वर्तमानपत्रें यांनीं त्या वेळीं इंदुरांत, व पर्यायानें मध्यभारतांत, अपूर्व लोकजागृति घडवून आणली. स्वामी दयानंद, बाबू केशवचंद्र सेन, प्रतापचंद्र सेन, गोपाळ हरि देशमुख, विश्वनाथ नारायण मंडलिक यांसारख्या नामांकित पुरुषांनीं इंदुरास भेट देऊन तत्रस्थ जनतेला आपल्या ज्ञानाचा व मताचा लाभ करून

दिला. दि. ब. आर. रघुनाथराव यांनीं पुनर्विवाह सशास्त्र असल्या-बद्दलचें जोरदार मत प्रतिपादन केलें. हत्तीशास्त्री, गणेशशास्त्री भागवत, गणेशशास्त्री केळकर वगैरे विद्वच्छ्रेष्ठांनीं स्वामी दयानंदांशीं सनातन धर्मावर श्रवणीय वाग्युद्ध केलें व आणखीही बऱ्याच परस्थ पंडितांपुढें आपला पांडित्यप्रभाव प्रकट केला. तुकोजीरावांना महाराष्ट्रीय व महाराष्ट्र यांच्याविषयीं अत्यंत प्रेमादर वाटत असे. तो प्रेमादर ते प्रसंगानुसार सक्रिय प्रदर्शितही करीत असत. इ. स. १८७७ च्या दुष्काळांत 'सार्वजनिक काका' च्या विनंतीवरून त्यांनीं दक्षिणेंतील दुष्काळपीडितांना वांटण्यासाठीं धान्याचीं शेंकडों पोतीं पाठविलीं होतीं व काशिनाथ नारायण तेलंग यांना मुंबई हायकोर्टांत न्यायाधिशाचें पद मिळाल्याबद्दल त्यांच्या गौरवार्थ इंदुरास भरलेल्या सभेपुढें आपली सहानुभूति प्रकट केली होती. तसेंच शेवटले पेशवे बाजीराव यांच्या कन्या श्रीमंत बयाबाईसाहेब आपटे यांचा त्यांनीं परामर्ष घेऊन नाना-फडणिसांच्या वंशजांना नेमणूक करून दिली होती. या गोष्टींनीं माळवा व महाराष्ट्र हीं जरी परस्परांपासून दूर वसत असलीं तरी अंतःकरणानें मात्र तीं जवळ किंबहुना अभिन्नच आहेत हें तुकोजी-रावांनीं उत्तम प्रकारें दाखवून दिलें होतें. तुकोजीरावांना साहित्याचीही विशेष आवड होती. त्यांच्या कारकीर्दींत आनंदराव सखाराम बर्वे, बाळकृष्ण मल्हार हंस, विष्णु सोमनाथ सरवटे, एकनाथशास्त्री कर-कंबकर, बळवंतराव कमळाकर माकोडे वगैरे नामांकित ग्रंथकार आणि जालमचंद भंडारी, रामचंद्र विठ्ठल व्यास वगैरे उत्तम वक्ते मंडळी इंदुरांस चमकली. भंडारी व व्यास यांची मातृभाषा भिन्न असतांही त्यांचें मराठी भाषेवर एवढें प्रभुत्व होतें कीं, महाराष्ट्रीय विद्वत्तेचें केंद्र अशा पुणें शहरांतील वक्तृत्वोत्तेजक सभेंत त्यांनीं मराठींत उत्कृष्ट व्याख्यानें देऊन बक्षिसें मिळविलीं होतीं! पुढें शिवाजीराव महाराजांची कारकीर्द सुरू झाली. शिवाजीराव स्वतः उत्तम संस्कृत पंडित, ज्योतिर्विद

व गुणग्राहक होते. त्यामुळें त्यांच्या कारकीर्दीत विद्वानांचा यथोचित परामर्ष घेतला जाऊन ग्रंथनिर्मितीलाही चांगलें उत्तेजन मिळालें. शैक्षणिक चळवळींना हातभार लावण्यास शिवाजीराव सदा कटिबद्ध असत. उच्च इंग्रजी विश्वविद्यालयीन शिक्षणासाठीं त्यांनीं होळकर कॉलेज स्थापून कॅनेडियन मिशनला खिश्चन कॉलेजद्वारा शिक्षणकार्य करण्यास वाव करून दिला. शिवाय टिळक व आगरकर या लोकसेवाव्रत विद्वानांना इंदुरास समक्ष बोलावून आणि त्यांचा यथोचित सत्कार करून त्यांच्या शैक्षणिक चळवळींना अपेक्षेबाहेर सहाय्य केलें. पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजकरितां कांहीं एक मुदत किंवा अटी न ठरवितां आपला पुण्यांतला वाडा आदण होऊन देऊन टाकला. नाटकांची तर त्यांना विशेषच आवड होती. आण्णासाहेब किर्लोस्कर व गोविंद बल्लाळ देवल या प्रसिद्ध नाट्याचार्यांना त्यांचा चांगला आश्रय असे. देवलांचीं शापसंभ्रम, विक्रमोर्वशीय वगैरे नाटकें खास शिवाजीरावांच्याच अनुज्ञेनें व प्रोत्साहनानें तयार झालेलीं आहेत. पुढें श्रीमंत सवाई तुकोजीरावांच्या राजवटींत राज्याची सर्वतोपरि भरभराट होऊन साहित्योन्नतीबद्दल जे प्रयत्न सुरू झाले ते सर्वांच्या डोळ्यापुढें आहेतच. ते पाहून दातृत्वांत प्रतिकर्ण म्हणून तुकोजीरावांची कोणी प्रशंसा केल्यास मिथ्या होणार नाहीं! केवळ आपल्या संस्थानांतलिच नव्हें तर अखिल हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रकारें लोकसेवा करणाऱ्या प्रायः सर्व संस्थांना तुकोजीरावांनीं हजारो रुपयांच्या देणग्या दिल्या आहेत व विद्वानांच्या परामर्षार्थही तसाच ‘ देकार ’ केला आहे. त्यांच्या एकंदर देणग्यांची मोजदाद करूं गेल्यास ती कित्येक लक्षांनीं भरेल! व तसेंच त्यांच्या साहित्यप्रीतीची तुलना करूं गेल्यास ती एकट्या बडोद्याचे अधिपति श्रीमंत सयाजीराव गायकवाडांशींच करतां येईल! मराठी व हिंदी या दोन्ही भाषांतील उत्तमोत्तम ग्रंथांना आणि साहित्यिक चळवळींना आपल्या राज्याकडून यथोचित उत्तेजन मिळावें

म्हणून तुकोजीरावांनीं इंदुरांत प्रस्थापिलेलीं ग्रंथोत्तेजक मंडळें व साहित्य सभा अजून अस्तित्वांत असून त्या संस्थांकडून साहित्य-संवर्धनासंबंधीं झालेले व होत असलेले प्रयत्न किती स्पृहणीय आहेत हें विशद करून सांगण्याची आवश्यकता नाहीं! तसेंच इंदूर ग्रंथालयालाही राज्यांतून ठराविक वार्षिक देणगी अव्याहत दिली जाण्याची तरतूद तुकोजीरावांनीं करून ठेवून होळकरशाहीचा सप्रमाण व सविस्तर इतिहास तयार होण्यासाठीं मुद्दाम एक इतिहास कचेरीही स्थापून दिली आहे. तुकोजीरावांचे सत्पुत्र व सांप्रत होळकरांच्या गादीवर असलेले श्रीमंत सरकार यशवंतराव महाराज हेही सुविद्य, साहित्यानुरागी आहेत. त्यांच्या मातुश्री श्रीमंत सौ. महाराणी चंद्रावती बाईसाहेब यांचें साहित्यप्रेम प्रशंसनीयच होय. होळकर घराण्यांत प्रत्यक्ष ग्रंथ निर्माण करणारी विभूति यापूर्वी न झाल्यानें जी एक प्रकारची मोठी उणीव राहून गेली होती ती यांनीं चांगल्या रीतीनें भरून काढली आहे. त्यांचें ‘ सुविचार–माला ’ हें पुस्तक व निर-निराळ्या नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेले लेख मोठे उद्बोधक आहेत. त्यांवरून त्यांची थोर विद्वत्ता व प्रांजल विचारसरणी निदर्शनास येऊन त्यांच्याविषयीं नितांत आदर वाटल्यावांचून रहात नाहीं. अस्तु.

आतां धारकर पवारांकडे वळतां तेथेंही त्या घराण्यांतील पुरुष आपल्या मुंज, भोज प्रभृति पूर्वजांकडून धारेला मिळालेला साहित्य-क्षेत्राचा मान कायम राखण्याच्या बाबतींत अविरतपणें तत्परता दाखवीत असल्याचें आढळून येतें. द्वितीय यशवंतराव पवार स्वतः कवि होते. त्यांनीं आपला दरबार अनेक विद्वज्जनांनीं विभूषित करण्याची महत्वाकांक्षा धरून दशग्रंथी, तत्वज्ञानी, धर्माचार्य, गायनाचार्य, साहित्याचार्य, वैयाकरण आदि मंडळी धारेस जमविली होती. त्या मंडळींत गणेशशास्त्री पारोळकर, भोंडोशास्त्री, वामनभट्ट जटापाठी, गणपतिमामा, रामचंद्र पुराणिक, रामकृष्णबुवा ऊर्फ

देवजी यांसारखे नामांकित व लोकादरपात्र पुरुष अग्रगण्य होते. पारोळकरांना यशवंतरावांनीं ' कालिदास ' ही पदवी बहाल केली होती. या पारोळकरांचा शतपथ ब्राह्मणावरील ' चरकप्रकाश ' नांवाचा ग्रंथ प्रो. मॅक्समुल्लराकडून प्रशंसेस पात्र ठरला होता. ज्योतिषांत-देखील त्यांची चांगली गति असून ते कविताही करीत असत. त्यांची कांहीं स्फुट कविता उपलब्ध आहे. धोंडोशास्त्री हे उत्तम धर्मशास्त्रज्ञ होते. त्यांच्याकडे प्रत्यक्ष काशी क्षेत्राहून धर्मसंबंधीं प्रकरणें निवाड्या-साठीं येत असत. वामनभट्ट जटापाठी व गणपतिमामा यांच्या अनुक्रमें वेदशाळा व साहित्यशाळा नांवाजलेल्या होत्या. रामचंद्र पुराणिकांनीं वैद्यकीचा व देवजीबुवांनीं गायनविद्येचा बराच प्रसार केला. भारत-वर्षातील पहिल्या प्रतीच्या संगीतज्ञांत देवजीबुवांचें नांव प्रामुख्यानें घेतलें जातें व त्यांची शिष्यपरंपरा दिल्ली, कलकत्ता, मुंबई, मद्रास वगैरे दूरदूरच्या शहरांपावेतों आढळते. यशवंतरावांच्या पश्चात् धारच्या गादीवर आलेले आनंदराव महाराज फार भोळे होते. हरिराव होळकरांप्रमाणें यांच्याही भोळेपणाच्या कित्येक आख्यायिका प्रसिद्ध आहेत. यांना आपल्या पूर्वजांविषयीं मात्र अत्यंत अभिमान वाटत असे, ह्मणून त्यांनीं आपल्या घराण्याचा साद्यंत इतिहास तयार करविण्याच्या हेतूनें महाराष्ट्रांतील प्रतिष्ठित पंडित वामनशास्त्री इसलामपुरकर यांना मुद्दाम धारेस बोलाविलें होतें; परंतु तो इतिहास इसलामपुरकरांकडून संपूर्ण तयार होण्यापूर्वींच आनंदराव स्वर्गवासी झाले. नंतर आनंदरावांचे उत्तराधिकारी उदाजीराव महाराज हे गादीवर आले; पण ते त्यावेळीं अल्पवयी असल्यामुळें गव्हर्मेंटकडून इंदूरचे रा. ब. कृष्णराव वासुदेव मुळ्ये यांची सुपरिंटेंडेंट ह्मणून धारेस योजना झाली. मुळ्ये यांनीं इसलामपुरकरांस आपलें इतिहासलेखनाचें काम पूर्ण करण्यास सांगितलें व तें पूर्ण झाल्यावर तज्ज्ञांना त्यांचा ग्रंथ दाखवितां तो नापसंत ठरल्यामुळें प्रसिद्ध होऊं शकला नाहीं. उदाजीराव

महाराज पुढें वयांत आल्यावर मोठे साहित्यरसिक निघाले. त्यांनीं अनेक विद्वानांस व संस्थांस देणग्या देऊन साहित्याभिवृद्धीस हातभार लाविला. शिवाय त्यांनीं स्वतः शालिहोत्र व राजनीति या विषयांवर इंग्रजींत स्वतंत्र ग्रंथही लिहिले. आनंदराव महाराजांप्रमाणें त्यांनाही आपल्या घराण्याबद्दल मोठा अभिमान वाटत होता. त्यांनीं मध्य-भारतास भूषणभूत असलेले वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध साहित्यप्रेमी काशीनाथ कृष्ण लेले यांच्या देखरेखीखालीं आपल्या घराण्याचा सप्रमाण इतिहास तयार होण्यासाठीं राज्यांत एक स्वतंत्र इतिहास ऑफिस कायम केलें. आतांपावेतों लेले यांच्या साह्यानें शिवराम काशीनाथ ओक यांनीं तयार केलेले पवार घराण्याच्या इतिहासावरील तीन ग्रंथ प्रकाशित झाले आहेत.

धारकर पवारांप्रमाणेंच द्विदल देवासकर पवारांतही विद्याभि-रुचि व दानशूरता यांविषयींचा आपल्या घराण्याचा पूर्वापार लौकिक यथाशक्ति राखणारे राजे झाले आहेत. त्यांतील वडील घराण्याकडील कृष्णाजीराव बाबासाहेब यांनीं मराठी व हिंदी ग्रंथनिर्मितीच्या बाबतींत, जवळपासचे तर राहोत, पण महाराष्ट्रांतून व त्या पलिकडच्या मुलुखां-तून आलेल्या कित्येक साहित्यिकांना उदार अंतःकरणानें देणग्या दिल्या होत्या व डॉ. किलहार्न प्रभृति संस्कृतज्ञ पाश्चात्य पंडितप्रवरांनीं प्रशंसिलेल्या संस्कृत 'व्हिक्टोरियाप्रशस्ति' चे कर्ते वैजनाथशास्त्री आणि मूळ कर्नाटकस्थ कवि कृष्णाचार्यशास्त्री अवधानी या दोघां विद्वानांना आपल्या पदरीं ठेविलें होतें. कृष्णाजीरावांचे उत्तराधिकारी व विद्यमान महाराज श्रीमंत सरकार तुकोजीराव बापूसाहेब यांच्या साहित्यभक्तीचे, गुणग्राहकतेचे व औदार्याचे गावे तितके गोडवे थोडेच आहेत. त्यांनीं स्वतः भक्तिभावपरिप्लुत अशी बरीच अभंगरचना केली असून कित्येक ग्रंथकारांना आणि वाङ्मयीन संस्थांना मुक्तहस्तानें देणग्या दिलेल्या आहेत. शिवाय मराठी साहित्य भांडारांत प्रतिवर्षी उत्तमोत्तम ग्रंथांची

भर पडावी या सद्धेतूनें विद्वान् परीक्षक मंडळाच्या संमतीनें सर्वोत्तम ठरणाऱ्या मराठी ग्रंथाला ‘ भोजराज प्राइझ ’ देणें व आपल्या राज्यांत मराठीला राजभाषा ह्मणून संमानित करणें या त्यांच्या दोन गोष्टींनीं तर त्यांची आपल्या मायभाषेवरील निःसीम प्रीति–भक्ति सुस्पष्ट होणारी आहे. देवासचे ‘ श्रीशिवाजी ’ साप्ताहिक त्यांच्याच प्रेरणेनें व पाठिंब्यानें चालत असे. सर्व बाबतींत मागसलेल्या स्वज्ञातिबांधवांच्या उन्नतीसाठीं मराठा--शिक्षण--परिषदेला सर्वोपरि सहाय्य करून त्यांनीं जें प्रत्यक्ष कार्य केलें तें त्यांच्या असाधारण कळकळीचें, बुद्धिमत्तेचें व सौजन्याचें दृश्यफलच होय ! त्यांचे युवराज विक्रमसिंहराव हे मुंबई विश्वविद्यालयाचे पदवीधर असून त्यांच्या ठायींही साहित्याभिरुचि दिसून येत आहे. त्यांचें मृगयाप्राविण्य वाखाणण्यासारखें आहे. याच विषयावर त्यांनीं मागें ‘ किर्लोस्कर ’ मासिकांतून एक उद्बोधक लेखही लिहिला होता. देवासच्या धाकट्या घराण्यांतील नारायणराव दादासाहेब हे मोठे प्रगतिप्रिय राजे होते. देवासला शिक्षण खात्याचा पाया घालून व व्हिक्टोरिया हायस्कूलची स्थापना करून त्या संस्थेस नांवा-रूपाला आणण्यासाठीं त्यांनीं जे प्रयत्न केले ते निःसंशय प्रशंसनीय आहेत. सदर हायस्कुलांतील विद्यार्थ्यांनीं चालविलेल्या ‘ बालबोध ’ नामक संस्थेला त्यांचें चांगलें पाठबळ होतें. त्यांचे उत्तराधिकारी मल्हारराव बाबासाहेब हे जरी वृत्तीनें राजर्षि होते तरी त्यांना वाङ्मयाची आवड होती. ‘ मालवा समाचार ’ व ‘ मार्तंड ’ या त्यांच्या राज्यांतील दोन्ही नियतकालिकांना सर्वस्वीं त्यांचेंच सहाय्य होतें. त्यांच्या पश्चात् गादीवर आलेले विद्यमान श्रीमंत सरकार सदाशिवराव खासेसाहेब महाराज यांच्या ठायीं वसत असलेले विद्वत्ता, वक्तृत्वशैली, लेखन-कलापाटव आदि गुण तर सर्वांच्या परिचयाचेच आहेत.

येथवर आपण मध्यभारतांतील राजांना व राजघराण्यांतील व्यक्तींनीं केलेल्या वाङ्मयविषयक कामगिरीचें विहंगमावलोकन केलें,

आतां इतर जुन्या पिढींतील व्यक्तींनीं केलेल्या वाङ्मयाविषयक कामगिरीचें विहंगमावलोकन करून हें प्रकरण आटोपतें घेऊं. वास्तविक पाहूं जातां विविधता, विपुलता, योग्यता व उपयुक्तता या सर्व दृष्टींनीं जुन्या पिढींतील व्यक्तींची ती कामगीरी बरीच महत्वाची आहे; परंतु मुद्रण संस्कार न घडल्यामुळें जगाला ती अजून अपरिचितच राहून जागोजागीं उपेक्षणीय स्थितींत अडगळ स्वरूपीं दफ्तरांत दडून पडलेली आहे; तथापि अलिकडे ग्वाल्हेरचे इतिहाससंशोधक भास्कर रामचंद्र भालेराव यांच्या चिकाटीच्या प्रयत्नांमुळें बऱ्याच दफ्तरांच्या गांठी सुटून त्यांतील अनेक ग्रंथांचा, नाममात्र कां होईना, परिचय झालेला आहे, ही आनंदाची गोष्ट होय. पुढील माहिती विशेषतः भालेराव यांच्याच निरानराळ्या लेखांधारें आह्मी देत आहों.

### मध्यभारतांतील जुनें मराठी गद्य वाङ्मय

वास्तविक मध्यभारतांतील जुन्या मराठी गद्य वाङ्मयामधील किरकोळ ह्मणून मंत्रतंत्र, वैद्यकांचीं चोपडीं, हेमाडपंती व इतर मेस्तकें हीं सोडतां बाकी राहिलेल्या बखरी आणि इतर बोधपर ग्रंथ हीं कालांतरानेंदेखील आज आपणांस उच्च दर्जाची वाटल्यावांचून रहात नाहींत ! त्यांपैकीं कांहीं बखरी दक्षिणेंतून नकलून आणलेल्या असून कांहीं इकडेच स्वतंत्र लिहिल्या गेलेल्या आहेत. नकललेल्या बखरींत ‘ पंचोपाख्यानाची बखर ’, ‘ गजासुरवधाची बखर ’ व ‘ शालिवाहनाची बखर ’ या ग्वाल्हेर व उज्जैन येथें उपलब्ध झालेल्या बखरी महत्वाच्या आहेत आणि स्वतंत्र लिहिलेल्या बखरींत ग्वाल्हेरचे मोरो हरि मुजुमदार यांनीं नारो सखारामाकडून लिहविलेली ‘ भाऊगर्दीची-बखर ’, महादजी शिंद्यांचे सेनापति सुभेदार खंडेराव हरि यांचे आतेबंधु रावजी अमृतफळे यांच्या नातवानें लिहिलेली ‘ पानिपतची-बखर ’, ‘ शिंदेशाहीचा पाहिला बखरकार ’ ह्मणून समजला जाणारा रामाजी अनंत दाभोळकर यानें लिहिलेली रोहिलखंडावरील मोहिमेची

बखर, कुलाबेकर आंग्र्याच्या पदरीं असलेला व दौलतराव शिंद्यांच्या मातुश्री मैनाबाई यांच्याबरोबर ग्वाल्हेरीस आलेला मोरो लक्ष्मण रानावडे यानें लिहिलेली 'तारीख सिंधिया', दौलतराव शिंद्याचे दिवाण यादव भास्कर शिक्केनवीस यांचे चिरंजीव रामचंद्रपंत यांनीं लिहिलेल्या 'शिवाजी महाराजांची बखर' व शिवाजी महाराजांच्या वेळेपासून तों पानिपत युद्धाच्या अखेरपर्यंत लिहिलेली 'मराठशाहीची बखर' या दोन बखरी आणि नरसिंग सदाशिव नेवाळकर यानें गोहद प्रकरणावर लिहिलेली बखर या सर्व बखरी महत्त्वाच्या आहेत. तसेंच होळकरांच्या पदरीं असलेले गोपाळ बाबा खासगीवाले यांची 'होळकरांची कैफियत' व धोंडो मोरेश्वर राजे यांची 'इंदूर संस्थानची बखर', 'श्रीमंत सकलगुणैश्वर्यविराजमान राजश्री श्रीसाच्चिदानंदस्वामींचे सेवेशीं आज्ञाधारक मानाजीपंतांची' बखर, 'श्रीचरित्र बखर' आणि एका नगरकरानें लिहिलेली 'यजुर्वेदी माध्यांदिनांची बखर' याही बखरी मोलाच्या होत. त्यांपैकीं 'मानाजीपंताची बखर' कोणी लिहिली हें समजत नाहीं; परंतु तिच्या भाषेवर व रचनेवर एकनाथी वाङ्मयाची दाट छाप पडलेली दिसून येते. 'श्रीचरित्र बखर' यशवंतराव ऊर्फ बाळा महाराज यांनीं लिहिली असून तिच्यांत समर्थ-शिष्य कल्याणबंधु दत्तात्रेय यांच्या वंशजांची व मुख्यत्वेंकरून दत्तात्रे-यांचे निपणतु मनोहर ऊर्फ आबा महाराज यांची हकीकत दिलेली आहे. हे बाळा महाराज या आबा महाराजांचेच चिरंजीव होते. आतां बखरींशिवाय इतर जे गद्य ग्रंथ आढळतात त्यांत नकललेले, स्वतंत्र व अनुवादात्मक असे तीन प्रकार नजरेस येतात. नकललेल्या ग्रंथांत रामदासकृत 'पंचीकरण', 'योगवासिष्ठ', 'वेदांतसिद्धांत प्रकरण', 'भागवतांतर्गत भूगोलरचना' आणि 'कौरव-पांडव सेनेंतील रथी महारथी' हे ग्रंथ प्रमुख असून स्वतंत्र ग्रंथांत ज्ञानदेवविरचित 'पंचीकरण महावाक्यविवरण', चांगदेवकृत 'तत्त्वसार' व

' बुद्धिबळाचा खेळ ' हे ग्रंथ महत्त्वाचे आहेत. यांतील शेवटला ग्रंथ महत्पुर येथील नारायण महिपत यांनीं दौलतराव शिंदे यांचे जामात बापूसाहेब दाभाडे सेनापति तळेगांवकर यांच्या प्रेरणेनें लिहिलेला आहे. यांत कांहीं संस्कृत पद्यभागही आहे. चांगदेवकृत 'तत्त्वसार' हा ग्रंथ ' ज्ञानेश्वरी ' नंतर २२ वर्षांनीं ह्मणजे शके १२३४ (इ. स. १३१२) मध्यें लिहिला गेला असून तो उज्जयिनीच्या ' प्राच्य ग्रंथसंग्रहालया ' च्या विद्यमानें नुकतांच प्रकाशित झाला आहे. या ग्रंथाच्या प्रकाशनामुळें महाराष्ट्र सारस्वतांतून सर्वस्वीं हकालपट्टी झालेल्या चांगदेवास पुनः महाराष्ट्र वाङ्मयाच्या इतिहासांत स्थान मिळवून देण्याचें श्रेय मध्यभारतास लाभलें आहे, ही गोष्ट येथें नमूद करण्यास आनंद वाटतो. अनुवादात्मक ग्रंथांत ' शुकबहात्तरी ', ' सिंहासनबत्तिशी ', ' वेताळपंचविशी ', ' गुलबकावली ', ' हातिमताई ' इत्यादि ग्रंथ सरस आहेत. यापैकीं कांहीं ग्रंथ मोडी लिपींत लिहिलेले आहेत. बाभूळगांवकरकृत ' भक्तमाल' ग्रंथाचा समावेश याच रुदरांत होऊं शकेल. वरील ग्रंथांव्यतिरिक्त कांहीं निराळ्या स्वरूपाच्या चोपड्याही मध्यभारतांत निर्माण झालेल्या आहेत. त्यांतील महादजी शिंद्यांच्या युरोपियन सेनानीनें शिंद्यांच्या देशी फौजेस इंग्रजी शिस्त शिकविण्यासाठीं तयार केलेल्या इंग्रजी—हिंदी—मराठी चोपड्या अवश्य निर्देशनीय आहेत. या चोपड्या आधुनिक ' धि सेल्फ इंग्लिश टीचर ' च्या धर्तीवर असून त्यांतील इंग्रजी अक्षरें, त्यांचे उच्चार व अर्थ मोडींतच दिलेले आहेत.

### मध्यभारतांतील जुनें मराठी पद्य वाङ्मय

येथवर आपण जुनें गद्य वाङ्मय पाहिलें; आतां पद्य वाङ्मयाकडे वळूं. महाराष्ट्राप्रमाणें मध्यभारतांतीलही जुनें मराठी गद्य वाङ्मय भक्तिपर व आध्यात्मिक स्वरूपाचें असून, तें प्रायः सर्वच स्वतंत्र आहे. महादजी शिंद्यांच्या अतिशय लोभांतल्या दत्तनाथ राक्षसभुवनकरांची स्फुट कवितांचीं बाडें इकडील पद्य वाङ्मयांत प्रथमतः ठळकपणें

दिसून येतात. या बाडांची प्रचंडता पाहूनच मन अगदीं थक्क होतें! दत्तनाथांच्या कवितेंत शब्दमाधुर्य नसलें तरी भावपूर्णता हा गुण मात्र विशेष रीतीनें उतरलेला दिसून येतो. त्यांचे एकनिष्ठ शिष्य विठ्ठल यांची कविता अल्पसंख्य पण सरस आहे. ग्वाल्हेर येथें नाथपंथाचा प्रचार करणारे व दौलतराव शिंद्यांना राजयोगाचें शिक्षण देणारे महिपतिनाथ उज्जयिनीकर ऊर्फ ढोलीबुवा हे उत्तम कवी होते. त्यांची मराठी व हिंदी अशी दोन्ही भाषांतील भक्तिपर स्फुट कविता ग्वाल्हेर, उज्जयिनी शिवाय काशी, प्रयाग व राजपुताना या भागांतही अजून प्रसिद्ध आहे. त्यांनीं ३०-४० पद्य ग्रंथ लिहिले. त्यांतील 'भक्तचरित्र' हा ग्रंथ सर्वोत्कृष्ट होय. त्यांच्या शिष्योपशिष्यांचीही बरीच कविता सांपडते. तसेंच ग्वाल्हेर येथें रामदासी मठाची स्थापना करणारे लक्ष्मण महाराज शिरगांवकर यांचे पणजे कल्याणबंधु दत्तात्रेय, आजे राघव महाराज व त्यांच्या वंशांतील मनोहर ऊर्फ आबा महाराज, यशवंत लक्ष्मण आणि बाळा महाराज वगैरे पुरुषांनींही पद्यरचना करून मध्यभारतांत रामदासी वाङ्मयाची अभिवृद्धि केली आहे. त्यांतील आबा महाराजांचें 'रामायण', 'वाग्विलास', व 'पंचीकरण' हे ग्रंथ ह्मणजे तत्कालीन मराठी पद्य वाङ्मयाचे अलंकारच होत. जिवबादादा बक्षी यांच्या आग्रहामुळें महाराष्ट्रांतून उत्तरभारतांत येऊन उज्जयिनीस मठ स्थापन करणारे संतकवि सोहिरोबानाथ आंबिये यांची अंतिम पद्यरचना इकडेच झालेली आहे. प्रसिद्ध वैदर्भकवि देवनाथ ग्वाल्हेरीस समाधिस्थ झाले. × त्यांची परंपरा मल्हारनाथ, वामननाथ व बाळकृष्णनाथ यांनीं तिकडे राखिली. वामननाथांचे 'आदिपर्व', 'पांडवप्रताप', 'पांडुरंगविजय' व 'यमगीता' हे पद्य ग्रंथ आणि

× या सत्पुरुषाविषयीं अशी आख्यायिका प्रसिद्ध आहे कीं, रामनवमीच्या उत्सवांत ते भजनानंदामध्यें पूर्ण निमग्न असतांना मंडपाला अकस्मात् आग लागली तरी त्याची शुद्ध त्यांना न राहून ते आंतल्या आंत भस्मसात् झाले!

त्यांचे शिष्य नारायणाची स्फुट कविता व कांहीं छोटेखानी पद्य ग्रंथ उपलब्ध आहेत. बाळकृष्णनाथ हे वामननाथांचे सुपुत्र होत. ते आपणास महाभारती ह्मणवीत असत. त्यांचे ‘ भारत ’, ‘ भागवत ’, ‘ कार्तिकमाहात्म्य ’, ‘ केदारकल्प ’, ‘ मार्तंडविजय ’, ‘ सिद्धलीलार्णव ’ इत्याद्यनेक प्रचंड ग्रंथ, स्फुट कविता व आख्यानांचीं बाडें पाहिलीं ह्मणजे त्यांस महाकवि ह्मणावेंसें वाटतें आणि ‘ कवि बाळकृष्णाची गिरा। व्यासामागें चमके धरा ’ असा प्रसिद्ध असलेला त्यांचा लौकिक यथार्थ वाटतो. या बाळकृष्णनाथांनीं जनकोजी शिंदे यांना केलेला ‘ नीतिबोध ’ ही उल्लेखनीय आहे. दौलतराव शिंद्यांच्या आग्रहानें रघुनाथदेवांनीं केलेलें ‘ मिताक्षरींचें मराठी ओवीबद्ध भाषांतर ’, शिंद्यांचे सेनापति केशव प्रवरासंगमकरांच्या भजनांचीं बाडें, ‘अवंतिका मोक्षपुरी। श्रीमहाकालेश्वराच्या मंदिरीं ’ लिहिला गेलेला श्रीधराचा ‘ तत्त्वामृत ’ ग्रंथ, दिनकर कवीनें श्रीमद्भागवतांतर्गत दशमस्कंधांतील ‘ भ्रमरगीताध्याया ’ चें केलेलें मराठी पद्यात्मक रूपांतर, नारायण श्रीरंगाचे श्रीपंढरीनाथावरील भक्तिभाव परिप्लुत ‘ म्हातारी आख्यान’, सोरटीबुवांचीं पदें आणि हरिकिंकर धुंडिराज पुरंदरे यांचीं भजनें, हें सर्व पद्यवाङ्मय उत्कृष्ट आहे. त्याचप्रमाणें अमृतसिद्धेश्वरकृत ‘ सत्य-नारायण कथा ’, मार्तंडबुवा नगरकरांचे ‘ भक्तचरित्र ’, शंकरशिष्य गंगाधराचें ‘ श्रीकृष्णचरित्र ’, रानडे ऊर्फ स्वच्छंदानंदस्वामींचें ‘मराठी देवी भागवत ’, नारायण महाराज व चिदंबरशिष्यांचीं पदें आणि रामजी दादा शिंदे, रामचंद्र बाळकृष्ण व गणपतराव चव्हाण यांचीं स्फुट आख्यानें यांचीही गणना उच्च प्रतीच्या पद्य वाङ्मयांत होण्या-सारखी आहे. मंगळा गौरीच्या कहाणीवर एका ग्वाल्हेरकर कवीनें रचिलेला व वऱ्हाडांत यादव माधव काळे यांना उपलब्ध झालेला चंपू ग्रंथही गोड आहे. तसेंच गंगाधरपंत खानवलकर गुलसरायवाले ऊर्फ विष्णु यांची आर्या कविता अत्युत्कृष्ट आहे. कविवर्य मोरोपंतांच्या

कवितेंत जर ती कविता मिसळून दिली तर ती पुनः त्यांतून निवडून काढणें खात्रीनें अशक्य होईल ! 'हरि मजला चालवेना' व 'एकदां नेत्र भरुनि पाही। मधुर तरि बोल सख्या कांहीं' यांसारखीं हृदयाला हलवून भावना उचंबळून आणणारीं गोविंदबुवा नाशिककरांचीं शेंकडों भक्तिपर पदें तर निःसंदेह मध्यभारताची चिरंतन व अनर्घ्य अशी वाङ्मयसंपत्तीच होय !

ढळत्या पेशवाईत महाराष्ट्रामध्यें पोवाडे व लावण्या यांची बेसुमार निपज झाली, तद्वतच मध्यभारतांतही त्यावेळीं तशा प्रकारच्या काव्याची निपज होऊन त्यांत आणखी खास उत्तरभारतांतील ख्याल, टप्पे, ठुमऱ्या, छक्कड यांचीही बरीच भर पडली. रंगराव व रामा गोंधळी सहजापूरकर यांनीं रचिलेले वीर-रसप्रचुर पोवाडे आणि विठ्ठलराव शिंदे पिंगरेकर, हरि भिकाजी, बापू शिरसाट, धोंडी, नारायण, बाळा, हरिबाळा वगैरेंनीं रचिलेले शृंगाररसपूर्ण ख्याल, टप्पे, ठुमऱ्या, छक्कड हे सर्व अत्यंत बहारीचे आहेत. याशिवाय त्या-वेळीं 'सख्या' नामक एक निराळाच विप्रलंभ शृंगारिक काव्य प्रकार इकडे प्रचारांत आला. त्यांतील रघुनाथ दीक्षित बांधवकराच्या कांहीं 'सख्या' तर महाराष्ट्रांतील नांवाजलेल्या लावण्यांवरही मात करणाऱ्या आहेत ! या कविचें 'मदन विलास' नामक एक शृंगारिक काव्यही उपलब्ध झालें आहे.

वर निर्देशिलेल्या या एकंदर जुन्या मराठी पद्य-गद्य वाङ्मयाशिवाय आणखींही बरेंचसे जुनें गद्य-पद्य वाङ्मय ठिकठिकाणीं पहावयास मिळतें; परंतु त्यांतील कांहीं ग्रंथ जाबालाप्रमाणें आपल्या जन्मदात्याविषयीं अज्ञान प्रकट करणारे असल्यामुळें त्यांचा उल्लेख केलेला नाहीं; तथापि असे ग्रंथ यापुढें संशोधकाच्या कृपाकटाक्षास पात्र न झाल्यास ते लवकरच सरस्वती नदीप्रमाणें अंतर्धान पावण्याचा संभव आहे.

## समारोप

अस्तु. या बऱ्याच लांबलेल्या एकंदर वृत्तांतावरून मध्यभारतांतील राजांनीं व विद्वानांनीं मातृभाषेच्या अर्चनेंत आपलें अलोट वाग्वैभव शतकानुशतकें आनंदानें उधळित या भूमीची साहित्यिक पूर्वपीठिका किती उज्वल व यशोमय करून ठेविली आहे, हें वाचकांच्या निदर्शनास येईल व अशा पूर्वपीठिकेमुळें या भूमीच्या आधुनिक मराठी वाङ्मयेतिहासावलोकनाबद्दल त्यांच्या ठायीं उत्कट जिज्ञासा उत्पन्न होईल, यांत संदेह नाहीं.



# प्रकरण पहिलें.

## भाषा व साहित्यविषयक वाङ्मय

वागर्थाविव संपृक्तौ वागर्थप्रतिपत्तये ।
जगतः पितरौ वन्दे पार्वतीपरमेश्वरौ ॥

—कालिदास.

### आधुनिक मराठी वाङ्मयाचा काळ

भारतवर्षांत आंग्ल सत्तेची प्राणप्रतिष्ठा झाल्यानंतर पाश्चात्य वाङ्मयाच्या परिचयानें व व्यासंगानें नवे गुण व नवें वळण उचलून जें मराठी वाङ्मय निपजूं लागलें त्याची गणना 'आधुनिक' या सदराखालीं होऊं लागली. या आधुनिक मराठी वाङ्मयाचा काळ स्थूल मानानें इ. स. १८६१ पासून धरण्यांत येत असल्यानें तेथपासून इ. स. १९३६ अखेर मध्यभारतांत जें आधुनिक मराठी वाङ्मय निर्माण झालें त्याचा परिचय आतां करून द्यावयाचा आहे.

### वाङ्मय नदीरूप आहे

वाङ्मय हें अनेक दृष्ट्या नदीरूप आहे. कारण नदीप्रमाणें वाङ्मयाचा उगम कल्पनेच्या उच्च स्थानापासून झाला असतो व पुढें

नदीप्रमाणेंच त्याचा प्रवाहही इतिहास, चरित्रें, काव्यें, कादंबऱ्या, नाटकें, शास्त्रीय विषय वगैरेच्या प्रांतांतून अनिरुद्धपणें संचार करीत जातो. त्यामुळें त्यास कोठें गंभीर तर कोठें उत्तान, कोठें रुक्ष तर कोठें सुभग, कोठें संकुचित तर कोठें विस्तृत असें परस्परभिन्न स्वरूप प्राप्त होतें. शिवाय नदीप्रमाणेंच त्याला निरनिराळ्या परभाषेंतलि वाङ्मयाचे परिवर्तित ओघ मिळून तें हळुंहळूं पुष्टही होत जातें. नदीच्या प्रवाहाप्रमाणेंच त्याचाही प्रवाह राष्ट्रांतील अथवा समाजांतील विशिष्ट विचारांचें आणि मतांचें वहनसाधन होतो व नदीच्या प्रपाता-प्रमाणेंच त्याच्याही प्रवाहाच्या प्रपातानें देशभक्ति, धर्मनिष्ठा, शास्त्रीय प्रगति वगैरेची विद्युत् समाजांत उत्पन्न होतें आणि असें होता होता शेवटीं नदीप्रमाणेंच तें प्रचंड स्वरूप होऊन बहुमुखानें इतस्तत: प्रसृत होतें. आपलें मध्यभारतीय आधुनिक मराठी वाङ्मय अशाच रीतीनें प्रसृत झालें असल्यामुळें त्याच्या पर्यालोचनाकरितां आपणास त्याच्या एकेका विषयांगाकडे स्वतंत्रपणें वळणेंच इष्ट होईल. सबब प्रस्तुत प्रकरणांत आपण त्याच्या ‘ भाषा व साहित्य ’ या विषयांगाकडे वळूं.

### भाषाविषयक वाङ्मय

प्रथम भाषाविषयक वाङ्मयाकडे वळतां आपणास ‘ भाषासौंदर्य शास्त्र ’, ‘ शुद्धलेखनसुधारणा अथवा सरकारी बंडावा ’, ‘ मराठी शुद्धलेखन ’, ‘ कांहीं मराठी शब्दांच्या व्युत्पत्तीचे माग अथवा मराठी भाषेच्या माहेराचें सिंहावलोकन ’, ‘ मराठी भाषेंतील सांप्रदायिक शब्द अथवा ह्मणी ( भाग पहिला ), ‘ शास्त्रीय मराठी व्याकरण ’ व ‘ मराठी बंगाली शिक्षक ’ अशीं लहानमोठीं सात पुस्तकें या विषयावर मध्यभारतांत निर्माण झालेलीं आढळतात. यांतील ‘ भाषासौंदर्य शास्त्र’ हें पुस्तक धारचे सदाशिव बापूजी कुळकर्णी यांनीं सन १९०८ मध्यें लिहिलें असून तें आकारानें जरी लहान असलें तरी महत्त्वाच्या दृष्टीनें मात्र मोठें आहे. शब्दयोजना, वाक्यरचना, अर्थसाधना, रसविचार,

अलंकार आणि भाषासरणी अशा सहा गोष्टींचें सोदाहरण व सुसंगत विवेचन यांत मार्मिकतेनें केलेलें आहे. दुसरें 'शुद्धलेखन सुधारणा अथवा सरकारी बंडावा' हें पुस्तक कुळकर्णी यांच्या वरील पुस्तकापूर्वी ३ वर्षे ह्मणजे सन १९०५ मध्यें 'ग्रंथमाले' तून प्रकरण रूपानें प्रसिद्ध झालें आहे व तें प्रो. मोरो केशव दामले यांनीं उज्जयिनीस असतांना लिहिलेलें आहे. यांत मराठी भाषेच्या शुद्धलेखन–सुधारणेचें खंडन व प्रचलित पद्धतीचें मंडन शास्त्रीय दृष्टीनें केलें आहे. याच्या अगदीं उलट 'मराठी शुद्धलेखन' हें पुस्तक असून तें सन १९३५ मध्यें प्रसिद्ध झालें आहे. मराठी शुद्धलेखन सुधारणेबद्दलच्या वादाचा अधिकृत रीत्या निकाल लावण्यासाठीं महाराष्ट्र साहित्य परिषदेनें नियुक्त केलेल्या 'शुद्धलेखन मंडळानें' विधायक चर्चा करून जे नवीन नियम तयार केले ते प्रचारांत आणण्याचें निरनिराळ्या विश्वविद्यालयांनीं ठरविल्यावरून त्यांची माहिती विशेषतः विद्यार्थी वर्गास या पुस्तकद्वारें करून देण्याचा प्रयत्न इंदूरचे प्रो. वामन गोपाळ ऊर्ध्वरेषे यांनीं केला आहे; तथापि या शुद्धलेखन सुधारणेस अनुकूल असलेल्या लेखकांसही या पुस्तकाचा उपयोग होण्यासारखा आहे. 'कांहीं मराठी शब्दांच्या व्युत्पत्तीचे माग अथवा मराठी भाषेच्या माहेराचें सिंहावलोकन' हें पुस्तक प्रो. परशुराम नारायण पाटणकर यांनीं जरी सन १९०७ मध्यें प्रयागहून प्रसिद्ध केलें असलें तरी त्याची बरीचशी तयारी त्यांच्या हातून मध्यभारतांतच झाली होती. प्रो. पाटणकर हे मूळचे कोंकणांतले राहणारे; परंतु नोकरीनिमित त्यांना कायमचें उत्तर हिंदुस्थानांत यावें लागून गुजराथपासून काशी, प्रयागपावेतोंच्या मुलुखांत हिंडावें लागलें. त्यामुळें त्यांचा निरनिराळ्या प्रांतिक भाषांशीं सहजगत्या परिचय होत गेला व त्यांत आढळलेल्या कांहींकांहीं शब्दांवरून त्या सर्व भाषांशीं मराठी भाषेचें थोडेंफार तरी नातें असावें, अशी त्यांची दृढ कल्पना झाली. तेव्हां तें नातें

शोधून काढण्याची जिज्ञासा त्यांच्या मनांत जागृत होऊन त्यासाठीं त्यांनीं मराठी भाषेंतील शब्दांशीं साम्य असणारे निरनिराळ्या भाषांतील निरनिराळे शब्द संग्रहित करण्यास सुरवात केली. दहाबारा वर्षांत असे दोनशें-अडीचशें शब्द जमले. याशिवाय त्यांना मोलस्वर्थच्या कोशांत वरील मुलुखांमध्यें माग लागण्याचा संभव असलेले असे आणखीही कांहीं शब्द सांपडले. त्यांचाही त्यांत त्यांनीं समावेश करून घेतला व मग अत्यंत शोधक आणि चिकित्सक बुद्धीनें सर्व शब्दांच्या व्युत्पत्त्या जुळवून प्रस्तुत पुस्तक लिहून तयार केलें. या पुस्तकांतील कित्येक शब्दांवरून मराठीचें उत्तरहिंदुस्थानांतून दक्षिणेकडे संक्रमण झालें असावें असें अनुमान प्रो. पाटणकर यांनीं काढिलें आहे; परंतु तें कितपत सयुक्तिक आहे हें सांगतां येणें कठिण आहे. इतिहासाचार्य विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांनीं संपादिलेल्या 'ज्ञानेश्वरी'च्या प्रस्तावनेंत या पुस्तकाचा गौरवपूर्वक उल्लेख आलेला आहे. 'मराठी भाषेंतलि सांप्रदायिक शब्द अथवा ह्मणी' (भाग पहिला) हें लहानसें पुस्तक धारचे वकील सदाशिव लक्ष्मण बापट यांनीं सन १८८५ मध्यें लिहिलेलें आहे व या पुस्तकाच्या नांवावरूनच त्यांतील विषय सहज कळून येण्यासारखा आहे. इंदूरचे विश्वनाथ नारायण देव ऊर्फ 'पुरुषोत्तम' यांनींही असाच जुन्या मराठी ह्मणींचा एक मोठा संग्रह केलेला असून तो ते पुस्तकरूपानें प्रसिद्ध करणार होते; परंतु त्यांच्या अकालीं निधनामुळें तें कार्य असिद्धच राहिलें. 'शास्त्रीय मराठी व्याकरण' हा प्रचंड ग्रंथ सन १९११ मध्यें प्रसिद्ध झाला आहे; परंतु तो प्रो. मोरो केशव दामले यांनीं त्याच्या १० वर्षें अगोदर उज्जनीस असतांना लिहिलेला होता. दादोबांच्या मराठी व्याकरणानंतर महाराष्ट्रांत त्याच विषयावर दोनतीन ग्रंथ निर्माण झाले; तथापि शास्त्रीय दृष्ट्या विचार करून लिहिलेल्या व्याकरणाची उणीव मात्र तशीच राहून गेली होती ती प्रो दामले यांनीं प्रस्तुत ग्रंथद्वारें दूर केली; परंतु त्यांचा

हा प्रयत्न कांहीं पूर्वग्रहदूषित विद्वानांनीं सदोष ठरवून त्यावर हवी तशी टीकाही केली. अशा विद्वानांत इतिहासाचार्य राजवाडे हे अग्रणी होते. त्यांनीं प्रथम ‘ प्राची प्रभा ’ नामक गोमांतकीय मराठी मासिकांतून या व्याकरणावरील आपले कांहीं टीकात्मक तिङ्त विचार प्रकट केले व मग त्यावरच सन १९१२ मध्यें ‘ सुबंत विचार ’ नामक एक स्वतंत्र पुस्तकही लिहून प्रसिद्ध केलें. या पुस्तकांत दामल्यांबरोबर इतर पूर्व व्याकरणकारांसही नादान ठरविण्यांत आलें आहे; परंतु राजवाड्यांच्या कुशाग्र बुद्धीबरोबरच त्यांचा विक्षिप्त स्वभावही सर्वांच्या परिचयाचा असल्यामुळें त्याबद्दल कोणीच विषाद मानला नाहीं. ‘ प्रौढबोध व्याकरण ’ कार रामचंद्र भिकाजी जोशी यांनीं आपल्या ‘ मराठी भाषेची घटना ’ या पुस्तकांत दामले यांच्या व्याकरणाविषयीं ह्मटलें आहे कीं, “ या पुस्तकानें मराठी व्याकरणासंबंधीं गोष्टींचा निकाल तर लागला नाहींच, पण उलट बऱ्याच नवीन भानगडी मात्र उत्पन्न झाल्या आहेत.” परंतु त्यांचा हा अभिप्राय निखालस मत्सरयुक्त दिसतो. तें कसेंही असो एवढें मात्र खरें कीं, मराठी व्याकरणावर एवढा विस्तृत, सांगोपांग व पूर्वकालीन व्याकरणविषयक चर्चेचा परामर्ष घेणारा यासारखा दुसरा ग्रंथ आजवर निर्माण झालेला नाहीं! या ग्रंथाच्या बऱ्याच पूर्वीं हरिशास्त्री थत्ते नामक एका ग्वाल्हेरच्या विद्वानाचेंही व्याकरणावर एक पुस्तक प्रसिद्ध झालें असल्याचें समजतें. ‘मराठी-बंगाली शिक्षक ’ हें पुस्तक वासुदेव गोविंद आपटे यांनीं इंदुरास असतांना लिहिलेलें आहे व याच्या आतांपावेतों दोन आवृत्त्या निघाल्या आहेत. बंगाली भाषा शिकणाऱ्यांसाठीं हेंच काय तें एक पुस्तक मराठींत आहे. याच्या प्रथमावृत्तींत बंगाली व्याकरणाची माहिती, उत्कृष्ट बंगाली लेखांचे उतारे, वाचनीय ( अर्थात् अभ्यसनीय ) बंगाली पुस्तकांची यादी, शब्दकोश इत्यादि गोष्टी दिल्या होत्या. नंतर द्वितीयावृत्तींत वरील गोष्टींशिवाय बंगाली भाषेंत व लिपींत छापलेलें एक पुस्तक व

त्याच्या स्पष्टीकरणार्थ एक स्वतंत्र परिशिष्ट अधिक जोडल्यानें या पुस्तकाच्या उपयुक्ततेंत विशेष भर पडली आहे.

**शब्दकोश**

भाषाविषयक वाङ्मयाच्या पाठोपाठ शब्दकोशांकडे वळणें इष्ट होईल. कारण, शब्दकोश हें भाषावाङ्मयाचें एक प्रमुख प्रत्यंग आहे. आपल्या मध्यभारतांत तीन शब्दकोश तयार झाले आहेत. त्यापैकीं इंदूरचे केशव रामचंद्र सप्रे यांचा 'मराठी कोश' व ग्वाल्हेरचे गंगाधर गोपाळ अटेरकर यांचा 'एकाक्षरी कोश' आज दुर्मिळ आहेत. त्यामुळें त्या दोन्ही कोशांविषयीं कांहींच लिहितां येत नाहीं. तिसरा कोश ह्मणजे पांचसहा वर्षांपूर्वी इंदूरचे अनंत सीताराम काळेले यांनीं रॉजेटकृत 'थेसॉरस' च्या धर्तीवर तयार केलेला 'राजकोश' होय. या कोशाचे एकंदर वीस भाग असून त्यांपैकीं फक्त पहिले दोन भाग प्रसिद्ध झाल्यावर काळेले यांचें आकस्मिक निधन होऊन पुढील भागांच्या प्रसिद्धीचें काम एकदम स्थगित झालें. हा कोश ह्मणजे मराठी-इंग्रजी, इंग्रजी-मराठी, इंग्रजी-इंग्रजी व मराठी-मराठी अशा चारींचा एकत्र विषय-शब्दकोशच होय. तो संपूर्ण प्रसिद्ध झाल्यास त्याच्या योगानें खरोखर एका सर्वोत्कृष्ट व सर्वोपयोगी शब्दकोशाची भर आपल्या वाङ्मयभांडारांत पडल्यासारखें होईल. सदर कोशाच्या प्रसिद्ध झालेल्या दोन भागांविषयीं 'ज्ञानप्रकाश' कार व 'महाराष्ट्र कोश' कार यांनीं प्रतिकूल अभिप्राय प्रकट केले आहेत; परंतु ते आमच्या मतें 'बोद्धारो मत्सरग्रस्ताः' या वचनाची सार्थकता पटविणारे आहेत. अस्तु. वरील शब्दकोशाशिवाय मुंबई इलाखा विद्याखात्याच्या मराठी क्रमिक सहा पुस्तकांतील संपूर्ण शब्द संग्रहित करून तयार करण्यांत आलेल्या बाळकृष्ण मल्हार हंस यांच्या 'रत्नकोशा' च्या रचनेचे व वासुदेव गोविंद आपटे यांच्या 'मराठी शब्दरत्नाकरा' चा कच्चा खडी तयार करण्याचें बरेंचसें श्रेय इंदुरास असल्याचें ह्मणतात.

## साहित्यविषयक वाङ्मय

आतां यापुढें साहित्यविषयक वाङ्मयाकडे वळतां ‘ अलंकार ’ ‘ मराठी अलंकार ’, ‘ रसप्रबोध ’, ‘ रूपकप्रबोध अथवा नाट्य-लक्षणमाला ’, ‘ भारतीय नाट्यशास्त्रासंबंधीं सुचलेले विचार ’ व ‘ नाट्यमार्ग ’ एवढीं या वर्गांत मोडणारीं पुस्तकें मध्यभारतांत तयार झालेलीं दिसून येतात. यांपैकीं ‘ अलंकार ’ हें पुस्तक बऱ्याच वर्षांपूर्वी बागळी इस्टेटमधील रामचंद्रशास्त्री नामक एका विद्वानानें लिहिलें होतें; परंतु तें आज उपलब्ध नाहीं. ‘ मराठी अलंकार ’ हें पुस्तक अलीकडेच सन १९३४ मध्यें इंदूरचे प्रो. वामन गोपाळ ऊर्ध्वरेषे यांनीं मराठी–भाषेच्या अभ्यासकांसाठीं तयार केलें आहे व त्यांत सर्व अलंकारांची माहिती थोडक्यांत सोदाहरण दिली आहे. ‘रसप्रबोध ’ हें पुस्तक उज्जनीचे बळवंत कमळाकर माकोडे यांनीं लिहिलें असून तें सन १८९२ मध्यें प्रसिद्ध झालें आहे. नाट्य किंवा काव्य यांचा आत्मा रस असल्याबद्दल संस्कृत व मराठी पंडितांनीं पूर्वी विचार करून गर्भित मत प्रतिपादन केलें आहे त्याचा पुनः सांगोपांग विचार करून माकोडे यांनीं हें उत्कृष्ट पुस्तक तयार केलें आहे. यांत रसाबरोबर ध्वनि, गुण व रीति यांचीही पण अल्प चर्चा केली आहे. भक्ति व प्रेयान् यांनाही त्यांनीं रसांत अंतर्भूत केलें आहे. हल्लीं नागपुर विश्वविद्यालयानें एम्. ए. च्या विद्यार्थ्यांकरितां मराठीच्या अभ्यास-क्रमांत हें पुस्तक ठेविलें असल्यावरून आज देखील त्याची विद्वन्मान्यता किती आहे हें दिसून येतें. ‘ रूपकप्रबोध अथवा नाट्यलक्षणमाला ’ हें पुस्तकही बळवंतराव माकोडे यांनींच वरील पुस्तकाच्या दोन वर्षे अगोदर ह्मणजे सन १८९० मध्यें लिहिलेलें आहे. नाट्यलक्षणाची यांत केलेली चिकित्सा व चर्चा इतकी सर्वांगीण व मार्मिक आहे कीं, ‘ विविधज्ञानविस्तार ’ कर्त्यांनीं आपल्या मासिकाच्या मार्च १८९१ च्या अंकांत या पुस्तकावर अभिप्राय देतांना ‘ मासे मासे नूतनं दृश्यकाव्यं ’

कसेंबसें खरडून नाटकाचार्य होऊं पहाणाऱ्या होतकरू मंडळींनें हें पुस्तक अवश्य वाचावें अशी शिफारस केली आहे. 'भारतीय नाट्यशास्त्रासंबंधीं सुचलेले विचार' व 'नाट्यमार्ग' हीं दोन पुस्तकें अनुक्रमें प्रो. परशुराम नारायण पाटणकर व सदाशिव बापूजी कुळकर्णी यांनीं लिहिलेलीं असून तींही आपापल्या परी चांगलीं आहेत.

## मराठी भाषेचे इतिहास

या साहित्यविषयक वाङ्मयानंतर मराठी भाषेच्या इतिहासावर लिहिल्या गेलेल्या पुस्तकांकडे वळणें योग्य होईल. मध्यभारतांत अशा प्रकारच्या लिहिल्या गेलेल्या पुस्तकांपैकीं इंदूरचे जगन्नाथ रावजी ट्ल्लु यांनीं लिहिलेलें 'मराठी भाषेचा इतिहास' हें पुस्तक सन १९१२ मध्यें प्रसिद्ध झालें असून त्यांत त्यांनीं मराठी भाषेंतील निवडक ग्रंथांची माहिती देऊन नंतर त्या भाषेच्या उत्तरोत्तर होणाऱ्या प्रगतीचें दिग्दर्शन केलें आहे. दुसरें पुस्तक 'देवास येथील मराठी साहित्य व साहित्य-सेवक' हें कृष्णाजी गंगाधर कवचाळे यांनीं सन १९२६ मध्यें लिहिलेलें आहे व त्यांत त्यांनीं देवासच्या मराठी साहित्याचा संक्षिप्त इतिहास दिला आहे. पुढें 'मराठी टांचणें' (मराठी वाङ्मयाच्या इतिहासा-वरील टांचणें) हें तिसरें पुस्तक प्रो. वामन गोपाळ ऊर्ध्वरेषे यांनीं सन १९३४ मध्यें केवळ कॉलेजच्या विद्यार्थ्यांच्या उपयोगासाठीं तयार करून प्रसिद्ध केलें आहे. हीं 'टांचणें' ह्मणजे मराठी वाङ्मये-तिहासाची जंत्रीच असल्यानें इतर अभ्यासूंनाही या पुस्तकाचा उपयोग होण्यासारखा आहे. यानंतर 'महाराष्ट्र-सारस्वत-मार्गदर्शिका' हें धारचे प्रो. बा. ग. चव्हाण यांनीं लिहिलेलें पुस्तक 'धार-तरुण साहित्य माले' चें दुसरें पुष्प ह्मणून सन १९३५ मध्यें प्रसिद्ध झालें आहे. या पुस्तकांत मराठी भाषेची उत्पत्ति व त्यांतील सारस्वताचा जन्म; त्या सारस्वतावर अनेक स्थित्यंतरामुळें व इतर भाषांशीं घडलेल्या साहचर्यामुळें झालेले संस्कार व परिणाम; कालदृष्ट्या त्याची विभागणी;

काव्यें, नाटकें, कादंबऱ्या, निबंध, भाषणें, प्रवासवर्णनें, लघुकथा, नाटिका, नाट्यछटा, भावगीतें, नाट्यगीतें वगैरे सारस्वताच्या विविध प्रकारांतील महत्त्वाच्या बाबी; त्यांचें अंतःस्वरूप; मानवी जीवनाशीं तादात्म्य होण्याकरितां सत्य, सौंदर्य आणि नीति यांचें त्यांत आविष्करण करण्याचे यथोचित मार्ग इत्यादि गोष्टींविषयीं थोडक्यांत पण उपयुक्त अशी माहिती दिली आहे. ग्वाल्हेरचे नीळकंठ सखाराम साठे यांच्या 'मोडी कागद वाचन' या सन १८७४ मध्यें प्रसिद्ध झालेल्या, थोड्या निराळ्या स्वरूपाच्या, पुस्तकाचाही येथें जातां जातां याच सदरांत निर्देश केल्यास वावगें होणार नाहीं.

## 'कला आणि नीति' विषयक वाङ्मय

आतां शेवटीं साहित्याशीं तत्त्वतः संबंध ठेवणाऱ्या कला आणि नीति यांच्या परस्पर नात्याविषयीं महाराष्ट्रांत उत्पन्न झालेल्या वादावर मध्यभारतांत जें वाङ्मय निर्माण झालें आहे त्याचा परिचय करून देऊन हें प्रकरण आटोपतें घेऊं. कला आणि नीति यांच्या परस्पर संबंधाचा वाद वास्तविक जुनाच असला तरी कस्तुरीच्या परिमलाप्रमाणें त्याचा ताजेपणा केव्हांही किंचिन्मात्र कमी होणारा नाहीं. हा वाद जागतिकही आहे. युरोपमध्यें गेल्या शतकांत या वादावर मोठमोठीं रणें माजलीं होतीं. महाराष्ट्रांत तर हा वाद नेहमी निरनिराळ्या रीतीनें डोकें वर काढित असतो. ५–६ वर्षांपूर्वीं पुण्याच्या 'रत्नाकर मासिकांतून प्रकाशित झालेल्या 'ओलेती' चित्रानें या वादाला नवें तोंड लागलें. तेव्हां या वादांत ग्वाल्हेरचे कविवर्य भास्कर रामचंद्र तांबे यांनीं भाग घेऊन 'कला आणि नीति' हें आपलें पुस्तक सन १९३२ मध्यें प्रसिद्ध केलें. सदर वादावरील मराठींतलें हें अगदीं पहिलेंच पुस्तक होय. नीति ही बहुरूपिणी असून ती सरड्याप्रमाणें सदा रंग पालटत असते; कलेची ती सहचरी नाहीं किंवा कलेचें अधिष्ठानही तिच्यावर अवलंबून नाहीं; त्या दोघींही परस्परनिरपेक्ष आहेत; इतक्यावरही त्या

दोघांचा कधीं एकमेकीशीं संबंध आलाच तर कला हीच स्वयमेव नीतीचें मंगलधाम होऊन तिचा बोज राखित असतें असें तांबे यांनीं आपलें मत सदर पुस्तकांत सप्रमाण प्रकट करून 'कला–नीति' वादांत पूर्वपक्ष केला तेव्हां त्यावर मंडलेश्वरचे ग. वा. कवीश्वर यांनीं उत्तर पक्ष करण्यासाठीं 'नीति आणि कलोपासना' हें पुस्तक लिहून तें सन १९३४ मध्यें 'होळकर सरकार ग्रंथमाले' चें ३० वें पुष्प म्हणून प्रसिद्ध केलें. या पुस्तकांत कवीश्वरांनीं नीतीवर येणाऱ्या प्रायः सर्वच आक्षेपांना समर्पक उत्तरें देऊन परिवर्तनशील नीति आणि शाश्वत नीति यांचें स्वरूप व संबंध विशद करीत कलेचा नीतीशीं असलेला निकट संबंध सिद्ध केला आहे. या कामीं त्यांनीं पौरस्त्य व पाश्चात्य थोर विभूति, प्राचीन आर्य साहित्यकार व आधुनिक युरोपस्थ तत्त्ववेत्ते यांच्या मतांचे आधार दिले आहेत व त्याबरोबरच साहित्याचार्य नरसिंह चिंतामण केळकर यांच्या मताचा टीकात्मक परामर्ष घेत आणि कविवर्य भास्कर रामचंद्र तांबे, कादंबरीकार प्रो. नारायण सीताराम फडके प्रभृति नामांकित मराठी साहित्यसेवकांच्या विरोधी मतांचें सयुक्तिक खंडन करीत आपल्या मताची मुद्देसूद मांडणी केली आहे; तथापि शुद्ध कलान्वित वाङ्मय नीतिनिरपेक्ष असूं शकत नाहीं किंवा तें स्वयमेवच नीत्युपदेशक असतें असें प्रतिपादन करण्यांत त्यांनीं पुढें केलेलीं सारींच विधानें जरी कदाचित् कोणाला पटण्यासारखीं नसलीं तरी त्यांची भूमिका आग्रहरहित व प्रतिपादन विद्वत्तापूर्ण आहे हें कोणालाही प्रांजलपणें मान्य करावें लागेल. कवीश्वरांच्या या पुस्तकाला पुण्याचा 'डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटी' कडून व इंदूरच्या 'महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक मंडळा' कडून तर यथोचित बक्षिसें मिळालीं आहेतच; परंतु त्याशिवाय त्यास एक आणखीही महत्त्वाचें बक्षिस मिळालें आहे, तें म्हणजे गोमांतकांतील 'रावराजे वाङ्मय पारितोषिक' हें होय. सदर पारितोषिक पेडणें येथील श्रीमंत रावराजे देशप्रभु यांनीं

सन १९३४ पासून प्रतिवर्षी मराठींतील सर्वोत्कृष्ट प्रबंधास देण्याचें ठरविलें आहे. हें पारितोषिक त्याच्या अगदीं सुरुवातीलाच मिळविण्याचा मान या पुस्तकाला लाभला ही गोष्ट येथें खरोखर उल्लेखनीय आहे. अस्तु. याच 'कला—नीति' वादावरचें पण थोड्या निराळ्या स्वरूपाचें तिसरें पुस्तक म्हटलें म्हणजे कवीश्वरांच्या 'नीति आणि कलोपासने' पूर्वी सन १९३२ मध्यें ग्वाल्हेरचे ना. बा. केळकर यांनीं लिहिलेलें 'सौंदर्यमीमांसा व कलाविज्ञान' हें होय. या पुस्तकांत कविवर्य तांबे यांच्या काव्यांतील कांहीं उतारे देऊन तद्वारें सौंदर्य आणि कला यांच्या अर्थनिरूपणाचा व त्यांच्या अन्योन्य संबंधदर्शनाचा प्रयत्न केलेला आहे. याशिवाय सन १९३५ मध्यें इंदूरच्या 'मराठी साहित्य संमेलन' प्रसंगीं धारचे 'श्यामसुंदर' (चिंतामण बळवंत लेले) यांनीं 'नीतिनिरपेक्ष कलेचें अस्तित्त्व असूं शकतें काय?' या प्रश्नार्थी नांवानें लिहिलेला निबंधही येथें उल्लेखनीय आहे. या लहानशा निबंधांत 'कला—नीति—वादा' ची साधकबाधक अंगें दाखवून शेवटीं नीतीचा बागुलबोवा किंवा अनीतीचें गरळ यांपासून जी अबाधित अलिप्त असेल तीच उत्तम कलाकृति होय असें प्रतिपादिलें आहे.

या वरील माहितीवरून एकंदरींत भाषा व साहित्याविषयक वाङ्मयाच्या निर्मितीसंबंधांत मध्यभारतीय लेखकांनीं बजाविलेली कामगिरी बहुविध व बहुप्रमाण जरी नसली तरी ती आहे त्या स्थितींतही उपयुक्ततेच्या दृष्टीनें बरीच महत्त्वाची व आदरणीय आहे ही गोष्ट कोणालाही सहज दिसून येईल.

## प्रकरण दुसरें

# कादंबऱ्या, गोष्टी व इतर कथाविषयक वाङ्मय

कादम्बरी रसभरेण समस्त एव ।
प्रीतो जनोऽय मधुनाऽनुरज्ञते च ॥

### कथावाङ्मयाचें पूर्वकथन

ललितवाङ्मय हें वस्तुतः साहित्यसृष्टींतील नंदनवन होय! मनुष्याच्या स्वभावजात रंजनप्रियतेमुळेंच ललितवाङ्मयाची उत्पत्ति साहित्यसृष्टींत झालेली आहे. या ललित वाङ्मयाच्या नाट्यकाव्यादि शाखांपैकीं कथा ही एक शाखा आहे व या शाखेकडे बहुजनसमाजाचा ओढा आरंभापासून असल्यामुळें जगांतील यच्चयावत् राष्ट्रांत कथा-वाङ्मयाची निर्मिति विशेष प्रमाणांत होत आली आहे. आपलें भारतीय कथावाङ्मयही सनातन व विपुल आहे. शंकर–पार्वती, व्यास–शौनकादिक, जन्मेजय–वैशंपायन, विष्णुशर्मा–राजपुत्र, विक्रम–वेताळ, भोज–कालिदास इत्यादि श्रोत्यावक्त्यांच्या जोड्यांनीं तर आदिभाषा संस्कृतांतील कथावाङ्मयाला रत्नाकरासारखें अफाट, अथांग व विविध गुणमुक्ताफलयुक्त करून ठेविलें आहे! प्रथम देवदानव,

यक्षगंधर्व, भूतपिशाच आणि दैवी गुणसंपन्न व्यक्ति यांचीं अद्भुतरम्य कृत्यें हीं त्या कथावाङ्मयाला विषयभूत झालीं व तदुपरांत त्यांचें स्थान मानवकोटींतील आदर्श व्यक्तींच्या उदात्तरम्य चरित्रांना लाभलें. हें सर्व कथावाङ्मय तत्कालीन लोकाभिरुचीप्रमाणें गद्य-पद्यांत असून त्याची उभारणी धर्मप्रसार, नीतिबोध, ज्ञानवर्धन व मनोरंजन या ध्येयचतुष्टयावर झालेली आहे आणि त्याचें स्थूल मानानें ऐतिहासिक व सामाजिक असे दोन भेद केले गेलेले आहेत. रामायण, महाभारत व पुराणें या आपल्या प्राचीन पूज्य ग्रंथांची गणना तत्त्वतः कथा-वाङ्मयांतच करतां येईल. 'आर्य चाणक्य', 'चंद्रगुप्त', 'कर्पूर-मंजरी', 'बृहत्कथासागर', 'कादंबरी', 'दशकुमारचरित्', 'वासवदत्ता', भोजप्रबंध', 'नागानंद', 'विश्वगुणादर्श', 'पंचतंत्र', 'हितोपदेश' इत्यादि ग्रंथ म्हणजे संस्कृत कथावाङ्मयाचे अनर्घ्य अलंकारच होत. संस्कृतानंतर मराठी भाषेचें युग सुरू झाल्यावर अग्रसर असलेल्या कवींनीं आपल्या कथावाङ्मयाला एकांगी पद्यबद्ध ठेवून त्यांत निराळ्या गोष्टींची भर न घालतां केवळ रामायण, महा-भारत व भागवतादि पुराणें या संस्कृत ग्रंथांतील वेंचक उपाख्यानें आणि संतविभूतींचीं चरित्रें हींच त्यांतून पुनः पुनः लोकांपुढें मांडलीं; परंतु तीं मांडतांना मात्र धार्मिक भावनांच्या अधिष्ठानावर अद्भुतरम्यता सलील उभी करण्यांत त्यांनीं अपूर्व चतुराई प्रकट केली. श्रीधराचें 'श्रीशिवलीलामृत' हा त्या काळचा सर्वदृष्ट्या उत्कृष्ट असा ग्रंथ होय. नंतर दंतकथा, कहाण्या, देवकन्या-नागकन्यांच्या गोष्टी यांनीं अंतःपुरवासिनींच्या वशिल्यानें कथावाङ्मयांत हळुहळूं शिरून गद्याची भर घातली. पुढें यथाकालीं इंग्रजी वाङ्मयाशीं ओळख झाल्यावर मराठी वाङ्मयाची जी कायापालट झाली तींत कथावाङ्मय गद्यामध्यें निर्माण करण्याकडे साहित्यप्रणेत्यांचा कल झुकला. प्रथम 'पंचतंत्र', 'हितोपदेश', 'बाळमित्र', 'ईसापनीति', नीतिकथा', 'बोधकथा'

वगैरे बरोबरच ‘ वेताळपंचविशी ’, ‘ सिंहासनबत्तिशी ’, ‘शुकबहात्तरी’, ‘ गुलबकावली ’, ‘ आरबी भाषेंतील सुरस आणि चमत्कारिक गोष्टी ’ आदि गद्य कथाग्रंथ भाषांतर रूपांत प्रसिद्ध झाले व नंतर सन १८६१ च्या पुढें कथावाङ्मयाच्या एकंदर स्वरूपांत हळुहळूं बदल होऊं लागला. एका कथानकाच्या सूत्रांत अनेक उपकथा गोंवणें किंवा अनेक कथांचें संकलन करणें याऐवजीं एकच प्रदीर्घ नवलकथा रचणें हा प्रकार सुरू झाला. असा प्रकार संस्कृतांतही थोडाफार होता व त्यांत बाण-भट्टाची ‘ कादंबरी ’ विशेष नांवाजलेली होती. या ‘ कादंबरीं ’ त पुंडरीक, महाश्वेता, चंद्रापीड, कादंबरी आदि पात्रांचे स्वभावविशेष आणि सरोवर, अरण्य, गंधर्वनगरीं आदि स्थळांचीं वर्णनें इतकीं सुंदर साधलेलीं आहेत कीं, त्यामुळें त्या ‘ कादंबरी ’ ला आदर्श मानून मराठी लेखक तशा नमुन्याच्या भाषांतरित व स्वतंत्र अशा दोन्ही प्रकारच्या प्रदीर्घ कथा लिहूं लागले व त्या कथांचा सरसहा समावेश ‘ कादंबरी ’ याच नांवाखालीं करूं लागले. हें ‘ कादंबरी ’ नांव तेव्हांपासून चिरंतन होऊन बसलें आहे. मध्यंतरीं, अव्वल इंग्रजी अमदानींत, रा. ब. काशीनाथ बाळकृष्ण मराठे यांनीं या ‘ कादंबरी ’ ऐवजीं ‘ नावल ’ हें नांव रूढ करण्याचा प्रयत्न केला होता. हा ‘ नावल ’ शब्द वास्तविक ‘ नाव्हेल ’ या इंग्रजी शब्दाचा पर्याय होय; परंतु अद्‌भुतपणा या अर्थी मराठींत असलेला ‘ नवल ’ शब्द येथें अभिप्रेत घेऊन नवल हा ज्याचा आत्मा तें नावल अशी आपल्या ‘नावल’ शब्दाची व्याख्या रावबहादुर करीत असत ! आणि खरोखरच या त्यांच्या व्याख्येला साजेल असेंच त्या काळीं निर्माण झालेल्या ‘ मुक्तामाला ’, ‘ मंजुघोषा ’, ‘ विचित्रपुरी ’, ‘ विश्वासराव ’ इत्याद्यनेक कादंबऱ्यांचें स्वरूप अद्‌भुत रसपूर्ण होतें. पुढें इंग्रजी वाङ्मयाच्या परिशीलनामुळें जसजशी बौद्धिक प्रगति होऊन विचारक्रांति होत गेली तसतशी एकंदर कथावाङ्मयाला विशेष मनोज्ञता आणण्याकडे

मराठी लेखकांची लेखणी हळुहळुं वळूं लागली. त्यामुळें निव्वळ काल्पनिक, अद्‌भुतरम्य कथानिर्मिति मागें पडावयास लागून वस्तु-स्थितिनिदर्शक सुललित कथारचनाच अधिकतेनें होऊं लागली. अशा सुललित कथावाङ्मयमंदिराचा मजबूत व सुंदर पाया घालण्याचें श्रेय 'करमणूक'कार हरि नारायण आपटे यांना देण्यांत येतें. 'मधली स्थिति' ही हरिभाऊंची अगदीं पहिली कादंबरी सन १८८८ मध्यें प्रसिद्ध झाली. तेथपासून पुढें पर्यालोचक दृष्टीनें मराठी कथावाङ्मय-गंगेकडे पाहूं जातां तिच्या काल्पनिक, ऐतिहासिक व सामाजिक अशा त्रिविध शाखा स्पष्टतया दिसून येतात. मध्यभारतांत या त्रिविध शाखा संपन्न करणाऱ्या कादंबऱ्या व कथा निर्माण झाल्या आहेत. यासाठीं त्यांचा परिचय त्या त्या शाखांतूनच येथें करून देणें इष्ट होईल.

## काल्पनिक कादंबऱ्या व कथा

मध्यभारतांतील अगदीं पहिली काल्पनिक कादंबरी 'बा (ब) हारदानिष' ही होय. आणि या कादंबरीपासून वास्तविक मध्य-भारतांत कथावाङ्मयाचा उगमही झालेला आहे. हरिभाऊंची 'मधली स्थिति' निर्माण होण्याच्या ८ वर्षें अगोदर ह्मणजे सन १८८० मध्यें ही कादंबरी याच नांवाच्या फारशी ग्रंथावरून 'इंदोर मदरेशां-तील एक शिक्षक' यांनीं अनुवादिली होती. आज या कादंबरीचा फक्त पहिला भाग उपलब्ध असून तो शिळा प्रेसवर छापलेला आहे. 'अॅरेबियन नाइट्स', 'पर्शियन नाइट्स' वगैरे सारखाच हा अद्‌भुत-रसपूर्ण ग्रंथ फारशी वाङ्मयांत फार प्रसिद्ध आहे व त्यांत आपल्याकडील 'वेताळ पंचविशी', 'सिंहासन बत्तिशी', 'शुक बहात्तरी' प्रमाणें मुख्य कथानक एक देऊन त्या कथानकाच्या सूत्रांत त्यास आनुषंगिक अशा अनेक अद्‌भुतरम्य उपकथा गोंविलेल्या आहेत. सन १८८० मध्यें हा ग्रंथ अनुवादिला गेला त्यावेळीं मध्यभारतांतील मराठी ग्रांथिक भाषा कशा स्वरूपाची होती हें दाखविण्याकरितां आम्ही

मुद्दाम या ग्रंथांतील कांहीं उतारे घेऊन त्याच्या कथानकाचा सारांश येथें देत आहों. हिंदुस्थानचा जहांदरशाहा नांवाचा एक शहाजादा एकदां शिकारीहून राजधानीस परत जात असतांना मार्गांत विश्रांतीसाठीं एका बागेंत उतरला. तेथें त्याला एक सुंदर युवक, हातांत मैनेचा पिंजरा घेऊन, स्वच्छंदानें गात आपल्याकडेच येत असलेला दिसला. त्याच्या मधुर कंठांतून निसृत होणारे श्रुतिमनोहर गानालाप ऐकून शहाजादा फार खुष झाला व तो जवळ येतांच त्यानें त्यास प्रेमानें सलाम केला; परंतु तो युवक गाण्यांत इतका निमग्न झाला होता कीं, त्याला आसपासचें मुळींच भान नव्हतें. त्यामुळें अर्थात्च शहाजाद्याच्या सलामाचा स्वीकार त्याच्याकडून झाला नाहीं. हा त्याचा उद्धटपणा समजून शहाजाद्याला फार राग आला. तो राग पिंजऱ्यांतील चाणाक्ष मैनेच्या तत्काल लक्षांत येऊन ती "शाहाजाद्याचे सेवेसी अर्ज करती जाहली कीं खुदावंत गरीब परवार सलाम, सांगत्यें श्रवण करावें, संप्रत या पुरुषापासून तुझे सलामाचा अनादर होऊन उद्धटपणा दिसून आला परंतु हें कर्म त्याजपासून बुध्द्या समजून घडलें नाहीं असे कीं, या पुरुषास गाण्याचा फारच इष्क, यामुळें हा आपलें तानबाजींत चूर आहे, या वेळेस याला दुसऱ्या विषयांचें किमपीही भान नाहीं, तर काय प्राप्ती कीं दीन दुनियेचा खावंद निग्रहानुग्रहसमर्थ प्रभु कृपावंत झाला असतां हा असा गाफलपणा करील कीं काय? यास्तव हें सर्वज्ञपणें मनांत आणून या गानरसांधाची तकसीर माफ् करावी." मैनेचें हें लीनपणाचें भाषण ऐकून शहाजाद्याचा राग पार निवळला व उलट तो त्या मैनेवर 'निहायत खुष' झाला. त्या गानमग्न युवकास तो दरडावून ह्मणाला "हे अमित्रसिला मूर्ख पुरुषा, मी कोण आहे तूं जाणत नाहींस काय? या मुलखाचा मी बादषाहा आहे. या तुती (मैने) चे भाषणावर बहुत महजून व मुष्ताक जाहालों यास्तव आपली बादषाहीची शान एकीकडे ठेवून सामोपचारें तुजला

तुती मागतों. दूरवर विचार करून हा लाल तुजला मी इनायत करितों तो घेऊन तुती मला समर्पण करशील तर चांगलें आहे." शहाजाद्याच्या या दरडावणीच्या भाषणामुळें तो युवक आपल्या गानतंद्रींतून खाडकन् जागृत झाला व त्यानें शहाजाद्याच्या आज्ञेला मान देऊन आपली आवडती मैना मोठ्या कष्टानें त्याच्या स्वाधीन केली. पुढें त्या मैनेला घेऊन शहाजादा राजधानींत आला. लौकरच त्या मैनेनें नाना प्रकारच्या मनोरंजक गोष्टी सांगून शहाजाद्याची मर्जी संपादन करून घेतली. शहाजाद्याला तिच्यावांचून क्षणमात्रही करमेनासें झालें. त्यानें तिचा पिंजरा आपल्या खास महालांत लटकावून ठेविला. एके दिवशीं शहाजाद्याची आवडती रूपवती बेगम मेहेरपरवर हिला आपल्या सौंदर्याचा फार गर्व झाला व तो ती शहाजाद्यापुढें मोठ्या दिमाखानें प्रगट करीत असतां मैनेला हंसूं आलें. त्या हंसण्याचें कारण शहाजादा व मेहेरपरवर या दोघांनींही आग्रहानें विचारल्यावरून मैना ह्मणाली "या इलाही कारखान्यांत संपूर्ण लावण्य एकाच स्त्रियेवर ठेविलें नाहीं. परमेश्वरानें आपले खुदरतीनें या जगांत रूपेंकरून व गुणेंकरून एकापेक्षां एक अधिकाधिक स्त्रिया निर्माण केल्या आहेत. त्यांच्या पदांगुष्टाचे नखाशींदेखील इचें (मेहेरपरवरचें) सौंदर्य तुळणार नाहीं. फार काय सांगूं......मींजूषाबाद ह्मणून एक शहर बहुत रमणीय आहे येथील बादषाहा मोठा दानधर्मज व शूरनितिज्ञ आणि तुमचे मुलखापेक्षां त्याचा मुलुख शतगुणें आबाद, त्याजला एक कन्या आहे, तिचें नांव बाहारबरबानू जिचें लावण्य अप्रतीम. एका जिव्हेनें काय वर्णन करूं, एवढा जगत्प्रकाशक सूर्य तोही तिजकडे बेदर्द अवलोकन करण्यास दिपतो."......"या प्रकारें मैनेचें भाषण श्रवण करून जहांदरशाहा बाहारबरबानूचे सौंदर्यावर गायबाना ह्मणजे तिजला पाहिली नसतां तिचे इष्काचा तीर खाऊन अगदीं बेकरार होऊन निपट फिदा जाहला." नंतर शहाजाद्यानें आपला चित्रकार बेनजीर

यास सौदागराच्या वेषांत मिंजूषाबादेस जाऊन युक्तीनें बाहारबरबानूचें चित्र काढून आणण्यास सांगितलें. बेनजीर हा उत्तम चित्रकार असून फार चतुर होता. मिंजूषाबादेस जाण्यास निघण्यापूर्वी त्यानें शहाजाद्याची एक सुंदर तसबीर तयार केली व ती जातांना आपल्याबरोबर घेतली. पुढें मिंजूषाबादेस पोंचल्यावर त्यानें युक्तिप्रयुक्तीनें थेट राजवाड्यांत अंतःपुरापावेतों आपला प्रवेश करून घेतला व एके दिवशीं संधि साधून शहाजाद्याची तसबीर बाहारबरबानूच्या नजरेस आणली. ती तसबीर पाहून बाहारबरबानू खुष झाली व ही कोणाची तसबीर ह्मणून तिनें विचारिलें. तेव्हां बेनजीरनें ही तसबीर शहाजादा जहांदरशहा याची असल्याचें सांगून त्याच्या गुणांची व पराक्रमाची निहायत तारीफ केली. ती तारीफ ऐकून अगोदरच तसबिरींतील शहाजाद्याचा मोहक चेहरा व बलिष्ट देहयष्टि पाहून प्रसन्न झालेल्या बाहारबरबानूचें मन त्याच्यावर अनुरक्त झालें. ही गोष्ट चाणाक्ष बेनजीरच्या तेव्हांच लक्षांत येऊन आपलें काम आतां फतेह झालें ह्मणून त्यालाही फार आनंद झाला. या भेटींत त्यानें बाहारबरबानूची गौरवर्ण व सुडौल मूर्ति नीट न्याहाळून लक्षांत ठेवून घेतली आणि बिऱ्हाडीं आल्यावर त्याप्रमाणें 'बालाग्र तफावत नाहीं' अशी तिची तसबीर तयार केली. नंतर ती तसबीर घेऊन तो परत आपल्या शहाजाद्याकडे आला व त्याला ती नजर करून सर्व हकीगत निवेदन केली. बाहारबरबानूची तसबीर पाहून आणि ती आपल्यावर अनुरक्त झाली असल्याचें ऐकून शहाजादा आतां पूर्ण प्रेमवेडा होऊन गेला. त्याला रात्रंदिवस बाहारबरबानूशिवाय दुसरें कांहीं सुचेनासें झालें. स्वतांचें देहभानही त्यास उरलें नाहीं. ही त्याची अवस्था पाहून बादशहाला मोठी काळजी उत्पन्न झाली. त्याला ताळ्यावर आणण्याकरितां काय उपाय करावे याबद्दल तो आपल्या वजिरांस सल्ला विचारूं लागला. हा इष्कानें वेडा झाला आहे तेव्हां त्याचें तें वेड घालविण्यास

'प्राचीन उदाहरण पुरःसर स्त्रियांची निंदा करणें' हाच एक रामबाण उपाय असल्याचें सर्वानुमतें ठरलें व त्याप्रमाणें मुख्य वजिरापासून तों सर्व वजिरांनीं पाळीपाळीनें स्त्रियांच्या दुश्चरित्राची एकेक गोष्ट शहाजाद्यास सांगण्यास सुरुवात केली. या बहारदानीषच्या पहिल्या भागांत सात वजिरांनीं सांगितलेल्या सात गोष्टी दिलेल्या आहेत. त्यांतील सहा गोष्टी मुसलमानांच्या असून सातवी गोष्ट एक पढतमूर्ख हिंदु व त्याची स्त्री यांची आहे. या सर्व गोष्टींत स्त्रियांच्या दुश्चरित्राचें भडक वर्णन केलेलें आहे. 'बहारदानिष' नंतर मध्यभारतांत निर्माण झालेली दुसरी अद्भुतरम्य कादंबरी म्हटली म्हणजे सन १८९३ मध्यें उज्जनीचे माधवराव सखाराम डांगवाले यांची 'बालपिशाच' ही होय. रेनॉल्ड्सच्या 'पिक्सी' कादंबरीचें हें भाषांतर असून त्यांत डांगवाले यांनीं 'पिक्सी' तील पात्रांचीं नांवें, त्यांचें स्वभाववैशिष्ट्य व प्रसंग या सर्व गोष्टी जशाच्या तशा कायम ठेविल्यामुळें अठराव्या शतकांत आंग्ल समाजामध्यें भूतपिशाचासंबंधानें काय काय समजुती प्रचलित होत्या याची कल्पना प्रस्तुत कादंबरीवरून उत्तम रीतीनें होऊं शकते. यानंतरची तिसरी अद्भुतरम्य कादंबरी म्हणजे सौ. कमलाबाई साहेब किबे यांची 'राजकुमारी' ही होय. किशोरीलाल गोस्वामी यांच्या याच नांवाच्या हिंदी कादंबरीचें हें भाषांतर असून तें भाषांतर सौ. कमलाबाईसाहेब यांनीं देवास येथें असतांना सन १९१० मध्यें केलेलें आहे. 'सत्यमेव जयते नानृतं' या वचनाची सत्यता पटविणारें चित्ताकर्षक कथानक रचून त्यांत वंगभूमींतील एक 'गौडबंगाल' दाखविण्यांत आलेलें आहे. दुर्मति हुसेनीच्या नादीं लागून राज्यलोभाला बळी पडलेल्या दिवाण रामलोचनानें मुंगेरचा राजा हिराचंद यास दीर्घकालपर्यंत गुप्तरीतीनें बंदिवासांत ठेवून केलेलीं कारस्थानें व त्या कारस्थानांचा सुगावा आपली स्त्री जमना हिला लागला असल्याच्या संशयावरून तिचा केलेला छळ, तो छळ सोसून जमननें

कडास लाविलेला आपला पतिव्रता—धर्म, रामलोचनाचीं कारस्थानें उघडकीस आणण्यासाठीं ब्रह्मचारी रामनंदानें केलेली कल्पनातीत खटपट, माणिक व सुकुमारी यांचें एकमेकांवरील अचल प्रेम इत्यादिकांनीं कथानक रसभरित करून गुप्त कोठड्या व तळघरें, त्यांत शिरण्याचे चमत्कारिक मार्ग, त्यांच्या दरवाजांस लावलेलीं विचित्र कुलुपें, त्या कुलुपांच्या किल्ल्या ठेवण्याच्या गुप्त जागा, आणि जादूनें भारलेले पुतळे यांच्या वर्णनांनीं त्यांत अद्‌भुतरम्यताही संमिश्रित केलेली आहे. अस्तु. या 'राजकुमारी' नंतर मात्र भाषांतरित किंवा स्वतंत्र अशी एकही अद्‌भुतरम्य कादंबरी आतांपर्यंत मध्यभारतांत निर्माण झालेली नाहीं.

वरील भाषांतरित अद्‌भुतरम्य कादंबऱ्यांच्या जोडीला 'सुमन-विकास' व 'पुष्पवन' असे दोन उपदेशपर गोष्टी—संग्रहही अनुक्रमें सन १८९० व १८९१ मध्यें मध्यभारतांत निर्माण झालेले आहेत. सुविख्यात फारशी पंडित शेख सादी याच्या 'बोस्तान' व 'गुलिस्तान' या ग्रंथांचीं हीं भाषांतरें असून तीं उज्जनीचे माधवराव व्यंकटेश लेले यांनीं तयार केलेलीं आहेत. 'बोस्तान' ग्रंथ फारशी वाङ्मयांत फार प्रसिद्ध आहे यांत व्यवहारचातुर्य, वैराग्य, ईश्वरनिष्ठा, भूतदया वगैरे संबंधांत अनेक लहानमोठ्या उपदेशपर गोष्टी दिलेल्या आहेत. या पुस्तकाच्या १८ व्या भागांतील अकराव्या गोष्टींत सादीनें, आपण स्वतः हिंदुस्थानांत सफर करण्यास आलों असतांना सोरटी सोमनाथाच्या मंदिरांतील मूर्तिपूजेचा प्रकार पाहून संतापानें तेथील पुजाऱ्यास विहिरींत लोटून दिलें असल्याची हकीगत लिहिली आहे. हा 'बोस्तान' ग्रंथ फारशी वाङ्मयांत योग्यतेच्या दृष्टीनें जरी विशेष श्रेष्ठ असला तरी लोकप्रियतेच्या दृष्टीनें 'गुलिस्तान' ग्रंथ त्यापेक्षांही कांकणभर अधिक श्रेष्ठ आहे. फारशी बोलणाऱ्या लोकांत 'गुलिस्तान' चा पुष्कळसा भाग तोंडपाठ येत असणाऱ्यांची संख्या शेंकडा ऐंशी असल्याचें

सांगतात! हा ग्रंथ गद्य-पद्य असून यांतील लहानमोठ्या उपदेशपर गोष्टींना सुभाषितांच्या रेलचेलीमुळें चांगलीच खुलावट आलेली आहे. लेले यांनीं आपल्या 'सुमनविकासा'च्या प्रारंभीं सादीचें संक्षिप्त चरित्र व मूळ ग्रंथास ('गुलिस्ताना'स) सादीनें लिहिलेल्या प्रस्तावनेचें भाषांतर दिलें असून खुलाशाच्या पादटीपा तर अगदीं पानोपान दिल्या आहेत.

## ऐतिहासिक कादंबऱ्या व कथा.

आतां ऐतिहासिक कादंबऱ्यांकडे वळतां असें दिसून येतें कीं, आजपर्यंत मध्यभारतांत १०-१२ ऐतिहासिक कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या आहेत व त्यांत कालदृष्ट्या 'श्रीप्रतापसिंगजी छत्रपति महाराणा संस्थान उदेपूर' ही कादंबरी अग्रस्थानीं आहे. सर वाल्टर स्कॉटच्या 'टॅलिस्मन' वरून इंदूरचे नारायण विनायक गणपुले यांनीं सन १८८६ मध्यें या कादंबरीची रचना केली आहे. 'टॅलिस्मन' मधलि इंग्लंडच्या इतिहासांतला 'क्रूसेड' (धर्मयुद्धें) संबंधाचा भाग फार चटकदार आहे. इंग्लंडचा राजा पहिला रिचर्ड हा सदर कादंबरीचा नायक असून त्याच्या आंगचें अचाट बाहुबळ, असामान्य शौर्य, अद्वितीय औदार्य आदि बहुमोल गुण पाहून लोक त्याला 'क्यूर डी लॅायन' [नरकेसरी] असें ह्मणत असत. या रिचर्डच्या राजवटीच्या आरंभीं महात्मा येशू ख्रिस्ताची पवित्र जन्मभूमि जरुसलेम [पॅलेस्टाइन] तुर्कांच्या हातीं होती. त्यामुळें तेथें जाणाऱ्या ख्रिस्ती यात्रेकरूंना तुर्कांकडून नेहमीं छळ सोसावा लागत असे. तो छळ बंद होण्याकरितां तें पवित्र शहर तुर्कांच्या हातून सोडवून घ्यावें ह्मणून युरोपांतील प्रायः सर्व ख्रिस्ती धर्माच्या राजांनीं रिचर्डला आपला नेता बनवून जरुसलेमवर जोराचा हल्ला चढविला. त्यावेळीं तुर्कस्थानच्या गादीवर असलेला शहा सलाहुद्दीन हाही पराक्रमादि गुणांत रिचर्डच्या जोडीतोडीचा होता. त्यामुळें तुर्क व ख्रिस्ती यांच्यामधील हें (धर्म) युद्ध बरीच

वर्षें निकरानें चालून शेवटीं रिचर्डच्या इच्छेप्रमाणें दोन्ही पक्षांत तह घडून आला व ख्रिस्ती राजे परत आपापल्या देशीं निघून गेले. ' टॅलिस्मन ' च्या या कथानकाशीं बव्हंशीं जुळणारा असा प्रसंग गणपुले यांनीं राजस्थानच्या इतिहासांतून निवडून काढून आपल्या उपरिनिर्दिष्ट कादंबरीची रचना सुंदर रीतीनें केलेली आहे. त्यांनीं रिचर्डची भूमिका उदेपूरचा महाराणा प्रतापसिंह यास देऊन सलाहुद्दीनची भूमिका दिल्लीपति अकबराकडे सोंपविली आहे आणि जरुसलेमच्या जागीं पुष्कर तीर्थाची योजना केली आहे. हें पुष्कर तीर्थ बरेच दिवस मुसलमानांच्या ताब्यांत होतें. तें परत मिळविण्याकरितां व मुसलमानांपासून स्वधर्मरक्षणाबरोबरच स्वदेशरक्षणाकरितां बाणेदार रजपुतांनीं वीरप्रवर प्रतापसिंगाच्या नेतृत्वाखालीं जी दीर्घ कालपर्यंत टक्कर दिली ती इतिहासप्रसिद्ध आहे. गणपुले यांच्या या कादंबरीनंतर सन १८८९ मध्यें इंदूरचे डिस्ट्रिक्ट व सेशन जज्ज आनंदराव सखाराम बर्वे यांची ' ठगाची जबानी ' ही आत्मकथनपर कादंबरी प्रसिद्ध झाली. कर्नल मेडोज टेलरकृत ' कन्फेशन ऑफ ए ठग ' या ग्रंथाचें हें उत्कृष्ट भाषांतर असून तें प्रथम ' विविधज्ञानविस्तार ' मासिकांतून क्रमशः प्रसिद्ध झालें होतें. या कादंबरीवरून एके काळीं हिंदुस्थानांत सर्वत्र प्रबळ होऊन बसलेल्या पाषाणहृदय ठगांच्या अमानुष कृत्यांची अंगावर शहारे आणणारी हकीगत कळून येते. हिंदुस्थानचे गव्हर्नर-जनरल लॉर्ड वुइल्यम बेंटिंग यांनीं ठगांचा बीमोड करण्याकरितां निर्माण केलेल्या स्वतंत्र खात्यांत कर्नल मेडोज टेलर हे एक मोठे अधिकारी होते. त्यांना शरण जाऊन पुढें निजामाच्या राज्यांतील ठगांच्या टोळ्या पकडवून देणारा ठगांचाच एक नायक अमीरअली यानें स्वमुखें निवेदन केलेली आत्मकथा प्रस्तुत कादंबरींत दिली आहे. या एकट्या अमीरअलीनें एकंदर ७१९ माणसांचे खून केले होते ! त्याच्या आत्मवृत्ताला कादंबरीचा वेश

खुलून दिसण्यासाठीं अवश्य लागणारा तेवढाच काल्पनिक भाग या पुस्तकांत आला आहे. 'ही कादंबरी वाचींत असतां तीं इंग्रजी ग्रंथाचें भाषांतर आहे, या गोष्टीची वारंवार विस्मृति पडते' असें बाळकृष्ण नारायण देव यांनीं जें ह्मटलें आहे तें अगदीं खरें आहे! आतांपावेतों या कादंबरीच्या तीन आवृत्त्या निघाल्या असून तिसरी आवृत्ति सन १९३१ मध्यें प्रसिद्ध झाली आहे. 'ठगाच्या जबानी' नंतर सन १८९८ मध्यें इंदूरचे अनंत नारायण भागवत यांची 'पितृबंधमोचन' ही 'स्वतंत्र ऐतिहासिक कादंबरी' मुंबईच्या 'कादंबरी संग्रहां' तून बाहेर पडली. हिचा फक्त पहिलाच भाग भागवतांकडून लिहिला गेला. छत्रपति शिवाजी महाराजांनीं स्वराज्याच्या टोलेजंग इमारतीचें तोरण, तोरणा किल्ला हस्तगत करून, बांधिलें तेथपासून पुणें, सुपें, चाकण, पुरंदर वगैरे किल्ले व तालुके जिंकिले जाऊन घाटमाथ्यावर महाराजांची सत्ता प्रस्थापित होईपर्यंत घडून आलेल्या घटना या कादंबरींत, इतिहासाच्या पार्श्व- भूमीवर उभारलेल्या कथानकांतून, वाचकांसमोर मांडिल्या आहेत. पुढें सन १९०७ मध्यें इंदुरास असतांना वासुदेव गोविंद आपटे यांनीं लिहिलेली 'मूर्तिमंत देशाभिमान' ही कादंबरी मुंबईच्या 'मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीच्या पुस्तकमालें' तून प्रसिद्ध झाली. छत्रपति राजाराम महाराजांच्या कारकीर्दीत संकटपरंपरा कोसळली असतां मराठशाहीची भवितव्यता चिरोज्ज्वल राखण्यासाठीं नेकजात मराठ्यांनीं कटिबद्ध होऊन जें अद्भुत शौर्यधैर्य प्रकट केलें त्याचें चित्र आपटे यांनीं या कादंबरींत उत्तम प्रकारें रेंखाटलें आहे. यानंतर सन १९०८ मध्यें वामनशास्त्री इसलामपुरकर यांची 'अविचाराचा परिणाम अथवा मुंजराजाचा शोचनीय मृत्यु' ही दोन भागांत लिहिलेली कादंबरी प्रसिद्ध झाली. सन १८९७–९८ मध्यें शास्त्री बुवांनीं, धार येथें श्रीमंत सरकार आनंदराव महाराज पवार यांच्या

आज्ञेप्रमाणें परमार घराण्याचा इतिहास तयार करीत असतांना ही कादंबरी लिहून काढिली होती. धारचा परमार राजा मुंज व कल्याणपुरचा चालुक्य राजा तैलप यांच्यांत पहिल्यापासून हाडवैर होतें. त्यांच्या नेहमीं लढाया होत असत. मुंजानें तैलपास १६ वेळां लढायांत जिंकून उदार अंतःकरणानें सोडून दिलें होतें; परंतु १७ व्या लढाईत मात्र तैलपानें कपट करून मुंजास कैद केलें व आपल्या राजधानींत नेऊन कांहीं दिवस बंदिवासांत ठेविल्यानंतर आपली उपवर बहीण कुसुमकुमारी हिला संगीत व चित्रकला या विषयांचें शिक्षण देण्याचें काम त्याच्याकडे सोंपविलें. लौकरच मुंजाचा प्रेमळ स्वभाव, मोहक स्वरूप आणि कलानैपुण्य पाहून कुसुमकुमारी त्याच्यावर अनुरक्त झाली. ही गोष्ट दृष्टोत्पत्तीस येतांच तैलपानें त्यांचा विवाह करून दिला. नंतर आपल्या या नवोढा पत्नीच्या सुखकर सहवासांत गतराजैश्वर्याचें दुःख पार विसरून मुंज आनंदानें कालक्रमणा करूं लागला; परंतु इकडे त्याचा मंत्री रुद्रादित्य यानें त्याच्या सुटकेसाठीं गुप्त प्रयत्न सारखे सुरू ठेविले. ते मुंजास कळल्यावर त्या कामीं त्यानें कुसुमकुमारीचें अनुमोदन व सहाय्य मिळावें ह्मणून ती गोष्ट तिला सांगितली. पण मुंजानें येथून जावें हें तिला बरें वाटलें नाहीं ह्मणून तिनें वरपांगीं मुंजास संमति देऊन हळूंच सारी हकीगत आपल्या भावाच्या कानावर घातली. त्याचा परिणाम असा झाला कीं, तैलपानें क्रोधाविष्ट होऊन मुंजाचा नानाप्रकारें अपमान केला व शेवटीं कुसुमकुमारीच्या इच्छेविरुद्ध त्याचा शिरच्छेद करून टाकला ! एवढा कथाभाग या कादंबरीच्या पहिल्या भागांत दिला आहे व नंतर कुसुमकुमारीला आपल्या पतीच्या वधास आपणच वास्तविक कारणीभूत झालों याबद्दल अत्यंत खेद वाटून ती रात्रंदिवस उदास राहूं लागली. हें पाहून तैलपानें तिचीही कठोर अंतःकरणानें निर्भर्त्सना केली. ती निर्भर्त्सना तिला असह्य होऊन सूडाचा विचार तिच्या मनांत उत्पन्न झाला. मग तिनें रुद्रा-

दित्याशीं संगनमत केलें व मुंजाचा उत्तराधिकारी ह्मणून धारच्या सिंहासनावर आरूढ झालेला आपला दीर सिंधुराजा याच्याकडून तैलपावर स्वारी करविली. त्या लढाईत तैलपाचा पराजय होऊन तो कैद झाला, तेव्हां तिनें त्यास सिंधुराजाकडून धारा नगरीस नेवविलें व तेथें पूर्वी त्यानें ज्या प्रकारें मुंजाचा शिरच्छेद करविला होता त्याच प्रकारें त्याचाही अपमानपूर्वक शिरच्छेद करविला! शेवटीं आपण आतां कृतकृत्य झालों असें समजून ती पूर्ण विरक्त स्थितींत तपोवनांत निघून गेली व तिकडेच तिनें यथाकालीं आपल्या नश्वर देहाचा त्याग केला. हा कथाभाग दुसऱ्या भागांत दिला आहे. शास्त्रीबुवांच्या या कादंबरीनंतर सन १९०९ मध्यें इंदूरचे सहस्रबुद्धे यांची 'अमृतपुलिन' ही कादंबरी 'मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीच्या पुस्तक माले' तून प्रसिद्ध झाली. ननिलाल वंद्योपाध्याय यांच्या याच नांवाच्या वंग कादंबरीच्या आधारें ही कादंबरी सहस्रबुद्धे यांना लिहिली असून तिच्यांत ग्वाल्हेरची राजकन्या हिरण्मयी व चितोडचा राजकुमार अजयसिंह या प्रणयियुग्माच्या दैवदुर्विलसिताचें करुणाजनक चित्र रेखाटलें आहे; परंतु यांतील कथानकाच्या उभारणींत इतिहासाचें अधिष्ठान कितपत सुदृढ ठेविण्यांत आलें आहे हें सांगतां येणें कठिण आहे. याच वर्षी (ह्मणजे सन १९०९ मध्यें) किंवा याच्या थोडें अगोदर अनंत नारायण भागवत यांची 'राज्ञी प्रभाव' ही कादंबरी प्रकाशित झाली; परंतु ती आह्मास उपलब्ध झाली नाहीं. नंतर सन १९२७ मध्यें देवासच्या 'मार्तंड' साप्ताहिकाचे संपादक डॉ. शंकर रामचंद्र ओक यांनीं 'केवळ स्वदेशासाठीं!' ही कादंबरी लिहिली. या कादंबरीकरितां डॉक्टर साहेबांनीं राजस्थानच्या इतिहासांतून एक हृदयंगम प्रसंग निवडून त्यावर कथानकाची उभारणी केली आहे व त्या उभारणीकरितां आदर्श ह्मणून जेन पोर्टरची 'धि लाइफ ऑफ सर वुइल्यम वॉलेस ऑर धि स्कॉटिश चीफ्स' ही कादंबरी पुढें

टेविली आहे. राजस्थान जिंकून स्वातंत्र्यप्रिय रजपुतांचा नक्षा उतरविण्याची व सौंदर्यशालिनी रजपूत कुलांगनांना आपल्या विलास-दासी बनविण्याची अल्लाउद्दीन खिलजीनें धरलेली महत्वाकांक्षा रजपूत वीरांनीं आपल्या पराक्रमाच्या बळावर कशी निष्फळ करून टाकिली व त्या आपत्प्रसंगीं रजपूत कुलांगनांनींही आपलें मनोधैर्य व तेजस्विता हीं कशी प्रकट केलीं याचें चित्र या कादंबरींत उत्तम रीतीनें रंग-विलेलें आहे. यापुढें सात वर्षांनीं ह्मणजे सन १९३४ मध्यें डॉ. शंकर रामचंद्र ओक यांचीच 'विक्रमाच्या उज्जयिनींत !' ही दुसरी कादंबरी प्रसिद्ध झाली. ही कादंबरी वास्तविक ऐतिहासिक नसून इतिहास-संशोधनविषयक आहे. डॉ. ओक यांचें उज्जनींत सतत २०–२५ वर्षे वास्तव्य असतांना त्यांनीं या प्रदीर्घ कालांत पुराणें, दंतकथा, इतिहास व प्रत्यक्ष निरीक्षण–संशोधन यांच्या योगें राजा विक्रमाच्या भूगर्भस्थित पुरातन उज्जयिनी नगरीविषयीं मिळविलेली माहिती या कादंबरींत, वस्तुस्थिति व कल्पना यांच्या संयुक्त पायावर उभारलेल्या कथानकाच्या द्वारें, वाचकांपुढें मांडिली आहे. त्या कथानकांत त्यांनीं आकर्षकता उत्पन्न करण्याच्या हेतूनें सत्यसृष्टींतील कांहीं पात्रें व प्रसंग यांनाही पण वाव दिला आहे. विशिष्ट ऐतिहासिक स्थळांचा परिचय कादंबरी रूपानें करून देण्याचा डॉ. ओक यांचा हा प्रयत्न खरोखरच अनु-करणीय आहे. पुस्तकाशीं संबंध असलेलीं अनेक स्थळें व व्यक्ति यांचीं चित्रें देऊन व तसेंच उज्जनीसंबंधाच्या अनेक कवींच्या कवितांचें परिशिष्ट जोडून डॉ. ओक यांनीं या पुस्तकांच्या एकंदर आंतरिक सौंदर्यांत जी भर घातली आहे तीही प्रशंसार्ह आहे. अस्तु. यापुढें मध्यभारतांत एकही ऐतिहासिक कादंबरी निर्माण न झाल्यामुळें आतां आपण वरील कादंबऱ्यांबरोबरच प्रसिद्ध झालेल्या ऐतिहासिक लघु-कादंबरीरूप कथांकडे वळूं.

मध्यभारतांतील पहिली ऐतिहासिक लघु–कादंबरीरूप कथा

ह्मटली ह्मणजे सन १८९४ मध्यें प्रसिद्ध झालेली 'वसईचा मोहरा' ही होय. ही कथा अनंत नारायण भागवत यांनीं लिहिलेली आहे व तींत ब्रह्मवीरमाणि चिमणाजी आप्पा पेशवे यांनीं सतत तीन महिने पोर्तुगिजांशीं झुंझून शेवटीं वसईच्या किल्ल्यावर मराठ्यांचा भगवा झेंडा फडकाविला आणि त्या संग्रामांत आपल्या सैनिकांनीं धरून आणलेल्या पोर्तुगिजांच्या मुख्य सेनापतीच्या रूपवती स्त्रीस बहीण मानून तिची तिच्या नवऱ्याकडे सन्मानपूर्वक रवानगी करून दिली, हा ऐतिहासिक प्रसंग रंगाविलेला आहे. १८९४ पासून १९०८ पर्यंत अवघ्या १५ वर्षांत या पुस्तकाच्या तीन आवृत्त्या निघाल्या असल्याचें आढळून येतें. यानंतर सन १९०९ मध्यें भागवतांचीच 'झीनात महाल' व डॉ. शंकर रामचंद्र ओकांची 'सती कर्मदेवी' हीं दोन पुस्तकें प्रसिद्ध झालीं. यांपैकीं 'झीनात महाल' या पुस्तकास 'दाक्षिणा प्राइझ कमिटी' कडून पारितोषिक मिळालें होतें; परंतु तें पुस्तक आमच्या पहाण्यांत आलें नाहीं. 'सती कर्मदेवी' ही गोष्ट प्रथम हरिभाऊ आपट्यांच्या 'करमणूक' पत्रांतून आली व नंतर तिच्यांत अल्पस्वल्प फेरफार करून ती पुनः पुस्तकरूपानें प्रकाशित केली गेली. राजस्थानच्या इतिहासांत समाविष्ट होऊं शकेल असा (जवळ जवळ काल्पनिकच) प्रसंग या गोष्टीकरितां घेऊन त्यांत रजपूत वीरांचे धर्मयुद्धप्रीति, साहस व शौर्य हे गुण आणि रजपूत वीरांगनांचे पति-भक्तिपरायणता व तेजस्विता हे गुण डॉक्टरसाहेबांनीं उत्तम प्रकारें चित्रित केले आहेत. अशाच तऱ्हेचा प्रयत्न 'सती कर्मदेवी' नंतर सन १९२० मध्यें प्रसिद्ध झालेल्या 'मंगळागौरीचा प्रसाद' या पुस्तकांतही उज्जनींचे राजाराम दौलत गडकरी यांनीं केलेला आहे. शिवाजी महाराजांचें स्वराज्यस्थापनेचें कार्य चालू असतांना एका अप्रसिद्ध चांद्रसेनीय कायस्थ प्रभूच्या कुटुंबांतील स्त्रियांनीं बजाविलेली बहुमोल कामगिरी यांत निवेदन केली असून त्याबद्दल "गडकरी यांनीं

आपल्या कल्पनेनें एका पराचा सुंदर हंस तयार केला आहे" असे उद्गार प्रस्तावनाकार भाई कोतवाल [ पुरुषोत्तम केशव कोतवाल ] यांनीं काढले आहेत; तथापि गडकरी यांनीं या गोष्टींत आपलें लेखनकौशल्य प्रकट करून महाराष्ट्रांतील स्वराज्याच्या उदयकाळचा एक देखावा चांगला दाखविला आहे यांत संदेह नाहीं ! इंदूरच्या 'साहित्य सेवा माले' चें पहिलें ( व शेवटलें ? ) पुष्प म्हणून हा 'मंगळागौरीचा प्रसाद' प्रसिद्ध झाला होता. यानंतर 'गाईनें राखिलें' या अशाच प्रकारच्या गडकरी यांनीच लिहिलेल्या लघु कादंबरीरूप कथेचाही येथें जातां जातां उल्लेख करणें उचित होईल.

## सामाजिक कादंबऱ्या व कथा

आतां यापुढें सामाजिक कादंबऱ्या व कथा यांकडे वळूं. मध्य-भारतांत सामाजिक कादंबऱ्या लिहिण्याचें कार्य प्रथम वासुदेव गोविंद आपटे यांनींच केलें असावें असें आतांपावेतोंच्या माहितीवरून दिसून येतें. 'दुःखाअंतीं सुख', 'नवयुग', 'विलक्षण भोळेपणा' व 'माणिक बाग' या चार कादंबऱ्या आपटे यांनीं इंदुरास असतांना लिहिल्या असून त्या सर्व 'मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीच्या पुस्तक-मालें' तून प्रकाशित झाल्या आहेत. त्यांपैकीं पहिली 'दुःखाअंतीं सुख' ही कादंबरी सन १९०१ मध्यें प्रसिद्ध झाली. मिसेस हेन्री वुड हिच्या 'Mrs. Halliburton's Troubles' या कादंबरीचें हें रूपांतर असून त्यांत मध्यम स्थितीतल्या पांढरपेशा वर्गांतील निराधार विधवा स्त्री आपत्काळांत अन्नानें दिवस काढून कुटुंबरक्षणाची व आपल्या मुलांच्या शिक्षणाची जबाबदारी कशी पार पाडते व तिचीं मुलेंही सदाचरणानें आणि सततोद्योगानें कशीं भाग्यास चढतात हें मुख्यतः दाखविलें आहे व या गोष्टीला उठाव आणण्याकरितां श्रीमंतांचीं मुलें फाजिल लाडामुळें कशीं आळशी व व्यसनी बनतात हेंही त्याबरोबर दाखविलें आहे. मूळ कादंबरींत मिसेस हेन्री वुडनें

विल्यम व मेरी यांच्यामधील मुग्ध प्रेमाच्या वर्णनानें रंग आणला असून ॲनालिन्च्या उदाहरणानें तरुण व नखरेबाज मुली अविचारामुळें दुर्गुणी तरुणांशी स्नेहसंबद्ध झाल्यावर लोकनिंदेस कशा पात्र होतात याचें चित्र चांगलें रेखाटलें आहे; परंतु आपटे यांना रूपांतर करतांना आपलें कथानक महाराष्ट्र समाजांत शोभून दिसेल असें बनविण्यासाठीं विल्यम व मेरी यांच्या प्रणयकथेस पूर्ण फाटा द्यावा लागला आहे व त्यामुळें अकराबारा वर्षांच्या कुसुमनें एकदां कोठें गंगाधराची तरफदारी केली ह्मणून तिच्या भावानें 'तुला गंगाधर नवरा आवडेल कां ?' असा सहज थट्टेनें प्रश्न करतां त्या पोरीनें लाजून कांहींच उत्तर दिलें नाहीं एवढ्यावरच या सरस कथाभागाची उभारणी करावी लागली आहे. यांत ॲनालिन् सोनीच्या रूपानें प्रगट झाली आहे; परंतु वयांत आलेल्या व प्रणयाची कल्पना झालेल्या या तरुण मुलीस महाराष्ट्र समाजांत प्रवेश करितांना तेरा वर्षे वयाची (पण लग्नाला योग्य अशी) कोंवळी पोर व्हावें लागलें आहे! त्यामुळें इतक्या लहान मुलीची एका तरुणाशीं गट्टी जमावी व तिनें त्याच्याबरोबर रात्रींबेरात्रीं खुशाल गप्पा मारित बसावें हें जरा चमत्कारिक वाटतें. एवढाच काय तो दोष या कादंबरींत दिसून येतो. यानंतर आपटे यांची 'नवयुग' ही दुसरी कादंबरी सन १९०४ मध्यें प्रसिद्ध झाली. हिचीं पहिलीं चारपांच प्रकरणें पं. शिवनाथशास्त्री यांच्या 'युगांतर' या बंगाली कादंबरीवरून अनुवादिल्यावर पुढील भाग स्वतः स्वतंत्रच लिहावा असें आपटे यांना वाटून त्यांनीं तो तसा उत्तम रीतीनें लिहिला आहे. आपल्या देशांत पाश्चात्य शिक्षणाच्या सुरुवातीबरोबरच नवयुगाला प्रारंभ झाला व नवे-जुने पक्ष निर्माण होऊन त्यांत लढे सुरू झाले, त्यांतील महाराष्ट्रांतले लढे आपटे यांनीं प्रस्तुत कादंबरींत रंगविले आहेत व ते रंगवितांना दोन्ही पक्षांतील दोषदर्शन निःपक्षपातित्वानें

केलें आहे. या ‘ नवयुगा ’ बरोबरच ( त्याच वर्षी ) ‘ विलक्षण भोळेपणा ’ ही आपट्यांची तिसरी कादंबरी प्रसिद्ध झाली. सम्युएल लव्हर याच्या ‘ Handy Andy ’ या इंग्रजी कादंबरीचें हें रूपांतर होय; परंतु आपटे यांनीं हें रूपांतर त्या मूळ इंग्रजी कादंबरीवरून न करतां के. एन्. काब्राजी यांनीं त्याचें पूर्वीच गुजराथींत ‘ भोलोदोलो ’ या नांवानें केलेल्या रूपांतरावरून केलेलें आहे. या कादंबरींतील भोळ्या बाळूची प्रत्येक कृति वाचकांना पोट धरधरून हंसावयास लावणारी आहे! ‘नवयुग’ व ‘विलक्षण भोळेपणा’ यांच्या पाठोपाठच सन १९०५ मध्यें ‘माणिकबाग’ ही आपटे यांची चौथी कादंबरी प्रसिद्ध झाली. मिसेस हेन्री वुड हिच्या ‘East Lyne’ या कादंबरीवरून आपट्यांनीं आपली ही कादंबरी रचिलेली आहे. उच्च कुळांतील शुद्ध वर्तनाच्या आणि निष्कपट, निष्पाप व कोमल अंत:करणाच्या परंतु संशय आणि मत्सर यांनीं ग्रासिलेल्या एका हतभागी स्त्रीनें आपल्या एकंदर जन्माचें कसें मातेरें करून घेतलें आणि जन्मभर पश्चात्ताप करूनही स्वतःच्या भयंकर चुकीचा परिणाम तिला कसा टाळतां आला नाहीं याचें चित्र या कादंबरींत रेखाटलें आहे. यानंतर ग्वाल्हेरचे शिवराम नाना कदम यांची ‘ मनमोहनी ’ ही कादंबरी सन १९०७–८ च्या सुमारास बाहेर पडली; परंतु ती आम्हाला पहाण्यास मिळाली नाहीं. पुढें सन १९१३ मध्यें इंदूरचे डॉ. गोपाळ रामचंद्र तांबे यांनीं विलायतेची सफर करून परत येतांना बोटीवर लिहिलेली ‘ शूर दामू अथवा झांकलें माणिक ’ ही कादंबरी प्रसिद्ध झाली. या कादंबरीचें नांवच इतकें सरळ अर्थबोधक आहे कीं, त्यावरून आंतील कथानकाची ठोकळ कल्पना कोणासही सहज होण्यासारखी आहे. वास्तविक या कादंबरींतील कथानक अगदींच साधें असून कथानायक दामूची कर्तृत्वशीलताही तितकीशी स्पृहणीय नाहीं; तथापि वाढत्या वया-बरोबर दामूच्या चारित्र्याला लागलेलें उदात्त वळण मात्र लक्ष वेधणारें

आहे यांत संदेह नाहीं. यानंतर सन १९०९ मध्यें ग्वाल्हेरचे श्रीनिवास विनायक गोरे यांची अगोदर 'चित्रमयजगतां' तून क्रमशः प्रसिद्ध झालेली 'भग्नहृदया' ही कादंबरी स्वतंत्र पुस्तक रूपानें बाहेर पडली. एका कुलीन हिंदु गतभर्तृका स्त्रीच्या चारित्र्यावर समाजकंटक लब्धप्रतिष्ठितांनीं केलेले घाणेरडे आरोप तिच्या बऱ्याच दिवसांनीं भेटलेल्या तरुण स्वाभिमानी पुत्राच्या कानीं पडून त्यास तें असह्य व्हावें व त्यामुळें त्याच्यावर त्या लब्धप्रतिष्ठितांकडून अनर्थांची परंपरा ओढवावी याचे करुणाजनक चित्र या कादंबरींत उभें केलेलें आहे. पुढें महाराष्ट्रांतील कापशी संस्थानचे माजी कारभारी व 'मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष', 'भयंकर स्वप्न', 'स्वर्गीय सौंदर्य' इत्यादि पुस्तकांचे कर्ते रामचंद्र नरसिंह इनामदार यांनीं ग्वाल्हेर येथून लिहिलेली 'खरी लोकसेवा' ही कादंबरी पुण्याच्या (हल्लीं पंढरपूरच्या) 'सुरस ग्रंथ मालें'तून पस्तिसावें पुष्प म्हणून सन १९२० मध्यें प्रसिद्ध झाली. मुंबईच्या मजूरवर्गाची करुणास्पद स्थिति चित्ताकर्षक कथानक-द्वारें पुढें मांडून त्या वर्गाची दुःस्थिति सहानुभूतिपूर्वक दूर करण्या-बद्दल वाचकांच्या मनांत स्फूर्ति उत्पन्न करण्याचा प्रयत्न या कादंबरींत केलेला आहे. नंतर सन १९३४ मध्यें इंदूरचे दामोदर बळवंत दांडेकर यांची 'चंद्रकांताचा चांद झाला!' ही कादंबरी प्रकाशित झाली. खालसा मुलखांत माजलेल्या हिंदुमुसलमानांतील वैमनस्याच्या दावाग्नीची झळ सन १९२८ मध्यें इंदुरास लागून तेथें दंग्याचा जो भयंकर स्फोट झाला त्यावरून दांडेकरांना प्रस्तुत कादंबरी लिहिण्याची स्फूर्ति होऊन तींत त्यांनीं मुसलमानांनीं इतरत्र हिंदु तरुणांना व स्त्रियांना फुसलावून किंवा धाकदपटशा देऊन धर्मभ्रष्ट करण्याचें किंवा आपल्या धर्मांत खेंचण्याचें जें बेधडक कुकर्म चालविलें आहे त्याची योग्य जाणीव बेफिकीर हिंदु समाजाला करून दिली आहे. या काद-बरींत बाटलेल्या कथानायक चंद्रकांताचें पूर्वचरित्र व त्याच्याशीं

निगडित असलेल्या इतर हिंदु पात्रांच्या विटंबनेची हकीगत आली असून चंद्रकांताचा पुढील जीवनक्रम याच्या पुढच्या कादंबरींत यावयाचा आहे. दांडेकरांनीं या कादंबरींतील घटनास्थळें इंदूर व इंदूरच्या आसपासचीं देऊन कथानकही इंदूरच्या परिस्थितीशीं प्रायः जुळणारें असें ठेविलेलें आहे त्यामुळें मध्यभारतीय वाचकांना ही कादंबरी वाचीत असतांना त्यांतील प्रत्येक प्रसंग जणुं काय आपल्या डोळ्यांपुढेंच उभा आहेसें वाटतें व तदितर वाचकांना इकडील एकंदर परिस्थितीचा सामान्य परिचय घडून येतो.

आतां पत्रमय कादंबऱ्या लिहिण्याचा जो नवा प्रकार प्रचारांत आला आहे, तशा प्रकारच्या आजपावेतों मध्यभारतांत लिहिल्या गेलेल्या तीन कादंबऱ्यांकडे वळूं. 'कमलेचीं पत्रें', 'इंदिरेस पत्रें' व 'शालिनीचीं निवडक पत्रें' या त्या तीन कादंबऱ्या असून त्या सर्व एकजात आत्मचरित्रपर आहेत. 'कमलेचीं पत्रें' ही कादंबरी ह्मणजे आर. वेंकट सुब्बाराव यांच्या "Kamala's letters to her husband" या इंग्रजी पुस्तकाचें भाषांतर होय. हें भाषांतर इंदूरचे नारायण कृष्ण वैद्य यांनीं सन १९०९ मध्यें केलें आहे व त्याला आरंभीं रमाबाईसाहेब रानडे यांच्याकडून लिहविलेला लहानसा पण सुंदर उद्बोधक असा 'परिचय' लेख जोडला आहे. सुमारें पन्नास वर्षांपूर्वींच्या महाराष्ट्रीय सुसंस्कृत हिंदु गृहिणीच्या कोमल मनोवृत्ति, शुद्धांतःकरण, पतिनिष्ठा व गंभीर विचार यांचें प्रतिबिंब या कादंबरींत पानोपानीं दिसून येतें आणि शेवटीं पतीच्या ठिकाणीं एवढें अकृत्रिम व उज्ज्वल प्रेम असतांनाही कमलेचें जीवित नितांत दुःखपर्यवसायी व्हावें हें पाहून मनाला मोठा चटका बसतो. ही कादंबरी इंदूरच्या 'होळकर सरकार ग्रंथमाले' चें चौथें पुस्तक ह्मणून प्रसिद्ध झाली आहे. 'इंदिरेस पत्रें' ही स्वतंत्र कृति सौ. कमलाबाई-साहेब किबे यांची असून ती सन १९२४ मध्यें प्रकाशित झाली आहे.

हींत हिंदु स्त्रियांच्या प्रशंसनीय गुणस्वभावाचें चित्रण भावनाप्रधान अंतःकरणानें उत्कृष्ट प्रकारें केलें आहे. ह्यांतील बरींचशीं पत्रें पूर्वी 'विविधज्ञानविस्तारां' तून आलीं होतीं. 'शालिनीचीं निवडक पत्रें' ग्वाल्हेरचे गोविंद बळवंत माक्रोडे यांनीं संपादिलीं असून आतांपावेतों त्यांचे पहिले दोन खंड, 'गृहिणी भूषण पुस्तकमाले' चे पहिलें व दुसरें पुष्प ह्मणून, अनुक्रमें सन १९३२ व १९३३ मध्यें प्रसिद्ध झाले आहेत. यांतील पहिल्या खंडाची आवृत्ति अवघ्या महिन्याभरांतच संपल्यामुळें, ज्यांनीं तो खंड वाचला नसेल त्यांचा विरस न व्हावा ह्मणून, संपादकांनीं दुसरा खंड छापतांना त्यांत पहिल्या खंडांतील सर्व पत्रें मुद्दाम प्रथम समाविष्ट करून घेतलीं आहेत. हीं पत्रें शालिनीनें विवाहित होऊन नवोढा, सून, माता, गृहिणी आणि सासू या संसारांतल्या यथाक्रम अवस्थांतरांतून जीवन व्यतीत करीत असतांना निरनिराळ्या नातेवाईकांना उद्देशून प्रसंगानुसार लिहिलेलीं आहेत त्यामुळें कुलीन, सुविद्य अशा महाराष्ट्रीय स्त्रियांचे सांसारिक अनुभव-जन्य विचार कसे व काय आहेत याची कल्पना होण्यास जणुं काय हीं पत्रें प्रतिनिधि स्वरूप झालीं आहेत. या पत्रांतून 'जुनें तें सोनें' या जीर्णमतवाद्यांच्या गतानुगतिक विचारसरणीस शालिनीनें आपल्या प्रगल्भ व प्रमाणाधिष्ठित मतप्रदर्शनानें हाणून पाडलें आहे; परंतु त्याबरोबर तिनें क्रांतिकारक मार्गाचा अवलंब करण्याचें मात्र कोठेंही दर्शविलें नाहीं! बालविवाह, बालविधवांचा प्रश्न, स्त्रीशिक्षण, पत्रिकेचें खूळ, हुंड्याची चाल व इतर उपेक्षणीय रीतीभाती या सर्व गोष्टींवरचे तिचे विचार बरेच सडेतोड जरी असले तरी ते मार्मिक व मननीय नाहींत असें कोण ह्मणूं शकेल? माक्रोडे यांनीं आपल्या या द्विखंड पुस्तकानें महिला वाङ्मयभांडारांत घातलेली भर खरोखरच अभि-नंदनीय आहे.

यापुढें आतां आपण सामाजिक कथांकडे वळूं. मध्यभारतांत

ऐतिहासिक लघु–कादंबरीस्वरूप कथा स्वतंत्र पुस्तकरूपानें जशा लिहिल्या गेल्या आहेत तशा सामाजिक कथा मात्र लिहिल्या गेल्या नाहींत; तथापि सन १९१२ मध्यें रतलामचे गोविंद विनायक रत्नपारखी यांनीं ' संसारी सावित्री ' नांवाची एक कथा तशा प्रकारची लिहिली असल्याचें समजतें. मध्यभारतीय लेखकांच्या सामाजिक लघुकथांचे तीन संग्रह मात्र प्रसिद्ध झालेले आहेत. त्यांपैकीं पहिला संग्रह ' कथामकरंद ' ( भाग पहिला ) या नांवानें सन १९१० मध्यें निघाला. यांत एकंदर पांच कथा असून त्या इंदूरचे विश्वनाथ नारायण देव ऊर्फ ' पुरुषोत्तम ' यांनीं लिहिलेल्या आहेत. ' दोन वारकरी ' या पहिल्या कथेंत देवांनीं भक्तिरस व ज्ञान या दोहोंचें खरें रहस्य विशद केलें आहे व ' अवघें देखें जन ब्रह्मरूप ' या दुसऱ्या कथेंत ब्रह्मज्ञानाची महती गाइली आहे; परंतु यांतील योग्याचा चमत्कार नवमन्वतरांत अश्रद्धेय ठरणारा आहे. 'शेवटीं सत्याचा जय होतो ' व 'तिघे वनवासी ' या अनुक्रमें तिसऱ्या व चौथ्या कथा साधारण आहेत. पांचव्या ' जीवन प्रेमाचा आधार ' या कथेंतील यमदूताचा पृथ्वीवरील संचार जरी अद्भुत कल्पनारम्य असला तरी एकंदर कथानक तत्वबोधक व चित्ताकर्षक झालें आहे. रामा चांभाराचीं दयाशील वृत्ती, त्याच्या बायकोचा तापट स्वभाव, साहेबाच्या जिविताची क्षणभंगुरता वगैरे गोष्टींमुळें कथानकाला चांगला रंग चढला आहे. यानंतर दुसरा कथासंग्रह 'षट्पाद' या नांवानें सन १९२९ मध्यें केशव सदाशिव केळकर यांनीं लिहून प्रसिद्ध केला. यांत ' तरुण-भारत ', ' खुनाचा खटला ', ' दर मिनिटास हजार रुपये ', ' गंधर्व-गायन-समाज ', ' पुण्य-कार्योत्तेजक-मंडळी ' व ' (बेकार) पदवीधरांची परिषद ' अशा सहा कथा दिलेल्या आहेत आणि त्यांपैकीं प्रत्येक कथेंत लेखकानें स्वतःच्या अनुभवांतील अगर निरीक्षणांतील प्रसंगाची मदत घेऊन कांहींतरी विशिष्ट तत्त्व पुढें मांडलें आहे. दुसऱ्या व तिसऱ्या

कथेंत संस्थानी वातावरण यथावत् चित्रित करण्याचा केलेला प्रयत्न बरा साधला आहे. तसेंच यांतील प्रत्येक कथेंत कांहीं ना कांही टीकाही असून ती टीका प्रायः सद्धेतुप्रेरित असल्यामुळें सात्विक व श्लाघ्य झालेली आहे. पुढें तिसरा कथासंग्रह 'भावना-तरंग' या नांवानें सन १९३४ मध्यें धारच्या 'तरुण-साहित्यमाले'चें पहिलें पुष्प म्हणून प्रसिद्ध झाला आहे. याचे लेखक चिंतामण बळवंत लेले ( श्यामसुंदर ) हे असून यांत 'दिव्यविनोदाल्पाहार', 'मातेचा रोष', 'एका वार्षिकांकाला वृद्धाचा संदेश', 'माझें पहिलें पत्र', 'शेरास सव्वा शेर', 'माझें संसारांतिल लग्न', 'संशोधनाची होळी', 'धबधबा पाहून काय मोक्ष मिळत होता?', 'ध्यान', 'पंढरीनाथापुढें रामदासीबुवांची कथा' व 'कालाय तस्मै नमः' अशा ११ लघुकथा संकलित केलेल्या आहेत. या लघुकथांतून विषयवैचित्र्य राखून तदनुषंगानें विविध स्वभावचित्रें रेखाटलीं आहेत.

**आध्यात्मिक कादंबरी**

अस्तु, येथपर्यंत काल्पनिक ( अद्भुतरम्य ), ऐतिहासिक व सामाजिक कादंबऱ्या आणि कथा यांचा परिचय करून देण्यांत आला. आतां त्यापेक्षां भिन्न स्वरूपाच्या अशा एका आध्यात्मिक कादंबरीचा परिचय करून द्यावयाचा आहे. ही कादंबरी ह्मणजे सन १९११ मध्यें विश्वनाथ नारायण देव ऊर्फ 'पुरुषोत्तम' यांनीं लिहिलेली 'मैत्रेयी आणि कात्यायनी' ही होय. हिचीं एकंदर पांच प्रकरणें असून त्यांपैकीं पहिलीं चार प्रकरणें पं. सीतानाथ तत्त्वभूषण यांच्या 'मैत्रेयी' नामक पुस्तकांतून भाषांतर केलेलीं आहेत व शेवटलें पांचवें प्रकरण बृहदारण्यकांतल्या एका भागावरील श्रीमदाद्यशंकराचार्यांच्या टीकाधारें स्वतंत्र लिहिलेलें आहे. आमचा आर्यावर्त देश प्राचीन काळीं उन्नतीच्या शिखरावर विराजमान असतांना येथील स्त्रियांनीं आध्यात्मिक ज्ञानांत किती प्रगति करून घेतलेली होती व येथील पुरुषही

आध्यात्मिक विषयांत कशा भराऱ्या मारीत होते, तसेंच सुशील, विदुषी पत्नींच्या समागमामुळें पुरुषांचा गृहस्थाश्रम धन्य होऊन त्यांच्या आत्मोन्नतींत त्यांना पत्नींकडून कसें साह्य लाभत होतें हें या कादंबरीवरून कळून येतें. मैत्रेयी आणि कात्यायनी या दोन्ही प्राचीन आर्य विदुषी सदर कादंबरींतील कथानायिका असून त्यांचें अध्यात्म विद्येतील प्रावीण्य सर्वश्रुतच आहे. भगवान् याज्ञवल्क्या-बरोबर त्या दोघींनीं अध्यात्म विषयावर केलेला वादविवाद या कादंबरींत दिला असून तो खरोखर मननीय आहे.

### बालकथावाङ्मय

आतां शेवटीं मुलांकरितां लिहिल्या गेलेल्या कथांचा परिचय करून देऊन हें प्रकरण आटोपतें घेऊं. इंग्रजींत 'Books for Bairns' (मुलांसाठीं पुस्तकें) या नांवाखालीं बालभाषेंत लिहिलेलीं, बालमनोवृत्तींस आनंद देणारीं व बालसृष्टींतील विविध व्यापारांचें मनोज्ञ आविष्करण करणारीं पुष्कळ पुस्तकें तयार झालीं आहेत व होत आहेत आणि तीं प्रायः सर्वच कथात्मक स्वरूपाचीं आहेत. मुलें हीं जन्मतः कथाप्रिय असतात व कथारूपांत त्यांच्यापुढें मांडिलेल्या विषयाचें आकलन तीं तत्काल करूं शकतात, हें पाहूनच जणुं काय, कोणत्याही भाषेंतल्या बालवाङ्मयाचें प्रणयन कथारूपांत करण्याचा प्रघात पडला असावा. आपल्या मराठींत बालवाङ्मयाची सुरुवात सन १८२८ मध्यें 'अर्वाचीन मराठी वाङ्मयाचे आद्य ग्रंथकार' ह्मणून दादोबा पांडुरंगांनीं गौरविलेल्या सदाशिव काशीनाथ ऊर्फ बापू छत्रे यांच्या 'बाळमित्र' ('Children's Friend' या इंग्रजी पुस्तका-वरून तयार केलेल्या) कथात्मक पुस्तकापासून झालेली आहे असें सरसहा मानण्यांत येतें; परंतु तत्पूर्वी सन १८२५ मध्यें टौनसेंट या मराठी भाषाभिज्ञ आंग्ल लेखकानें 'बालगोष्टी' हें पुस्तक लिहिलें

असल्याचा शोध लागतो. तेथपासून तों सन १९०२ मध्यें बालवाङ्मयाचे प्रथितयश पुरस्कर्ते व प्रणेते वासुदेव गोविंद आपटे यांचीं 'बाल रामायण' व 'बाल भारत' हीं पुस्तकें प्रकाशित होईपर्यंत जें बालवाङ्मय निर्माण झालें तें अल्पसंख्य जरी असलें तरी त्यांत उक्त छत्रेकृत 'इसापनीति' (१८२९) व 'वेतळपंचविशी' (१८५२), विष्णू वामन बापट निर्मित 'बालोपदेश कथा' (१८३६), मिसेस फरार विरचित 'बालबोध गोष्टी, (१८३८) व विनायक शास्त्री प्रणीत 'नीतिकथा' हीं पुस्तकें बहुमोल आहेत आणि एक प्रकारें याच पुस्तकांच्या पायावर पुढें वासुदेव गोविंद आपटे यांनीं आपल्या एकंदर बालकथावाङ्मयाच्या प्रकामसुंदर मंदिराची उभारणी केलेली आहे. आपटे आपणास पुणेंकर ह्मणवीत होते; तथापि शिक्षण व नोकरी या दोन्हीं निमित्तांनीं त्यांचें वास्तव्य इंदुरास अधूनमधून बरेच दिवस राहिलें होतें. त्या अवधींत त्यांनीं इंदुरांत जीं पुस्तकें लिहिलीं त्यांपैकीं 'भारतांतील सोप्या गोष्टी' भाग १ व २ (१९०९–१९१३ *) 'रामायणांतील सोप्या गोष्टी' (१९१३) 'साधुसंतांच्या गोष्टीं', व 'बालमनोरंजन' (१९१६) या चार पुस्तकांचा समावेश कथावाङ्मयांत होतो. आपट्यांच्या इतर पुस्तकांप्रमाणें हींही पुस्तकें बाल समाजांत अत्यंत प्रिय झालेलीं आहेत. यांपैकीं पहिल्या दोन पुस्तकांचे विषय त्यांच्या नांवांवरूनच स्पष्ट आहेत. महाभारत व रामायण हे आपले सर्वमान्य राष्ट्रीय आर्ष ग्रंथ होत. त्यांतील निरनिराळ्या महनीय विभूतींचे गुण, पराक्रम व ऐश्वर्य यांचा परिचय बालकांना करून देऊन तद्द्वारें त्यांच्यापुढें लहानपणापासून सुंदर आदर्श उभे करणें किती श्रेयस्कर आहे हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. आपट्यांनीं आपल्या वरील दोन्हीं पुस्तकांत

* हा सन द्वितीयावृत्तीचा आहे.

अनुक्रमें महाभारत व रामायण या ग्रंथांतून निवडलेलीं उद्बोधक आख्यानें सुबोध, रसाळ वाणीनें वर्णिलीं आहेत. तसेंच त्यांनीं 'साधुसंतांच्या गोष्टी' या तिसऱ्या पुस्तकांत भक्तीचा महिमा मुलांच्या मनावर ठसविणारीं नामदेव, तुळशीदास, ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास, एकनाथ इत्यादिकांचीं चरित्रें थोडक्यांत दिलीं आहेत. 'बालमनोरंजन' हें त्यांचें चौथें पुस्तक ह्मणजे संस्कृतांतील नीतिपर ग्रंथांत अद्वितीय समजल्या जाणाऱ्या 'हितोपदेशा'ची लहान मुलांकरितां तयार केलेली मराठी लघु आवृत्तिच होय. आपटे यांनीं हें पुस्तक अगदीं सोप्या भाषेंत लिहून त्यांतील प्रत्येक कथेचें तात्पर्य शेवटीं दिलें आहे. आपट्यांच्या या वरील पुस्तकांच्या जोडीला बसणारीं मध्यभारतीय बालकथावाङ्मयांतील दुसरीं पुस्तकें ह्मणजे 'मुलांचा खाऊ', 'लहान मुलांकरितां सुरस गोष्टी', 'बूबी' व 'बालकथा' हीं होत. यांपैकीं 'मुलांचा खाऊ' हें पुस्तक देवासचे सदाशिव कृष्ण शितोळे यांनीं सन १९१४ मध्यें देवास थोरल्या पातीचे राज्याधिपति श्रीमंत तुकोजीराव महाराज पवार यांच्या २७ व्या वाढदिवसानिमित्त तयार केलें असून त्यांत मुलांना राजनिष्ठेचा उपदेश केलेला आहे. 'लहान मुलांकरितां सुरस गोष्टी' हें पुस्तक इंदूरचे सीताराम विष्णु सरवटे यांनीं सन १९१९ मध्यें लिहिलें आहे व यांतील सर्वच गोष्टी मुलांना आवडणाऱ्या आहेत. 'बूबी' हें एका जर्मन पुस्तकाचें भाषांतर असून तें सत्यबोध बाळकृष्ण हुदलीकर यांनीं इंदुरास असतांना सन १९२४ मध्यें तयार केलें आहे. ही गोष्ट मोठी चित्ताकर्षक व बोधप्रद आहे. 'बालकथा अर्थात् मुलांकरितां सोप्या गोष्टी' हें पुस्तक सौ. कमलाबाई किबे यांनीं लिहिलें आहे. आज्ञाधारकपणा, मनाचा थोरपणा, लीनता, दयाळूपणा, सत्यवादित्व, आत्मविश्वास, देश व समाज यांची सेवा, स्वामिभक्ति, देवावर निष्ठा वगैरे निरनिराळ्या गुणांवर प्रत्येकीं एकेक स्वतंत्र गोष्ट अशा एकंदर १८ गोष्टी

यांत दिल्या आहेत. भाषा सोपी व सुंदर आणि गोष्टी बालकांना सहज रिझविणाऱ्या यांमुळें सदर पुस्तकानें बालवाङ्मयांत निःसंदेह एका चांगल्या पुस्तकाची भर पडली आहे.

---

# प्रकरण तिसरें.

## नाटकें, प्रहसनें व इतर नाट्यविषयक वाङ्मय.

सुखिनि सुखनिधानं दुःखितानां विनोदः ।
सदय हृदयहारी मन्मथस्याग्रदूतः ।
अति चतुर सुगम्यो वल्लभः कामिनीनां ।
जयति जगति नाट्यं पञ्चमश्चोपवेदः ॥

### नाट्यवाङ्मयाचें पूर्वकथन

वरील श्लोकांत ललित वाङ्मयांतर्गत नाट्याची गाइलेली महती अगदीं यथार्थ आहे. व्युत्पन्न लोक वाङ्मयांत काव्याचा दर्जा श्रेष्ठ मानतात; परंतु 'काव्येषु नाटकं रम्यं' या उक्तीवरून काव्यांतही नाटक रम्य अतएव अधिक श्रेष्ठ असल्याचें दर्शविलें जातें. ललित-वाङ्मयांतील नाटकाचा हा अग्रपूजेचा मान इतर दृष्टींनींही पण सिद्ध होतो. मांडलिक राजे ज्याच्यापुढें नतमस्तक होतात त्यालाच जगांत 'सम्राट्' हें नामाभिधान प्राप्त होत असतें. या दृष्टीनें विचार केल्यास नाट्यापुढें चौसष्ट कलांतील चित्रकला, नृत्यकला, गायनकला, अभिनयकला इत्यादि प्रमुख कला सदैव हात जोडून उभ्या असतात;

ह्यावरून त्याचें कलेंतील सार्वभौमत्व निर्विवाद सिद्ध होतें. नाट्य हें प्रथम ब्रह्मदेवानें 'आत्मोपसिद्ध' असें प्रचलित केलें. वेदांगोपांगापासून त्याची उत्पत्ति झाली व स्वर्गलोकांत त्याचा अपरंपार महिमा वाढला. नयबुद्धिपराक्रमानें 'देवराज्य' संपादणाऱ्या नहुष राजाची तर नाट्यावर इतकी प्रीति जडली कीं, पुढें कृतकर्मामुळें त्याला पृथ्वीवर परतावें लागलें तेव्हां त्याच्या इच्छेखातर भरतमुनींस नाट्यकलेला स्वर्गातून मृत्युलोकीं आणणें भाग पडलें आणि 'न तथा गन्धमाल्येन देवास्तुष्यन्ति पूजिताः। यथा नाट्यप्रयोगस्थैत् नित्यं तुष्यन्ति मंगलैः' व 'त्रैगुण्योद्भवमत्र लोकचरितं नानारसं दृश्यते। नाट्यं भिन्नरुचिर्जनस्य बहुधाप्येकं समाराधनम्' अशी तिची मुक्तकंठानें महती गाऊन तिचा प्रचार येथें करावा लागला. तसेंच तिच्या जोपासनेसाठीं त्यांना स्वतंत्र शास्त्राची रचनाही करून ठेवावी लागली. लौकरच ललितकलांचे भोक्ते असे अनेक मोठमोठे राजे या नाट्यकलेचे आश्रयदाते बनले, इतकेंच नव्हें तर त्यांतील कित्येक राजे व राजकुटुंबांतील स्त्रीपुरुष नृत्यगायनाभिनयाचें सशास्त्र शिक्षण संपादून नाट्यप्रयोगांत हौसेनें भूमिकाही घेऊं लागले. रसिकांकडून नाट्याचा मनःपूर्वक आदर होऊं लागला आणि भास, कालिदास, भवभूतिसारखे प्रतिभासंपन्न कविश्रेष्ठ नाट्यग्रंथप्रणयनांत आपली प्रज्ञाशक्ति अहमहमिकेनें प्रकट करूं लागले! एकंदरींत अशा प्रकारें देवाश्रय, राजाश्रय व विद्वानाश्रय लाभल्यामुळेंच भाग्यवंत झालेल्या नाट्यकलेला आपलें अस्तित्व प्राचीन काळापासून आजपर्यंत अव्याहत राखतां येऊन 'लोकसमाराधने'चें कार्य यशस्वितेनें चालवितां आलें आहे. आपल्या मराठी साहित्यसृष्टींत नाट्यकला प्रथम 'ललितें' 'गोंधळ' 'बोहोडे', 'कलगी–तुरे', व 'दशावतार' यांच्या रूपांत अवतरली व 'तमाशा'च्या मार्गानें पुढें येत तिनें १९ व्या शतकाच्या पूर्वार्धातील अंतिम दशकांत 'नाटका'चें अभिजात स्वरूप धारण

करावयास सुरुवात केली. मराठींतलें अगदीं पहिलें नाटक ( वस्तुतः प्रहसन ) तंजावरच्या शाहूराजाच्या राजवटींत ( सन १६७८–१६८८) लिहिलें गेलेलें 'लक्ष्मीनारायण कल्याण' हें होय असा अलीकडील शोध आहे; परंतु यापूर्वी ' पहिलें ' ह्मणून सर्वमान्य ठरलेलें मराठी नाटक ह्मणजे सन १८४३ मध्यें विष्णुदास ( विष्णु अमृत ) भावे यांनीं तयार केलेलें ' सीतास्वयंवर ' हें आहे. हें नाटक स्वतः रचून रंगभूमीवर आणल्यामुळें ' महाराष्ट्राचे भरतमुनि ' असा भावे यांचा लौकिक सर्वत्र चिरस्थायी झाला. भाव्यांनीं बरींच नाटकें लिहिलीं; परंतु त्यांच्या नाटकांचें महत्त्व वास्तविक प्रयोगापुरतेंच मर्यादित होतें. व्यवस्थित थाटमाट करून नाटकांना यथोचित रूपांत वाङ्मयसृष्टींत प्रवेश करावयाला पुढें आणखी चौदा वर्षांचा कालावधि लागला व परशुराम तात्या गोडबोले यांचें ' वेणीसंहार ' हें पहिलें अभिनव नाटक ' बंडाच्या सालीं' [१८५७] लोकांपुढें आलें. यानंतर भाषांतरित व स्वतंत्र अशीं दोन्हीं प्रकारचीं नाटकें महाराष्ट्रांत भराभर निर्माण होऊं लागलीं.

### अद्‌भुतरम्य नाटकें व प्रहसन

मध्यभारतांतील अगदीं पहिलें मराठी नाटक ' टेंपेस्ट ' हें होय. गोडबोल्यांच्या 'वेणीसंहारा' नंतर सुमारें दीड तपानें ह्मणजे सन १८७५ मध्यें इंदूर येथील इंग्रजी मदरेशाचें माजी हेडमास्तर नीळकंठ जनार्दन कीर्तने यांनीं तें लिहून प्रसिद्ध केलें. शेक्सपियरच्या ' टेंपेस्ट ' नाटकाचें हें भाषांतर असून त्यावेळीं प्रस्तुत इंग्रजी नाटक मॅट्रिकच्या अभ्यासक्रमांत ठेविलें गेलें असल्यामुळें विद्यार्थ्यांना तें समजण्यास सुलभ जावें या हेतूनें कीर्तने यांनीं त्याचें हें मराठी भाषांतर तयार केलें होतें. या भाषांतरित नाटकांत मुख्य नाटकाचें नांव व त्यांतील पात्रांचीं नांवें हीं जींच्या तींच कायम ठेवण्यांत येऊन पात्रांच्या तोंडचीं भाषणें व पद्यभाग यांना मात्र मार्मिकतेनें मराठी वळण दिलें गेलेलें आहे.

यानंतर मध्यभारतांत निर्माण झालेलें दुसरें मराठी नाटक म्हटलें म्हणजे इंदूरचे शिवराम रामचंद्र गुप्ते यांचें 'राजशोक' हें होय. हें नाटक सन १८८५ मध्यें प्रसिद्ध झालें असून तें आज अनुपलब्ध आहे; तथापि तें एका इंग्रजी नाटकाचें भाषांतर होतें असें समजतें. पुढें सन १८९८ मध्यें इंदूरचे डिस्ट्रिक्ट व सेशन्स जज्ज आनंदराव सखाराम बर्वे यांचें 'हिंमतबहाद्दर' नाटक बाहेर पडलें. शेक्सपियरच्या 'हॅम्लेट' नाटकाचें हें भाषांतर होय. बाळकृष्ण नारायण देव यांनीं 'विविधज्ञानविस्तारां'तून (ऑगस्ट–सप्टेंबर १९०२) लिहिलेल्या बर्वे यांच्या विस्तृत चरित्रांत म्हटल्याप्रमाणें खरोखरच या नाटकास भाषांतर म्हणण्यापेक्षां रूपांतर म्हणणेंच अधिक युक्त होईल. कारण, मूळ कृतींत जेथें जेथें आंग्ल देशीय दंतकथा, ऐतिहासिक गोष्टींचा निर्देश व इतर संदर्भ आले आहेत तेथें तेथें बर्वे यांनीं आपल्या पुराणांतील व इतिहासांतील समान कथाभाग योजून आणि संदर्भ जोडून पात्रांचीं भाषणें सजविलीं आहेत; परंतु असें करतांना मूळ कृतींतील रसाची, रहस्याची व हृद्गताची यत्किंचित्‌ही हानि होऊं न देण्याची पूर्ण खबरदारीही त्यांनीं घेतलेली आहे. ज्युलियस सीझरच्या जागीं त्यांनीं दु:शासन आणला आहे, अलेक्झांडरच्या ऐवजीं शिवाजी उभा केला आहे आणि गोंझेनो नाटकाच्या ठिकाणीं जामदग्न्यविजय नाटक पुढें केलें आहे. अशा तऱ्हेचे आणखीही पुष्कळ खुबीदार व व मार्मिक प्रकार या नाटकांत ठिकठिकाणीं केलेले आहेत. पात्रांचीं नांवेंदेखील त्यांनीं मूळ इंग्रजींत ज्या अक्षरांनीं आरंभ झालीं आहेत त्याच अक्षरांनीं शीं मराठींत घेतलीं आहेत. जसें हॅम्लेट–हिंमतबहादुर, पोलोनियस–पिलाजी, लेअरटीस–लक्ष्मणराव, आफिलिया–अंबा, मार्सेलस–मिसरलाल, होरेशियस–हरसहाय इत्यादि. याप्रमाणें एकंदरींत बर्वे यांनीं आपलें हें रूपांतरित नाटक आदर्शरूप असें तयार केलें आहे व त्यामुळें मराठींतील जुन्या उत्तमोत्तम नाटकांत तें कायमची मानाची

जागा पटकावून बसलें आहे. या ‘ हिंमतबहादूरा ’ नंतर इंदूरचे एक शिक्षक मोरेश्वर रामचंद्र फाटक यांनीं लिहिलेलें ‘ प्रेमदर्शिका ’ हें स्वतंत्र काल्पनिक नाटक सन १८९७ मध्यें प्रसिद्ध झालें. सदर नाटक आम्हास उपलब्ध झालें नाहीं. पुढें सन १८९९ मध्यें ‘ सटवाई अथवा नटमोगऱ्याची फटफजिती ’ हें अनंत नारायण भागवत यांनीं शेरिडनच्या ‘ ड्यूएना ’ नाटकावरून रचिलेलें नाटक ‘ कादंबरी संग्रह पुस्तकमालें ’ तून प्रसिद्ध झालें. या नाटकाच्या प्रस्तावनेंत भागवतांनीं म्हटलें आहे कीं, “ शेरिडनच्या बहुतेक नाटकाच्या संविधानकांत नायक आणि नायिका यांच्या प्रणयविवाहाचा घोंटाळा आहे कोणी कांहीं खटपट करतों, कोणी कोणाला फसवितों, कोणी दुसऱ्याचें सोंग घेतों, कांहींतरी करतों आणि शेवटीं बायको उपटतो, अशा तऱ्हेचें असतें तशाच तऱ्हेचा लग्नाचा घोंटाळा याही नाटकांत आहे. मूळ नाटक इंग्लिश आहे, असें घेऊन चाललें ह्मणजे मनाचा तितका विरस होणार नाहीं. तीस चाळीस वर्षांमागें आमची इंग्लिश विचाराची पण मराठी पोषाख केलेली सटवाई जर रंगभूमीवर आली असती तर ती लोकांस मुळींच आवडली नसती. परंतु सध्यांची स्थिति तशी नाहीं. सांप्रत ज्या रंगभूमीवर त्राटिकेचा थयथयाट, प्रेमगुंफेची गुंतागुंत वगैरे गोष्टींचा कालमानाप्रमाणें जर कोणी तिरस्कार करीत नाहीं तर, अशा ठिकाणीं सटवाईच्या लपंडावीला कोणी नको ह्मणेल व त्याजमुळें तिला कोणी हिडिसफिडिस करील असें वाटत नाहीं. तीही आपलें थोडेंसें कौशल्य दाखवून सगळयांचा निरोप घेईल. ” भागवतांच्या या ‘ प्रास्ताविक शब्दा ’ वरून त्यांच्या ‘ सटवाई ’ चा सामान्य परिचय वाचकांना सहज होण्यासारखा आहे. पुढें सन १९०० मध्यें ग्वाल्हेर संस्थानाधिपति श्रीमंत माधवराव महाराज शिंदे आलिजाह बहादर यांनीं लिहिलेलें ‘ संगीत चंद्रहास—रूपावती ’ हें स्वतंत्र काल्पनिक नाटक प्रसिद्ध झालें असें ‘ महाराष्ट्रीय वाङ्मयसूची ’ वरून कळून

येतें. तें नाटक आम्हास पहावयास मिळालें नाहीं. यानंतर सन १९१८ मध्यें इंदूरचे गोविंद नत्थो कुडाणेकर यांचें 'आसुरी पिपासा' नाटक बाहेर पडलें. हें नाटक ह्मणजे वामन गोपाळ जोशीकृत 'राक्षसी महत्त्वाकांक्षा' व कृष्णाजी नारायण अस्नोडकरकृत 'अघोर तृष्णा' या दोन नाटकांची संयुक्त विकृतावृत्तीच होय! कुडाणेकरांनीं नाटकाच्या कथानकाची 'काळवेळ' जुनी धरली आहे; पण 'ताळमेळ' मात्र कसलाही धरला नाहीं. त्यामुळें 'आधुनिक पत्ते' खेळण्यासारखे बालिश प्रकारही त्यांत दिसून येतात व त्यावरून "आपल्या लहानपणीं जे खेळ आपण खेळलों तेच खेळ आपल्या मोठेपणीं आपलीं मुलें खेळत असल्याचें पाहून आनंद होतो", असें या नाटकाचे प्रस्तावनाकार 'किरात' (कृष्णाजी लक्ष्मण सोमण) यांनीं ह्मटलें आहे तें अगदीं यथार्थ वाटतें!

वरील नाटकांच्या पंक्तीला बसणारें असें एक प्रहसनही मध्यभारतांत तयार झालेलें आहे. त्याचें नांव 'तेजाच्या शोधार्थ' हें होय. सन १९३४ मध्यें प्रसिद्ध झालेल्या इंदूरच्या अ. श्री. भांडारकर यांच्या 'शिरीषाचीं फुलें' या काव्यसंग्रहांत तें शेवटीं दिलें असून त्याचें स्पष्टीकरणार्थी नांव "एकांकी संविधानकाशिवाय नाटक"! असें ठेविलेलें आहे. लेखकानें हें नाटक मूळ अमेरिकेंतलि 'हार्वर्ड ड्रॅमॅटिक क्लब' साठीं इंग्रजींत लिहिलें व नंतर 'मिस्टिसिझम्', 'सिंबॉलिझम्', 'ॲलिगरी' इत्यादि 'बड्याबड्या गोष्टीं' चा परिचय मराठी वाचकांना व्हावा या सद्धेतूनें प्रेरित होऊन त्याचें हें मराठी भाषांतर मुद्दाम तयार केलें! परंतु हें 'नाटक' वाचून आपणास कांहीं समजलें व आनंद आला असें जो ह्मणूं शकेल तोच रसिक धन्य होय! पौरस्त्य समाजजीवनाविषयीं अमेरिकन लोकांच्या असलेल्या कित्येक जुन्यानव्या चुकीच्या कल्पना 'सन ऑफ इंडिया' सारख्या चित्रपटांत आपणास दिसून येतात तशाच त्या भांडारकरांच्या प्रस्तुत

नाटकांतही मधून मधून डोकावलेल्या नजरेस पडतात. ऋषीचा वर्णिलेला पोषाख व त्याच्या पत्नीनें झोंपडींत जाऊन शिवणकाम घेऊन येणें इत्यादि प्रकार चमत्कारिक नाहींत असें कोण ह्मणूं शकेल? या अशा प्रकारांनीं भारतीय ऋषिकालीन जीवनाबद्दलच्या ज्ञानांत जगद्विख्यात इतिहासपंडित डॉ. सर रामकृष्ण गोपाळ भांडारकरांच्या या नातवानें घातलेली नवीन भर अद्भुत–अपूर्वच ह्मटली पाहिजे!

## पौराणिक नाटकें

आतां आपण मध्यभारतांत निर्माण झालेल्या पौराणिक नाटकांकडे वळूं. ग्वाल्हेरकडील कांहीं जुन्या साहित्यिकांनीं पौराणिक नाटकें पूर्वीं लिहिलीं असल्याचें समजतें; परंतु त्यांतील कांहीं मुद्रणसंस्काराभावीं व कांहीं उपेक्षेमुळें आज नामशेषसुद्धां राहिलीं नाहींत! त्यामुळें तूर्त उपलब्ध असलेल्या नाटकांत कालदृष्ट्या पहिलें पौराणिक नाटक ह्मणून ग्वाल्हेरचे प्रो. बाळकृष्ण रामचंद्र बोकील यांनीं 'नाट्यविनोद मंडळी' करितां सन १९१७ मध्यें लिहिलेलें, 'रुक्मांगद–मोहिनी' हें ठरतें. राजा रुक्मांगदाच्या एकादशी व्रतपरीक्षेची प्रसिद्ध कथा या नाटकांत रंगविली गेली असून त्याबरोबरच पर्यायानें कांहीं सामाजिक प्रश्नांचाही त्यांत विचार करण्याचा प्रयत्न केला गेला आहे. माजी 'मुंबई वैभव' पत्रांतून या नाटकाचें विस्तृत परीक्षण आलें होतें व इतर विद्वानांनींही त्यावेळीं या नाटकाची मुक्तकंठानें प्रशंसा केली होती. पुढें सन १९३२ मध्यें 'वीरधर्मदर्पण' हें दुसरें पौराणिक नाटक प्रसिद्ध झालें. प्रो. परशुराम नारायण पाटणकर यांच्या याच नांवाच्या संस्कृत नाटकाचें हें भाषांतर असून भाषांतरकर्ते इंदूर राज्याचे कस्टम्स कमिश्नर व प्रथितयश कवि नरहर शंकर रहाळकर हे होत. पाटणकरांचें मूळ संस्कृत नाटक डॉ. सर रामकृष्ण गोपाळ भांडारकरांसारख्या विद्वन्मुकुटमणीच्या स्तुतीस पात्र झालें होतें, यावरून त्या नाटकाची खरी योग्यता कळून येण्यासारखी आहे. सन १९३४-३५

च्या इंटरमीजिएट परीक्षेकरितां अजमेर बोर्डानें तें नाटक संस्कृत विषयाच्या अभ्यासक्रमांत नेमिल्यावरून रहाळकरांनीं विद्यार्थ्यांच्या उपयोगासाठीं मुद्दाम त्याचें हें मराठी भाषांतर तयार केलें. भारतीय युद्धामध्यें भीष्माचार्यांच्या पश्चात् कौरवपक्षाचें सेनापतित्व लाभलेल्या द्रोणाचार्यानें चक्रव्यूहाची रचना केली त्यावेळीं महारथि अर्जुन संशप्तकाबरोबर युद्ध करण्यांत गुंतला असल्यामुळें त्याचा पुत्र अभिमन्यु हा त्या चक्रव्यूहाचा भेद करण्यास पुढें सरसावला व हां हां ह्मणतां त्यानें कौरवसेनेचा धुव्वा उडवून दिला, हें पाहून चिडून गेलेले मोठे मोठे कौरववीर त्या बालनरकेसरीवर सर्व बाजूंनीं एकदम तुटून पडले व त्यांनीं रणनीतीला धाब्यावर बसवून त्याचा अगदीं असहाय्य स्थितींत अत्यंत निष्ठुरतेनें वध केला. ही बातमी अर्जुनाला समजतांच त्यानें संक्षुब्ध होऊन अभिमन्यूच्या वधांत पुढाकार घेणाऱ्या जयद्रथाचा शिरच्छेद करण्याची प्रतिज्ञा केली व ती शेवटीं तडीस नेली, हा कथाभाग या नाटकांत देऊन त्यांत वीर व करुण या दोन रसांचा प्रामुख्यानें परिपोष केला आहे. सुप्रसिद्ध नाटककार सदाशिव अनंत शुक्ल यांचें 'सिंहाचा छावा' हें नाटकही याच कथा भागावर उभारलें गेलें आहे व त्या नाटकाचा अधिकांश भाग शुक्लांनीं ग्वाल्हेर येथें असतांनाच लिहिला आहे हें येथें निर्देशिणें अवश्य आहे. पुढें सन १९३३ मध्यें विश्वनाथ चिंतामण बेडेकर यांचे 'ब्रह्मकुमारी' नाटक प्रसिद्ध झालें. हें नाटक बेडेकर यांनीं मुंबईकडे प्रसिद्ध केलें असलें तरी त्याचें संपूर्ण हस्तलिखित त्यांनीं उज्जनीस असतांनाच तयार केलें होतें. देवेंद्राकडून कपटानें भ्रष्ट झालेल्या गौतमपत्नी अहिल्येची करुणकथा या नाटकांत रंगविली असून विषयाच्या उठावाकरितां गुरुपत्नी तारा व चंद्र यांच्यांतील प्रेमाच्या उपकथेची सुंदर जोड तिला दिली आहे. अहिल्या व तारा यांच्यांतील निःसीम मैत्री, गौतम–अहिल्येचे नर्मगर्भ प्रणयसंवाद, विवाहित आयुष्यांत कुचंबलेल्या तारेचें

अतृप्त आकांक्षेचे भेदक पडसाद व तिनें आपल्या अननुरूप पती (बृहस्पती) ला त्याच्यावर आपलें प्रेम नसल्यासंबंधांत स्पष्टपणें दिलेली मर्मांतक परंतु आंतरिक भाव उघड करणारीं उत्तरें, आणि प्रेमालापांत नंदनवन काश्मीरच्या सृष्टिवैभवाचीं गुंफिलेलीं वर्णनें वगैरे गोष्टींनीं हें नाटक बरेंच रसभरित झालें आहे. शिवाय त्यांत काव्यमय भाषेचीही यथोचित भर पडली आहे. अत्यंत प्राचीन कथानकाची मांडणी नवीन पद्धतीनें आकर्षक कशी करतां येतें हें या नाटकावरून उत्तम प्रकारें दिसून येण्यासारखें आहे. रामचंद्र कृष्ण वैद्य ऊर्फ वनवासीकृत 'वेणीसंहार' व नरहर शंकर रहाळकरकृत 'उत्तर रामचरित्' या संस्कृतावरून अनुवादिल्या गेलेल्या व अप्रकाशित राहिलेल्या पौराणिक नाटकांचा नुसता नामनिर्देश येथें करून ठेवणें अप्रस्तुत होणार नाहीं.

### ऐतिहासिक नाटकें

आतां ऐतिहासिक नाटकांकडे वळूं. या विभागांत समाविष्ट होणाऱ्या मध्यभारतीय लेखकांच्या नाटकांत अनंत नारायण भागवत यांना लिहिलेलीं व पुण्याच्या 'कादंबरीसंग्रह–ऐतिहासिक पुस्तकमालें' तून प्रसिद्ध झालेलीं 'पृथ्वीराज–संयोगिता', 'कृष्णाकुमारी' (१९०९) 'माधव–निधन', 'माधव–राज्यारोहण' व 'रावबाजी अथवा महाराष्ट्राचें दुर्दैव' (१९०१) हीं चार नाटकें अग्रभागीं दिसून येतात. या सर्व नाटकांना 'दक्षिणा प्राइझ कमिटी' कडून पारितोषिकें मिळालीं होतीं. भागवतांनीं या नाटकांकरितां घेतलेले इतिहासांतले कथाप्रसंग मुळांत चांगले असले तरी ते त्यांनीं चित्रित करण्यांत दाखविलेलें कौशल्यही निःसंदेह प्रशंसनीय आहे. यांपैकीं शेवटल्या तीन नाटकांत त्यांनीं पानिपतावरील पराजयानंतर पेशवाईला लागलेल्या उतरत्या कळेंत दुही–दुराशामुळें कर्त्या पुरुषांच्या कर्मण्यतेला जडलेल्या अपक्षयाच्या दुःखदायी कथा पुढें मांडल्या आहेत. भागवतांचीं वरील नाटकें 'कादंबरीसंग्रह–ऐतिहासिक पुस्तकमालें' तून प्रसिद्ध होत

असते वेळींच ग्वाल्हेरचे गंगाधर गणेश जोशी यांनीं सन १९०५ मध्यें 'माधव–विजय' नांवाचें एक संगीत ऐतिहासिक नाटक लिहिलें असल्याचें समजतें; परंतु तें नाटक आमच्या पहाण्यांत आलें नसल्यानें त्यांत रंगविलेलें कथानक थोरल्या माधवराव पेशव्यांचें होतें कीं सवाई माधवराव पेशव्यांचें होतें हें सांगतां येत नाहीं. यानंतर सन १९३४ मध्यें ग्वाल्हेरचे माजी सरन्यायाधीश चिंतामण विनायक वैद्य यांचें 'संयोगिता अर्थात् पतिनिष्ठा' हें नाटक प्रसिद्ध झालें. वैद्यांनीं या नाटकाच्या प्रस्तावनेंत त्याचें जन्मवृत्त थोडक्यांत दिलें आहे त्यावरून असें कळतें कीं, सन १८९७ मध्यें देवलांची नाटक मंडळी ग्वाल्हेरला आली असतांना त्या मंडळीचा 'शारदा' नाटकाचा प्रयोग पाहून श्रीमंत माधवराव महाराज शिंदे आलिजाहबहादूर हे अत्यंत प्रसन्न झाले व 'तुम्हींही एखादें नवें नाटक रचावें म्हणजे तें आपण शिमग्याच्या वेळीं रंगभूमीवर आणूं' असा त्यांनीं आपला मनोदय वैद्यांजवळ प्रकट केला. त्यावेळीं वैद्य हे आपल्या 'मध्ययुगीन भारत' या ग्रंथाच्या तयारीसाठीं चंदबरदाईकृत 'पृथ्वीराजरासा' काव्याचा अभ्यास करीत होते, त्यामुळें साहजिकच रात्रंदिवस मनांत घोळणारें पृथ्वीराज–संयोगितेचें चरित्र हाच विषय त्यांना सुचून त्यावर त्यांनीं अल्पावधींत नाटक लिहून काढून तें महाराजांना दाखविलें. महाराजांच्या तें पसंतीस उतरलें व लगेच शिमग्यांत त्याचा प्रयोग करण्याचें निश्चित झालें. त्या प्रयोगांत स्वत: महाराज पृथ्वीराज होणार होते व कवि चंदाची भूमिका वैद्य घेणार होते; परंतु ऐन वेळीं कांहीं कारणामुळें प्रयोग होण्याचें तसेंच राहिलें आणि मग या नाटकाला अनपेक्षितपणें ३५ वर्षांचा दीर्घकालीन अज्ञातवास घडून आला! अस्तु. येणेंप्रमाणें हें नाटक जरी अलीकडे प्रसिद्ध झालें असलें तरी त्याची रचना मात्र जुन्या काळचीच साकी, दिंडी, सूत्रधार, विदूषक आदींनीं मंडित आहे त्यामुळें या नाटकाची त्याच्या जन्मत: समकालीन

असलेल्या नाटकांशीं तुलना केल्यास त्यांत अनेक दृष्टींनीं हें नाटक बऱ्याच वरच्या दर्जाचें ठरेल यांत संदेह नाहीं.

**सामाजिक नाटकें**

ऐतिहासिक नाटकांनंतर सामाजिक नाटकांकडे वळून पहातां, मध्यभारतीय लेखकांनीं लिहिलेल्या सामाजिक नाटकांत प्रो. बाळकृष्ण रामचंद्र बोकील यांनीं सन १९०७ मध्यें एका इंग्रजी नाटकाधारें लिहिलेलें ' कमलिनी ' नाटक हेंच पहिलें नाटक असावें असें दिसतें. या नाटकांत स्त्रियांची बाजू घेऊन कांहीं सामाजिक सुधारणांचे प्रश्न पुढें मांडले होते व ' ग्वाल्हेरकर संगीत मंडळी ' नें सुंदर प्रयोगद्वारें या नाटकाचा लौकिक एके काळीं सर्वत्र पसरविला होता. त्यानंतर सन १९१४ मध्यें जगन्नाथ रावजी टुल्लु यांनीं लिहिलेलें ' विकार-विलास ' हें नाटक प्रसिद्ध झालें. या नाटकांत अनाचार दुष्परिणामाचें चित्र साध्या कथानकांतून सुरेख रीतीनें दाखविलें आहे. टुल्लु हे जुन्या पिढींतील संस्कृत व आंग्ल विद्यासंपन्न पदवीधर विद्वान् असून त्यांनीं आजपर्यंत लहानमोठीं बरींच गद्यपद्य पुस्तकें लिहिलीं आहेत; परंतु दुर्दैवानें त्यांची बूज लोकांकडून व्हावी तशी झालेली नाहीं. ' विकार–विलासा ' शिवाय ' प्रेमळाविजय ' ' प्रेमांजलि ' व ' चंद्रकलंक ' अशीं आणखींही तीन नाटकें त्यांनीं लिहिलीं आहेत; पण तीं अमुद्रित आहेत; तथापि त्यांच्यावरील बाळकृष्ण अनंत भिडे व प्रो. लक्ष्मण गणेशशास्त्री लेले यांच्यासारख्या नामांकित साहित्यमर्मज्ञांच्या जाहिर झालेल्या अनुकूल अभिप्रायांमुळें त्यांचा येथें निर्देश करण्याचा मोह आवरत नाहीं. ' प्रेमळा विजयां ' त प्रौढ विवाह, स्त्रीशिक्षण, देशभक्ति आदि गोष्टींविषयीं प्रेम उत्पन्न करणाऱ्या विविध प्रसंगांनीं कथानकाला मोठी चित्तवेधकता आणली असून ' प्रेमांजलि ' व ' चंद्रकलंक ' यांतील कथानकांनीं जणूं काय सात्विक प्रेमाचे सुंदर पाठच पुढें मांडले आहेत. अस्तु. पुढें सन

१९२७ मध्यें श्रीनिवास विनायक गोरे यांनीं लिहिलेलें ' बनावट सही ' हें नाटक मुंबईच्या ' भारत गौरव ग्रंथमाले ' चें सत्तरावें पुष्प म्हणून प्रसिद्ध झालें. ' न स्त्री स्वातंत्र्यमर्हति ' व बेलगामी स्त्रीस्वातंत्र्य या दोन स्थितींत समाजाला हितकर होईल असा मार्ग कोणता ? या प्रश्नाची चर्चा प्रस्तुत नाटकांत करण्यांत आली आहे. यांतील सुशीला या मुख्य पात्रानें सांप्रत हिंदु समजांत सुशिक्षित स्त्रियांच्या मनोभूमिका कशा प्रकारें तयार होत आहेत हें उत्तम रीतीनें दाखविलें असून विवाहाचा उच्चतम हेतु कोणता, सात्विक आत्महित हें मानवी कर्तव्यांत सर्वश्रेष्ठ कां वगैरे महत्वाच्या गोष्टींचे मार्मिकपणें दिग्दर्शनही त्यांत केलें आहे. यानंतर सन १९२८ मध्यें इंदूरचे प्रो. दत्तात्रेय महादेव बोरगांवकर यांचें ' शांति–स्वरूप ' हें नाटक प्रसिद्ध झालें. ' A Dolls House ' या इब्सनच्या नाटकावरून Problem Drama ची कल्पना उचलून बोरगांवकरांनीं सदर नाटक लिहिलें व तद्द्वारें मराठी नाटकांत आतांपावतों प्रचलित असलेल्या फक्त शोकपर्यवसायी व आनंदपर्यवसायी या दोन प्रकारांत संदेहपर्यवसायी या आणखी तिसऱ्या प्रकाराची नवीन भर घातली याबद्दल ते खरोखर अभिनंदनास पात्र आहेत. डॉक्टर वसंत [ कोंकणस्थ ब्राम्हण ] व मैनाबाई [सारस्वत ब्राम्हण] यांची विद्यार्थीदशेपासून दाट मैत्री असते आणि पुढें वाढत्या वयाबरोबर त्यांच्या मैत्रीचें पर्यवसान एकमेकांवर अनुरक्त होऊन विवाहबद्ध होण्याच्या आकांक्षेंत होतें; परंतु आपल्या त्या विवाहापासून कौटुंबिक शांतीचा भंग होईल हें लक्षांत आणून वसंत, स्वतःच्या वैयक्तिक सुखावर लाथ मारून, आईबापांनीं पसंत केलेल्या वधूचा स्वीकार करावयास तयार होतो व आपली बहीण सरोजिनी हिनें नाकारलेल्या गणपतराव नांवाच्या एका श्रीमान् आय्. सी. एस्. बिजवराशीं लग्न करण्यास मैनावतीला प्रवृत्त करतो असें या नाटकाचें कथानक असून त्यांत अलिकडील सुशिक्षित कुमारिकांची चंचल

वृत्ति, स्वार्थसाधु मित्रांची कपटनीति, जुन्या पिढींतील मंडळीचे लग्नासंबंधींचे परंपरागत विचार वगैरे हिंदु समाजांत अजून सर्वत्र नजरेस येणाऱ्या कित्येक गोष्टी यथार्थ रीतीनें रंगविलेल्या आहेत. कथानकाची मांडणी कलायुक्त, विचारसरणी अभिनव पण तर्कशुद्ध व भाषा आकर्षक यांमुळें हें नाटक उत्कृष्ट झालें आहे. पुढें सन १९३० मध्यें 'स्वातंत्र्याची झुळुक' हें इंदूरचे धैर्यशील बळवंत पोंदे यांचें नाटक प्रसिद्ध झालें. 'न स्त्री स्वातंत्र्यमर्हति' या पुराणोक्त वचनाचाच पुरस्कार या नाटकांत अभिनिवेशपूर्वक केलेला आहे. मीनाक्षी नांवाची एक श्रीमंत कुळांत जन्मलेली सुशिक्षित स्त्री आपल्या माहेरच्या श्रीमंतीचा व स्वतांच्या शिक्षणाचा तोरा मिरवून आपल्या अकिंचन असलेल्या नवऱ्यास कस्पटाप्रमाणें लेखते व निःशंकपणें स्वैर वर्तन करतें. त्यामुळें त्या पतिपत्नींत नेहमीं खटके उडून त्यांचें वैवाहिक जीवन दिवसेंदिवस अधिकाधिक दुःखप्रद होत जातें. शेवटीं मेटाकुटीस आलेला सिंहेश्वर तिला घरांतून घालवून देतो व स्वतांस समाजसेवाकार्यास वाहून घेतो. तत्पूर्वी एकदां मीनाक्षी-वर गांवगुंडांकडून बलात्कार होण्याचा प्रसंग येतो; परंतु मकरेश वकील व त्याची पत्नी तुळजाबाई यांच्या साह्यानें ती त्या प्रसंगांतून निभावते. पुढें मकरेश वकीलाचा पुतण्या मेघनाथ हा तिच्यावर डोळा ठेवून बलात्कार करण्याचा प्रयत्न करतो व त्यांतूनही मकरेश वकील तिची सोडवणूक करतो. अखेरीस मीनाक्षीला आपल्या स्वैरवर्तनाचा अत्यंत पश्चात्ताप होऊन ती आपल्या पतिसन्निध आज्ञाधारकपणानें राहण्याची इच्छा सिंहेश्वराचा मित्र कुंभनाथ याच्याजवळ प्रकट करते तेव्हां कुंभनाथ हा युक्तीनें एका असहाय्य अबलेला तिच्या अपेक्षेप्रमाणें मदत करण्याचें सिंहेश्वराकडून अगोदर वचन घेऊन मग मीनाक्षीला त्याच्यां स्वाधीन करतो. याप्रमाणें सदर नाटकाचें सुखांत कथानक असून त्याची मांडणी सर्वदृष्ट्या सुंदर करण्याचा प्रयत्न पोंदे यांनीं

कसोशीनें केला आहे व तो बऱ्याच अंशीं सिद्धीसही पण गेला आहे. सन १९२७ मध्यें पुण्याहून प्रसिद्ध झालेल्या सदाशिव अनंत शुक्ल यांच्या 'सौभाग्य लक्ष्मी' या प्रसिद्ध सामाजिक नाटकाची रचना ग्वाल्हेर येथें झाली असून 'म्हातारपणचे डोहाळे' हें अप्रकाशित असलेलें परंतु रंगभूमीवर एकदां गाजलेलें अत्यंत विनोदी सामाजिक नाटकही आठवले यांच्या हातून तेथेंच तयार झालेलें आहे त्यामुळें या दोन्ही नाटकांचा येथें निर्देश करणें अवश्य आहे व त्याबरोबरच मोलियरच्या एका नाटकाचें रूपांतर केलेलें भास्कर रामचंद्र तांबेकृत 'भयंकर प्रमाद' व नरहर शंकर रहाळकरकृत 'मानाजीराव' या दोन्ही अप्रकाशित नाटकांचाही पण येथें उल्लेख करून ठेवणें जरूर आहे.

### बाल नाट्यवाङ्मय (नाटकें व प्रहसनें)

आतां मध्यभारतांत लिहिल्या गेलेल्या बालोपयोगी नाटकांकडे व प्रहसनांकडे वळूं. अशीं नाटकें व प्रहसनें इकडे लिहिण्यास सुरुवात वासुदेव गोविंद आपटे यांच्या प्रोत्साहनानें अनंत नारायण भागवत यांनीं प्रथम केली असल्याचें दिसून येतें. 'तेजोत्कर्ष' व 'तेजोभंग' हीं दोन नाटकें भागवतांनीं लिहिल्यानंतर स्वतः आपट्यांनीं त्या विषयाकडे वळून 'नाट्य रामायण' व 'नाट्य भारत' हीं दोन नाटकें लिहिलीं आणि 'नाट्यरूप भारतवर्ष' हा प्रहसनसंग्रह तयार केला. उपर्युक्त पांच पुस्तकांपैकीं पहिलें आणि शेवटलें पुस्तक इतिहासावरून आणि मधलीं तीन पुस्तकें महाभारत व रामायण यांवरून रचिलीं गेलीं आहेत. 'तेजोत्कर्ष नाटका'स दक्षिणा प्राइझ कमिटीकडून बक्षिस मिळालें होतें; परंतु तें नाटक आम्हास उपलब्ध न झाल्यानें त्याच्या संबंधांत येथें कांहींच लिहितां येत नाहीं. 'तेजोभंग' नाटक सन १९०८ मध्यें प्रसिद्ध झालें व त्याची द्वितीयावृत्ति सन १९१८ मध्यें निघाली. यांतील कथानक स्त्रीपात्रविरहित असून त्याची

उभारणी भागवतांनीं महाभारतांतर्गत कर्णपर्वांतील एका चटकदार प्रसंगावर केली आहे. यांत वीररस प्रधान आहे व त्याबरोबर वत्सल आणि हास्य या दोन रसांचा परिपोष प्रसंगानुसार केला गेला आहे. 'नाट्य रामायण' आणि 'नाट्य भारत' या पुस्तकांची रचना वासुदेव गोविंद आपटे यांनीं इंदुरास 'मल्हारि–मार्तंड–विजय' साप्ताहिकाचे संपादक असतांना करून तीं 'होळकर सरकार ग्रंथमालें'तून अनुक्रमें पहिलें व दुसरें पुस्तक म्हणून सन १९१८ मध्यें प्रसिद्ध केलीं आहेत. यांत त्यांनीं रामायण व महाभारत या ग्रंथांतील कांहीं ठळक बोधप्रद प्रसंग घेऊन ते प्रवेशरूपानें वर्णिले आहेत. या पुस्तकांनंतर लागलीच दुसऱ्या वर्षीं म्हणजे सन १९१९ मध्यें 'नाट्य-रूप भारतवर्ष' हें पुस्तक प्रसिद्ध झालें. बौद्ध कालापासून तों पेशवाई-अखेर सुमारें अडीच हजार वर्षांच्या कालांतील एकंदर सत्तावीस प्रसंग भारतीय इतिहासांतून निवडून त्यांवर लिहिलेलीं लघु प्रहसनें यांत संकलित केलीं आहेत. गोड, सरळ भाषा आणि मनोवेधक प्रसंग यांमुळें आपटे यांचीं वरील तिन्हीं पुस्तकें मुलांना अत्यंत प्रिय होऊन त्यांचे प्रयोग एके काळीं ठिकठिकाणच्या मराठी शाळांतून संमेलना-सारख्या प्रसंगीं वेळोवेळीं होत असत. पुढें राजाराम दौलत गडकरी यांचीं 'शरयू–शिवाजी' व 'भक्तिवात्सल्य' हीं अनुक्रमें ऐतिहासिक व पौराणिक नाटकें प्रसिद्ध झालीं. वरील नाटकांप्रमाणें हींही नाटकें मुलांना प्रिय होण्याजोगीं आहेत. नंतर दामोदर बळवंत दांडेकर यांनीं इंदूरच्या अहिल्योत्सवांत शाळांतील मुलांमुलींकरितां प्रयोगासाठीं म्हणून लिहिलेलीं 'अहिल्येचा रणरंग अथवा राघोबा दादा पेशव्यांची स्वारी' व 'अहिल्या–संदेश' हीं दोन प्रहसनें अनुक्रमें सन १९३४ व १९३६ मध्यें प्रसिद्ध झालीं. यांतील पहिल्या प्रहसनांत चंद्रचूडाच्या कारस्थानाप्रमाणें होळकरांची दौलत बळकाविण्याच्या हेतूनें राघोबा-दादांनीं अहिल्याबाईवर स्वारी करण्याचा बेत करणें व शेवटीं

अहिल्याबाईच्या तेजस्वितेपुढें दिपून जाऊन ओशाळे झालेल्या त्या दोघांही पुरुषांनीं कृतकर्माबद्दल त्या देवीसमोर पश्चात्ताप प्रकट करणें हा प्रसंग रंगविला असून दुसऱ्या प्रहसनांत अद्भुतरम्य कथाप्रसंगाची पार्श्वभूमि घेऊन त्यावर अहिल्याबाईच्या अलोट दानधर्माविषयीं व पेशवाईतल्या राजकारणापासून अलिप्त रहाण्याविषयीं इतिहासकारांकडून घेण्यांत येणाऱ्या आक्षेपांना उत्तरें देणारीं पात्रें उभीं केलीं आहेत व त्याबरोबरच अहिल्याबाईचे राजनीतिविषयक दूरदर्शीपणाचे विचार प्रकट करण्याकरितां त्यांना शिवलोकांतून कल्पनासृष्टींत उतरवून त्यांच्याकडून चालू राजकारणाच्या सद्यःस्थितीचें स्वरूप आणि पौराणिक काळच्या साम्राज्यशाहीचें स्वरूप हीं दोन्हीं सोदाहरण विदित करविलीं आहेत व शेवटीं शेवटीं ओघानें प्रचलित सामाजिक विषयांचाही परामर्ष घेवविला आहे. एकंदरींत दांडेकरांचीं हीं दोन्हीं प्रहसनें उत्तम वठलीं आहेत. 'अहिल्या–संदेशा' पूर्वी सन १९३५ मध्यें प्रसिद्ध झालेलें महूचे सराफ यांचें 'हास्यरस' हें प्रहसनही येथें उल्लेखनीय आहे. मात्र त्यांत नांवाप्रमाणें हास्याशिवाय दुसरा कोणताच रस सांठविलेला नाहीं. व कांहीं विशिष्ट विषयही प्रतिपादन केलेला नाहीं.

### नाट्यविषयक अवांतर वाङ्मय

आतां मध्यभारतांत जें नाट्यविषयक अवांतर वाङ्मय निर्माण झालें त्याकडे वळून हें प्रकरण संपवूं. अशा अवांतर वाङ्मयांत बळवंतराव कमळाकर माकोडे यांचें 'रूपक प्रबोध अथवा नाट्य-लक्षणमाला', प्रो. परशुराम नारायण पाटणकर यांचें 'भारतीय नाट्य-शास्त्रासंबंधीं सुचलेले विचार' व सदाशिव बापूजी कुळकर्णी यांचें 'नाट्यमार्ग' या समाविष्ट होणाऱ्या तीन पुस्तकांचा परिचय मागें 'भाषा व साहित्यविषयक वाङ्मय' या प्रकरणांत करून देण्यांत आलाच आहे. त्याशिवाय इतर पुस्तकें ह्मटलीं ह्मणजे उज्जनीचे

माधवराव व्यंकटेश लेले यांनीं मुंबईच्या ‘ विविधज्ञानविस्तार ’ मासिकांतून संस्कृत नाटकांवर स्वतंत्रपणें प्रसिद्ध केलेले ‘ सार व विचार ’ नामक उत्कृष्ट प्रबंध, तसेंच प्रो. वामन गोपाळ ऊर्ध्वरेषे यांचा भासकृत ‘ स्वप्नवासवदत्त ’ नाटकावरील आणि नरहर शंकर रहाळकर यांचा कालिदासकृत ‘ शाकुंतल ’ नाटकावरील टीका-प्रबंध व इंदूरचे विनायकराव जोशी यांनीं लिहिलेलें ‘ किर्लोस्करकृत संगीत नाटकांचे प्रयोग आणि त्यावर चार शब्द ’ हीं होत. लेले यांचे ‘ सार व विचार ’ प्रबंध ‘ मालती माधव ’ ( १९०० ), ‘ श्रीमहावीर चरित् ’, ‘ उत्तर रामचरित् ’, ‘ मुद्राराक्षस’ (१९०३), ‘मृच्छटिक’, ‘मालविकाग्निमित्र’, ‘ शाकुंतल ’ ( १९०५ ) , ‘ विक्रमोर्वशीय ’ व ‘ वेणीसंहार’ (१९०७) अशा नऊ प्रमुख संस्कृत नाटकांवर असून ते त्यांनीं अत्यंत व्यासंगपूर्वक विस्तृत असे लिहिलेले आहेत. वास्तविक ‘ सार व विचार ’ असें दुहेरी नांव जरी या प्रबंधांना दिलें गेलें आहे तरी त्यांत सार मात्र अधिक असून विचार अगदीं तुरळक आहेत; तथापि हें प्रबंध ह्मणजे मराठी नाट्यविषयक लेखनांत एक नवीन उपक्रम आहे व तो बराच यशस्वी झाला आहे. प्रो. ऊर्ध्वरेषे यांचा ‘ स्वप्नवासवदत्ता ’ वरील टीका–प्रबंध मुख्यतः कॉलेजमधील विद्यार्थ्यांकरितां सन १९२९ मध्यें लिहिला गेला आहे आणि तो अपक्षेप्रमाणें सुबोध व माहितीपूर्ण असा झाला आहे. रहाळकरांच्या ‘ शाकुंतला ’ वरील टीका–प्रबंधाचे नांव शाकुंतल–सौंदर्य हें होय. हा प्रबंध अगदीं अलीकडे सन १९३६ मध्यें प्रसिद्ध झाला आहे. शाकुंतलाचें सौंदर्य–समीक्षण या मुख्य उद्दिष्टाबरोबर त्या नाटकाचें सर्वांगीण परीक्षण व कालिदासाच्या अंगच्या साहित्यिक गुणांचें निरीक्षण याही गोष्टी रहाळकरानीं मोठ्या मार्मिकतेनें रसिकतेनें व विद्वत्तेतें यांत साधिल्या आहेत. विनायकराव जोशी यांचें किर्लोस्कर संगीत नाटकांच्या प्रयोगावरील पुस्तक सन १८८५ मध्यें प्रसिद्ध झालें आहे. श्रीमंत शिवाजीराव

होळकरांच्या राजवटींत इंदुरास 'किर्लोस्कर नाटक मंडळी' आली असतांना तिच्या तेथील रंगभूमीवर जीं नाटकें झालीं त्या सर्व नाटकांच्या प्रयोगांचें परीक्षण करण्याचा जोशी यांचा हेतु होता असें या पुस्तकाच्या नांवावरून दिसून येतें; परंतु या पुस्तकांत फक्त 'शाकुंतल' नाटकाच्याच प्रयोगाची गुणदोषचर्चा केलेली आहे. कदाचित् अशा प्रकारें प्रत्येक नाटकाच्या प्रयोगाची गुणदोषचर्चा स्वतंत्र पुस्तक रूपानें प्रसिद्ध करण्याचा त्यांचा मानस असल्यास न कळे. मात्र एवढें खरें कीं त्यांचा तसा मानस या पुस्तकांत कोठेंही दिग्दर्शित झालेला नाहीं.

## प्रकरण चौथें

# काव्यें व काव्यविषयक वाङ्मय

ते धन्यास्ते महात्मानस्तेषां लोके स्थिरं यशः ।
यैर्निबद्धानि काव्यानि ये वा काव्ये प्रशंसिताः ॥

### काव्य वाङ्मयाचें पूर्वकथन

प्रत्यक्ष काव्य रचणारे अथवा काव्यांत ज्यांची प्रशंसा केलेली आहे ते महात्मे धन्य व स्थिरकीर्ति होत ह्मणून जें वर्णन वरील कवितेंत करण्यांत आलें आहे तें अयथार्थ आहे असें कोण ह्मणूं शकेल ! व्युत्पन्न साहित्यिकांनीं काव्याला ललित वाङ्मयाचें प्रधान अंग कल्पून त्याची महती नाना परींनीं गाइली आहे. त्यांत ' साहित्यदर्पण '-कारानें " चतुर्वर्गफलप्राप्तिः काव्यादेव प्रवर्तते " ह्मणजे धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष या चाऱ्ही पुरुषार्थांची फलप्राप्ति काव्यापासून होते असें घोषित केलें असून राजर्षि भर्तृहरीनें तर ' सुकविता यद्यस्ति राज्येन किम्" ह्मणून जगांतलें ऐश्वर्य, प्रभुत्व व सुख यांचें केवळ आगर समजलें जाणारें राज्यही कवितेपुढें कःपदार्थ गणिलें आहे ! यानंतर राष्ट्रगुरु समर्थांनीं त्याच्याही पलीकडे जाऊन ' नसतां कवींचा

व्यापार। तरी कैंचा असता जगदुध्दार। ह्मणोनी कवी हे आधार। सकल सृष्टीसी ॥" या उद्गारांनीं कविकर्तृत्व पूर्ण पराकोटींतलें ठरवून टाकिलें आहे! आपल्या आर्यावर्तात कवितेचा जन्म वाङ्मयाच्या उत्पत्तीबरोबरच झालेला आहे, किंबहुना वाङ्मय ह्मणजेच काव्य अशा कल्पनेनें वेद, ब्राह्मणें, उपनिषदें व सूत्रें या आदिवाङ्मयाचें प्रणयन छंदोबद्ध करण्यांत आलें आहे; तथापि यथार्थतेनें 'काव्य' संज्ञा-पावलेला पहिला आर्य ग्रंथ ह्मटला ह्मणजे महर्षि वाल्मीकिप्रणीत 'रामायण' हा होय. संस्कृत वाङ्मयाचा अधिकांश भाग पद्यबद्धच आहे. कालिदास, भारवि, माघ, धनपाल यांसारखे मोठमोठे संस्कृत कवि साहित्याकाशांत आपल्या अद्वितीय प्रतिभाद्युतीनें चमकून गेले व त्यांनीं निर्माण केलेलीं काव्यें जगद्विश्रुत, जगच्चित्ताकर्षक व जगन्मान्य होऊन अजरामर झालीं. मराठीचेंही आदिवाङ्मय प्रायः पद्यबद्धच निपजलें. मुकुंदराय व ज्ञानेश्वर हे मराठीचे आद्यकवि मानले जातात आणि त्यांच्या कालापासून तों आजमितीपावेतों निर्माण झालेल्या कवितेचें 'प्राचीन' व 'अर्वाचीन' असे दोन भेद करण्यांत येतात. आंग्ल-सत्तेच्या प्रतिष्ठापनेच्या काळापर्यंतची कविता 'प्राचीन' सदराखालीं जाते व त्यानंतरची कविता 'अर्वाचीन' सदराखालीं मोडते. प्राचीन कवितेचेही पुनः तीन पोटभेद पाडण्यांत येतात. हे तीन पोटभेद ह्मणजे संत कवींची कविता, पंडित कवींची कविता व शाहिरांची कविता हे होत. मुकुंदराय, ज्ञानेश्वरापासून तों रामदास, तुकारामापर्यंत संत कवींचा काळ चमकला. या संत कवींनीं अध्यात्मभावानें भरलेली व भक्तिरसानें ओथंबलेली विपुल काव्यरचना केली. पुढें मराठी स्वराज्याच्या कोंबडसादीबरोबर पंडित कवींचा अरुणोदय होऊन पेशवाईच्या अस्तमानापर्यंत त्यांची सद्दी राहिली. या कवींनीं प्रायः रामायण, महाभारत व भागवत या संस्कृत ग्रंथांवरून आख्यानपर काव्यें रचण्याचें एकजात कार्य मोठ्या अहमहमिकेनें केलें. त्यामुळें त्यांच्यांतील

कित्येकांना त्याच त्याच कथाभागांवर पुनः पुन: काव्यें करण्याचा प्रसंग येऊन त्यांच्या एकंदर कवितेला कायम ठशाचें रूप प्राप्त झालें! वास्तविक या पंडित कविमंडळांत मुक्तेश्वर, वामन पंडित, मोरोपत, रघुनाथ पंडित यांसारखे संत कवींपेक्षां अधिक व्युत्पन्न व अधिक प्रतिभासंपन्न कवि झाले आणि त्यांनीं आपल्या कवितेला प्रसाद, वृत्तें, रस, अलंकार आदि विविध प्रकारांनीं उत्तम रीतीनें सजविलें; परंतु तिच्या अंतरंगांत होत असलेल्या पिष्टपेषणाची मात्र कधींच दरकार बाळगिली नाहीं! वरील पंडित कवींबरोबरच शाहिरांनाही पुढें यावयास बराच वाव मिळाला व अव्वल इंग्रजी अमदानीपावेतों त्यांचा चालता काळ राहिला. पूर्वजांचे प्रखर पराक्रम, अलोट ऐश्वर्य, निःसीम देशाभिमान, उज्ज्वल राजनिष्ठा, रोमहर्षण युद्धप्रसंग आणि महत्त्वाच्या राजकीय घडामोडी यांचें रसभरित वर्णन करून जनतेचें सुप्त अंतःकरण जागृत करण्याची व त्यांच्या मदिरून गेलेल्या महत्त्वाकांक्षांचें उद्दीपन करण्याची जी कामगिरी राजस्थानांत भाटचारणांनीं केली तीच कामगिरी या शाहिरांनीं महाराष्ट्रांत केली. छत्रपति शिवाजी महाराजांच्या दरबारीं चमकलेले रामाजी, अज्ञानदास व तुळशीदास हे आद्य शाहीर होत. त्यांनीं जानपद भाषेंत ओजस्वी पोवाडे रचून त्यांत ऐतिहासिक प्रसंगद्वारें महाराष्ट्राचें अंतःकरण, महाराष्ट्राच्या भावना, महाराष्ट्राचें कर्तृत्व व महाराष्ट्राच्या आकांक्षा यथावत् चित्रित केल्या. थोरल्या माधवराव पेशव्यांच्या राजवटीपावेतों या शाहिरांनीं मराठ्यांच्या मर्दुमकीचे पोवाडे पुष्कळच गाइले; परंतु त्यानंतरच्या काळांत मराठ्यांच्या अंगचें शौर्याचें पाणी उतरत जाऊन जसजसे ते लोक भोगविलासाला अधिकाधिक लालचावूं लागले तसतसे त्यांना खुष राखण्याच्या हेतूनें या शाहिरांनींही आपल्या रसवंतीला शृंगार रसाच्या लावण्या रचण्याकडे वळविलें. रावबाजींच्या राजवटींत तर या लावण्यांचा जणुं काय वसंतऋतूच फुलला! परंतु पुढें लौकरच

झालेल्या इंग्रजी सत्तेच्या अशनिपातानें व ग्राम्यतेमुळें अगोदरपासून शिष्टवर्गानें केलेल्या उपेक्षेनें या लावण्यांची निपज एकदम कमी पडून त्यांचा पाहतांपाहतां लोपही होऊन गेला आणि त्याबरोबर एकंदरींत 'प्राचीन' कवितेची 'इतिश्री' झाली. नंतर कांहीं कालपावेतों महाराष्ट्रांत कवित्व–गुणाची अवहेलना झाल्यावर एकीकडून पढिक शास्त्री मंडळीनें संस्कृत साहित्याच्या साह्यानें व दुसरीकडून आंग्लविद्या संपादिलेल्या विद्वान् मंडळीनें पाश्चात्य साहित्याच्या साह्यानें मराठी कवितेच्या पुनरुद्धाराचें कार्य हातीं घेतलें. कृष्णशास्त्री राजवाडे, कृष्णशास्त्री चिपळूणकर, परशुराम बल्लाळ गोडबोले, गणेश सदाशिवशास्त्री लेले वगैरे मंडळी पहिल्या बाजूस होती व बजाबा रामचंद्र प्रधान, विष्णु मोरेश्वर महाजनी, डॉ. कान्होबा रणछोडदास कीर्तिकर, पुरुषोत्तम बाळकृष्ण जोशी, गोविंद वासुदेव कानिटकर वगैरे मंडळी दुसऱ्या बाजूस होती. या सर्व कवींनीं संस्कृत आणि इंग्रजी वाङ्मयातील उत्तमोत्तम काव्यें व स्फुट कविता यांचीं उत्कृष्ट भाषांतरें व रूपांतरें केलीं. त्यांच्या बरोबरीनें महादेव मोरेश्वर कुंटे आणि गंगाधर रामचंद्र मोगरे यांनींही हळुहळू पुढें येऊन मराठी कवितेला स्वतंत्रतेच्या क्षेत्राकडे नेण्याचे यथाशक्ति प्रयत्न केले. या त्यांच्या प्रयत्नांनीं भावी अर्वाचीन ऊर्फ आधुनिक मराठी कवितामंदिराची चर तयार होऊन त्यावर लौकरच पाया उभारण्याचें काम रे. नारायण वामन टिळक व कृष्णाजी केशव दामले ऊर्फ केशवसुत या दोघांनीं मिळून केलें. मनाच्या स्वभावजात स्वैरंचर शक्तीला दडपून टाकणाऱ्या कूपमंडुक वृत्तीस त्यांनीं जलांजुलि देऊन कवितेला जुन्या कल्पना, जुने संप्रदाय, जुने वृत्तबंध यांच्या संकुचित सीमारेषा ओलांडावयास लाविलें व विश्वाच्या अफाट अंगणांत त्रैगुण्योद्भव लोकचरिताशीं समरस होऊन भावनास्फूर्त (भाव) गीतस्वरूप धारण करण्यास तिला उद्युक्त केलें! या कवीश्वरांची ही कामगिरी अल्पावधींत

लोकादरास पात्र ठरल्यामुळें त्यांनीं दिलेल्या स्वरूपांतच मराठी कविता तेव्हांपासून आजपावेतों लीला–विलास करीत आलेली आहे व त्या लीला–विलासांतच तिनें सुनीत, वैणिक, नाट्यगीत, उपहासपर, विडंबनात्मक आदि पाश्चात्य कवितेचे विविध प्रकारही हळूहळूं आत्मसात् केलेले आहेत. आमच्या मध्यभारतांतील मराठी कवितेच्या स्वरूपांतही याप्रमाणेंच वेळोवेळीं परिवर्तनें झालेलीं आहेत.

## मध्यभारतांतील काव्यारंभ

मध्यभारतांतील ' प्राचीन ' मराठी कवितेचा त्रोटक वृत्तांत मागें ' पूर्वपीठिके ' त दिलाच आहे. त्या कवितेंत महाराष्ट्रांतल्या तत्कालीन कवितेप्रमाणें पांडित्य व राष्ट्राभिमान हे मधले गुण परिस्थित्यनुसार चांगले उतरूं शकले नसेल तरी भक्तिमत्व व शृंगार हे आदि-अंतांतले गुण मात्र उत्कटत्वानें उतरले होते. नवोदित आंग्ल–सत्तेबरोबर महाराष्ट्र परतंत्र झाला व त्याचे भोगविलास संपले, त्याबरोबर त्याच्या कवितेंतला राष्ट्राभिमान गारठला व शृंगार रस आटला; परंतु भक्तिमत्व व पांडित्य हे गुण थोड्याफार प्रमाणांत तसेच स्थिर राहून त्या दोन गुणांवरच त्याची कविता ' अर्वाचीन ' क्षेत्रांत पाऊल टाकी-पर्यंत रसिकांना रिझवित राहिली. मध्यभारतीय मराठी कवितेनेंही असाच रसिकांना रिझविण्याचा यथाशक्ति प्रयत्न केला. सन १८६९ मध्यें महादेव मोरेश्वर कुंटे यांचें ' राजा शिवाजी ' हें स्वतंत्र काव्य प्रसिद्ध झालें व त्याबरोबर महाराष्ट्रांतील ' अर्वाचीन ' कवितेचा अरुणोदय सूचित झाला. त्याच्या केवळ चारच वर्षांनंतर ह्मणजे सन १८७३ मध्यें इंदूरचे बाळकृष्ण मल्हार हंस ( बीडकर ) यांनीं ' भागीरथी ' नामक स्वतंत्र काव्य प्रसिद्ध करून मध्यभारतांतील ' अर्वाचीन ' कवितेचाही अरुणोदय सूचित केला. हंसांचें हें काव्य गंगावर्णनपर असून तें उत्कृष्ट आहे. याच विषयावर महाराष्ट्रांतही श्रीमंत बापूसाहेब कुरुंदवाडकरांचें ' गंगावर्णन ' आणि चिंतामणि-

पेठकरांची ‘ गंगावर्णना ’ हीं दोन काव्यें प्रसिद्ध आहेत. त्यांच्याकडे तौलनिक दृष्टीनें पाहिलें तर पहिल्यांतील वर्णनात्मक धार्मिक दृष्टि दुसऱ्यांत दिसून येत नाहीं व दुसऱ्यांतील भावनेचा उज्ज्वलता पहिल्यांत आढळून येत नाहीं; परंतु त्या दोहोंचा समन्वय हंसांच्या ‘ भागीरथीं ’त मात्र उत्तम प्रकारें पहावयास मिळतो ! या ‘ भागीरथी ’ नंतर दुसऱ्याच वर्षी (सन १८७४) ग्वाल्हेरचे केशव वासुदेव बापट गंगाजळीवाले यांचें ‘ रासपंचाध्यायी ’ काव्य बाहेर पडलें. भागवताच्या दशम स्कंधावरून सदर काव्याची रचना करण्यांत आलेली आहे. यानंतर मध्यभारतांत झपाट्यानें काव्यनिर्मिति होऊं लागली. ती निर्मिति बहुविध व बहुसंख्य असल्यामुळें तिचा परिचय आतां विषयवार संक्षेपानें करून देऊं.

## स्तुति–भक्तिपर व पौराणिक काव्यें

प्रथम स्तुति–भक्तिपर व इतर पौराणिक काव्यांकडे वळलें तर त्यांतील पहिल्या शाखेंत गणपति, शंकर, अंबिका, दत्त व विष्णु या प्रमुख पंच देवदेवतांसंबंधांत मध्यभारतीय श्रद्धाळु कवींनीं लहानमोठीं मिळून सुमारें २५ काव्यें निर्मिलेलीं आढळतात. त्यांत गणपतीसंबंधाचें मात्र ‘ श्रीगणेश पंचपदी ’ हें उज्जयिनीचे धुंडीराज कृष्ण अष्टेवाले यांचें अलीकडे प्रसिद्ध झालेलें एकच काव्य दिसून येतें. हें काव्य म्हणजे अष्टेवाले यांनीं स्वतः गुंफिलेल्या ‘ सत्सेवासुममाला ’ नामक हिंदी–मराठी मिश्रित लघु काव्यमालेंतलें २७ वें सुमन होय. शंकरा-संबंधाचीं मात्र तीन काव्यें उपलब्ध आहेत. त्यांपैकीं पहिलें ‘ शिव-प्रार्थना शतक ’ हें इंदूरचे अंधकवि केशव गणेश ऊर्फ आप्पाशास्त्री गोळे यांनीं सन १८८३ मध्यें रचिलेलें असून त्यांत ‘एकादश नवकां’ त म्हणजे नऊनऊ निरनिराळ्या वृत्तांतील श्लोकांच्या अकरा प्रकरणांत शंकराची भक्तिभावानें आळवणी केलेली आहे. दुसरें ‘ शिवस्तुति ’ हें काव्य इंदूरचे आत्माराम बाळकृष्ण रणदिवे यांनीं रावबहादुर

नानकचंद हे इंदुरास कारभारी असतांना तयार केलेलें आहे. हें सबंध काव्य आर्या वृत्तांत असून कवीनें प्रत्येक आर्येच्या आद्याक्षरानें 'शिवपदीं लीन रायबहादुर नानकचंदजी सी. आय्. ई. कारभारी साहेब संस्थान इंदूर यांस चिरायु ठेव ' हें वाक्य पूर्ण कलें आहे. तिसरें ' अमरेश्वर स्तवन ' हें काव्य हरसोला [ इंदूर राज्य ] येथील अमरेश्वर महादेवाच्या नित्योपासनेसाठीं तेथील माजी शिक्षक गंगाधर सीताराम अभंग ( अतीतकर ) यांनीं सन १९०८ रचिलें आहे. अंबिकेचें आराधनपरही एकच काव्य आहे व तें सन १८८४ मध्यें इंदूरचे महादेव दाजी खांडेकर यांनीं ' अंबिका चौसष्टी ' या नांवानें तयार केलं आहे. याच्या प्रस्तावनेंत खांडेकर लिहितातः—"( या रचनेस ) मद्देशबांधव लक्ष देऊन मदत देतील तर लक्षांचें उपयुक्त अलक्ष न करतां दक्षतेनें पक्षपात वर्जून मी कांहीं कविता तयार करीत आहे त्यास उमेद जास्त येईल." परंतु खांडेकरांच्या या विनंतीचा आदर त्यांच्या किती देशबांधवांकडून झाला व त्यावरून पुढें त्यांच्या हातून किती काव्यनिर्मिति झाली याचा पत्ता लागत नाहीं ! मात्र या ' अंबिका चौसष्टी ' वरून त्यांच्या ठायीं काव्यरचनाकौशल्यापेक्षां काव्यरचनेची हौसच अधिक वास करीत होती असें दिसून येतें ! दत्तासंबंधांत ग्वाल्हेरचे अनंतशास्त्री द्राविड यांचें 'श्रीदत्तालंकारमुक्तावलि' व कृष्णाजी गंगाधर कवचाळे यांचें ' श्रीदत्तपदामृत पंचपदी ' हीं दोन काव्यें आढळतात. यांपैकीं दुसरें काव्य देवासच्या ' बालदत्त समाजा ' च्या विद्यमानें सन १९१८ मध्यें प्रसिद्ध झालें आहे. श्रीगुरुचरित्र या प्रासादिक ग्रंथाची ब्रम्हीभूत श्रीवासुदेवानंदसरस्वती टेंभे स्वामीमहाराज यांनीं 'सप्तशती गुरुचरित्रसार' नांवानें तयार केलेली संक्षिप्तावृत्ति सन १९३४ मध्यें इंदूरचे भास्कर गणेश विभूते यांनीं प्रसिद्ध केली आहे तिचाही येथें उल्लेख करणें अवश्य आहे. विष्णूचे अवतार मानल्या जाणाऱ्या व्यंकटेश, कृष्णादि देवांच्या स्तुत्यर्थही

कांहीं काव्यें इकडे रचिलीं गेलीं आहेत, त्यापैकीं देवीदासकृत ‘ श्री व्यंकटेशस्तोत्र ’ धारचे कृष्णराव बापूजी लेले यांनीं पद्यबद्ध-स्वरूपांत (?) सन १८८५ मध्यें प्रसिद्ध केलें आहे. यानंतर त्याच्या चौथ्या वर्षीं म्हणजे १८८९ मध्यें प्रो. परशुराम नारायण पाटणकर ऊर्फ चेतोहर यांनीं जयदेवकृत ‘ गीतगोविंदाचें समवृत्ती भाषांतर ’ तयार केलें आहे. हें भाषांतर साद्यंत गोड झालें आहे; परंतु त्यांतल्या त्यांत “दीन तुझ्या विरहीं तीं” इत्यादि दोनतीन गीतें तर अतिशयच बहारीचीं उतरलीं आहेत. हेंच ‘ गीत–गोविंद ’ नांव देऊन एक स्वतंत्र लघुकाव्य कृष्णाजी गंगाधर कवचाळे यांनीं सन १९२० मध्यें प्रसिद्ध केलें आहे व त्यांत श्रीकृष्णाचें चरित्र साररूपानें वर्णिलें आहे. श्रीकृष्णाच्या लीलांवरही ‘ श्रीकृष्णलीलामृत ’ व ‘ श्रीकृष्ण लीला ’ नामक दोन काव्यें रचिलीं गेलीं आहेत. ‘श्रीकृष्ण-लीलामृत ’ हें ग्वाल्हेरचे श्रीमंत बळवंतराव भैयासाहेब शिंदे यांचें काव्य असून तें त्यांच्या प्रतिभासंपन्न भक्तकवि या लौकिकास सर्वथा साजेसें उतरलें आहे. दुसरें ‘ श्रीकृष्णलीला ’ हें इंदूरचे सीताराम विष्णु सरवटे यांनीं सन १९२८ मध्यें प्रसिद्ध केलें आहे. सरवट्यांची प्रस्तुत रचना विविधवृत्तात्मक असून मोठी गोड व निर्दोष असली तरी ‘ जरि फिदा वृषभानुसुतेवरी ’ या चरणांतील ‘ फिदा ’ या एकमात्र उर्दू शब्दानें त्या सबंध काव्याच्या एकंदर स्वरूपाला निष्कारण गालबोट लागलें आहे ! श्रीकृष्णाच्या विवाहावरही ‘श्री रुक्मीणी-विवाह गीत’ नांवाचें एक सामान्य लघु काव्य हरिदास यशवंत नीलकंठ कवीश्वरबुवा यांनीं इंदुरास असतांना सन १९२५ मध्यें रचिलें आहे. याशिवाय श्रीकृष्णाच्या भजनार्थ निरनिराळ्या नाटकी चालींवर भास्कर गणेश भिडे गुरुजी यांनीं रचिलेल्या पदांचा ‘ श्रीकृष्ण भजनमाला ’ नामक संग्रह सन १९१८ मध्यें प्रसिद्ध झाला आहे. सर्व देव-देवतांच्या भजनोपयोगी असेही कांहीं पदसंग्रह मध्यभारतांत निघालेले

आढळतात. त्यापैकीं सन १८९५ मध्यें प्रसिद्ध झालेला ' प्रार्थना संग्रह ' हा बाळकृष्ण रघुनाथ जाधव यांनीं रचिलेला असून त्याची वाढविलेली द्वितीयावृत्ति ' संगीत प्रार्थना ' या नांवानें कवीचे चिरंजीव व इंदूरचे प्रख्यात चित्रकार आणि फोटोग्राफर प्रतापराव जाधव यांनीं सन १९१५ मध्यें काढली आहे. बाळकृष्णपंत हे इंदूरच्या प्रार्थना–समाजाच्या संस्थापकांपैकीं एक होते त्यामुळें अर्थातच त्यांनीं आपलें हें पुस्तक आपल्या ' समाजबंधू ' च्या खास उपयोगासाठीं तयार केलें होतें. यांत कांहीं पदें हिंदीही आहेत. याचप्रमाणें या पुस्तकानंतर प्रसिद्ध झालेल्या ' पदमाला ' व ' श्रीस्मरणमंगल ' या श्रीमंत बळवंतराव भैयांच्या दोन्हीं पुस्तकांतही मराठी–हिंदी भजनें संग्रहित केलेलीं आहेत. यापैकीं दुसऱ्या पुस्तकाच्या आतांपावेतों सहा आवृत्ती निघाल्या आहेत. सन १९०९ मध्यें देवासचे कृष्णाचार्य धर्माधिकारी यांचा ' पदसंग्रह' प्रसिद्ध झाला. याच्या प्रस्तावनेवरून सदर पुस्तकाची प्रथमावृत्ति पूर्वीं कधींतरी निघाली असल्याचें कळून येतें. सन १९२१ मध्यें भास्कर रामचंद्र भालेराव यांनीं प्रसिद्ध केलेल्या महादजी शिंद्यांच्या ' माधव विलास ' नामक भक्तिपर पदसंग्रहाचा उल्लेख मागें पूर्वपीठिकेंत आलेलाच आहे. आद्यशंकराचार्यांच्या 'परापूजा' काव्यावरून उत्स्फूर्त झालेलें कृष्णाजी गंगाधर कवचाळे यांचें सन १९२७ मधलें ' स्मरणी ' काव्यही याच वर्गांत मोडणारें असून भागीरथीबाई वैद्य यांचीं 'पदें, अभंग व कथासार ', दत्तात्रय तुकाराम गोसावी यांचीं ' पदें ' (१९२८), आनंदराव अटेरकरांची 'आनंद–भजन–लहरी ', धुंडीराज कृष्ण अष्टेवाले यांची ' सत्सेवासुममाला ', ' कवनसुमन ' (१९२८) व ' सद्विनोदसुख ' या लहानमोठ्या काव्यांचाही याच वर्गांत समावेश होतो. यांपैकीं शेवटल्या काव्यांत भगवंतानें आतांपर्यंत पिता, सुत, बंधु, पति वगैरे रूपांत या मर्त्यलोकीं अवतार घेतलेले आहेत; पण मातेचा अवतार मात्र कधींच घेतलेला

नाहीं तो त्यानें घ्यावा अशी प्रार्थना कवीनें केली आहे. या प्रार्थनेंत सलगीचा विनोद विशेष असल्यानें त्याला कवीकडून दिलें गेलेलें 'सद्विनोदसुख' हें नांव खरोखर यथार्थ शोभतें. कवि ह्मणतोः—

"मी माता नच होईन । तुज बालक नच बनवीन ।
कुणि तुजला सांभाळावें । कुणि लाड तुझे पुरवावे ॥
तूं राजा वल्लभ व्हाया । परि मी नच होइन जाया ।
कुणि पतिव्रता पाळावें । कुणि आज्ञेमध्यें रहावें ॥
तूं माता हो वेल्हाळ । मी होइन तूझा बाळ ।
मी रुसेन तूं हो लाल । मग हळूंच मज कुरवाळ ॥
तूं माय दयासागर । तव अंकीं असल्यावर ।
कोणास नाहिं भीणार । मम कोण काय करणार ॥"

वरील अवतरणावरून या काव्याची मधुरता व विनोदपरता स्पष्ट दिसून येण्यासारखी आहे. मात्र यांत मात्रादि दोष बरेच ठिकाणीं घडले आहेत. नंतर सन १९३२ मध्यें महत्पूरचे बालस्वामी यांनीं पांडवगीता, हरिमोडस्तोत्र, चर्पटपंजरिका व द्वादशपंजरिका या स्तोत्रांचीं मराठी भाषांतरें करून तीं एकत्र 'ग्रंथत्रय' नांवाच्या पुस्तकद्वारें प्रकाशित केलीं आहेत. या अशा देवांच्या स्तुति–भक्तिबरोबर संतविभूतींच्याही स्तुति–भक्तीला वाहिलेलीं तीन काव्यें मध्यभारतांत प्रसिद्ध झालीं आहेत. एक इंदूरचे प्रो. माधव हरि मोडक यांचें 'श्रीशीलनाथ–अष्टोत्तरी', दुसरें रामचंद्र नारायण कुळकर्णी ऊर्फ नाथसुत यांचें 'श्रीनाथगीतांजलि' व तिसरें यशवंत सखाराम राशिनकर ऊर्फ गीतात्मज यांचें 'श्रीदत्तनामामृत'. 'श्रीशीलनाथ–अष्टोत्तरी' सन १९०२ मध्यें प्रकाशित झाली असून हिच्यांत मध्यभारतांतील विख्यात योगींद्र श्री शीलनाथ महाराज यांची भक्तिभावानें प्रार्थना केलेली आहे. 'श्रीनाथगीतांजली' ही श्री माधवनाथ महाराज संस्थान चित्रकूट यांच्या सांप्रदायी मंडळींत नित्योपासनेसाठीं रचिली

गेलेली आहे. हिच्या आतांपावेतों चार आवृत्त्या निघालेल्या आहेत व ' हिंदी गीतांजलि ' ह्मणून तिचें हिंदींत भाषांतरही झालेलें आहे. ' श्री दत्तनामामृत ' हें सन १९३३ मध्यें देवासच्या ' शारदोपासक मंडळा ' चें पंचम पुष्प ह्मणून प्रसिद्ध झालें असून यांत शिनोरचे श्रीसच्चिदानंद स्वामी यांना श्रीदत्तरूप मानून त्यांची आराधना केलेली आहे.

वरील काव्यांबरोबरच पौराणिक कथाप्रसंग व जुन्या संस्कृत आणि हिंदी पौराणिक काव्यांचीं पद्यबद्ध भाषांतरें सातआठ झालेलीं आहेत. त्यांतील ' रास पंचाध्यायी ' चा उल्लेख मागें आलाच आहे. ' उद्धव संदेश ' हें यांपैकीं दुसरें काव्य होय. हें काव्य याच नांवानें मूळ संस्कृतांत रचिलेल्या गोरूप नामक कवीच्या काव्याचें समश्लोकी भाषांतर असून तें अप्पाशास्त्री गोळे यांनीं सन १८८६ मध्यें तयार केलेलें आहे. याच्यानंतर पांच वर्षांनीं ह्मणजे सन १८९१ मध्यें ' अंगद शिष्टाई ' हें गंगाधर सीताराम अभंग यांचें काव्य प्रसिद्ध झालें. गोळे व अभंग हे दोन्ही मध्यभारताचे मागील पिढींतले नांवाजलेले कवि होत. वरील काव्यें त्यांच्या कीर्तीला सर्वथा साजेशींच उतरलीं आहेत. रामायणावर तीन निरनिराळ्या कवींच्या कृति उपलब्ध आहेत. त्यांपैकीं पहिलें ' साकीबद्ध रामायण ' हें सन १९०६ मध्यें सदाशिव बापूजी कुळकर्णी यांनीं रचिलेलें असून दुसरें ' चौपाई रामायण ' अर्थात् श्रीतुलसी रामायणाचें समवृत्त भाषांतर ग्वाल्हेरचे गोविंद सदाशिव भोपटकर यांनीं तयार केलेलें आहे. भोपटकरांचें हें विस्तृत भाषांतर कार्य मराठी वाङ्मयांत खरोखरच अपूर्व व अप्रतिम असून त्याद्वारें चौपाई व दोहे या खास हिंदी वृत्तांचाही मराठी काव्य प्रदेशांत प्रवेश झालेला आहे.

चौपाई:—" **तें वन पावन मंगलशाली ।**
**बघे जेथ मानव बनमाली ॥**

तरुवर सुफल-सुमन-भारानें ।
झुलति मंजुहि लता-वितानें ॥
अवघे विटप कल्पतरु झाले ।
त्यजुनि महेंद्रधाम जणुं आले ॥
कमलें विकसलिं सुभग तडागीं ।
गुंजति भ्रमरवृंद अनुरागी ॥ ”

दोहा:—“ स्थूल सूक्ष्म अवघें जगत्, सूत्रात्मा श्रीराम ।
जड चैतन्य स्वरूपयुग, करतो यथाप्रणाम ॥ ”

‘ चौपाई रामायणां ’ तील या दोन्हीं उदाहरणांवरून तीं दोन्हीं हिंदी वृत्तें मराठी कवींना कितपत सुसाध्य आहेत हें कळून येईल. अस्तु. आतां रामायणावरील तिसरें काव्य ‘ अभंग रामायण ’ हें अलीकडेच सन १९३५ मध्यें ग्वाल्हेरचे महादेव बळवंत माहुलीकर ( गोडबोले ) यांनीं रचून प्रकाशित केलें आहे. “मुलींनीं झोपाळ्यावर बसून ओव्याप्रमाणें गावें, मुलांनीं वेळींअवेळीं खेळतांबागडतां ताना घ्याव्या, भजनी मंडळीनीं टाळवीण्याच्या गजरांत संकीर्तन करावें” अशी या रामायणाची रचना असल्याचें भास्कर रामचंद्र तांबे यांनीं वर्णिलें आहे. माहुलीकरांची ही कृति बऱ्याच अंशीं लोकप्रिय होण्यासारखी आहे. कीर्तन व्यासंगाबद्दल विख्यात असलेले रतलामचे विष्णु सखाराम घाटे यांनीं हरिदासी पद्धतीनें तयार करून सन १९३२ मध्यें प्रसिद्ध केलेलें ‘ सावित्रीचें कथानक ’ ही चांगलें आहे. रामचंद्र लक्ष्मण देसाई ( मायानंद चैतन्य ) व दत्तात्रय तुकाराम गोसावी यांच्या अनुक्रमें ‘ सत्यनारायण कथा ’ व ‘ संगीत गुरुचरित्र कथामृत ’ (१९३३) या पुस्तकांचाही येथें याच सदरांत जातांजातां उल्लेख करणें अवश्य आहे.

### तात्त्विक, आध्यात्मिक व उपदेशपर काव्यें

मध्यभारतीय कवींनीं तात्त्विक, आध्यात्मिक व उपदेशपर काव्यें-

ही कांहीं रचिलीं आहेत. श्रीमद्भगवद्गीता हा आपल्या तात्त्विक व आध्यात्मिक ज्ञानांचा अत्यंत श्रेष्ठ असा आदर्श ग्रंथ मानला जातो. या ग्रंथाच्या अर्थोपदेशनिरूपणासाठीं मध्यभारतांत लहानमोठीं पांच काव्यें निर्माण झालेलीं आढळतात. त्यांतील इंदूरचे शिवचंद्र बलदेव भारतिया यांनीं सन १९०३ मध्यें प्रकाशित केलेलें 'गीतार्थपद्यावलि' हें काव्य पहिलें होय. त्यानंतर 'दिव्यदृष्टि', 'श्रीमद्भगवद्गीतोपनिषद् किंवा गीतार्थ सप्तशति' आणि 'गीताहृदय' हीं तीन काव्यें अनुक्रमें १९१३, १९१९ व १९२५ सालीं प्रसिद्ध झालीं आहेत. या तिन्हींचे रचयिते 'मायानंद चैतन्य' हे होत. यांपैकीं 'दिव्यदृष्टि' ची द्वितीयावृत्ति सन १९१७ मध्यें निघाली असून हिंदी व इंग्रजी भाषेंत ही तिचे अनुवाद झाले आहेत. गीतेचा ११ वा अध्याय निवेदन करतांना भगवंतानें अर्जुनाला विश्वरूपदर्शनासाठीं जी दिव्यदृष्टि दिली तिचें रहस्य गीतावचनांच्या अर्थासह यांत प्रथम वर्णन करून नंतर गीतेच्या प्रत्येक अध्यायाचें सार, शंकराचार्यांच्या 'परापूजे' चें भाषांतर व इतर कांहीं गोष्टी पद्यमय दिल्या आहेत. 'गीता–प्रबोधन' हें भगवद्गीतेवरील शेवटचें पांचवें काव्य होय. हें सन १९३१ मध्यें कृष्णाजी गंगाधर कवचाळे यांनीं रचिलें असून यांत गीतेंतील मुख्यमुख्य श्लोकांचें सार श्लोकांतच वर्णिलें आहे. कविसम्राट् रवींद्रनाथ टागोर यांचें 'गीतांजलि' हें उच्च प्रतीचें आध्यात्मिक काव्य जगप्रसिद्ध आहे. या काव्यानें 'नोबल प्राइझ' संपादून पाश्चात्य पंडितांना चकित करून सोडलें आहे. मराठींत या काव्याचा पद्यानुवाद करण्याचा प्रयत्न आजवर तिघांचौघां विद्वानांनीं केला असून तसाच प्रयत्न इंदूरचे डॉ. श्रीधर नारायण शारंगपाणी यांनींही पण आपल्या 'महाराष्ट्र गीतांजलि' या पुस्तकद्वारें सन १९२६ मध्यें केला आहे व तो बराच यशस्वी झाला आहे असें ह्मणणें वावगें होणार नाहीं. संतश्रेष्ठ श्री तुकाराम महाराजांचे कांहीं निवडक आध्यात्मिक अभंग घेऊन

त्यांचे ‘ अभंगरत्नांचे हार ’ इंदूरचे प्रो. शांताराम अनंत देसाई यांनीं गुंफिले आहेत. या पुस्तकाच्या चौथ्या प्रकरणांत ब्राउनिंग व तुकाराम या दोघांच्या ईशप्राप्तीसंबंधाच्या विचारांची केलेली तुलना मननीय आहे. तसेंच ‘ देवावर दावा ’ व ‘ तुकोबांस सगुण साक्षात्कार ’ अशीं, तुकाराम महाराजांचे अभंगवेचे घेऊन आध्यात्मिक दृष्टीनें प्रकरणरूप लिहिलेलीं केशव सदाशिव केळकर यांचीं दोन लघु पुस्तकेंही चांगलीं आहेत. ‘ मुमुक्षु ’ कार लक्ष्मण रामचंद्र पांगारकर हे इंदुरास असतांना त्यांनीं सन १९१७ त रचिलेलें ‘ द्वैताद्वैत संगति स्तोत्र ’ त्यांच्या कीर्तीस साजेसेंच उतरलें आहे. याच्या अगोदर श्रीमंत बळवंतराव भैय्या शिंदे यांचें ‘ मुक्तिद्वार चतुष्टय ’ काव्य प्रसिद्ध झालें आहे. देहांत देव कोणता तो दाखवा ? ’ असा गुरु याज्ञवल्क्यास राजा जनकानें प्रश्न करतां याज्ञवल्क्यानें त्यास देहांत देव दाखवून विदेही केलें, त्यासंबंधांत त्या उभयतांमध्यें झालेल्या प्रश्नोत्तरांवर शिवरामस्वामी नामक एका कवीनें मराठींत एक लघु काव्य रचून सर्व वेदशास्त्रांचा गर्भितार्थ त्यांत आणला आहे. त्याची संक्षिप्तावृत्ति स्वतःच्या काव्य वार्णांत ‘ बोधामृत अथवा वेदांतसार ’ नांवानें हरिदास केशवबुवा आठल्ये (लष्करकर) यांनीं सन १९१७ मध्यें प्रसिद्ध केली आहे. या कृतींत वृत्तदोष विपुल आहेत. निरीश्वर वादाचा पुरस्कार करणाऱ्या महान् दार्शनिक कवि ईश्वर कृष्णाचें ‘ सांख्यसप्तति ’ काव्य प्रसिद्ध आहे. यांत साऱ्या सत्तर आर्यांत एकंदर सांख्य सिद्धांत साररूपानें ग्रथित केला आहे. आद्य शंकराचार्यांपासून तों लो. बाळ गंगाधर टिळकांपर्यंत अनेक विद्वानांनीं या ग्रंथावर टीका लिहिल्या असून दीड हजार वर्षांपूर्वी त्याचें चिनी भाषेंत भाषांतरही झालें आहे. मराठी वाचकांस या महत्त्वाच्या संस्कृत पद्य ग्रंथाचा परिचय पद्यबद्धच करून देण्याचा प्रयत्न मंदोसरचे केशव नारायण डांगे यांनीं अलीकडे सन १९३५ मध्यें केला आहे तो निःसंशय प्रशंसनीय होय.

मध्यभारतांतील तात्त्विक व आध्यात्मिक काव्य ग्रंथ हे एवढेच आहेत.

आतां उपदेशपर काव्यांकडे वळतां त्यांत धारचे कृष्णराव बापूजी लेले यांनी सन १८८५ मध्यें प्रसिद्ध केलेलें ' सुबोध मंजरी ' काव्य कालानुक्रमानें पहिलें असल्याचें दिसून येतें. यांत लेले यांनीं स्वतःच्या-शिवाय इतर कवींच्याही बोधपर कविता संकलित केल्या आहेत. लेल्यांची कविता बरीच प्रसन्न व प्रसादयुक्त आहे.

" आम्रफलाची गोडी केवीं मत्काव्यरूप कांकडिला ।
रंभा मयूरकविता समता कैसी घडेल माकडिला ॥ "

हे त्यांनीं स्वतःच्या कवितेविषयीं काढलेले उद्गार वास्तविक विनयाचेच म्हटले पाहिजेत. यानंतर सन १८९२ मध्यें ' सुभाषित पद्यमाला ' हें पुस्तक सांवळाराम कमळाकर माकोडे यांनीं प्रसिद्ध केलें. यांत अनेक हृद्य सुभाषितें पद्यांत गोंविलेलीं आहेत. मानवी मन हें स्वभावतःच स्खलनशील, सुखलोलुप असतें. त्याची चंचलता व चौचालपणा घालविण्यासाठीं खोंचदार शब्दांत समर्पक दृष्टांत देणें सर्वथैव उपयोगाचें असतें. त्या दृष्टीनें गंगाधर सीताराम अभंग यांनीं सन १९०८ मध्यें रचिलेलें ' मनास बोध ' हें काव्य फारच परिणाम-कारक व सुंदर वठलें आहे. याच कवीचें सन १९१० मध्यें प्रसिद्ध झालेलें ' सुबोधरत्नावलि ' काव्यही उत्तम आहे. यांत कांहीं स्वयंस्फूर्त व कांहीं संस्कृतांतून अनुवादिलेलीं अशीं सुभाषितें कवीनें गोड कवितांत गुंफिलेलीं असून शिवाय संगीत वर्णमाला, व्यंजनकुसुमावलि, भजनें, पदें वगैरेंचेंही संकलन केलेलें आहे. अभंगांचीं हीं दोन्हीं पुस्तकें विशेषतः मुलांना पठनीय आहेत. ' रामदासीबुवां ' चें ' विज्ञान ' (१९२०) ,' मायानंद चैतन्यां ' चें ' द्विजबोधशास्त्र ', धुंडिराज कृष्ण आष्टेवाले यांचें ' सद्विचार ' (१९३०) व आनंदराव आटेरकरांचें

' आत्मउपरति अर्थात् मनोपदेश ' हीं किरकोळ काव्येंही याच सदरांत मोडणारीं आहेत.

### चरित्र व इतिहासविषयक काव्यें

मध्यभारतीय कवींनीं चरित्र व इतिहासविषयक अशीं सुमारें वीस काव्यें निर्माण केलीं आहेत. त्यांपैकीं जगन्नाथ रावजी टुल्लु यांनीं सन १९०२ मध्यें रचिलेलें ' स्वामी विवेकानंद ' व रामचंद्र नारायण कुळकर्णी ऊर्फ नाथसुत यांनीं सन १९२८ मध्यें रचिलेलें ' श्रीमाधवनाथ दीप–प्रकाश ' अर्थात् श्रीनाथमहाराज चित्रकूटकर यांचें ओवीबद्ध चरित्र हीं दोन सनातन धर्माच्या विभिन्न क्षेत्रांत नांव गाजविणाऱ्या महनीय पुरुषाच्या चरित्रांवर लिहिलेलीं काव्यें आहेत. यांतील दुसरें काव्य मोठें पोथीरूप असून अत्यंत भक्तिभावानें लिहिलेलें आहे व पहिलें लहानसें असून रसाळ वाणींत लिहिलेलें आहे. या पहिल्या काव्यांत टुल्लु यांनीं वापरलेला 'जाफत्त' (मेजवानी) हा एकमात्र आगंतुक ऊर्दू शद्ब खटकणारा आहे. ' श्रीमाधवनाथ दीप–प्रकाशा ' ची द्वितीयावृत्तीही प्रकाशित झाली आहे. ऐतिहासिक चरित्रपर काव्यें ह्मणून ' थोरले मल्हारराव होळकर सुभेदार यांजवरील काव्य ', ' मैनाबाईसाहेब पवार ' व ' सुमनमाला–पुष्प १ लें ' हीं तीन लहानमोठीं काव्यें प्रसिद्ध आहेत. यांपैकीं पहिलें काव्य इंदूरच्या इंग्लिश स्कूल मधील एक माजी शिक्षक एकनाथ अण्णाजी जोशी करकंबकर यांनीं रचिलेलें असून त्यास ' दक्षिणा प्राइझ कमिटी ' कडून बक्षिस मिळालें होतें. कालिदासाच्या ' रघुवंशा ' प्रमाणें होळकर वंशावर एकवीस सर्गात्मक महाकाव्य रचण्याचा एकनाथपंतांचा मनोदय होता; परंतु त्यांच्यावर निघृर्ण काळाची अचानक झडप पडल्यामुळें तो मनोदय शेवटास जाऊं शकला नाहीं. प्रस्तुत काव्य त्या एकवीस सर्गांपैकीं पहिला सर्ग होय. नर्मदा व तापी या नद्यांच्या सभोंवतालची प्राकृतिक शोभा, सुभेदारांची मर्दानी ऐट व समरधुरंधरता, दयाबहादुराबरोबर

मराठ्यांची झालेली भयंकर रणधुमाळी, कालिकेच्या जत्रेंतील गुलहौशी स्त्रीपुरुषांचे अनेकविध विभ्रम व चेष्टा, खंडेरावांच्या निधनानंतर सुभेदार व त्यांची स्त्री यांचें शंकरभट्टानें केलेलें सांत्वन, सती न जाण्याबद्दल सुभेदारांनीं अहल्याबाईची केलेली मनधरणी व उपदेश वगैरे सर्वच गोष्टींचें वर्णन एकनाथपंतांनी या काव्यांत अगदीं यथातथ्य केलेलें आहे. ‘ मैनाबाईसाहेब पवार ’ हें काव्य सीतामहूचे माजी जज्ज नारायण गणेश शिरसाळकर यांनीं सन १८९७ मध्यें रचिलेलें असून यांत धारकर पवारांच्या घराण्यांतील दुर्दैवानें पाठ पुरविलेल्या राणी मैनाबाई साहेबांवरील संकटपरंपरेची वर्णिलेली हकीकत हृदयाला द्रव आणणारी आहे. ‘ सुमनमाला–पुष्प १ लें ’ हें काव्य जगन्नाथ रावजी ढुल्लु यांचें आहे व तें सन १९०६ मध्यें प्रसिद्ध झालें आहे. सम्राट अकबर, छत्रपति शिवाजी, महाराणा रणजितसिंह व महाराणी व्हिक्टोरिया या चौघांच्या चरित्रांतील उज्ज्वल कामगिरीचें अतिसंक्षित वर्णन यांत केलें असून शेवटीं ‘ तडित्तेज ’ नामक एक भगिनीप्रेमाची काव्यात्म कल्पित कथाही त्यास जोडली आहे.

यापुढें इतिहासविषयक काव्यें घेतां त्यांत विदर्भकवि लक्ष्मणशास्त्री गाडगे ‘ कविमयूर ’ यांनीं इंदुरास असतांना सन १९२० मध्यें रचिलेलें ‘ होळकर काव्य ’ वगळलें तर बाकीचीं काव्यें ह्मणजे पोवाडेच आहेत. या पोवाड्यांच्या पुस्तकांत सन १८९३ मध्यें प्रसिद्ध झालेलें ‘ होळकरशाहींतील पोवाडे ’ हें पहिलें पुस्तक होय. होळकर-शाहींत अल्पावधीमध्यें साधारण अधिकाऱ्यापासून तों दुय्यम दिवाणाच्या पदापावेतों पोंचलेल्या रा. सा. बाळकृष्ण आत्माराम गुप्ते यांनीं जुन्या लोकांकडून ऐकावयास मिळालेले होळकर घराण्यांतील अहिल्याबाईपासून तों शिवाजीराव महाराजांपावेतोंच्या निरनिराळ्या व्यक्तींचे पोवाडे व त्याबरोबरच छत्रपति शाहू महाराज, जनकोजी शिंदे, गायकवाड, पुणें शहर, बदामी किल्ला, खर्ड्यांची लढाई,

पानपतची लढाई, धारच्या किल्लांतील बंड वगैरे संबंधाचे पोवाडे सर्व एकत्र करून ते या पुस्तकांत दिले आहेत. यातील कित्येक पोवाडे वीररसपरिपूर्ण असून हृदयस्पर्शी आहेत. सन १९२३ मध्यें रामचंद्र नारायण कुळकर्णी ऊर्फ समर्थदास यांनीं रचिलेला 'यशवंत गीत' हा पोवाडाही उत्कृष्ट आहे. मराठशाहीच्या पडत्या काळांत जन्म घेण्याचें दुर्भाग्य वाटेला आल्यामुळें ज्यांचे जाज्वल्य स्वाभिमान, अतुलनीय स्वातंत्र्याभिमान, अढळ स्वधर्माभिमान आणि निःसीम पराक्रम हे सर्व गुण कवडीमोल ठरून इंग्रज ग्रंथकाराकडून व त्यांचीच 'री' ओढणाऱ्या मराठी लेखकांकडून चोर, ठक, लुटारू, निर्दय अशा शेलक्या विशेषणांनीं ज्यांची संभावना झाली त्या यशवंतराव होळकरांच्या प्रखर पराक्रमाचें वर्णन या 'गीतां'त केलेलें आहे. पेशवाईचीं सत्तासूत्रें हातीं खेळविणारें मुत्सद्दीमंडळ विरुद्ध, शेजारचे रजपूत प्रतिकूळ, भिस्त ठेवावयास जावें त्या 'स्व'—जनांचीं मनें कलुषित व बलिष्ठ इंग्रजांनीं चहूंबाजूंनीं वेढा घातलेला अशा बिकट परिस्थितींतसुद्धां कच न खातां स्वतःच्या हिंमतीवर व बळावर दौलतराव शिंद्यांच्या कंपूचा फन्ना उडवून, हडपसरच्या लढाईंत घोड्यास टांच मारून पाहतांपाहतां शत्रूच्या तोफांचीं आगीचीं तोंडें स्वहस्तानें फिरवून देऊन, मुकुंदरा खिंडींत सहा महिनेपावेतों कर्नल मॉन्सनला रडकुंडीस आणून, भरतपूरच्या लढाईंत सेनापती लेकचे १८ हल्ले मागें परतवून व बंधु विठोजीच्या वधाचा सूड उगविण्यासाठीं पेशवाईच्या खास राजधानींत (पुणें शहरांत) शिरून, ती लुटून व तेथें आपल्या मनाप्रमाणें नवीन पेशवा गादीवर स्थापून त्यांनीं जी मुर्दुमकी गाजविली ती केव्हांही असामान्य कोटींतीलच म्हटली पाहिजे! यशवंतरावांच्या वरील वीर गुणांच्या वर्णनाबरोबरच त्यांचें स्वातंत्र्यप्रीति, उदार मनस्कता व गरीबांविषयींचा कनवाळूपणा हे इतिहासांत अदृश्य असलेले गुणही समर्थदासांनीं आपल्या 'गीतां'तून उजेडांत

आणले आहेत. पुस्तकाच्या सुरुवातीला त्र्यंबक बळवंत गोगटे यांच्या लेखणातून उतरलेला ' विषय-परिचय ' जोडला असून तोही मोठा उद्बोधक आहे. या ' यशवंत गीता ' शिवाय समर्थदासांनीं थोरले बाजीराव पेशवे व सुभेदार मल्हारराव होळकर यांच्यावरील पोवाडेही प्रसिद्ध केले आहेत व ते दोन्ही उत्कृष्ट आहेत. तसेंच ' माध्यान्हीचा राजस्थान ' हा त्यांचा अप्रसिद्ध असलेला पोवाडाही येथें उल्लेखनीय आहे. ' यशवंत गीता ' बरोबरच सन १९२३ मध्यें कोल्हापूरचे राजकवि रामचंद्र नरहर माळी यांचा ' श्रीमंत इंदूर राजघराण्याचा संक्षिप्त इतिहासिक (!) पोवाडा ' इंदुरास प्रसिद्ध झाला आहे; परंतु तो अगदींच सामान्य आहे. याच्यापूर्वी सन १९२२ मध्यें इंदूरचे विद्यमान अधिपति राजराजेश्वर श्रीमंत यशवंतराव महाराज हे युवराज असतांना त्यांच्या वर्षगांठीनिमित्त नरहर शंकर रहाळकर यांनीं ' होळकरांचा फटका' रचिला असून त्यांत 'होळकरांच्या नरसिंहांच्या छाव्यां ' चें यशोवर्णन थोडक्यांत रसभरित असें केलेलें आहे. तसेंच इंदूरच्या अहल्योत्सवानिमित्त राजाराम दौलत गडकरी यांनीं तयार केलेले ' उत्सव कार्य ', ' धर्मकार्य ' (१९२०), 'लांगूल कार्य ' वगैरे लहानलहान पोवाडेही चांगले आहेत. होळकरांप्रमाणेंच ' देवासकर पोवार सरकारांचा ऐतिहासिक पोवाडा ' सन १९०९ मध्यें कोल्हापुरस्थ कवि सीताराम गोविंद खाटवकर यांनीं रचिलेला आहे. यांत देवासकर पवारांच्या मूळ पुरुष असलेल्या साबूसिंगापासून तों कृष्णाजीराव बाबासाहेबांपर्यंतच्या पुरुषांचें वर्णन थोडक्यांत करून नंतर श्रीमत सरकार तुकोजीराव महाराजांचें वर्णन, श्रीमंत स. सौ. सं. महाराणी राधाबाईसाहेब महाराज यांच्यासह, विस्तारानें केलेलें आहे. राजाराम दौलत गडकरी व देवासचे राजाश्रित हरिदास सीताराम वामन मोहिते यांच्या सन १९२० मधील अनुक्रमें 'शिवकार्य' व 'सिंहगडचा पोवाडा' या दोन्ही कृतींचा ही येथें जातांजातां उल्लेख करणें अवश्य आहे.

## राष्ट्रीय, देशभक्तिविषयक व राजप्रशस्तिपर काव्यें

राष्ट्रीय, देशभक्तिविषयक व राजप्रशस्तिपर अशीं मध्यभारतीय कवींनीं आठदहा काव्यें लिहिलेलीं आहेत, त्यांत सन १८८३ मध्यें प्रसिद्ध झालेलें ' स्वदेशस्थित्यादर्श ' हें काव्य पहिलें होय. हें काव्य नारायण चिमणाजी दिवाडकर यांनीं देवास हायस्कुलांत विद्यार्थी असतांना रचिलें असून यांत आपल्या देशाची प्रारंभिक, मध्यकालीन व विद्यमान स्थिति प्रथम वर्णन केली आहे व तदुपरांत स्वदेशोद्धारार्थ शेतकी आणि उद्योगधंदे यांत प्रगति करून घेऊन मद्यपानादि व्यसनें सोडण्याचा उपदेश केला आहे. भाषा भारदस्त, वर्णनशैली चित्तवेधक व उपदेश कळकळीचा यामुळें हें काव्य सुंदर उतरलें आहे. ' विविधज्ञानविस्तार ' मासिकाच्या नोव्हेंबर–डिसेंबर सन १८८३ च्या संयुक्तांकांत या काव्यावर उत्तम अभिप्राय आला होता. ' महाराष्ट्रीय ज्ञानकोश ' कार डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांनीं सदर काव्य आपल्या वडिलानें आपलेकडून वयाच्या ५ व्या वर्षींच वाचवून घेतलें होतें व त्याचा आपल्या मनावर झालेला परिणाम अद्याप कायम आहे असें ' विद्यासेवक' मासिकाच्या मार्च सन १९३६ च्या अंकांत लिहिलें आहे. या काव्याचें पुनर्मुद्रणही अलीकडे झालें असल्याचें समजतें. यानंतर सन १८८७ मध्यें एकनाथ अण्णाजी जोशी करकंबकर यांचें ' शिवाजी महाराज यांस दादोजी कोंडदेवकृत उपदेश ' हें काव्य प्रसिद्ध झालें. सदर काव्याला ' दक्षिणा प्राइझ कमिटी ' कडून बक्षिसही मिळालें होतें. पुढें सन १९२२ मध्यें असहकारिता वादाची चळवळ ऐन भरांत असतांना 'यशवंत गीता' चे कर्ते समर्थदास यांनीं ' हिंददेवीची फिर्याद ' व 'महात्मा गांधी यांची कैफियत ' या नांवाचे दोन चिमुकले पोवाडे रचिले. त्यांतील पहिल्या पोवाड्यांत पंजाबची कहाणी वर्णन करून दुसऱ्या पोवाड्यांत महात्मा गांधींनीं स्वराज्यप्राप्तर्थ्य केलेल्या आदेश–उपदेशाचें सार पुढें मांडिलें

आहे. ' लोकमान्यांचा १९०८ सालचा पोवाडा ' ही समर्थदासांनीं रचिला आहे; परंतु तो अप्रसिद्ध आहे. पुढें सन १९२७ मध्यें ' एकच हिंदुस्थान ' हें महूचे यशवंत खंडेराव कुळकर्णी यांचें काव्य प्रसिद्ध झालें. यांत कुळकर्णी यांनीं प्रथम प्राकृतिक व धार्मिक दृष्ट्या हिंदुस्थानचें असलेलें अद्वितीयत्व वर्णन करून नंतर येथें झालेल्या धर्मपरायण, सात्त्विक, कर्तव्यतत्पर, रणपटु, न्यायप्रिय, देशोद्धारक व विद्यासंपन्न थोर थोर पुरुषांचें गुणसंकीर्तन केलें आहे. वरील काव्यें राष्ट्रीय व देशभक्तिपर झालीं आतां राजप्रशस्तिपर काव्यांकडे वळतां त्यांत सन १८९० मध्यें बळवंतराव कमळाकर माकोडे यांनीं श्रीमंत माधवराव महाराज शिंदे अलिजाबहादूर त्यांच्या विवाहसमारंभांत आहेरादाखल नजर केलेलें ' काव्योपायन ' ( प्रार्थना ) हें काव्य पहिलें असल्याचें दिसून येतें. यानंतर सन १८९२ मध्यें देवास धाकट्या पातीचे अधिपति ' श्रीमंत मल्हारराव बाबासाहेब पवार यांच्या सेवेशीं अल्प नजर ' ह्मणून एक काव्य त्यांच्या राज्याभिषेकोत्सव प्रसंगीं ग्वाल्हेरच ( त्यावेळीं देवास हायस्कुलांत शिकत असलेले ) भास्कर रामचंद्र तांबे यांनीं रचिलेलें प्रसिद्ध झालें. पुढें देवास थोरल्या पातीचे श्रीमंत सरकार तुकोजीराव पवार याच्या ' तेविसाव्या वाढदिवसाच्या दरबाराचें पद्यात्मक वर्णन ' व ' पंचाविसाव्या वाढदिवसानिमित्त अभिनंदनपर पद्यावलि' हीं देवास येथील मराठी शाळेचे माजी हेडमास्तर रामचंद्र हयग्रीव मणूरकर यांचीं लघु काव्यें अनुक्रमें सन १९१० व १९१२ मध्यें प्रसिद्ध झालीं. नंतर सन १९२० मध्यें प्रो. परशुराम नारायण पाटणकर यांचें ' मल्लारिराजप्रशस्ति अथवा मेंडकी मैदानचा सुखवास ' हें काव्य बाहेर पडलें. सन १९१८ मध्यें ग्रंथिज्वराच्या ( प्लेगाच्या ) सांथीच्या वेळीं देवास धाकट्या पातीच्या प्रजेला मेंडकी नांवाच्या मैदानांत रहावयास जावें लागलें त्या प्रसंगीं प्रजेची झालेली हवालदिल स्थिति, श्रीमंत सरकार मल्हारराव महाराजांनीं प्रजेला

दयार्द्र अंतःकरणानें केलेलें सर्व प्रकारचें सहाय्य व सुदैवानें याच वेळीं महाराजांना ब्रिटिश गव्हर्मेंटकडून मिळालेल्या 'महाराजा' या पदवीमुळें प्रजेला झालेला अत्यानंद या सर्व गोष्टींचें वर्णन प्रो. पाटणकरांनीं या काव्यांत 'करुणा' नामक छंदामध्यें केलें आहे. या छंदाचें लक्षण त्यांनींच पुढें दिल्याप्रमाणें आहेः—

"ही करुणा नामच्छंदें रचना बहु सुरम्य गाना।
प्रतिपाद चतुर्दश मात्रा लघु गुरु नियम न त्यांना ॥"

पुढें श्रीमंत सरकार मल्हारराव महाराजांचा सौवर्ण ज्युबिली महोत्सव सन १९२६ मध्यें साजरा झाला त्या शुभ प्रसंगीं देवास, इंदूर व धार येथील माजी विद्याधिकारी काशीनाथ कृष्ण लेले यांनीं आर्या वृत्तांत तयार केलेल्या 'अभिनंदन पत्रिके' चा व सन १९३४ मध्यें ग्वाल्हेरच्या राजकन्या श्रीमंत कमलाराजे यांच्या विवाह प्रसंगीं ना. बा. केळकर यांनीं रचिलेल्या 'यशःश्री' नामक कवितासंग्रहाचा येथें निर्देश करणें जरूर आहे. हीं वरील सर्व काव्यें प्रासंगिक असून वस्तुतः सामान्य आहेत.

### शृंगारिक काव्य

मध्यभारतांत शृंगारिक असें एकच काव्य आतांपावेतों प्रसिद्ध झालें आहे, तें म्हणजे ग्वाल्हेर राज्यांतील चंदेरी महालाचे माजी कमाविसदार गंगाधर गोपाळ आटेरकर यांनीं सन १८९८ मध्यें रचिलेलें 'कामोद्भव' हें होय. हें काव्य आम्हास उपलब्ध झालें नाहीं.

### शोकपर काव्यें

मध्यभारतीय कवींचीं शोकपर अशीं तीनच काव्यें आढळतात. त्यांतील पहिलें काव्य 'स्वदेशस्थित्यादर्श' कर्ते दिवाडकर यांनीं बळवंत पांडुरंग ऊर्फ अण्णा किर्लोस्कर यांच्या निधनावर सन १८८५ मध्यें रचिलेलें 'बळवंत वियोग' हें होय. हें काव्य बरें उतरलें आहे.

दुसरीं दोन काव्य ' मातृ विरह ' व ' प्रिया विरह ' हीं जगन्नाथ रावजी टुल्लु यांनीं अनुक्रमें सन १९१५ व १९१७ मध्यें रचिलीं आहेत. ही दोन्हीं काव्यें लहान आहेत. ' मातृ–विरह ' हें काव्य मंदाक्रांता वृत्तांत असून तें नितांत हृदयस्पर्शी आहे; परंतु ' प्रिया–विरह ' हें काव्य मात्र तितकें हृदयस्पर्शी उतरलें नाहीं. कारण त्यांत कवीनें कांहीं अप्रस्तुत बालिश विचार–विनोद व अनुचित प्रसंग अकारण अधेमधें गोंविलें असल्यानें बरेंच ठिकाणीं रसहानि झाली आहे. इंदूरचे गजानन लक्ष्मण पेठे यांनी ' जानकीबाई पेठे यांचें स्मारक ' ह्मणून सन १९३५ मध्यें तयार केलेल्या लघुतर काव्याचाही येथें नामोल्लेख करण्यास हरकत नाहीं.

**विविध विषयक स्फुट काव्यें**

आतां मध्यभारतीय कवींच्या विविध विषयक स्फुट काव्यांकडे वळतां सकृद्दर्शनींच कृष्णराव बापूजी लेले यांचें ' सुबोध कीर्तन ' हें सन १८९४ मध्यें प्रसिद्ध झालेलें पुस्तक पुढें येतें; परंतु तें आम्हास उपलब्ध झालें नाहीं. यानंतर ' दीपग्राम ' व ' धर्म ' हीं जगन्नाथ रावजी टुल्लु यांचीं अनुक्रमें सन १९०१ व १९०६ मध्यें प्रसिद्ध झालेलीं लघु काव्यें आढळतात. ' दीपग्राम ' हें एका इंग्रजी काव्याचें अनुकरण असून तें अगदीं साधें व सामान्य आहे; परंतु ' धर्म ' हें लहानसें काव्य स्वतंत्र व चांगलें आहे. यांत धर्माचा अतिव्यापक असा अर्थ व सर्वसंमत महिमा वर्णिलेला आहे.

**" नरहृदयिं वसे जी भक्ति ती मूळ आहे !**
**सकल भुवनिं तीतें पालवी फूटताहे !**
**झुलत झुलत छाया–वृक्ष हा धर्म थोर !**
**थकत कुथत पांथा दे विसांवाचि फार ! "**

या एका श्लोकावरून सबंध काव्याची कल्पना होण्यासारखी आहे. टुल्लु यांच्या ' सुमन माले ' चें हें दुसरें पुष्प होय. पुढें

सन १९१० मध्यें 'छप्पन संवत्सर ऊर्फ छप्पनसालचा दुष्काळ' हें गंगाधर सीताराम अभग यांचें काव्य प्रसिद्ध झालें. यांत संवत् १९५६ मध्यें माळव्यांत पडलेल्या भयंकर दुष्काळांत लोकांच्या झालेल्या हालअपेष्टांचें हृदयस्पर्शी चित्र रेखाटण्यांत आलें आहे. सन १९१४ मध्यें उज्जनीचे प्रि. गोविंद सदाशिव आपटे यांनीं रचिलेलें 'वल्गना विवेचन अथवा चहा काव्य' ही चांगलें आहे. या काव्यांत आत्म-प्रशंसा, शंकासमाधान, वस्तुस्थिति, शास्त्रीय विवेचन, कर्तव्य व प्रार्थना इत्यादि प्रकरणें देऊन चहाचें व्यसन एकंदरींत हानिकारक कसें आहे हें विनोदी रीतीनें दाखविलें आहे. 'शिशुपालवध अथवा श्री माघकाव्य' हें इंदूरचे त्र्यंबक मोरेश्वर पांढरकर यांचें संस्कृतावरून भाषांतर केलेलें काव्य सन १९३१ मध्यें प्रसिद्ध झालें. यांत पांढरकरांनीं मूळ संस्कृत काव्यांतील वृत्त, भाव, अर्थगांभीर्य आदि गोष्टींस शक्य तोंवर कोठेंही धक्का बसूं दिला नाहीं. त्यावरून पांढरकरांची संस्कृतांतील गति व मराठींतील काव्यग्रथनकौशल्य या दोहोंची परीक्षा चांगल्या रीतीनें होऊं शकते. या काव्याचे पहिले दोन सर्ग पूर्वी स्वतंत्रही प्रसिद्ध केले गेले होते. सन १९३२ मध्यें देवास धाकट्या पातीचे माजी प्रांतन्यायाधीश गोविंद बळवंत आणेराव यांचें स्वीय 'मंगलमाले'चें पहिलें पुस्तक म्हणून 'वक्रोक्ति पंचविशी' हें काव्य बाहेर पडलें. यांत पंचवीस श्लोकांमध्यें शंकरपार्वतींची प्रश्नोत्तरें असून त्यांत सभंग आणि अभंग अशा दोन्ही प्रकारच्या श्लेषांनीं वक्रोक्ति साधली आहे व क्वचित् अर्थश्लेषही सहजीं आणला आहे. संस्कृतांत अशा तऱ्हेचीं काव्यें पुष्कळ आहेत; परंतु मराठींत, आमच्या माहितीप्रमाणें, हें काव्य पहिलेंच आहे. सन १९३६ मध्यें केशव नारायण डांगे यांचें 'भरणी' काव्य प्रसिद्ध झालें. हें काव्य प्रथम नागपूरच्या 'विहंगम' मासिकांतून क्रमशः प्रकाशित झालें होतें. देशोद्धारांत, विशेषतः खेड्यांतील आर्थिक पुनरुज्जीवनांत,

कलांचें आणि सौंदर्यसमीक्षक दृष्टीचें महत्त्व किती व कसें आहे याचें चित्र या काव्यांत कल्पित कथानकद्वारें रेखाटलें आहे. समर्थदास यांचीं, 'श्रीमंत होळकर सरकार यांना केलेल्या नामसप्ताहाचा पोवाडा' 'श्रीनाथ मंदिरोत्सव', 'श्रीनाथलीला तुषार नं. १ व नं. २,' वगैरे काव्यें; श्रीमंत सरदार माधवराव विनायक किबे यांचे चिरंजीव शरत्कुमार ऊर्फ भाऊसाहेब यांच्या विवाह समारंभानिमित्त निरनिराळ्या कवींच्या संस्कृत व मराठी कवितांचा 'मंगल गीतें' नामक संग्रह (१९२५); कु. गिरिजासुता यांचें 'काव्यतरंग' (१९३०) व 'काव्यस्वर्धुनितुषार' (१९३२) हें दोन लघुकाव्यसंग्रह; तसेंच देवासच्या शारदोपासक मंडळाची 'मंजरी' (१९३१) हा काव्यसंग्रह आणि उज्जनीचे श्रीधर लक्ष्मण धर्माधिकारी यांची 'श्री क्षेत्र उज्जयिनी यात्रा–कथासार' नामक अवीबद्ध पोथी (१९३३) या पुस्तकांचाही येथें उल्लेख करणें अवश्य आहे.

### कविता संग्रह

आतां मध्यभारतीय कवींच्या स्फुट कविता संग्रहाकडे वळून पाहतां तसे कविता संग्रह आजपावतों वीसपंचवीस प्रसिद्ध झालेले दिसून येतात व त्यांत कालदृष्ट्या सन १८८७ मध्यें प्रसिद्ध झालेला 'वाग्विहार' हा इंदूरचे माजी एज्युकेशन इन्सपेक्टर विष्णु सोमनाथ सरवटे ऊर्फ गुरुजी यांचा कविता संग्रह अगदीं पहिलाच असलेला आढळून येतो. 'अनेक तऱ्हेच्या पक्वानांनीं भरलेलें ताट' असा नरहर शंकर रहाळकर यांनीं या 'वाग्विहारा' चा करून दिलेला 'परिचय' यथायोग्य वाटतो. सूक्ष्म अवलोकन शक्ति व विशाल दृष्टिकोन, क्वचित् पाल्हाळिक पण एकंदरात मोहक वर्णनशैली, त्यांत अलंकारोपमांचीं उत्कृष्ट भर, विषयानुरूप रसपरिपाक आणि रसानुकूल छंद व रागरागिण्यांचा उपयोग या सर्व गोष्टींमुळें गुरुजींचा हा 'वाग्विहार' रसिकांना निःसंदेह संतृप्त करणारा आहे!

निरनिराळ्या विषयांवरील पंचवीस स्वतंत्र प्रकरणरूप प्रदीर्घ कविता व स्फुट सदराखालीं आणखी चौदा लघु कविता ऊर्फ चुटके एवढा कवितासंभार या 'वाग्विहारां'त दृष्टीस पडतो. त्याकडे पाहिलें म्हणजे ईश्वराला आळवावयाचें असो किंवा 'नरजन्मधन्यते'ची दिशा दाखवावयाची असो; 'मातृपकार' स्मरावयाचे असोत किंवा 'मातृमोह' प्रकट करावयाचा असो; 'विद्यावैभव' सांगावयाचें असो किंवा 'स्वतंत्रते'चें महिम्नस्तोत्र गावयाचें असो; कार्तिक स्नानाकरितां नदीवर जाण्यास निघालेल्या अथवा नागपंचमीच्या मिरवणुकींत नटून थटून चाललेल्या 'मदनलालडीं'च्या व त्यांच्यावर 'फिदा' झालेल्या 'रंगेल ज्वान पठ्ठयां'च्या रूपांचें, पोषाखांचें, ऐटीचें व कामुक लीलांचें वर्णन करावयाचें असो किंवा दुर्दैवी शहाअलम बादशहाचा अरुण्यरोदनवत् 'विलाप' पुढें मांडावयाचा असो; कोरेगांवच्या रणमैदानावर बापू गोखल्याचें, रावबाजीच्या भीरू वृत्तीची निर्भत्सना करून, वीरांना लढण्यास उत्साहित करणारें भाषण द्यावयाचें असो किंवा अन्योक्ति, दृष्टांत व विनोद समर्पक साधावयाचे असोत गुरुजींची प्रतिभा हीं सर्व कार्यें येथून तेथून सारखी समरस होऊन यशस्वितेनें सहज करूं शकली, हें पाहून सानंद आश्चर्य वाटल्यावांचून रहात नाहा! गुरुजींच्या कवितेंत तसे अनेक रस आहेत; पण त्यांतल्या त्यांत शृंगार रस प्राधान्यें-करून आहे; तथापि तो शृंगार रस ग्राम्य किंवा उच्छृंखल नसून समर्याद, सभ्य व रसिकांना आवडेल असा आहे. सत्य सृष्टींतील कोणतेंही दृश्य शब्द सृष्टींत यथावत् चित्रित करण्यांत तर गुरुजींचा हातखंडाच होता ही गोष्ट 'नागपंचमी' व 'छत्री' या त्यांच्या कवितांवरून सहज दिसून येण्यासारखी आहे. या 'वाग्विहारां'तील निरनिराळीं कविता प्रकरणें गुरुजींनीं इंदुर संस्थानांतील आपल्या समकालीन नामांकित व प्रिय व्यक्तींना समर्पण केलीं आहेत. व त्या

समर्पणांतही कवितेच्या विषयानुरोधानें ज्या व्यक्तींत ते गुण आढळले त्यालाच ती समर्पण करून आपली गुणज्ञता व मार्मिकता व्यक्त केली आहे. ' विविधज्ञानविस्तार ' ( पुस्तक १९ अंक १-२ ) मध्ये या ' वाग्विहारा 'चें परीक्षण आल होतें; परंतु तें परीक्षण दुर्ग्रह-दूषित असल्याचें उघड दिसून येत आहे. रहाळकर यांनीं सन १९१९ मध्यें ' वाग्विहारा 'चा एका स्वतंत्र लघु पुस्तकद्वारें करून दिलेला 'परिचय' त्रोटक असला तरी तो मार्मिक आहे व त्यापासून ' वाग्विहारा 'ची खरी योग्यता रसिकांना कळून येण्यासारखी आहे. अस्तु. या 'वाग्विहारा 'च्या पाठोपाठ सन १८८८ मध्यें गंगाधर सीताराम अभंग यांची ' पद्ममाला ' व त्यानंतर सन १८९८ मध्यें धुंडिराज कृष्ण आष्टेवाले यांचा ' पद्मपद्म ', सन १९०१ मध्यें जगन्नाथ रावजी दुल्लु यांच्या ' चार कळ्या ' व सन १९०६ मध्यें त्यांचेंच ' सुमनमाला—पुष्प १ लें ' हे चार लघु कवितासंग्रह प्रकाशित झाल्यावर सन १९१२ मध्यें इंदूरचे रा. ब. विनायक कृष्ण मुळ्ये ऊर्फ कृष्णतनय यांची ' काव्य कुसुमांजलि ' रसिकांपुढें आली. या ' अंजलीं ' त लहान-मोठीं मिळून एकंदर ४० कविताकुसुमें असून त्यांतील बरींचशीं प्रेमरसानें युक्त आहेत. ' प्रेम ', ' प्रेमाचें मूळ ', ' प्रेमाची व्याख्या', ' प्रेमाची मीमांसा ', ' प्रेमाचा परिणाम ', ' प्रेमलंभाष्टक ', ' प्रियारोप ', ' विरहिणी ', ' प्रियदर्शनानुरक्ति ', ' प्रियादर्शन ' इ. शीर्षकांवरून त्यांच्या एकंदर प्रेमविषयक कवितांची कल्पना सहज होण्यासारखी आहे. या कवितांपैकीं अधिकांश कविता संस्कृत व इंग्रजी कवितांवरून भाषांतरलेली आहे. त्यांतील बायरन, टेनिसन, शेक्सपियर, साउदे, शेले व लांगफेलो या प्रथितयश आंग्ल कवींच्या चुटक्यांचीं केलेलीं भाषांतरें चांगलीं आहेत. सन १८८६ ते १८९२ हा कृष्णतनयांच्या ' अंजलीं ' तील कवितेचा काळ होय. या काळांत रे. टिळक, केशवसुत, तांबे, रहाळकर, Bee प्रभृति कवींनीं मराठी

कवितेला लाविलेलें नवीन वळण लोकाभिरुचीस उतरून तशा प्रकारची कविता सारखी बाहेर पडत असतांनाही कृष्णतनयांनीं आपल्या कवितेला जुन्या वळणाचीच ठेविली, हें येथें नमूद करण्यासारखें आहे. त्यांची सर्व रचना विविध वृत्तांत असून भाषा प्रगल्भ आहे. कल्पनेच्या भराऱ्या त्यांत कोठेंही नाहींत. 'संभाजीचे उद्गार', 'मांडवचा किल्ला पाहून' व 'प्रवासी' या तीन कवितांत त्यांचे सर्व कवित्वगुण उत्तम प्रकारें प्रकट झालेले दिसतात. यानंतर सन १९२२ मध्यें बडोद्याचे प्रसिद्ध कवि दत्तात्रय कोंडो घाटे यांची निवडक कविता 'दत्तांची कविता' हें नांव देऊन त्यांचे चिरंजीव विठ्ठलराव यांनीं ग्वाल्हेरहून प्रसिद्ध केली. दत्त व विठ्ठलराव या दोघांचा तसा विद्यार्जनाच्या निमित्तानें मध्यभारताशीं थोडाफार संबंध राहिला असला तरी 'दत्तांच्या कविते' चें प्रकाशनश्रेय मात्र विठ्ठलरावांच्या हातून मध्यभारताला अकल्पितपणें लाभलें आहे. आपलें अवघें २४ वर्षांचें आयुष्य खरोखरच तडित्तेजाप्रमाणें चमकवून दत्तांनीं केशवसुत, रे. टिळक, विनायक, लेंभे, चंद्रशेखर वगैरे समकालीन कवींबरोबर आपलेंही नांव चिरस्थायी करून ठेविलें आहे. त्यांच्या कवितांकडे पाहिलें ह्मणजे त्यांच्या प्रतिभेचा खराखुरा विकास यापुढेंच व्हावयाचा असल्याचीं प्रच्छन्न चिन्हें त्यांतून दिसून येतात, त्यामुळे त्यांच्या काव्यस्फूर्तीची ज्योत वर्धनोन्मुख असतांनाच त्यांच्यावर काळाची अचानक झडप पडली हें पाहून महाराष्ट्राला हळहळ वाटणें साहजिक आहे दत्त हे अंतःकरणानें राष्ट्रीय वृत्तीचे कवि होते. मायदेशाचें पारतंत्र्य पाहून त्यांचें अंतःकरण सदान्कदा उद्विग्न होत असे. त्यांची उद्विग्नता 'मित्रा विहंगा', 'वर्षप्रतिपदा', 'दिवाळी', 'भगवा झेंडा' आदि कवनांतून तळमळीनें उद्गारित झालेली आहे. तशी तर उद्विग्नतेची झांक प्रायः त्यांच्या सर्वच उत्कृष्ट कवितांतून दिसून येणारी आहे. जणुं काय, आपणास अवघ्या २४ वर्षांच्या आंतच

इहलोकचें वास्तव्य आटोपावयाचें आहे याचीं स्वप्नेंच त्यांना पडत होतीं ! दत्तांचें निधन सन १८९९ मध्यें झालें. तत्पूर्वी त्यांनीं १८९७ त 'एका आसन्नमरण दुष्काळपीडितास उद्देशून' व १८९८ सालच्या प्रथम दिनीं विश्वरूपी महाग्रंथाचें नूतन वर्षरूपी 'नव पान उघडलें' या दोन कवितांतून निकट येणाऱ्या स्वतःच्या मृत्युविषयींचें भाकित बोलून दाखविलें होतें ! ज्या कवितेनें दत्तांचें नांव चिरस्मृत राहणार आहे त्या त्यांच्या 'निज नीज माझ्या बाळा' या दगडालाही द्रव फोडणाऱ्या अंगाई गीतांतसुद्धां त्यांनीं असेंच स्वतःचें मरण ध्वनित केलें होतें. आपल्या काव्यवाटिकेंत निसर्गाशीं प्रेमालाप करतांना दत्त बऱ्याच ठिकाणीं आढळतात; परंतु त्यांचें मन जात्याच तत्त्वचिंतनशील असल्यामुळें ते त्या प्रेमालापांत मधूनच निसर्गाला तेथल्या तेथें सोडून तात्त्विक विचार व उदात्त कल्पना यांत चहूंदिशीं रममाण झालेलेही दिसून येतात ! या त्यांच्या प्रवृत्तीमुळेंच शुद्ध सृष्टिवर्णनपर काव्यांत गणना करतां येईल अशी कविता त्यांच्या हातून निर्माण होऊं शकली नाहीं. 'सायंकाळ' या कवितेंत त्यांनीं सायंकाळीं सूर्यबाळाला त्याची आई अंगाई करून निजवीत असल्याची रेखाटलेली कल्पना खरोखर अभिनव व उदात्त आहे तसेंच लक्ष्मीविलास राजवाड्याच्या मनोऱ्यास उद्देशून लिहिलेली कविताही मनोऱ्याप्रमाणें उंच भावनांची निदर्शक आहे. 'विश्वामित्रीच्या कांठीं' ही कविता वर्णनें, उपमा व रचना या दृष्टींनीं बरीच चित्ताकर्षक झाली असून निसर्गाशीं तल्लीन झालेल्या कविहृदयाची ती उत्कृष्ट साक्ष पटवून देणारीही आहे. 'मित्रा नारायणा' यांतील विश्वासावर फुलाचें केलेलें रूपक रमणीय नाहीं असें कोण म्हणूं शकेल ? राग व अनुराग यांचा सुंदर खेळ 'सखे सुमनमाले' त पाहण्यासारखा आहे; परंतु या कवितेच्या शेवटल्या दोन ओळी व 'प्रतिभा विहंगा' चा शेवट रस हानिकारक वाटतात. बालस्वभावनिदर्शक अशा 'बाल लेखन', 'शहाणी

बाहुली ' ' बोलत कां नाहीं ', ' अ आ ई ' वगैरे ज्या चारदोन कविता दत्तांच्या आहेत त्या मात्र वरील दोषांपासून अलिप्त असून नितांत मधुर आहेत. विठ्ठलराव यांनीं ' दत्तांच्या कविते ' ला दत्तांचें चरित्र लिहून जोडलें आहे तें वाचीत असतांना डोळ्यांतून टिपे गळणार नाहींत असा वाचक विरळाच सांपडेल ! तें वाचीत असतांना आपण एखादी कल्पित कथाच वाचीत आहोंत कीं काय, असा क्षणोक्षणीं भास होतो ! दत्तांचे जिवलग स्नेही चंद्रशेखर यांनीं आपल्या, दत्तांच्या सान्निध्यांतील, मागील आठवणी उजळून लिहिलेली प्रस्तावना व त्यांनीं आणि रे. टिळकांनीं दत्तांच्या वियोगावर गाइलेल्या गीतांचें परिशिष्ट हींदेखील सुंदर आहेत. ' दत्तांची कविता ' प्रसिद्ध होण्याच्या दोन वर्षे अगोदर म्हणजे सन १९२० मध्यें भास्कर रामचंद्र तांबे यांच्या कवितेचा पहिला भाग व नंतर सन १९२७ मध्यें त्याचा दुसरा भाग अनुक्रमें प्रो. वासुदेव गोविंद मायदेव व दिनकर गंगाधर केळकर ऊर्फ अज्ञातवासी या दोघां पुण्यपत्तनस्थ कवींनीं प्रसिद्ध केले आणि पुढें सन १९३५ मध्यें प्रो. मायदेव यांनींच ' तांबे समग्र कविता ' या नांवानें तांब्यांची ऑक्टोबर सन १९३५ पावेतोंची कविता प्रो. माधवराव पटवर्धन यांच्याकडून संपादवून तीही प्रकाशित केली. यांशिवाय ग्वाल्हेर राज्यांतील विद्याखात्याकरितांही तांब्यांच्या कवितेचें एक पुस्तक याच्या अगोदर प्रकाशित झालेलें आहे. तांबे यांच्या ठायीं काव्यरचनेची हौस ते विद्यार्थीदशेंत असतांनाच उत्पन्न झाली व पुढें त्यांच्या प्रतिभेचा खरा उन्मेष टिळक, केशवसुतांच्या बरोबर झाला. तेथपासून आतांपावेतों त्यांची नवनवोन्मेषशालिनी प्रतिभा मधूनमधून कांहीं वर्षांचा खंड पाडून फुलतच राहिली आहे ! टिळक, केशवसुत, विनायक आदि त्यांच्या जोडीतोडीचे आरंभींचे कवि दिवंगत झाले व तसेंच मागाहून बरोबरीला आलेले गोविंदाग्रज, बालकवि ठोमरे आदि कवीही इहलोक सोडून गेले आणि रहाळकरां-

सारखे सहकारी कवि मध्येंच काव्यप्रपंचाला विटून पारखे झाले, तरीही तांब्यांनीं आपली काव्यार्चना, कवींच्या मागील दोन पिढ्यां-इतकीच, हल्लींच्या पिढीबरोबरही चालविली आहे, हें पाहून रसिकांना त्यांच्याविषयीं विशेष आदर वाटणें साहजिक आहे; परंतु हा आदर मात्र अलीकडे वाटूं लागला आहे. केशवसुत, गोविंदाग्रज यांच्याबरोबर मराठी काव्याच्या नभोमंडळांत उदयास येऊन चमकून गेलेल्या बहुतेक सर्व चांगल्या कवींचा, ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें, अल्पा-वधींत उदोउदो होऊन गेला; पण त्या नभोमंडळाच्या एका बाजूस एखाद्या तेजस्वी ताऱ्याप्रमाणें बऱ्याच कालापासून चमकत असलेल्या तांब्यांची मात्र उपेक्षाच होत राहिली ! या गोष्टीला दोन कारणें प्रामुख्यानें दाखविण्यांत येतात एक स्वतः तांबे यांचीच प्रसिद्धि-पराङ्मुख वृत्ति व दुसरें महाराष्ट्रापासून दूर असलेलें त्यांचें वास्तव्य. वस्तुतः हीं दोन्हीं कारणें तशीं अयुक्तिकही ह्मणतां यावयाचा नाहींत; ह्मणून आतां उशीरा कां होईना पण तांबे यांची बूज आज महाराष्ट्रांत सर्वत्र होत आहे व त्यांतून केशवसुतांच्या सांप्रदायाप्रमाणें त्यांचाही एक स्वतंत्र सांप्रदाय स्थापन झालेला आहे हें पाहून मध्यभारतियांना साभिमान आनंद वाटणें अगदीं साहजिक आहे ! केशवसुतांनीं जुनी परंपरा त्यागून व नवें वळण घेऊन मराठी काव्यसृष्टींत नवयुग निर्माण केलें आणि त्यांच्या समकालीन व उत्तरकालीन कवींनीं बहुशः त्यांचेंच आनुयायित्व स्वीकारलें; परंतु तांबे यांनीं मात्र तसें केलें नाहीं. त्यांनीं आपल्या कवितेचें निराळेंच स्वतंत्र वैशिष्ट्य राखिलें ही गोष्ट खास केशवसुतांच्या हयातींतच ह्मणजे सन १९०५ पर्यंत तांब्यांनीं ५० वर रचिलेल्या कवितांवरून दिसून येते. केशवसुत तांब्यांच्या कवितेचे चाहते होते. त्यांच्या आग्रहाखातर तांब्यांनीं कांहीं चतुर्दश-पद्या रचिल्या. त्यांतील ‘ गेली ज्योति विझोनियां मग फुका फुंका तयाला किती ’ ही त्यांची चतुर्दशपदी वाचून केशवसुत अतिशय

खुष झाले व ‘ भास्करराव हे जीवंत वाणीचे निसर्ग कवि आहेत ’ अशा अर्थाचे उद्गार त्यांनीं रहाळकरांजवळ काढले ! गेय वृत्तांचे पुरस्कर्ते ह्मणून तांबे विशेष प्रसिद्ध आहेत. संगीताचें ज्ञान त्यांना चांगलें असून उर्दूचाही त्यांनीं अभ्यास केलेला आहे, त्यामुळें ‘ मधुरकोमलकांतपदावलि ’ या जयदेवाच्या उक्तींचें पदोपदीं स्मरण करून देणाऱ्या मृदुमधुर पदपंक्तींनीं त्यांच्या काव्याला अवीट गोडी आलेली आहे. तसेंच अधूनमधून इंग्रजी काव्यांच्या गाढ परिशीलनाचे पडसादही त्यांच्या काव्यांतून उमटलेले आहेत, तेही मोठे आकर्षक आहेत. मोगऱ्याच्या ताटव्यांत शिरावें व जिकडे तिकडे पांढऱ्या शुभ्र, मोहक, सुवासिक फुलांचे गेंद पाहून मन रिझावें तसा आनंद तांब्यांच्या काव्यवाटिकेंत शिरल्यानें लुटावयास मिळतो ! हा अनुभव कांहीं अलीकडचा नाहीं, बराच जुना आहे. सुमारें २५ वर्षांपूर्वी तांब्यांचे स्नेही रामचंद्र कृष्ण वैद्य ऊर्फ कवि वनवासी यांनींही तो “ वा तांब्यांनीं अपुल्या वाणीनें रसिकचित्त डुलवावें ” या आर्यार्धांत निवेदिलेला आहे ! तांब्यांच्या प्रकाशित समग्र कवितेची संख्या १९७ आहे. त्या कवितेकडे रसाच्या दृष्टीनें पाहूं गेलें तर ‘ होय शृंगारा करुण रसा थारा ’ असें तिच्याविषयीं निर्विवादपणें ह्मणतां येईल. तांब्यांच्या कवितेंतून प्रकट होणाऱ्या शृंगारभक्तीवर कटाक्ष ठेवून त्यांस ‘ शृंगारमधुमत्तामिलिंद ’ अशी पदवीही एका टीकाकारानें बहाल केली आहे; परंतु या पदवीला मुळांतच कुत्सितपणाची दुर्गंधी असून तिला वास्तविक पात्र होण्याइतकी उद्दाम शृंगाराची कविताही तांब्यांची नाहीं ! तथापि एवढें जरूर आहे कीं, तांब्यांच्या समग्र कवितेचा तीन–चतुर्थांश भाग प्रणयानें विनटलेला असून त्यांत शृंगाराच्या अनेकविध गूढ–तरल छटा दाखविल्या गेल्या आहेत; पण त्यांचीं अशीं कवितासुमनें पत्नीप्रेमाच्या वेलीवरच अधिकतर फुललेलीं असल्यामुळें त्यांतला शृंगार सदभिरुचीला सोडून उच्छृंखल होत.

उत्तानता धारण करणारा असा कदापि नाहीं ! मात्र त्यांच्या पत्नीप्रेमा-व्यतिरिक्त असलेल्या प्रेमपर कवितांमधील ' जीवसंयोग ', ' नववधू प्रिया मी बावरते ', ' कवणें मुलखा जाशी गे तूं ', ' रतलें पर-पुरुषाशीं ', ' दे पूर्ण हृदयसुंदरी ' इत्यादि कवितांमधून वाच्यार्थानें शृंगाराचा अतिरेक झालेला दिसून येतो; परंतु लक्ष्यार्थानें तो तसा नाहीं. उत्तान शृंगाराची भाषा वापरून तिचें पर्यवसान वेदांतांत करावयाचें ही प्राचीन कवींनीं घालून दिलेली प्रथा तांब्यांनीं यांत गिरविली आहे एवढेंच ! तथापि ही गोष्ट यावरही कबूल करावी लागेल कीं, तांब्यांची शृंगारप्रियता अपूर्व—अद्वितीय आहे. सन १८९१ च्या सुमारास ऐन तारुण्यावस्थेंत रचिले गेलेल्या ' डोळे हे जुलमि गडे ' या त्यांच्या ठसकेबाज, रंगेल व लोकप्रिय नाट्यगीत ह्मणून प्रसिद्ध असलेल्या कवितेंतून जो एक प्रकारचा गोड प्रणयोन्माद प्रकट झालेला आहे तो आजही त्यांच्या तीनचार तपानंतरच्या वार्द्धक्य स्थितींत रचिले गेलेल्या ' समज मानिनी मान न करिं गे ', 'कोणिकडे जादुगरिणि आज सांग धांवा ', ' डोळयांतलि जादू ' वगैरे कवितां-तून उत्कटतेनें प्रकट होत आहे ! यावरून प्रणयाराधन—प्रियतेंत तांबे अद्वितीय आहेत असें कोणीं ह्मटलें तर तें अयथार्थ कसें होईल ? ' वदन मदनरंगसदन ' ह्मणून प्रियेच्या प्रेमांत दंग होऊन केलेलें गोड गुंजन, 'हृदय सांग चोरिलें कशास सुंदरी' असा रोकठोक प्रश्न करीत हृदयसुंदरीबरोबर मांडलेली विनोदगर्भ विरोधभक्ति, ' कुपित अंगनेप्रत ' व ' क्रुद्ध सुंदरीस ' रागांतून अनुरागांत वळ-विण्याकरितां त्यांची केलेली मनधरणी आणि ' गे शपथ तुझी ' ह्मणत ' माझेपण तुझिया उरीं मुरें ' अशी प्रियेला दिलेली कबुली हीं सर्व तांब्यांच्या प्रेमी पुरुषांचीं प्रणयाराधनें रसिकचित्तांना निःसंशय मोहविणारीं आहेत ! परंतु एकंदरींत प्रेमवर्णनाच्या बाबतींत तांबे जुन्या जमान्यांतलेच कवि वाटतात. २० व्या शतकांतील प्रेमाची

पोपटपंची त्यांच्या कवितेंतून मुळींच ऐकूं येत नाहीं. उलट ' अहो धन्वंतरी ! ', ' माळिण ', ' जोगी ' वगैरे त्यांच्या अगदीं अलीअलीकडच्या प्रेमपर कवितांतील नायकनायिकांचा प्रणयसंवाद तर फारफार पूर्वींच्या काळांतला वाटतो. नोकरीच्या निमित्तानें तांब्यांना राजपुतान्यांतही कांहीं काळ काढावा लागला होता, त्यावेळीं तिकडील युवयुवतींच्या प्रेमाचीं वर्णनें त्यांनीं ' राजकन्या व तिची दासी ', ' फेरीवाला ', ' बिजली जशि चमके स्वारी ! ', ' मुशाफिर आम्ही ' वगैरे कवितांतून केलेलीं आहेत आणि त्या कवितांना वीर रसाचें अधिष्ठान दिलें असल्यामुळें तर त्यांत एक प्रकारची विशेष आकर्षकताही उत्पन्न झालेली आहे. ' बिजली जशि चमके स्वारी ! ' ही कविता वाचीत असतांना अजाच्या पराक्रमामुळें हृष्ट झालेल्या पण लज्जाशील असलेल्या इंदुमतीचें कालिदासानें केलेलें वर्णन एकदम आठवतें. " माझीं सारीं प्रेमगीतें मला माझ्या पत्नीवरील प्रेमामुळेंच लिहितां आलीं. मी जर प्रीतीचा स्वाद घेतला नसतां तर तिच्या अभावीं प्रीतीची एक ओळही मला खरडतां आली नसती " असें स्वतः तांब्यांनीं ह्मटलें असून त्याची प्रचीति पत्नीला उद्देशून असलेल्या त्यांच्या कवितांतून उत्तम प्रकारें पहावयासही मिळते ! तांब्यांच्या आयुष्यांत पत्नीप्रेम खरोखरच ओतप्रोत भरून गेलेलें आहे. आपल्या पत्नीच्या सुधामधुर प्रेमामुळें लाभलेल्या अपार मनस्तुष्टीचें वर्णन त्यांनीं ' जीवित साफल्यां ' त केलेलें वाचून व

" ही अपूर्व शक्ति सगुण
झाडितसे मम अंगण
माझं भाग्य बघुन
जळफळतिल देव ते ! "

असे अहोभाग्याचे उद्गार ' सहज तुझी हालचाल ' या कवितेंत काढलेले ऐकून त्यांच्या पत्नीप्रेमाचा अदमास कोणलाही चांगल्या

रीतीनें होऊं शकतो. त्या अदमासावरून त्यांना पत्नीप्रेमाची एक प्रकारची निशाच चढलेली आहे, असें जरी कोणीं म्हटलें तरी तें फारसें अतिशयोक्तीचें होणार नाहीं! कारण, ' शुक्राच्या चांदणी '–कडे किंवा ' क्षिप्रा–चमळा–संगमा ' कडे पाहून त्यांतही ते पत्नी-प्रेमाची साक्ष शोधावयास जातात व दयिता हीच अधिदेवता होय असा भाव ठेवून ते ' सारा सद्‌गुणसंघ ' तिच्या ' आदर्शरूपी मुखीं ' प्रतिबिंबित झालेला पाहतात! ( कदाचित् कधीं काळीं ) विपदा आपल्या मानगुटीवर बसली असतांना सदा संसाराला जुंपलेल्या प्रिय पत्नीला ' सुखाचा वारा ' लागत नाहीं म्हणून ते मध्येंच हळहळतात आणि तिचें बाह्य स्वरूप पाहून तिच्या अंतरंगाविषयीं विपरित कल्पना लोकांकडून होत असल्याचें समजून ' जन म्हणाति तुज सांवळी ' यांत तिची समजूत घालत बसतात! अस्तु. हें स्वतःच्या पत्नीविषयींचें तर राहोच पण एकंदर स्त्री समाजाविषयींही तांब्यांच्या ऋजु अंतःकरणाला असेंच आदराभिमानमिश्रित प्रेम वाटतें व त्या समाजाच्या सुखाची अनेक परींनीं होणारी पायमल्ली पाहून त्यांचें द्रवलेलें अंतःकरण त्या समाजाविषयी नितांत सहानुभूतीचे शब्द बोलूं लागतें. ' भयचकित नमावें तुज रमणी ' या कवितेंत त्यांचें उदात्त स्त्रीदाक्षिण्य प्रकट झालेलें असून कुमारिकेला 'सौभाग्यवती भव ' असा आशीर्वाद देतांना

**" स्वर्गस्थ ज्योति अस्वस्थ धरेवर याया।**
**अति आतुर तुजला ' आई ' संबोधाया॥ "**

असे दिव्योद्गार आपोआप त्यांच्या मुखावाटें बाहेर पडलेले आहेत. हिंदु विधवांचा प्रश्न समाजसुधारकांबरोबर वाङ्मयसेवकांनींही हातीं धरलेला आहे व त्या विधवांचीं गाऱ्हाणीं आणि मनोव्यथा लोकांच्या कानांवर घालून त्यांच्याबद्दल सहानुभूति उत्पन्न करण्याची कामगिरी त्यांनीं बजाविली आहे. तांब्यांनींही या विषयाला आपल्या कवितेंतून स्थान दिलें आहे. त्यांनीं एकंदर सहा विधवा लोकांपुढें उभ्या केल्या

आहेत. त्यांची पहिली विधवा दिवंगत पतीच्या सहवासाचा लाभ 'स्वप्नां'त घेत असतांना आढळतें. त्या सहवासानें अगदीं आनंदित होऊन ती आभासित पतीच्या पाठोपाठ जाऊं लागणार इतक्यांत जागृत झाल्यामुळें एकदम सुखसागरांतून दुःखाच्या खोल गर्तेत फेंकून दिल्यासारखी होते व मग त्याच स्वप्नसृष्टींत पुनः कायमची निमग्न होण्याची इच्छा करते. नंतर दुसरी विधवा 'आत्मयज्ञ' करतांना दिसते. पति मेला ह्मणून त्याबरोबर स्त्रीचे नैसर्गिक मनोधर्म कांहीं मरत नाहींत, यामुळें ती विधवा सहानुभूति बाळगणाऱ्या आपल्या नवीन प्रियकरास रात्रीं चोरून पत्र लिहिण्याचें धाडस करतें; परंतु लगेच तिचें पापभीरु, किंबहुना समाजभीरु मन तिला खाऊं लागून पत्र फाडावयास लावतें. इतकेंच नव्हे तर, ज्या बोटांनीं तें पत्र लिहिलें त्या बोटांना प्रायश्चित्ताखातर दिव्यानें जाळून घेण्यासही प्रवृत्त करतें आणि नंतर सारखे झुरणीस लावून शेवटीं देहत्यागापावेतों मजल नेऊन पोंचवितें! पुढें तिसरी विधवा मृत पतीला विसरून जाऊन दुसऱ्या पुरुषाविषयीं ओढ घेत असलेल्या आपल्या मनाची व त्याच्या सेवेसाठीं झटूं पहात असलेल्या देहाची स्थिति 'बघुनि तया मज होय कसेंसें' यांत निवेदन करीत त्या मनाला आणि देहाला समाजभीतीच्या अवजड दडपणाखालीं कशीबशी डांबून टेवित असलेली पहावयास मिळते. यानंतरची चौथी विधवा, तिच्याजवळ थोर अंतःकरणानें आपली पत्नी होण्याची इच्छा प्रकट करणाऱ्या पुरुषास, 'हिंदु विधवेचें मन' किती उदात्त व संयमनशील असतें हें दाखवित असतांना दिसतें.

> **"भगिनी होइन, दासी होइन**
> **भक्त होउनी चरणां पूजिन**
> **तुमच्या वाटा केशीं झाडिन"**

**एवढ्या गोष्टींला तयार असतांना मग**

> **"अधिक पत्निपणिं काय कृपाळा?"**

अशी त्या पुरुषाला ती कांकुळतीनें जाबही विचारते! पुढें पांचवी विधवा घरांतील माणसांच्या जांचाला कंटाळून आधींच कंटाळवाणा झालेला असहाय जीव 'गंगामाई'ला अर्पण करण्याकरितां 'नदितिरीं उभी' राहिलेली आढळते. ती आतां नदींत उडी घेणार तोंच पोटच्या पोराचा 'आई आई' असा हंबरडा ऐकून हृदय एकदम वात्सल्यानें उचंबळून आल्यामुळें कृतनिश्चय मागें घेत

**" मोलमजूरी करीन बाळा,**
**भिक्षा मागिन रे वेल्हाळा,**
**परि भरीन हीं तोंडें चिमणीं "**

असें ह्मणत पोरासाठीं जिवंत राहून स्वावलंबनाचा निर्धार करते. यानंतरची शेवटची सहावी विधवा 'ते कांत यापुढें, मीहि तयांची कांता!' असें घनगंभीर वाणीनें ह्मणत समाजभीति, लोकनिंदा, रूढिबंधन वगैरे गोष्टींची मुळींच पर्वा न करतां पूर्ण सुधारक बनून प्रेम जडलेल्या पुरुषाला आपल्याबरोबर लग्न करण्यास धडाडीनें प्रवृत्त करीत असलेली दिसते! अस्तु. तांब्यांच्या या वरील सहाही विधवा ह्मणजे खरोखर विधवा–पुनर्विवाहाच्या विचार–मार्गातल्या गेल्या ५० वर्षांतला अंतरक्रम दाखविणाऱ्या शिलाच होत! या विधवांबरोबर विधुरांवरही तांब्यांनीं दोनचार कविता केलेल्या आहेत. त्यांत 'शिशु-वंचन' व 'मुलाच्या विवाहकालचे एका विधुराचे उद्गार' या दोन कविता विशेष उल्लेखनीय आहेत. करुण रसाचा आविष्कार तांब्यांनीं प्रायः या विधवा आणि विधुर यांच्यावरील कवितांतच अधिकतेनें केलेला आहे. तांब्यांनीं सातआठ शिशुगीतेंही लिहिलीं आहेत व त्यांत मुलांना आवडणारे विषय व समजणारी भाषा यांचा मधुर संगम साधण्याचा प्रयत्न बऱ्याच यशस्वी रीतीनें केला आहे. १९०७ सालीं त्यांनीं 'वारा', 'चिमणी' व 'आतां गडि फू दादाशीं' या कविता लिहिल्या, तशाच अलीकडे सन १९३५ त ही 'स्फुट ओव्या',

' कुणि असेल ग ! असेल बोबडकांदा ' वगैरे कविता रचिल्या. ' माउली ', ' भूपाळी ', ' अंगाईगीत ' याही त्यांच्या एतद्विषयक कविता उच्च दर्जाच्या असून त्यांत त्यांची वत्सलवृत्ति उत्कटतेनें प्रतिबिंबित झालेली आहे. ' भूपाळी ' ही कविता तर कोमल भावांची अभिव्यक्ति व नादमधुर शब्दयोजना यांच्यामुळें अतीव रम्य उतरली आहे.

" जागति गोठ्यांत गाइ
पाजति वत्सांस पाहिं
ये, रांगे,
कळ लागे
माझिया स्तनांला ! "

हें त्यांतील शेवटचें कडवें मातांना आनंदानें वेड लावल्यावांचून रहात नाहीं ! राष्ट्रीय ऊर्फ देशभक्तिपर अशी कविता तांब्यांच्या हातून थोडीफार झालेली आहे. देशासाठीं देह आणि वाणी हीं दोन्हीं झिजवावींत अशी मनापासून इच्छा असली तरी पोटासाठीं संस्थानांतील दास्यत्वाची वृत्ति कायमची पत्करल्यामुळें त्यांना ती इच्छा परिमितपणेंच पुरी करून घ्यावी लागली आहे आणि ह्मणूनच देशभक्तिपर कविता आळवूं पाहणाऱ्या त्यांच्या प्रतिभेची अवस्था पंख जळाल्यामुळें लोळागोळा होऊन पडलेल्या संपातीसारखी झालेली आहे ! ' मातृभूमीप्रत ' या कवितेंत तांब्यांनीं आपल्या हातून मातृभूमीच्या उपकाराची फेड कांहींच होत नाहीं या जाणीवेच्या तीव्रतेनें बोंचणाऱ्या शल्यानें आपलें हृदय किती व्यथित झालेलें आहे हें स्पष्टतेनें ध्वनित केलें आहे. ते मातृभूमीला ह्मणतात कीं, आजपर्यंत तुझ्या उराखांद्यावर वाढून मी केव्हांही तुझ्याशीं प्रेमाचा शब्द बोललों नाहीं किंवा कधींही तुझी सेवा करण्याचें मनांत आणलें नाहीं; उलट

" जे त्वत्पुत्र उदारधी झिजविती काया तुझ्या सेवनीं

**जाळाया निज पोट ही शिणविली वाणी तया निंदुनी**
**व्हावा तोष धन्यास यास्तव सदा मीं हांसलों त्यांजला "**

आणि असे घोर अपराध आपलेकडून घडले असतांही त्या मातृभूमीची करुणा भांकून ते शेवटीं तिला कांकुळतीनें विचारतात

**" आतां तूं कुरवाळशील वद कां ऐशा कुपुत्रा मला ? "**

असहकारितेच्या काळांत तांब्यांनीं ' अशांचें कोण करिल तरि काय? ' ' कोण रोधील ? ', ' प्रतिज्ञा ', ' वाटलें नाथ हो ! तुम्ही उतरतां खालीं ! ' वगैरे कविता रचून त्यांत आपल्या मनाच्या त्यावेळीं झालेल्या स्थितीचें, तळमळीचें, उत्साहाचें व आशानिराशांचें वर्णन उत्कटतेनें केलेलें आहे ! यांशिवाय पाश्चात्यांच्या, परकियांच्या भुलावणीनें आपण आपल्यालाच सर्वतोपरि कसें नागवून घेत आहोंत याचें वर्णन ' घटोत्कच–मायें ' त विनोदानें केलेलें आहे; पण याच्या उलट समाजांतील विषमतेमुळें दनिदुबळ्यांवर होणारे नानाप्रकारचे अनर्थपात कायमचे टळावेत आणि विषमता अगदीं रसातळाला जावी ह्मणून ' रुद्रास आवाहन ! ' मात्र रणांगणावर शोभणाऱ्या आवेशांत अगदीं धीर–गंभीर वाणीनें केलेलें आहे ! त्यांची ' साम्राज्यवादी ' ही कविताही चांगली असून ' दुष्काळानंतरच्या सुकाळां ' त कृषीवल जीवनाचें रेखाटलेलें प्रसन्न चित्र नितांत आकर्षक आहे. सन १९२१ च्या ऑगस्टमध्यें तांबे अत्यंत आजारी झाले व आपली इहलोकची यात्रा आतां संपली असें समजून त्यांनीं पुढच्या प्रवासासाठीं मनाची तयारी केली. त्या तयारीचें वर्णन त्यांच्या ' प्रस्थान ', ' घाबरूं नको ', ' आलों, थांबव शिंग ', ' जन पळभर ह्मणतिल हाय हाय ! ', ' निरोप घेतांना ', ' मरणांत खरोखर जग जगतें ', ' चंद्रा, मार्ग धरी अपुला ' व ' आगगाडी बदलली ' या आठ कवितांतून पहावयास मिळतें. तांब्यांच्या आध्यात्मिक कविताही बऱ्याच असून त्या प्रायः सर्वच उत्कृष्ट आहेत. ' आलें तुझ्या रे दारीं नृपा ' यांतील अनंताची

लागणी, ' साउलीं ' तील दुरत्यय अशा मायेची भुलावणी, ' घट भरा शिगोशिग ' यांतील माया दूर झाल्याशिवाय सच्चिदानंदाचा साक्षात्कार होत नाहीं हा उपदेश, ' प्रेमरत्नास ' यांतलें आत्मतत्त्व, ' आरोहणां ' तला आत्म्याचा विकास, ' नटेश्वराच्या आरतीं ' तील विश्वोत्पत्तीची मीमांसा, ' मनोमय चित्रें रचि सुंदरी ! ' यांतील मूर्तापेक्षां अमूर्तांतच रंगून जाण्याची मनाची स्वाभाविक प्रवृत्ति, 'कवणें मुलखा जाशी ? ' व ' रतलें परपुरुषाशीं ! ' यांतलि परमेश्वराशीं मीलनोत्सुक झालेल्या आत्म्याला केलेला प्रश्न व त्याचें मिळालेलें उत्तर या सर्वांपासून तत्त्वजिज्ञासूंना आनंद आणि उद्बोधन या दोहोंचा लाभ झाल्यावांचून राहणार नाहीं. ' प्रभु तुज कवणें परि ध्याऊं ', ' निशिदीनिं तुज हरि ध्याइन का मी ? ', ' वंदन व्हावें हरि मम जीवित ', ' हरि अर्पावें काय तुला मीं ? ' वगैरे ईश्वराला भक्तीनें आळविणाऱ्या तांब्यांच्या कविताही चांगल्या आहेत. यांतील कांहीं कविता तर मुंबईच्या प्रार्थना समाजाच्या ' सुलभ भजनसंग्रहा ' च्या ५ व्या आवृत्तींतही घेतलेल्या आहेत. तांब्यांच्या इतर उपदेशपर कवितांपैकीं ' कळा ज्या लागल्या जीवा ' यांत ध्येय आणि परिस्थिति या दोहोंनीं ओढल्या जाणाऱ्या जीवाची ओढाताण उत्तम रीतीनें दाखविली असून ' किति महामूर्ख तूं शहाजहां ' यांत एका उपयुक्ततावाद्यानें ताजमहाल उभारणाऱ्या शहाजहान बादशहावर उपरोधिकपणें झोडलेलाताशेरा दिला आहे. अस्तु. येथपर्यंत झालेल्या तांब्यांच्या समग्र कवितांच्या सिंहावलोकनावरून ते खरोखरच एक थोर, प्रतिभासंपन्न कवि आहेत, असें कोणालाही दिसून येईल. ' गारुडी ', ' संध्या तारक ', ' प्रीतीचा वास ' वगैरे त्यांच्या आरंभींआरंभींच्या आठदहा कविता उघड रीतीनें इंग्रजीवरून भाषांतरलेल्या आहेत व बाकीच्या सर्व स्वतंत्र–स्वयंस्फूर्त आहेत. तसेंच त्यांच्या कवितेचें वळणही बरेंच नाविन्यपूर्ण आहे. भाषेच्या दृष्टीनें त्यांच्या

'आठवती ते दिन', 'ललने चल लवलाही', 'रासमंडळ गोपीचंदन' वगैरे थोड्याशा कवितांवर 'गीतगोविंद' कर्त्या जयदेव कवीची छाप पडलेली दिसून येते आणि कल्पना–विचारांच्या बाबतींत कांहीं कवितांमधून विश्वकवि रवींद्रनाथ टागोरांच्या 'गीतांजली' चे स्पष्टास्पष्ट पडसाद ऐकूं येतात. यांशिवाय 'सक्रुण सुमुखि! उत्थान न करि गे!', 'लीन लयीं का तया प्रतीक्षिति' अशा अवास्तव संस्कृतप्रचुर पंक्तीही त्यांच्या कावितेंतून तुरळकपणें आढळतात व रांगडी मुलुखांतल्या वास्तव्यामुळें ढोर, चुगल, बिछोना, सुनेरी सारखे प्रांतिक शब्दही मधून मधून शिरलेले दिसतात. तसेंच केवळ वृत्तसुखार्थ उपयोजिलेले ताहन, पलटली, आजुनी, दीसंदीस वगैरे कांहीं विकृत शब्दही दृग्गोचर होतात; तथापि वरील सर्व दोष मनोनेत्र दिपवून टाकणाऱ्या त्यांच्या दिव्य प्रतिभादीप्तिपुढें एकदम जाणवत नाहींत व जाणवले तरी फार वेळ समोर टिकून रहात नाहींत! तांब्यांची काव्यसृजनशक्ति तर खरोखरच असाधारण आहे! आपल्या जीविताचा वसंत गेला, दिन ढळला, मधुघट रिकामे पडले असे जरी ते वेळोवेळीं ह्मणत असले तरी ते त्यांचे उद्गार विनयशीलतेचे द्योतक होत. कारण, ते रिकाम्या ह्मणत असलेल्या घटांतून भावनेचा मधु अजून इतका ओसंडत असलेला दिसून येतो कीं, रसिकांनीं जरी त्याचें मनसोक्तपणें आकंठपान केलें तरी द्रौपदीच्या थाळीप्रमाणें ते घट कधींच रिकामे होणारे खास नाहींत! 'भक्तिनें दिलीं, ह्मणुनि तरि घेणें' अशी तांब्यांनीं आपलीं काव्यसुमनें स्वीकारण्याकरितां रसिकांना लीनतेनें विनंति केली आहे व त्याबरोबर तीं काव्यसुमनें त्यांच्याकडून अनास्थेनें कुस्करलीं न जावोत ह्मणून साशंक भीतिही प्रदर्शित केली आहे; परंतु तो त्यांचा भ्रम होय. कारण अशीं 'सुमनें' कुस्करणारा रसिक खरोखर अरसिकच ठरेल व खरा रसिक त्या 'सुमनां' ना शिरोधार्य मानणाराच दिसेल! तांब्यांच्या कवितेच्या खालोखाल त्यांचे

सहृत् व मागील कविपिढींतील एक नामांकित कवि नरहर शंकर रहाळकर यांच्या कवितेची गणना होते. सन १९२३ मध्यें रहाळकरांचा कवितासंग्रह ‘ पुष्पांजलि ’ या नांवानें ‘ होळकर सरकार पुस्तक मालें ’ तून १५ वें पुस्तक ह्मणून प्रसिद्ध झाला. या ‘ अंजलीं ’ तील ‘ पुष्पां ’ ची संख्या ७७ असून त्यांतील मोजकीच दोनचार वगळतां बाकीचीं पुष्पें सन १८९८ पासून १९०४ पावेतोंच्या अवघ्या ७ वर्षांच्या काळांत रहाळकरांच्या प्रतिभावेलीवर फुललेलीं आहेत. हा काळ त्यांच्या १६ ते २२ वर्षें वयाचा होता ! त्यानंतर रहाळकरांनीं कविता लिहिली नाहीं असें मुळींच नसून प्रसंगोपात्त राजभक्तीला वाहिलेली अशी थोडीफार कविता त्यांच्या हातून झालेली आहे; परंतु एकंदरींत कवि ह्मणून त्यांचा खराखुरा अवतार १९०४ सालींच संपला; तथापि त्यानंतर श्रेष्ठ काव्यमर्मज्ञ टीकाकाराचा दुसरा अवतार घेऊन ते अजूनही महाराष्ट्रापुढें उभे आहेत. त्यांचे केशवसुत व विष्णुपंत सरवटे या सत्कविद्वयाच्या कवितांवरील टीका प्रबंध विद्वन्मान्य ठरले असून अलीकडे त्यांनीं महूच्या यशवंत खंडेराव कुळकर्णी यांच्या कवितासंग्रहाला लिहिलेली प्रस्तावना व कालिदासकृत ‘ शाकुंतल ’ नाटकावर लिहिलेला सौंदर्यसमीक्षणपर प्रबंध तितक्याच योग्यतेचे उतरले आहेत आणि त्या सर्वांतून त्यांचें उत्कट काव्यप्रेमही आपोआप प्रकट झालें आहे ! काव्यस्फूर्ति आपणास अंतरली असें पाहून

“ गानमय सगळें
सगळें विश्व दिसें
हृदयिं मन गान न केविं वसे ?

× × × ×

जाहलें मूक
मूक जरी गान
हृदय परि पिळतें आंतून ! ”

असे उद्वेगपूर्ण उद्गार रहाळकरांनीं बरेच वर्षांपूर्वी काढले होते. तसेच उद्गार " कवि या नात्यानें मी १९०४ सालीं मेलों असून सध्यां माझें भूत वावरत आहे असें मला वाटतें " म्हणून ते हल्लींही काढीत असतात; परंतु हे उद्गारसुद्धां एक प्रकारचें काव्यच होय ! केशवसुतांनीं ' तुतारी ' व रे. टिळकांनीं ' रणशिंग ' फुंकून मराठी काव्यसृष्टींत नवयुगाचा उपःकाल सूचित केला. त्यावेळीं त्यांच्या पाठोपाठ जी शिलेदार मंडळी पुढें आली त्यांतीलच रहाळकर हे एक होते. केशवसुतांविषयींचा पूज्यभाव अजूनही रहाळकरांच्या ठायीं कायम असून ते कवि या नात्यानें त्यांना आपले गुरु मानतात. वयाच्या १३–१४ व्या वर्षीच रहाळकरांनीं कविता रचण्यास सुरुवात केली. त्यांची त्या वेळची कविता विशेषतः ' न्यायसुधा ', ' न्यायसिंधु ', ' हिंदुपंच ' व ' इंदुप्रकाश ' या वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झाली; परंतु त्यांच्या कवितेला खरें स्वरूप केशवसुतांच्या सहवासानंतरच प्राप्त झालें, असें त्यांनीं स्वतः ' केशवसुत आणि त्यांची कविता ' या आपल्या टीका-प्रबंधांत म्हटलें आहे. प्रांजळ व प्रौढ भाषा, विषयाशीं उत्कट तादात्म्य, आल्हाददायक कल्पनाविष्कार आणि साध्या शब्दांत अर्थपूर्ण सिद्धांत ग्रथित करण्याचें कौशल्य हे गुण रहाळकरांनीं केशवसुतांपासूनच उचलेले दिसतात. त्यांच्या ' पुष्पांजली ' वर अभिप्राय देतांना साहित्याचार्य नरसिंह चिंतामण केळकर यांनीं ' सहृदयता हा कवीचा प्रधान गुण होय आणि तो रहाळकरांच्या कवितेंत सर्वत्र आढळतो ' अशी ग्वाही दिली असून त्याचें पुष्टीकरण ' पुष्पांजली ' चा आमोद रसिकांपावेतों पोंचविण्याचें गंधवाहकाचें कार्य करणाऱ्या प्रो. श्रीकृष्ण नीलकंठ चापेकर यांनीं केलें आहे. ' पुष्पांजलीं ' तील एकंदर ७७ कवितांपैकीं २८ कविता प्रेमविषयक आहेत. उत्कट प्रेमाची खरी कल्पना या कवितांच्या पर्यालोचनानें सहज होण्यासारखी आहे.

" प्रीती वसते संयोगीं नच, परी वियोगीं खरी
वाटे सत्या कवि-वैखरी "

असें रहाळकरांनीं ' उत्तर ' या कवितेंत म्हटलें आहे व तें मनाला पटल्यामुळेंच कीं काय, प्रीती-परिचयासाठीं प्रेमीजनांच्या विरह-दुःखाचींच गीतें त्यांनीं अधिक गाइलीं आहेत ! ' सखि-विरह ' व ' विरहगीत ' या त्यांच्या गीतांत प्रियकरास प्रियेच्या भेटीची लागलेली अनावर उत्कंठा आणि त्यांच्या विरहविकल मनाचा माजलेला गोंधळ यांचें वर्णन बहारीनें केलेलें असून ' पत्रिका ', ' उत्तर ', ' उभयतांच्या सौख्यास पुरेसा तो ', ' राग माझा वाईट असा आहे' या प्रिया-प्रिय-करांच्या प्रेमपत्रिकाविषयक कवितांतून त्याच गोष्टींचीं सुरेख चित्रें रेखाटलीं आहेत. त्यांतल्या लटक्या रागाच्या व उत्कट अनुरागाच्या कांहीं छटा तर अतिशय चित्ताकर्षक आहेत. ' प्रेमोद्गारां ' त प्रियेवर स्तुतिसुमनांची नुसती वृष्टीच केली आहे. आणि ' धिक्कारां ' त अविचारानें प्रियेच्या कोमल हृदयावर कटु वचनांची कुठार हाणून तिनें ओंठाला लावलेला प्रेमाचा पेला झुगारून दिल्याबद्दल प्रियकरानें स्वतःची पश्चात्तापपूर्वक निर्भत्सना करून घेतली आहे. तसेंच पति-पत्नींचें प्रेम किती निःसीम व अन्योन्य असतें हें ' स्वप्न ' कवितेंत दाखवून अनुरूप पत्नीच्या सहवास-सान्निध्यानें पतीला हें जग किती सुखमय भासतें याचें काव्यमय वर्णन ' गृहिणी ' कवितेंत केलें आहे. ' प्रियेचें चुंबन ' व ' प्रीतीचें चुंबन ' हे चुंबनविषयक चुटके असून ' सखीचे अश्रु ' हाही चुंबनाचीच महती गाइलेला चुटका आहे व हे तिन्ही चुटके चटकदार आहेत. प्रीतीचा चटका लावून प्रियेनें शेवटीं दगा दिल्यामुळें प्रेमी पुरुषाच्या विषण्ण चित्तांतून निघालेले उद्गार ' जग मजला होय पारखें ' या कवितेंत ऐकविले आहेत व ' चंद्राप्रत ' या कवितेंतही अशाच एका प्रेमहत वेड्यानें अस्ताचला-कडे जांणाऱ्या चंद्रास ' तूं मदनबाणानें विद्ध झाल्यामुळें अथवा

एखाद्या देवतेनें झिडकारल्यामुळें असा खिन्न व पांडुरवर्ण झाला आहेस कीं काय ? ' असा प्रश्न करून शेवटीं ' जर तूं स्वर्गांत असतांना तेथें प्रेमशल्य तुला इतकी पीडा देत आहे तर भूलोकीं असणाऱ्या माझ्या-सारख्या मनुष्याला त्यायोगें व्यथा व्हावी यांत आश्चर्य नाहीं ' असें ह्मणून स्वतःचें समाधान करून घेतलें आहे. '...प्रत ' ही कविताही याच वर्गांतील आहे. ' शंकेखोर प्रियकरास उद्देशून ' या कवितेंत आपल्या प्रीतीविषयीं अकारण साशंक झालेल्या प्रियकराला आपली प्रीति खरोखरच किती निर्भेळ व पवित्र आहे याची खात्रीं करून देण्याचा प्रियेनें परोपरीनें प्रयत्न केला आहे. ' रूपांत प्रीतीचा जन्म होतो ' ही कवीची कल्पना किती कोती आहे व प्रीतीचें खरें उगम-स्थान हृदय कसें आहे हें स्वतः रूपसंपन्न असलेल्या प्रियेनें आपल्यावर प्रीति नसलेल्या प्रिय सख्यास ' सौंदर्य आणि प्रीति ' या कवितेंतून मार्मिकतेनें सोदाहरण पटवून दिलें आहे. अढळ मातृनिष्ठा व निरुपम मातृवात्सल्य प्रकट करणाऱ्या अशा रहाळकरांच्या ५-६ कविता आहेत त्यांतील ' दिवाळी ', ' आईचें चित्र ' व ' मातृस्मृति ' या तीन कविता त्यांना प्रसंगोपात्त स्वतःच्या आईची आठवण होऊन स्फुर-लेल्या आहेत आणि ' माझी आई ' ही कविता तर त्या आईच्या निधनोत्तर अशौच कालांतच त्यांच्या हातून निर्माण झालेली आहे त्यामुळें तिच्यांत ताज्या दुःखाचे उमाळयावर उमाळे आलेले दिसणें साहजिक आहे. ' तान्हुला ' ही कविता मातृवात्सल्यानें अगदीं ओथंबलेली आहे. तान्हुला झोंपेंत स्वप्न पहात असतांना आईनें त्याच्याकडे आपले वात्सल्यपूर्ण नेत्र लाविले आहेत व त्याचें दचकणें, रडवें तोंड करणें, रागाचा आविर्भाव दाखविणें व शेवटीं गालांतल्या गालांत हंसणें या क्रिया पाहून तिच्या अंतःकरणांत धडकी भरल्यामुळें तिनें काढलेले उद्गार या कवितेंत ग्रथित केलेले आहेत. त्यांतील

" कुणिकडे

लपवुं या गडे
जगापासोनी
कां हृदय फाडुनी ठेवुं आंत लपवोनी ! ”

हे तिचे शेवटचे उद्गार तर अपत्यप्रेमाची परमावधि प्रकट करणारे आहेत तसेंच आपल्या एकुलत्या एक कन्येचें लग्न झाल्यावर ती सासरीं जाण्यास निघतांना खुळ्या मातृहृदयाची होणारी स्थिति ‘ आईची विनवणी ’ या कवितेंत दाखविलेली आहे. या कवितेच्या शेवटच्या भागांत ज्यावेळीं आई विहिणीला भगिनी ह्मणून संबोधून आपल्या पोटच्या गोळा तिच्या पदरीं निरवतांना ‘ इजसी सांभाळा आतां ’ असें सांगतें त्यावेळीं तर वत्सल आणि करुण हे दोन्ही रस अगदीं एकजीव होऊन हृदयाला विरघळून टाकतात ! ‘ माझी बहीण ’, ‘ ओवाळणी ’ व ‘ आग ’ या मृतभगिनीच्या स्मृतीवर रचिलेल्या कविताही करुणरसात्मक असून ‘ ताईची संक्रांत ’ यांत गतभर्तृका भगिनीनें संक्रांतीच्या दिवशीं स्वतःच्या दुर्भाग्याबद्दल काढलेले हृदयविदारक उद्गार ऐकविले आहेत व तसेंच सरसहा हिंदु विधवांचें दुर्धर दुःख पाहून आपलें तळमळणारें अंतःकरण रहाळकरांनीं ‘ विधवांचें गाऱ्हाणें ’ यांत ओतून दिलें आहे. सदर कवितेंत पंकांत रुतलेल्या त्या गाईच्या उद्धारार्थ रुढिविच्छेदनाचा उपदेश केला आहे.

“ रुढी आह्मिच पाडिली, जगिं न ती स्वयें पातली,
तदंकित अम्हीं न, ती खचित किंकरी आपुली.
× × ×
अरी प्रगतिला घडे अडथळा जुन्या रूढिनें
शृंगारुनि तिला बळें नव रुढी तरी पाडणें
× × ×
जुने कुणिकडे तरी दिन नवीन कोणीकडे ?
न लक्ष पुरवाल कां तिळहि कालमानाकडे ?

जुनें नभ परी नवे किति तयांत ते तारक
जमीन जुनि दे परी न नव पीक का मोहक ?
महार्णव जुना नवीं तरिहि काय रत्नें न वी ?
जुन्यांतुनिच जें नवें निघत तें मना तोषवी ! ”

या पंक्तींतून आपल्या उपदेशाच्या समर्थनार्थ त्यांनीं केलेला युक्तिवाद-ही समाधानप्रद आहे. ही कविता विधवाविवाहाला ‘ अब्रह्मण्य ’ ह्मणून नाकें मुरडण्याच्या काळांत सुधारक वर्गामध्यें विशेष प्रसिद्धि पावली होती असें ह्मणतात. राष्ट्रीय कविता ह्मणून सबंध ‘ पुष्पांजली ’-त एकही कविता नाहीं व ऐतिहासिक वर्गांत जेमतेम गणल्या जाऊं शकतील अशाही ‘ जागृति ’, ‘ अवंतिकेम ’ व ‘ होळकरांचा फटका ’ या काय त्या तीनच कविता आहेत. बाह्यतः नांवांवरून सृष्टिवर्णनात्मक पण वस्तुतः आंतून गूढ तत्त्वें निवेदन करणाऱ्या ‘ गुलाबाचें फूल ’, ‘ कालची पुष्पकलिका ’, ‘ रानांत उमलेलें फूल ’, ‘ सायंस्वप्नें ’, ‘ सरिता ’, ‘ दोन फुलें ’ व ‘ ओसाडी ’ अशा सात कविता असून त्यांच्यांतील प्रतिभेची भरारी, कल्पनाविशेष, रचनाप्रकार व भाषाशैली या सर्व बाबतींत केशवसुतांच्या पद्धतीचा अवलंब केला गेला आहे. रहाळकरांचा विनोदी स्वभाव व त्यांची आनंदी वृत्ति हीं त्यांच्याशीं प्रत्यक्ष परिचय असणाऱ्या व्यक्तींस पूर्णावगत आहेतच. परंतु तसा परिचय नसणाऱ्या व्यक्तींना तीं अवगत होण्यास ‘ एका कुरूप कवीचे विचार ’ ही त्यांच्या विनोदी कवितांतील एक कविता पुरेशी आहे. शेक्सपियरच्या रिचर्डाप्रमाणें कुरूपतेचें सुंदर चित्र या कवितेंत पहावयास मिळतें. वारुणीवरचा ‘फटका’, रडक्या दैववाद्याच्या उत्साही प्रयत्नवाद्यानें केलेल्या निर्भर्त्सनेचा ‘ फटका ’, संपन्नांनीं विपन्नांशीं कसें वागावें हें आपल्या संवादांतून दाखविणारी ‘ तारा आणि काजवा ’ कविता या सर्व उपदेशपर कविता जितक्या जोरदार तितक्याच चटकदार आहेत. उन्मनी अवस्थेच्या द्योतक अशा पांचसहा कविताही ‘ पुष्पांजली ’ त

आहेत. त्यांतील ' ॐ ब्रह्म ' या कवितेंत गूढ ब्रम्हाला मनोहर दृष्टांतांनीं आकलनसुलभता आणली आहे. मायेच्या आवरणानें ब्रह्म झांकून गेलें आहे, त्याच्या प्राप्तीकरितां काय केलें पाहिजे हें सांगतांना रहाळकरांनीं म्हटलें आहे:—

" मायाबंधन तोड हें; नच पुढें राही अतां त्यामधें,
जें जें या जगतीं तयांतिल तुझी आसक्ति घे काढुनी "

म्हणजे केवळ

" ब्रह्मप्राप्ति–नव्हें–स्वयं मग मना ! होशील ॐ ब्रह्म तूं ! "

कृतपापांचा पश्चात्ताप, पापक्षालनाविषयींची उतावीळता, देवसेवेची उत्कंठा, सुखदुःखें हीं ईश्वरी इच्छेमुळें येतात व दुःखांतून देवच सोडवितो अशी श्रद्धा इत्यादि वर्ण्यविषय असलेल्या ' यापुढें ', 'नवी सृष्टि नवा देह ', ' सुख–दुःख ' व ' क्षिप्रातीरावर ' या कविताही चांगल्या आहेत. अस्तु. येथपर्यंत ' पुष्पांजली ' तील ठळकठळक कवितापुष्पांच्या करून दिलेल्या परिचयावरून रहाळकरांचें प्रतिभाशालित्व व काव्यग्रथनकौशल्य या दोन्ही गोष्टी उत्तम प्रकारें प्रत्ययास येण्यासारख्या आहेत. त्यांच्या कवितेमध्यें शब्दमाधुर्य जरी कमी प्रमाणांत असलें तरी ती उगीच रसोत्कटतेनें बरीच भरून निघाली आहे. कल्पनेच्या प्रांतांतल्या उड्याही त्यांच्या कवितेंत फार थोड्या आहेत; परंतु त्या थोड्यांतही ' देवत्वासहि टाकुनी झणि भुतें होतील माझेपरी ! ' अशा प्रकारच्या कांहीं अत्युच्च उड्या तर मनाला थक्क करून टाकणाऱ्या आहेत ! ' माझी बहीण ' ' प्रीतीचें गाणें ', ' तीर आणि गाणें ', ' सरिता ' वगैरे सातआठ कविता उघडउघड रूपांतरित व अनुवादित असल्या तरी एकंदरींत त्यांच्या कवितेचा तोंडवळा इंग्रजी कवितेसारखाच भासतो. शिवाय ' हृदयीं मी प्रेमें तिला लाविलें ' असे इंग्रजी धर्तीचे कांहीं नवीन प्रयोगही त्यांनीं केलेले आढळतात. तसेंच ' अजबरी ' ' परवणी ' ( पर्वणी ) वगैरेसारखी

वृत्तसुखार्थ केलेली विकृत शब्दयोजना आणि 'जेर', 'गुलदस्त' वगैरेसारखी परकीय कर्णकटु शब्दयोजना याही त्यांच्या कवितेंत आढळतात. रहाळकरांच्या 'पुष्पांजलि' नंतर सन १९३० मध्यें ग्वाल्हेरचे भा. र. सावंत यांचा 'बोबडे बोल' हा कवितासंग्रह बाहेर पडला. वास्तविक सावंत हे एक नवे काव्यचिकीर्षु युवक आहेत. तेव्हां त्या दृष्टीनें त्यांचा हा कवितासंग्रह पाहिला म्हणजे खरोखरच त्यास 'बोबडे बोल' हें त्यांनींच दिलेलें नांव अगदीं यथार्थ वाटतें! पुढें सन १९३२ मध्यें महूचे यशवंत खंडेराव कुळकर्णी यांचा 'मानस-निष्यंद' हा कविता-संग्रह 'होळकर सरकार पुस्तक माले'चें २६ वें पुस्तक म्हणून प्रसिद्ध झाला. मध्यभारतांतील विद्यमान कविमंडळांत कुळकर्णी यांची गणना अग्रेसरत्वानें केली जाते. भाषेचें साधें पण प्रगल्भ रूप आणि रम्य कल्पनांची इतस्ततः पखरण यांच्या योगानें त्यांच्या कवितेला अगोदरच गोडपणा आला असून त्यांत पदलालित्य व तालबद्धता यांची विशेष भर पडल्यामुळें तर तो गोडपणा द्विगुणित झाला आहे! शिवाय देवानें त्यांना कंठमाधुर्यही दिलें असल्यानें प्रत्यक्ष त्यांच्या तोंडूनच त्यांच्या त्या गोड कविता ऐकतांना जो एक प्रकारचा अननुभूत आनंद अनुभवायला मिळतो तो तर निःसंदेह वर्णनातीतच होय! 'मानस निष्यंदां'त त्यांच्या एकंदर ७३ कविता संकलित झालेल्या आहेत व त्या कवितांच्या गुणरूपाचा त्रोटक परिचय रहाळकर यांनीं अत्यंत सहृदयतेनें आरंभीं करून दिला आहे. भास्करराव तांबे हे आपले गुरु होत व त्यांच्या काव्यप्रकाशानेंच आपणास स्फूर्तिलाभ झाला आहे असें स्वतः कुळकर्णी यांनीं म्हटलें आहे त्यावरून तांब्यांच्या कवितेचा थोडाफार प्रभाव कुळकर्णी यांच्या कवितेवर पडणें अगदीं स्वाभाविक आहे. शिवाय तांब्यांप्रमाणें त्यांच्या या सच्छिष्याच्याही काव्यनिर्झरिणीचा उगम मनाजोगत्या पत्नीच्या सहवासांत व्यतीत होणाऱ्या आनंदी जीवनांतूनच झालेला असल्यामुळें त्या दोघांच्याही

प्रेमविषयक कवितांतून सारख्या सुखानुभूतीची उदात्तरम्य चित्रें रंगविलीं जाणेंही साहजिक आहे ! तांब्यांनीं आपल्या कवितेंत आपल्या ' वारू ' चा स्पष्ट नामोल्लेख फारफार तर एकदोन ठिकाणींच केला असेल; परंतु कुळकर्ण्यांनीं मात्र आपल्या कवितेंत आपल्या ' इंदू ' चा स्पष्ट नामोल्लेख अनेक वेळां केला आहे. शिवाय तांब्यांनीं आपल्या पत्नीच्या सांवळेपणाची तरफदारी करतांना अवघ्या जनाला खुशाल आंधळें म्हणण्याचें धाडस केलें आहे; परंतु कळकर्ण्यांनीं मात्र तसें धाडस न करतां आपल्या पत्नीचें रूप विशेष सुंदर नसल्याबद्दल आपसांतच एकमेकांच्या भाग्याला दोष दिला आहे ! तथापि बाह्य वर्णरूपावर न भाळतां अंतःसौंदर्यांवरच भाळणाऱ्या या सहृदय कविद्वयाचें पत्नीप्रेम त्यांच्या कवितेंतून अलौकिकत्वाचा सारखा गोड आभास उत्पन्न करणारें आहे. आणि खरोखर असें पत्नीप्रेम असल्याशिवायच

**ऐसे मंगलधाम जेथ फळती ते ईश्वराचे श्रम ।**
**विश्वाचें सुखधाम त्यास म्हणती ' धन्यो गृहस्थाश्रम '**

असे उद्गार कुळकर्ण्यांना आपल्या ' जीवन–संगीतां ' तून कधीं काढतां आले असते काय ? किंवा

**" हीच इंदुमुखि हृदयीं ठसवी**
**हीच सदा सर्वत्र दिसावी**
**हीच तूंहि मजसी । प्रभुजी । काय म्हणूं तुजसी "**

अशी ' अनन्यपूजना ' च्या समाप्तींत त्यांनीं देवाजवळ कधीं मागणी केली असती काय ? अथवा देवाचें ध्यान करतांना देवाच्याऐवजीं पत्नीचीच मूर्ति डोळ्यांपुढें उभी राहून हें ' कोणत्या देवाचें ध्यान ? ' असा संभ्रम त्यांना कधीं झाला असता काय ? कुळकर्ण्यांच्या तशा प्रेमविषयक कविता तर फारच थोड्या आहेत व त्यांत शृंगार रस जवळजवळ नाहींच असें म्हटलें तरी चालेल; तथापि कल्पनाविलास मात्र त्यांत जागोजागीं असून तो अभिनव, उच्च प्रतीचा आहे.

कोणत्याही सुंदरीच्या मुखाचें वर्णन करावयाचें झालें ह्मणजे तिला शशिवदना ह्मणून संबोधावयाचें असा अगदीं ठराविक पुरातन कविसंकेत आहे; परंतु ती कल्पना किती अप्रस्तुत, किंबहुना हिणकस, आहे हें 'शशिवदना ह्मणुं कसें?' या कवितेंत मोठ्या मार्मिकतेनें व तितक्याच बहारीनें दाखविलें असून

**"जगदीशाचें नामहि घेतां गिरि-कुहरीं रखडावें**
**तव नामाचें साधन करितां सदनीं स्वर्ग समावे"**

असा रमणी—नामाचा महिमा. तिच्या भ्रूधनूंतून सुटणाऱ्या नयनशरानें स्वतः होऊन विद्ध होणाऱ्या प्रेमशरणागताच्या तोंडून 'शस्त्र कशास हवें?' या कवितेंत काढविले आहेत. तसेंच रमणीच्या विलोल नयनांचा महिमा 'जादू' कवितेंत वर्णिला आहे. त्या नयनांत स्वर्ग असून धैर्यमेरूला डळमळावयाला लावण्याची अद्भुत शक्तीही आहे; इतकेंच नव्हे तर साक्षात् ब्रह्मदेवालाही झुरावयास लावून जिवंतांना मतप्राय करून टाकण्याचें अचाट सामर्थ्यदेखील आहे, असें प्रतिपादन केलें आहे 'कवीची शरणचिठ्ठी' या मध्येंही मृगलोचनेचा अशाच प्रकारचा महिमा वर्णिला आहे. 'जगावर स्वार्थाची धुंदी', 'दिशाभूल' 'आत्मयज्ञ' व 'मृत्युशय्येवर' यांतील प्रेमाचें नैराश्य जितकें हृदयविदारक आहे जितकेंच 'प्रेमाचें तर्कशास्त्र' व 'मी नाहीं' यांतील प्रेमानें केलेली थट्टा हृदयाल्हादक आहे. 'समर्पण' मधला मातापितरांविषयींचा आदरभाव तर हृदयांतून उफाळून बाहेर पडला असून 'ऋण' कवितेंतली माता, पिता, मित्र व सुहृज्जन यांच्या उपकारांची फेड करण्यासाठीं लागलेली चुटपुट आणि 'निश्चय कवितेंतलें अपंगांस किंवा संकटग्रस्तांस सहाय्य करूं पाहणारा हळवा स्वभाव अत्यंत चित्तस्पर्शी आहेत. 'पतिव्रतेच्या सौभाग्य' वर्णनांतील

**"पतिव्रता ह्या विहिणी असती देवाच्या घरच्या!"**

या उद्गारांनीं तर पतिव्रतांविषयीं असलेल्या अगदीं परमोच्च प्रतीच्या

आदरानें कोणाचें अंतःकरण सद्गदित होणार नाहीं ? तसेंच ‘ जात कोणती ? ’ म्हणून विचारतांना

“ प्रेमळ हृदयें जात तयांची एकच घडली धात्यानें ”

असे काढलले उद्गारदेखील उदात्त आहेत. परंतु ते उद्गार केवळ कल्पनासृष्टीतच विचरित होणारे आहेत. ‘ तरुणास ’ व ‘ पौरुष ’ यांतले विचार अत्यंत तडफदार आहेत. तरुण जीवांना सुप्तावस्थेतून चटकन् जागें करून त्यांच्या अंगांत जोम उत्पन्न करणारी विद्युतोपम शक्ति या विचारांत दिसून येते.

“ मेली कोण ‘ फुकाहि ’ पौरुष जरी स्वर्गातुनी फेंकलें ? ”

ही त्यांतील ओळ तर निःसंशय नेभळटांच्या जिव्हारींच घाव घालणारी आहे. ‘ दास्य ’ या कवितेंत दास्याची निरनिराळ्या दृष्टांतद्वारें महती गाइली असून स्वातंत्र्याचें बीजदेखील दास्यांतच सांपडतें व सेवावृत्ति ही प्रत्यक्ष जगचालक परमेश्वरालाही पत्करावी लागली आहे हें उत्तम प्रकारें दाखविलें आहे आणि शेवटीं सत्व व सत्य यांच्याविषयीं जागरूक राहून सेवा वृत्तीनें जग जिंकण्याचा उपदेश केला आहे. ‘ लग्नसोहळा ’, ‘ जागृति ’, ‘ निर्भत्सना ’ व ‘ एकच हिंदुस्थान ’ या कुळकर्ण्यांच्या राष्ट्रीय भावनात्मक चार कविता होत. त्यांतील ‘ एकच हिंदुस्थान ’ ही कविता मोठी असून ती पूर्वी स्वतंत्र पुस्तक-रूपानें प्रसिद्ध झाली आहे. सृष्टिविषयक कविताही कुळकर्ण्यांनीं थोड्याच रचिल्या आहेत. त्यांपैकीं ‘ वसंतज्योत्स्ना ’ या कवितेंत

“ तारांच्या अधरीं शशी व्रण करी तों पाझरे ही सुधा ! ”

म्हणून ज्योत्स्नेचें केलेलें वर्णन तर खरोखरच बहारीचें आहे ! ‘लता’, ‘ गुलाब हंसे ’, ‘ बहर कां आला ’, ‘ जगाची . मोहरात्र ’ इत्यादि कवितांतून संतसज्जनांचें चारित्र्यविशेष गर्भितार्थानें पुढें मांडिले आहेत ते अत्यंत उद्बोधक होत. तसेंच ‘ ईश्वरविषयक ’, ‘ निर्गुण निराकार ’, ‘ ईशस्वरूप ’, ‘ ईशस्तवन ’, ‘ स्तवन ’, ‘ मंत्रपुष्प ’, ‘ हांक ’

वगैरे भक्तिपर कवितांतही उद्‌बोधकता आहे व त्यांतील समर्पक दृष्टांत आणि शुद्ध भाव विलोभनाय आहेत. अस्तु. एकंदरींत कुळकर्ण्यांची अशी विविधविषयक कविता कल्पनासुंदर, भावनिर्भर, कर्णमधुर व विचारप्रधान आहे तांत नटवेपणा किंवा उन्माद नाहीं व तसेंच भाषादोष किंवा छंददोषही आढळत नाहींत प्रतिभेचा विलास तर तिच्यांतून जागोजागीं इतका दिसून येतो कीं, त्यामुळें मन प्रसन्न होऊन

" जाशील काय कविते ! रसिका वराया ?
आनंदतील जन कां तुजला बघाया ?
आनंद प्रेम पसरेल तुझ्यामुळें कां ?
संसारदु:ख हलकें करिशील तूं कां ? "

अशा स्वत: कुळकर्ण्यांनीं आपल्या कवितेला केलेल्या प्रश्नांचीं उत्तरें आपणच ' हो ' कारार्थी देऊन टाकावीं, असें रसिकांना वाटल्यावांचून रहात नाहीं ! कुळकर्ण्यांच्या ' मानस–निष्यंदा ' नंतर इंदूरचे दुसरे प्रतिभासंपन्न कवि रामचंद्र अनंत काळेले यांचा ' वाग्वसंत ' नामक कवितासंग्रह ' होळकर सरकार ग्रंथ माले ' चें २७ वें पुष्प म्हणून सन १९३४ मध्यें प्रसिद्ध झाला काळेले हे कवि 'श्यामल' या टोपण नांवानेंही प्रसिद्ध असून कुळकर्ण्यांसारखेच ते तांबे यांचे सच्छिष्य आहेत. ' वाग्वसंता ' ला तांबे यांनींच प्रस्तावना लिहिली आहे व तींत त्यांनीं काळेल्यांची कविता रसपूर्ण, मधुर व सौंदर्यसमीक्षक अशी असून भाषाही भावनेला अनुकूल अशी मृदुमधुर असल्याचें म्हटलें आहे. तें अगदीं यथायोग्य होय. ' वाग्वसंतां ' तील एकंदर कवितांची संख्या ५३ आहे व त्यांत ईश्वरभक्ति, तत्त्वज्ञान, सृष्टिवैभव वगैरे विषयांना अजिबात वगळून प्रेम–दयिताप्रेम हाच एक विषय प्राधान्येंकरून रंगविला आहे, त्यामुळें साहजिकच शृंगाररसाची त्यांतून रेलचेल झाली आहे. अशा शृंगाररसात्मक कवितांचे स्वत: काळेले यांनींच उत्कंठा, निराशा व प्रेमसाफल्य असे तीन विभाग केले आहेत. या

तिन्ही विभागांतील कोणत्याही कवितेकडे पाहिलें म्हणजे निर्व्याज प्रेमाचें किंवा त्या प्रेमाकरितां आसावलेल्या अंतःकरणाच्या तळमळीचें वर्णन करतांना काळेल्यांच्या रसवंतीचें वर्णनविषयाशीं अगदीं तादात्म्य झालेलें दिसून येतें. वस्तुतः कवीचें अंतःकरण ज्या विषयावर विशेष आसक्त झालेलें असतें त्याच विषयाचें वर्णन त्याच्या हातून सरस उतरत असतें. काळेल्यांच्या कवित्वाचा उत्कट उत्कर्ष याचमुळें त्यांच्या प्रेमविषयक कवितांतून झालेला आहे. प्रांजल व ओघवती भाषेबरोबरच उपमा, उत्प्रेक्षा, रूपक आदींनीं रसिकचित्त सहज आकर्षून घेण्याइतकें कल्पनाप्रभुत्व व प्रतिभाशालित्वही त्यांच्या ठायीं खचित आहेत. वर सांगितल्याप्रमाणें त्यांच्या प्रेमविषयक कवितांच्या उत्कंठा विभागांत एकंदर १६ कविता असून त्या प्रायः सर्वच भावसुंदर आहेत. प्रणयोत्कंठित पुरुषाच्या देहाला सर्व प्रकारचे सुखसोहाळे लाभले तरी त्याचा एकाकी वेडा जीव मात्र 'स्वजन'—शोधनार्थ कसा सारखा वणवण हिंडत असतो याचें हृदयस्पर्शी वर्णन 'हुरहुर' कवितेंत काळेल्यांनीं केलें आहे व 'उत्कंठा' कवितेंतही अशाच दुसऱ्या एका वेड्या जीवाची प्रेमातुरता वर्णिली आहे. तसेंच सखीमीलनोत्सुक मन कसें तळमळतें हें 'सर्व हें वायां' आणि 'रिझवूं कुठें मनाला?' या दोन कवितांतून दाखविलें आहे. काळेल्यांच्या कवितांतले असे प्रणयोत्कंठित जीव सारेच अभागी आहेत असें नाहीं, तर त्यांत कांहीं भाग्यवंतही पण आहेत. 'पहिलीच ओळख' या चार ओळींच्या चुटक्यांत तशा एका भाग्यवंताचें चित्र रेखाटलें आहे. त्या भाग्यवंताची आपल्या 'स्वजना' शीं अगदीं पहिल्याच नेत्रमीलनासरशी ओळख होते न होते तोंच त्या उभयतांच्या मनोवृत्ति एकाकार होऊन जातात व त्या मधुर प्रसंगीं विनयान्वित लज्जेचा नाजुक गुलाब त्या 'स्वजना'—च्या अंगावर सांडून त्याचे कांटे त्या प्रणयोत्कंठित भाग्यवंतावर उभे राहतात! संसारांत पदार्पण करूं पाहणाऱ्या तरुण दांपत्याचें हें चित्र

खरोखरच गोड आहे! 'इतक्यांतच ना आला?' ही कविताही हृदयंगम आहे. प्रियकर प्रणयिनीकडे येतो आणि थोडा वेळ थांबून परत जावयास निघतो, तें पाहून प्रणयिनी त्याला आडवते, असा प्रसंग या कवितेंत चित्रित केला आहे.

"तुम्हाला असतिल कामें थोर
त्यांचा नकोच हा बाडिवार
मी जरी रिकामी सकाम तरिही फार"

असें प्रणयिनीनें ह्मणून काम शब्दावर कोटी केली आहे व पुढें तिळही उसंत नसलेला सूर्य पश्चिमेच्या घरीं क्षणभर तरी रंगतो, कुठेंही थारा नसलेला व जगभर सारखा भिरभिर वाहणारा वारा वेलींभोंवतीं घुटमळतो, परतून मागें न पाहतां अखंड धांवत सुटणारा महानद मध्यें येणाऱ्या टेकडीला कवटाळतो असें असतांना मग तुम्हीच

"सदा कां पोटासाठीं जाल?
क्षणहि ना हृदयाशीं बैसाल?
पोट हें बोटभर–हृदय डोह परि खोल"

वगैरे युक्तिवाद लढविला आहे. नंतर तो प्रियकर तिच्या विनवणी-प्रमाणें संध्याकाळपासून सकाळपावेतों तिच्याकडे थांबतो तरीही तेवढा अवधि तिला क्षणाएवढाच वाटून ती त्याला परत इतक्यांतच ना आला! ह्मणून ह्मणतच राहते! अस्तु. अशा प्रकारें काळेल्यांनीं प्रणयोत्कंठेचा तिच्या अगदीं प्राथमिक अस्वस्थतेपासून तों विश्रंभ-मीलनापावेतोंचा विकास आपल्या कवितांच्या उत्कंठा विभागांत दाखविला आहे. त्यानंतर दुसऱ्या निराशा विभागांत चाळवणी किंवा वचनविस्मरण यांपासून तों जगांत प्रेमाचा कोठेंच लवलेश नाहीं, असा दृढ विश्वास होईपर्यंतचीं दारुण प्रेमपर्युत्सुकतेचीं चित्रें रंगविलीं आहेत. या विभागांतील कवितांची संख्या १५ आहे व त्या एकूणएक कविता एकजात उच्च प्रतीच्या आहेत. 'तूंही जाशिल का?', 'सांखळी

ही तूंझिमाझी ', ' तुझेमाझे पाहून गडे हात!' , '!' ' कुणास तरी ' व ' जगीं या नाहिं ' या कविता त्यांतल्या त्यांत विशेष उत्कृष्ट आहेत. निसर्गात आढळून येणारें प्रेमचांचल्य पाहून आपल्या प्रियेच्या प्रेमाविषयीं आशंका उत्पन्न झालेला एक प्रणयी पुरुष प्रियेला कांकुळतीनें ह्मणतोः—

" माझा जीव खराखुरा सखि, तुझ्या आशेवरी टांगला
तूंही जाशिल का कुणातरि सवें टांकूनि ऐसा मला ? "

तर दुसरा, प्रियेनें झिडकारल्यामुळें प्रेमभंग झालेला, प्रणयी पुरुष रोंकठोंकपणें प्रियेला विचारतोः—

" काय गे जाणून माझी, प्रीति ! अव्हेरिली ?
आंत नी बाहेर कीं गे, स्वार्थसत्ता आगळी ? "

यानंतर एकीच्याकडून प्रेमभंग झालेल्या प्रणयी पुरुषाला दुसरीच एक प्रिया प्रेमानें आळवूं लागली असतां तो प्रणयी पुरुष विषण्ण अंतःकरणानें तिला सांगतोः—

" हृदय हें मृत गणीं
काय कवटाळुनी ?
प्रेत कां कधि पुढें
हात करि आपुला ? "

व पुनः प्रेम करण्यास प्रवृत्त होत नाहीं. नंतर दुसरा एक प्रणयहत पुरुष पुनः प्रेम करण्यास प्रवृत्त होत असतां तिसरा एक पुरुष त्याला उपदेश करतोः—

" अयि ! कां फुका तिचियापुढें पसरून मागसि अंजली ?
करणार किंमत काय ती नच होय जी नच जाहली
मनिं प्रीतिची मृदु कल्पना बसलास घेउन कोठली ?
तशि प्रीति लोकिं खरी कुणा नच लाभणार न लाभली ? "

' जगीं या नाहिं ' या कवितेंत

" भुई जेथें खणूं तेथें जळाचा ओघ लागावा—
जगीं पै नाहिं प्रीतीचा कुठें थोडाहि ओलावा "

हें शेवटीं सांगतांना एक प्रेमहत पुरुषानें स्वतःच्या उद्भ्रांत मनाची घातलेली समजूत हृदयस्पर्शी आहे. ' निष्ठुर किति ती तरुणी ' या कवितेवर तांब्यांच्या रचनेची घनदाट छाप पडलेली आहे. नटव्या तरुणाच्या नश्वर रूपावर भाळणाऱ्या तरुणीस ' कालचा गुलाब कुठें ' या कवितेंत केलेला उपदेश मार्मिक आहे. यानंतरच्या तिसऱ्या प्रेम-साफल्य विभागांत एकंदर ९ कविता आहेत. त्यांतील पहिल्या एक श्लोकी ' प्रीति ' कवितेंत प्रीतीचें आचरित वर्णिलें असून दुसऱ्या ' धन्य खरी प्रीति ' या कवितेंत प्रीतीची धन्यता गाइली आहे. सात्त्विक प्रीतींतून उद्भवणारी प्रिया–प्रियकरांची एकात्मता '—ला ' या कवितेंत प्रियकराकडून वदविली आहे; परंतु त्याच्या तोंडीं घातलेली भाषा मात्र बायकी वाटते. ' तुझा मी ' ' तुज ह्मणूं कुणासारखी ' व ' कशाला ? ' या तिन्ही कविता काळेल्यांच्या एकंदर कवितेंत सर्वांत अधिक गोड व उत्कृष्ट असून त्यांचे सारे कावित्वगुण त्यांतून उत्कटतेनें प्रकट झालेले आहेत.

" कुणी ग्रह मांडिता अपुले
शनी–रवि–सोम या नामी
असे ग्रह एक गे माझा
परंतू हाच–तूझा मी ! "
कसें होता कसें होई
असो हें पंडिताकामीं
कसें नी कांहिंही होवो
मला हें ज्ञान–तूझा मी ! " (तुझा मी)

× × ×

" हे थोरले कशाला
वाडे नि राजवाडे ?
माझ्यांत तूं-तसा मी
तूझ्यांत गे वसू दे ॥
हातांत या कशाला
लक्ष्मी हवी गजांत ?
हे गे तुझे नि माझे
राहोत हातिं हात ॥
देवांचिया कशाला
या तेहतीस कोटी ?
तूं देवताच माझी
मी देव तूजसाठीं ॥
जाण्या हवें कशाला
वैकुंठ पुण्य गांठीं ?
ही गांठ तूझि माझी
त्याहून फार मोठा " ॥ (कशाला ?)

एकंदरींत प्रणयीयुगुलांच्या ऐक्यांतच खरा स्वर्ग, खरा वैकुंठ, खरा परमेश्वर भेटतो अशा दिव्य प्रत्ययांत परम प्रेमाची नितराम् पूर्तता होते, असें काळेले यांच्या प्रेमसाफल्य विभागांतील कवितांचें सार होय. यानंतर काळेल्यांनीं आपल्या कवितांचे वात्सल्य व विविध असे आणखी दोन स्वतंत्र विभाग केले आहेत त्यांतील वात्सल्य विभागांत ६ कविता असून विविध विभागांत ७ आहेत. ' कोणाचें तरि पोर हें ! ' या वत्सल विभागांतील प्रारंभींच्याच कवितेंत बीभत्स–वत्सल–संकर पाहण्यासारखा आहे. एक शेंबडेंलेंबडें, घामट पोर पाहून कवि त्याची किळस करतो व मुलें हीं फुलेंच होत असें ह्मणणाऱ्या कवींपुढें त्या

पोराला उभें करून त्यांचें ह्मणणें किती निरर्थक आहे, हें त्यांस पटवून देण्याचें मनांत आणतो तोंच त्या पोराची आई तेथें येऊन

**" माझं बाळ ग सोनुलं ह्मणत घे त्याचे मुके शंभर ! "**

असें दृश्य त्याला दिसतें, त्याबरोबर कवीची खाशी जिरून

**" आई ! पोटिं तुझ्या अगाध परि जी माया न ती स्वर्गिंही ! "**

असे लीनतेचे भावनिर्भर उद्गार त्याच्या तोंडून चट्कन बाहेर पडतात!

' बोल बोबडे ' ही कविताही मधुर आहे. या कवितेंत मातेनें किंवा पित्यानें आपल्या लहानग्या बाळाला

**" बघुं सांगसि गोष्ट कशी**
**बघुं मारिसि हांक कशी**
**कोऱ्याही पानिं तुझे वाच बघुं धडे "**

असें ह्मणून माझें बोलणें समजण्याइतका तूं मोठा केव्हां होशील असा प्रश्न केला आहे; पण लगेच तेथें थांबून त्याच्या उलट

**" परि कळण्या शब्द तुझे**
**होइ न मी कधिं नुमजे**
**तुझियापरि छान सान बाळ एवढें "**

असें हर्षोन्मादांत ह्मटलें आहे! 'गेलि कुठें तरि आई ?' या कवितेंतील नुकत्याच थोड्या दिवसांपूर्वी दिवंगत झालेल्या मातेची लहान मुलीनें आपल्या वडील बहिणीजवळ काढलेली आठवण जशी हृदयाला सद्गदित करणारी आहे तशीच ' स्वप्न आणि जागृति ' या कवितेंतील मातेला मृत बालकाविषयीं सुखस्वप्नें पडून जागृति येतांच एकदम वाटणारी उद्विग्नताही हृदयाला द्रव आणणारी आहे. ' तें फूल हें फूल ' या हिंदु विधवांची अनुकंपनीय स्थिति वर्णिलेल्या कवितेंतलादेखील करुणरस अस्साच आहे. ' जीवास ' व ' सदेह आणि विदेह ' या कविता तत्त्वगंभीर आहेत. आपल्या पवित्र शीलामुळें आर्यावर्ताला सार्थनाम करणाऱ्या आर्य महिलांची प्रशंसा ' आर्याप्रशस्ति ' कवितेंत

केली असून तिच्या शेवटीं आर्यावर्ताचें वैभव वगैरे सर्व परक्यांनीं नेलं तरी नेवो; परंतु त्याच्या आर्यमाहिलांवर मात्र परक्यांची अशुभ छाया कधींही न पडो, अशी सदिच्छा प्रकट केली आहे. छत्रपति शिवाजी महाराज, लोकमान्य टिळक, महात्मा गांधी, वंगकवि रवींद्रनाथ यांसारख्या रत्नांना जसें कुशींत घेतलें तसेंच आपल्यासारख्या दगडालाही कुशींत घेण्याबद्दल मातृभूमीची प्रार्थना ' माझी मायभू ' या कवितेंत केली आहे. ' प्रीतिगीत ' या नांवाचें एक खंडकाव्य काळेले लिहीत आहेत त्यांतील दोन चुटके या ' वाग्वसंतां ' त दिलें आहेत ते दोन्ही चांगले आहेत. तरीही त्यांतल्या त्यांत विश्वामध्यें जिकडेतिकडे प्रेमाचें राज्य चालू असतांना मनुष्यानें मात्र प्रेमापासून वंचित रहावें याबद्दल खेद प्रकट केला असलेली ' माणसेंच कां गे ! ' ही कविता अधिक चांगली आहे. अस्तु. एकंदरींत पाहूं जातां ' वाग्वसंतां ' तील कवितेची रचना सुश्लिष्ट व मधुर असून विषयवैचित्र्य तींत विशेष नसलें आणि किंबहुना प्रियेभोंवतीं पिंगा घालणाऱ्या पारव्याच्या कूजिताप्रमाणें ती जरी प्रेमाभोंवतीं पिंगा घालीत गोड आलाप काढीत असली तरीही तिच्यांतील प्रणयभाव अल्लड लीलांपासून तों उदात्त गंभीर विलासापर्यंत यथाक्रम विकसित झाला असल्यानें तिच्या ठायीं एक प्रकारची विशेष विलोभनीयता उत्पन्न झालेली आहे, यांत संदेह नाहीं ! कांहीं जागीं घडलेले विरसकारी यतिभंग व ' ओहळती ' सारखीं उपयोगांत आणलेलीं कर्णकटु क्रियापदाचीं रूपें वगळतां काळेल्यांची संपूर्ण कविता निर्दोष व सहजसुंदर आहे, असें निर्विवादपणें म्हणतां येईल. ' वाग्वसंता ' बरोबरच ' शिरीषाचीं फुलें ' हा इंदूरचे अ. श्री. भांडारकर यांचाही कवितासंग्रह सन १९३४ मध्यें प्रसिद्ध झाला. यांतील कवितांची संख्या २५ असून त्यांत ' वेडा ', ' अश्रु ', ' राधेचा नाच ', ' आकाशांतील चित्रपट , ' बंदिखानाचें गीत ' व ' ओवाळणी ' या मोजक्या ६ च

कविता काय त्या बऱ्या आहेत; तथापि त्यांच्याविषयीं अधिक लिहितां येण्यासारखें असें त्यांत कांहीं नाहीं. या कवितासंग्रहाला जोडलेल्या 'तेजाच्या शोधार्थ' या नाटिकेचा परिचय नाट्य वाङ्मयाच्या प्रकरणांत पूर्वीं करून दिलेलाच आहे. पुढें सन १९३५ मध्यें विठ्ठल सखाराम शेंबेकर ऊर्फ किरण यांच्या 'उमलत्या कळ्या' व चंद्रकांत निंबाळकर यांची 'पाकळी' हे दोन कवितासंग्रह प्रसिद्ध झाले. यांपैकीं 'पाकळी' हा कवितासंग्रह भाषा व छंद या दोन्ही शास्त्रांच्या दृष्टीनें बराच सदोष आहे. परंतु 'आकस्मिक घाला', 'जीवित नौका', 'कुमुदिनी' वगैरे कवितांकडे पाहिलें तर निंबाळकर यांच्या ठायीं थोडीबहुत प्रतिभा अवश्य वसत असल्याचें दिसून येतें व आज त्यांच्या कृतींत दिसून येणारे दोष पुढें अभ्यासानें त्यांना दूर करतां येतील अशी आशाही वाटते. 'उमलत्या कळ्या' या कवितासंग्रहांत एकंदर ५० कविता–कळ्या असून त्या विविध रस–भाव–युक्त आहेत; तथापि कल्पनाचमत्कृतीच्या न्यूनतेमुळें त्यांच्यांत आकर्षकता मात्र बेतास बात आहे. प्रत्येक उमलत्या कळींतून उपदेशाचा मकरंद सादर करावा असा किरणांना मोठा हव्यास असल्याचें दिसून येतें व त्यामुळेंच निसर्गाचे सर्व लहानमोठे क्रियाशील घटक हे एक प्रकारें मनुष्यामात्राकरितां देवानें निर्मिलेले उपदेष्टेच आहेत, ही आपल्या पूर्वगामी कवींची कल्पना त्यांच्या कवितासंग्रहांतून ठायींठायीं उभी असलेली आढळते. 'सद्गुरूस तोटा नाहीं', 'मेघ', 'ओढ्याचा उपदेश' 'चंदनाचे बोल', 'उदय' वगैरे त्यांच्या अशा प्रकारच्या कविता चांगल्या आहेत. यांशिवाय त्यांच्या इतर उपदेशपर कवितांतील आशेचा महिमा वर्णिलेली 'ही कोण?', घराची थोरवी व प्रेमाकर्षकता कथन केलेली 'घर' आणि मित्राची श्रेष्ठता प्रतिपादन केलेली 'मित्राशिवाय' या कविताही बऱ्या आहेत. मातृविहीन मुलाची आईविषयीं होणारी निरनिराळ्या प्रकारची तळमळ 'पोरका!' व 'माते!' या दोन कवितांतून हळुवार अंतःकरणानें

ओतिली असून नवोढा पत्नीकडे पाहून तरुणाला होणारा आनंद व वाटणाऱ्या आकांक्षा 'चल गडे!' आणि 'एकजीव' यांतून भावनोत्कटतेनें प्रकटविल्या आहेत. देशभक्तिपर सदराखालीं येतील अशा चारसहा कविताही या संग्रहांत आहेत. त्यांत 'फांसावरला देशभक्त!', 'शनिवारवाड्यास!', व 'खेळ' या तीन कविता शिवायकरून बाकीच्या कविता अगदीं सामान्य आहेत. एकंदरींत किरण यांचा हा कवितासंग्रह त्यांची प्रथमाकृति या दृष्टीनें बरा आहे. त्यांत कांहीं ठिकाणीं घडलेले यतिभंग, मात्रांचा तोकडेपणा व गोळा-वती, निश्चियले सारखीं कर्णकटु क्रियापदाचीं रूपें हे सर्व दोष पुढच्या करितां टाळतां येणें किरणांना अशक्यसें नाहीं. अस्तु. यानंतर अगदीं अलीकडे सन १९३६ मध्यें इंदूरच्या 'मालव साहित्य' त्रैमासिकाचे एक संपादक विनायक हरि आपटे यांचा 'माला' हा कवितासंग्रह प्रसिद्ध झाला. लहानमोठ्या ७४ कवितासुमनांनीं ही 'माला' ग्रथित झालेली असून तिच्यांतून स्फूर्तीची चमक आणि प्रतिभेचें पाणी सुंदरतेनें लकाकत आहे व तसेंच कडकडीत भाषाशैली आणि खण-खणीत विचारप्रणाली हेही गुण स्पष्टतेनें दृग्गोचर होत आहेत, त्यामुळें या संग्रहाचा अर्धाअधिक भाग ओजस्वी कवितांनींच व्यापिला गेला आहे. आपट्यांची अत्यंत मानी, धीर गंभीर व युयुत्सु मनोवृत्ति त्यांच्या अशा कवितांतून सहज प्रतिबिंबित झालेली दिसते. त्यांनीं आरंभींच प्रभुपदास केलेल्या 'प्रार्थनें'त ह्मटलें आहे:—

**बळ बुद्धी तेज नवें**
**स्वपराक्रम-प्राप्त हवें,**
**मागण्यास घाल तुम्ही, ही नकोच कल्पना!**

× × ×

**जीवनार्थ युद्ध करूं**
**वीरवृत्ति तीच वरूं**

सोसणें नको मनास, पतन तशी याचना !

वरेंच ' राही कविते ! ' मध्येंही त्यांनीं कवितेला विनविलें आहे:–

" राही कविते माझ्या हृदयीं
अभिमानाचें गाणें गाई

× × ×

मन बुद्धी वा, विकावयाची
वृत्ती नेदी मजला कधिंही "

' शर्तीस्तव जिणें ' या कवितेंत त्यांनीं स्वाभिमानी पूर्वपुरुषांचे पराक्रम आठवून तसें जिणें प्राप्त करून घेण्याचा सर्वांस उपदेश केला आहे व 'कां भीसी तरुणा मरणाला' ही कविताही याच, परंतु थोड्या निराळ्या स्वरूपाच्या, विषयावर उभारली आहे. त्याचप्रमाणें देश-धर्म-कार्यासाठीं धारातीर्थी पतन हेंच जीविताचें ध्येय किंवा हाच स्वर्गसाधनाचा मार्ग अशी सार्वत्रिक दृढ भावना असलेल्या काळांतील प्रसंग वर्णिलेल्या ' निर्वाणीचा निरोप ', ' दोन शिपाई ', ' आह्वन ' वगैरे कविताही असाच बोध घेण्यासाठीं रचिलेल्या आहेत. या सर्व कवितांतून वीर पुरुष आणि वीरांगना यांच्या रणाभिनिवेशाचीं चित्रें आपस्यांनीं खरोखर इतकीं सुंदर रंगविलेलीं आहेत कीं, तांबे आणि अज्ञातवासी या कविद्वयाच्या एतद्विषयक सर्वमान्य कवितांच्या पंक्तीला या कविता निःशंकपणें नेऊन बसविण्यासारख्या आहेत. खास इतिहासाचा आधार घेऊन रचिलेली अशी मात्र आपस्यांनीं एकही कविता केलेली नाहीं. त्यांचे

" एकछत्रा करी, मातृभूमी खरी
आड येई, उरीं घाव त्याला "

हे ' घे उडी ' कवितेंतले बोल व

" रोमांत भिने ही भूमाता "

हे ' उखळांत दिलें हें शिर आतां ! ' कवितेंतले उद्गार जितके उत्कट

तितकेच उज्वल देशभक्तीचे द्योतक असून ' प्रिय मूर्ति हिंदभूची ' व ' नमस्कार त्या देशपूजारता ' या कवितांतल्या आकांक्षाही तशाच उच्च कोटींतल्या आहेत. ' प्रेम कां कर्तव्य ', ' प्रेमसूत्र ', ' प्रेमाचें भूत ', ' खरें प्रेममीलन ', ' शेवटची विनवणी ', ' शेवटचें समाधान ', ' प्राणांची पंचारती ' ' सखी माझी ', ' चित्र ', ' आवडतें काय ? ', ' चंचल स्थिरता ', ' ठसा कसा पुसेल ? ' ' सुंदरीचा पतंग ' ' कर ' वगैरे आपट्यांच्या पंधरावीस प्रेमपर कविता आहेत; परंतु या कवितांत त्यांनीं इतर आधुनिक कवींप्रमाणें हवा तसा शृंगाररस भरून प्रणयाचें एकसारखें अर्चन–गुंजन केलेलें नाहीं तर उलट कांहीं प्रसंगीं

" कर युवतीच्या गळ्यांत घाला
मउमउ गोष्टी बोलायाला
मग शत्रूचा आला घाला
कोण परतवी प्रबल भयंकर " (' कर ')

असा प्रणयरत तरुणांना प्रश्न करून आपली वीरवृत्ति तेथेंही प्रकट केली आहे ! तथापि या प्रेमपर कवितांतून कांहीं ठिकाणीं प्रणयाच्या मधुर छटाही त्यांनीं दाखविल्या आहेत; पण त्यांवर विलासधुंदीची छाया मात्र मुळींच पडूं दिलेली नाहीं ! विधवांवर ' स्मृति कशी मळावी ! ' व ' सौभाग्याचा घाला ' अशा दोनच आपट्यांच्या कविता आहेत; परंतु त्यांत सहजापेक्षित करुणरसाचा उठाव मात्र केलेला नाहीं. ' सौभाग्याचा घाला ' यांत तर

" माझे झाले वीस, तयांचे वीस चोक ते ऐंशी "

असें आपलें व आपल्या पतीचें वयोमान सांगणाऱ्या तरुण विधवेनें आपल्या जरठ दिवंगत पतीचें वर्णन अथपासून इतिपावेतों उपहासगर्भ विनोदानेंच नटाविलें आहे. मासल्याकरितां त्यांतले खालील उतारे पहा:

" देवदर्शना जाया निघतां, म्हणती मज अडवोनी,
' पतीवांचुनी देव स्त्रियांना नाहीं दुसरा कोणी ',

देव कशाचा यमलोकींचें जिवंत भूतच आलें,
लग्नापासुनी बघतां–बघतां माझे डोळे धाले;
कमरेवरती हात ठेवुनी, उभे राहती जेव्हां,
कसे विठोबा सुंदर दिसती पंढरपुरचे तेव्हां; "

× × ×

पोषाखाची ऐट वरतुनी, कलप मिशीला छान,
'ऊपरसे तो खूप बनी है अंदर जाने राम;'

\+ + +

वैद्य पळाले, डॉक्टर थकले, हकीम सारे सरले
विकत घ्यावया तरुणपणा ते उपाय सर्वहि हरले,

\+ + +

सौभाग्यांतही वैधव्याचा अनुभव पुरता आला
तोच पुरवला ! कशास असला सौभाग्याचा चाला ?"

या उपहासगर्भ विनोदानें मात्र द्रव्यलोभी मातापित्यांकडून होणाऱ्या बाला–जरठ–विवाहाच्या पुरस्कारावर उत्तम प्रकारें तिरस्कार प्रकट केला गेला आहे, यांत संदेह नाहीं! मातृवात्सल्य व मातृउपकारस्मरण या विषयांवर 'किशोर', 'माझे गुलाबाचें फूल', 'तीच बाळाची बाप तीच आई!', 'माझा मणी' व 'मातृवंदन' या पांच कविता असून त्या सर्व उत्कृष्ट आहेत.

" सात्विकता सत्वघटित हृदय गोजिरें,
वत्सलता दिव्य रसें नित्य पाझरे,
मृदुतेची मृदुलताहि वाउगी ठरे
उद्भवती अष्टभाव स्मृतिबळें मला "

हे 'मातृ–वंदनां' तील मातेचें गुणवर्णन खरोखरच भावनिर्भर आहे व तसेंच 'तीच बाळाची बाप तीच आई!' यांत एके ठिकाणीं बाळाला सकाळची दिलेली उपमाही मोठी भावमधुर आहे. उपविरायर

अशा 'उद्यां', 'तारुण्य', 'जीभ' वगैरे थोड्याच कविता आपट्यांनीं रचिलेल्या आहेत; परंतु त्यांत केवळ 'तारुण्य' कविता सोडून बाकीच्या कविता साधारण प्रतीच्या आहेत. यौवनाचा सुंदर महिमा या 'तारुण्यां'त गाइलेला आहे. 'तुम्ही कसें?' 'साद्यंत', 'दृष्टि व सृष्टि' आणि 'जागविलें कुणि मला?' या आपट्यांच्या इतर कवितांपैकीं चार कविता आध्यात्मिक वर्गाखालीं मोडण्यासारख्या असून 'एका संन्याशाचा पश्चात्ताप' ही कविता केवळ विनोदाच्या वर्गांत मोडणारी आहे. तसेंच 'विरोध का विरोधाभास?' व 'घटकेंत काय होईल?' यांतील कल्पकता बुद्धीला झुलविणारी आहे. 'मुनिवर कां पारधी' ही कविताही चांगली आहे; तथापि यांतील संवाद उलटा ठेवून अपन्हुति अलंकार साधला असता तर त्यांत आणखी विशेष लज्जत आली असती!

"अभिमंत्रित कविचीं वाणी, काष्टाला पल्लव आणी"

व

"कवि वैभव धरणीवरचे, कवि प्रेषित देवाघरचे"

अशा प्रकारें 'कवीचें स्वागत' करतांना गाइलेलें गौरव-गीतही उत्कृष्ट आहे. आपट्यांच्या 'मालें' तल्या ठळक कवितांचा हा त्रोटक परिचय झाला. त्यांच्या कवितेमध्यें एकंदरींत वीर रस प्रधान आहे; तथापि इतर रसांनाही त्यांनीं कांहीं कवितांतून यथोचित वांव दिला आहे. त्यांचा आधुनिक कवितेवरील व्यासंग दांडगा असल्यामुळें साहजिकपणें कांहीं उत्तम कवींच्या कवितेची छाप त्यांच्या कवितेवर पडलेली दिसून येते. उदाहरणार्थ त्यांच्या 'किशोर' कवितेकडे पाहिलें ह्मणजे कुंटे यांच्या 'राजा शिवाजी' काव्यांतील संभाजीचें चित्र चटकन् डोळयांपुढें उभें राहतें व 'सवत' कवितेंतील विनोदानें प्रो. मायदेव यांच्या 'फसले ग बाई' या कवितेची तावडतोब आठवण होते. 'विरोध कीं विरोधाभास!' या कवितेंत माधवज्युलियनच्या कवितेंतले पडसाद

ऐकूं येतात व ‘ कां भीसी तरुणा मरणाला ’, ‘ घे उडी ’, ‘ उखळांत दिलें हें शिर आतां ’ वगैरे कविता तांब्यांच्या कवितेची स्मृति देतात अस्तु. आपट्यांची भाषा बरीच प्रौढ व ओघवती आहे. पातळली पुनीतले, वाफाळलेले, सफेतलेले अशीं क्रियापदाचीं नव्यानें रूढ होत चाललेलीं रूपें त्यांच्या कवितेंत बरीच आलेलीं आहेत. बँक, बोटसारखे इंग्रजी व धुजती, याच्यासारखे हिंदी शब्द तसेंच सु–पदव्यासारखे घेडगुजरी समास वगळले आणि ‘ खांदे कर अंक तुवा शिणविले सदा ’ अशा ठिकाणीं कर, अंक या संस्कृत शब्दांच्या जोडीला खांदा हा मराठी शब्द न ठेवितां “ स्कंध अंक हस्त तुवा......” अशी रचना केली तर त्यांच्या एकंदर कवितेंत भाषेच्या दृष्टीनें दोष सहसा दिसून येणार नाहींत.

येथपर्यंत परिचय करून दिलेले कवितासंग्रह हे सर्व वैयक्तिक होत. त्यांशिवाय निरनिराळ्या कवींच्या निवडक कवितांचे संग्रहही कांहीं प्रसिद्ध झाले आहेत त्यांकडे आतां वळूं. अशा कवितासंग्रहांपैकीं ‘ माळव्यांतील अर्वाचीन कवि ’ व ‘ सुमनहार ’ या दोन पुस्तकांचें प्रकाशन इंदूरच्या ‘ महाराष्ट्र साहित्य सभे ’ नें अनुक्रमें सन १९२७ व १९२८ मध्यें केलें आहे व या दोन्हींत माळव्यांतील, किंबहुना खास इंदुरांतील, सुमारें ४० प्रसिद्ध–अप्रसिद्ध आधुनिक कवि–कवयित्रींच्या कविता दिलेल्या आहेत. त्यांतील कित्येक कविता पूर्वींच इतरत्र प्रकाशित होऊन नांवाजल्याही गेलेल्या आहेत. यानंतर सन १९३१ मध्यें देवासच्या शारदोपासक मंडळांतील कृष्णाजी गंगाधर कवचाळे, गोविंद लक्ष्मण झोकरकर, डॉ. शंकर रामचंद्र ओक, वाङ्मयविशारद चिंतामण गणेश ओक, कृष्ण नरहर भागवत प्रभृति कविसदस्यांच्या कवितांचा ‘ मंजरी ’ नामक संग्रह प्रसिद्ध झाला. ‘ केसरी ’ नें या संग्रहावर अभिप्राय देतांना ता. १५ जानेवारी सन १९३२ च्या अंकांत म्हटलें आहे “ देवास येथील शारदोपासक मंडळाच्या काव्यकुंजांतील

ही चौथी मंजरी मनास आल्हाद देणारी आहे." या 'मंजरी'च्या अगोदर परंतु त्याच वर्षी इंदूरच्या 'महाराष्ट्र साहित्य सभे'नें सन १९३३-३४ च्या अजमेर बोर्डाच्या हायस्कूल एक्झामिनेशनसाठीं 'मराठी निवडक कविता' नामक कवितासंग्रह प्रसिद्ध केला. यांत नामदेव, एकनाथापासून तों तांबे, रहाळकरांपावेतोंच्या एकंदर २३ प्राचीन-अर्वाचीन विख्यात कवींच्या कविता, त्यांच्या त्रोटक चरित्रांसह, दिलेल्या आहेत. अशाच प्रकारचे 'काव्यकुंज' व 'काव्योद्यान' हे आणखी दोन कवितासंग्रह अजमेर बोर्डाच्या हायस्कूल एक्झामिनेशनसाठीं अनुक्रमें सन १९३४ व १९३६ मध्यें प्रसिद्ध झाले. यांपैकीं पहिला संग्रह प्रो. ना. बा. पराडकर व म. दा. साठे या दोघांनीं मिळून तयार केला असून दुसरा संग्रह इंदूरचे केशव रामचंद्र रुद्र यांनीं तयार केला आहे. हे दोन्ही संग्रह वस्तुत: विद्यार्थ्यांकरितां जरी तयार झाले असले तरी रसिकांनाही त्यांपासून लाभ घेतां येण्यासारखा आहे. सन १९३५ मध्यें उज्जयिनीच्या 'महाराष्ट्र वाङ्मय मंडळा'नें 'मालविका' नामक माळव्यांतील २५ ठळक विद्यमान कवि-कवयित्रींच्या निवडक कवितांचा संग्रह आपल्या संस्थेच्या ग्रंथमालेचें पहिलें पुष्प ह्मणून प्रसिद्ध केला. यांतील कांहीं नवोदित कवींच्या कवितांतून व्याकरणाच्या व छंदशास्त्राच्या दृष्टीनें थोडेबहुत दोष दिसून येत असले तरी एकंदरींत सर्वच कविता भावमधुर व सुश्लिष्ट आहेत, यांत संदेह नाहीं. प्रो. रामचंद्र वामन पंतोजी व प्रो. नारायण बाळकृष्ण पराडकर या दोघांनीं मिळून प्रस्तुत 'मालविके'चें संपादन केलें असून भास्कर रामचंद्र तांबे यांनीं तिला लहानशी उद्बोधक प्रस्तावना लिहिली आहे व शेवटीं सर्व कवि-कवयित्रींचीं त्रोटक चरित्रें दिलीं आहेत.

### बालोपयोगी काव्यें

आतां मध्यभारतांतील बालोपयोगी काव्यांकडे वळून पाहतां तशीं काव्यें, पूर्वी उपदेशपर काव्यांत परिचय करून दिलीं गेलेलीं गंगाधर

सीताराम अभंग यांचीं ‘ मनास बोध ’ व ‘ सुबोधरत्नावली ’ हीं दोन्हीं परत जमेस धरून, एकंदर सहाच आजपर्यंत निर्माण झालेलीं दिसून येतात. त्यांतील ‘ बोधसुधा ’ हें विष्णु सोमनाथ सरवटे यांचें काव्य पहिलें असून तें सन १८९० मध्यें प्रसिद्ध झालें; परंतु तें आम्हांस उपलब्ध झालें नाहीं. नंतर याच्या पुढच्याच वर्षी ह्मणजे सन १८९१ मध्यें ‘ पद्यात्मक तोंडचें हिशेब ’ व त्यानंतर ३० वर्षांनीं सन १९२० मध्यें ‘ चित्रकाव्य अर्थात् पद्यात्मक बाराखड्या ’ हीं गंगाधर सीताराम अभंग यांचीं दोन पुस्तकें प्रसिद्ध झालीं. हीं दोन्हीं पुस्तकें उत्तम असून प्राथमिक शाळाखात्यांतील अभ्यासक्रमांत नेमण्यासारखीं आहेत. ‘ चित्रकाव्या ’ च्या पूर्वी सन १९१७ मध्यें ‘ मुलांकरितां गोड गाणीं ’ हा वासुदेव गोविंद आपटे यांनीं संपादलेला चिमुकला कवितासंग्रह प्रसिद्ध झाला व त्यानंतर दोन वर्षांनीं सन १९१९ मध्यें ‘ राजगीतें ’ या नांवाचा होळकर राजघराण्यांतील आदर्श विभूतींच्या गुणगौरवार्थ निरनिराळया आधुनिक लोकप्रिय चालींवर नरहर शंकर रहाळकर व राजाराम बाळकृष्ण खानवलकर या कविद्वयानें रचिलेला गाण्यांचा संग्रह प्रसिद्ध झाला. यांतील कित्येक गाणीं सुंदर आहेत.

### स्त्रियोपयोगी काव्यें

मध्यभारतांतील स्त्रियोपयोगी काव्यांची संख्या मोजकी चारच आहे. या चार काव्यांतील पहिलें ‘ स्त्रियांकरितां गाण्यांचें पुस्तक ’ हें सन १८८४ मध्यें रमाबाई इंदूरकरीण नामक कवयित्रीनें रचिलें असून दुसरें ‘ मुलीची पाठराखणी ’ हें सन १९०७ मध्यें नारायण गणेश शिरसाळकर यांनीं रचिलें आहे. याच्या पुढच्याच वर्षी ह्मणजे सन १९०८ मध्यें हिंदुस्थानांत राष्ट्रीय विचारांची नवीन लाट सर्वत्र जोमानें उचंबळली त्या वेळीं सौ. रमाबाई महेश्वरकर यांनीं ‘ स्वदेश-स्थितिविषयीं बायकांच्या सभेंतील गाणीं ’ हें पुस्तक रचिलें. या तिसऱ्या पुस्तकानंतर ‘ अंतर्गृहांतील गीतें ’ हें चौथें पुस्तक पुढें

सन १९१५ मध्यें इंदूरच्या सौ. सरस्वतीबाई टिपणीस यांनीं प्रसिद्ध केलें. प्रस्तुत चार पुस्तकांपैकीं पहिलें पुस्तक आज अनुपलब्ध असून तिसरें सरकार जमा झालेलें आहे. ' मुलीची पाठराखणी ' या पुस्तकाची रचना ' केरळकोकिळ ' कार कृष्णाजी नारायण आठल्ये यांच्या एतद्विषयक सुप्रसिद्ध काव्यांच्या जोडीतोडीची साधी, सुबोध व सुंदर आहे. ' अंतर्गृहांतील गीतें ' या पुस्तकांत जुन्या निवडक स्त्रीगीतांचा संग्रह केलेला आहे. त्यांतील कांहीं गीतें तर खास स्त्रियांनींच रचिलेलीं असून कांहीं धनगरांनीं रचिलेलीं आहेत !

## काव्यविषयक अवांतर वाङ्मय

आतां काव्यासंबंधांत जें अवांतर वाङ्मय मध्यभारतांत प्रसिद्ध झालें आहे त्याकडे वळूं. या वाङ्मयाचे ठळकपणें दोन विभाग पडतात. एक निरनिराळ्या काव्यांसंबंधीं टीकात्मक वाङ्मय व दुसरें परिचयात्मक वाङ्मय. यांपैकीं पहिल्या विभागांत मोडणारीं अशीं सात पुस्तकें आहेत व तीं प्राय: सर्वच हायस्कूल, कॉलेजांतील प्रौढ विद्यार्थ्यांकरितां ह्मणून तयार केलीं गेलेलीं आहेत. यांतील रघुनाथ पंडितकृत ' नलदमयंतीस्वयंवराख्याना ' वरील सान्वयार्थ टीका सीताराम विष्णु सरवटे यांनीं सन १९२० मध्यें केली असून ती अत्यंत उपयुक्त आहे. अशाच प्रकारच्या सान्वयार्थ टीका प्रो. वामन गोपाळ ऊर्ध्वरेषे यांनीं वामन पंडितकृत ' भामाविलास ' ( १९३३ ), ' नामसुधा ' व ' वेणुसुधा ' ( १९३५ ), भक्त मयूरकृत ' आर्या केकावली ' ( १९३५ ) आणि ज्ञानेश्वरकृत ' ज्ञानेश्वरी प्रासादिक-अध्याय १ ओव्या १–८४ ' (१९३६) यांवर केलेल्या आहेत व त्याही सर्व अभ्यासकांना उद्बोधक आहेत. ग्वाल्हेर राज्यांतील शाळांतून मराठी विषयाच्या अभ्यासक्रमांत ठेविलेल्या तांबे यांच्या निवडक कवितासंग्रहावरील गोविंद बळवंत माकोडे यांचें रहस्योद्बोधक टीपांचें पुस्तक आणि प्रो. पराडकर व साठे यांनीं संपादिलेल्या 'काव्यकुंजा' वरील उज्जयिनीचे हरि लक्ष्मण मसूरकर यांचें

' कुंजविहार ' ( १९३४ ) नामक विस्तृत सान्वयार्थ टीपांचें पुस्तक हीं दोन्हीं पुस्तकें उत्तम आहेत. आतां परिचयात्मक विभागांतील एकंदर पुस्तकांची संख्या पाहूं जातां ती आठ असल्याची दिसून येते. त्या पुस्तकांपैकीं बाळकृष्ण मल्हार हंस यांचे तुकाराम, मोरोपंत व वामन या संतकवित्रयीवरील निबंध विद्वानांच्या आदरास पात्र ठरले असून ' दक्षिणा प्राइझ कमिटी ' कडून त्यांस बक्षिसेंही मिळालीं होतीं. हे तीन निबंध अनुक्रमें सन १८८० १८८२ व १८८३ मध्यें प्रसिद्ध झाले आहेत. त्यांतील मोरोपंतावरील निबंध हल्ली मुंबई विश्वविद्यालयाच्या मराठीच्या अभ्यासक्रमांत नेमिला गेला असून तो आज दुर्मिळ झाल्यामुळें त्या विश्वविद्यालयाच्या मराठीच्या अभ्यास-नियामक मंडळानें त्याचें नुकतेंच सन १९३६ मध्यें पुनर्मुद्रण केलें आहे. हंसांनीं आपल्या निबंधांतून तुकाराम, मोरोपंत व वामन या तिन्ही कवींच्या चरित्रांसह त्यांच्या काव्यांचें मार्मिक, रसग्राही परीक्षण खरोखरच सुंदर रीतीनें केलें आहे. संतवाङ्मयाचा दीर्घ व सांगोपांग अभ्यास करणाऱ्यांत आज अग्रगण्य समजले जाणारे लक्ष्मण रामचंद्र पांगारकर यांनीं आपल्या मोरोपंताच्या चरित्रांत हंसांच्या निबंधांविषयीं ह्मटलें आहे. " हंसांचे तिन्ही निबंध अत्यंत मार्मिकपणानें, सहृदयतेनें व सद्भावानें लिहिलेले आहेत. हंसांची भाषा प्रगल्भ व प्रेमळ आहे, विचारसरणी चित्तवेधक व उदात्त आहे, व टीकापद्धति बाळबोध व शुद्ध भावाची आहे. यांच्या मोरोपंतावरील १५६ पानांच्या निबंधांत मोडक, ओक, मालाकार ( चिपळूणकर ) वगैरेंच्या लेखांतील सर्व माहितीचा योग्य उपयोग केला गेला असून हंसांच्या सात्त्विक वृत्तीची त्यांत भर पडल्यामुळें निबंध फार रसाळ झाला आहे...... उत्तम ग्रंथकार होण्यास प्राचीन वाङ्मयाचा निरंतर अभ्यास, सतत मनन व तदाकार वृत्ति हे गुण पाहिजेत. हे गुण संपादून हंसांनीं आपले निबंध लिहिले आहेत. मालाकार व हंस यांचे निबंध ताडून पाहण्यासारखे

आहेत. मालाकारांच्या वाणींत प्रतिभा व ओज जास्त आहे, हंसांच्या वाणींत प्रेम व रसिकता अधिक आहे. मालाकारांची वाणी दिपविणारी आहे, हंसांची वाणी आपल्या सिद्धांतांचें सत्यत्व मनाला पटवीत शुद्धानंद देणारी आहे. मालाकार व हंस दोघेही विद्वान् व रसिक पंतभक्त होत, पण मालाकारांचें मुख्य बळ प्रतिपक्षखंडणांत व्यक्त झालें आहे व हंसांचें बळ पंतकविताकमलाची माधुरी (!) यथार्थत्वें व्यक्त करण्यांत उघड झालें आहे." अस्तु. हंसांनी तुकाराम, मोरोपंत व वामन यांच्याशिवाय ज्ञानेश्वर, रामदास व एकनाथ यांच्यावरही निबंध लिहिले आहेत; परंतु ते अद्याप अप्रकाशित आहेत. हंसांनंतर नरहर शंकर रहाळकर यांची 'विष्णुगुरूजी यांचें अल्प चरित्र व काव्यपरिचय' व 'केशवसुत आणि त्यांची कविता' हीं दोन पुस्तकें अनुक्रमें सन १९१९ व १९२० मध्यें प्रसिद्ध झालीं. यांपैकीं पहिलें पुस्तक लिहितांना मध्यहिंदुस्थानांतील इतर प्रमुख अर्वाचीन मराठी कवींच्या काव्यांचे परिचय लेख लिहिण्याचा रहाळकरांनीं संकल्प केला होता; परंतु कार्यबाहुल्यामुळें तो संकल्प त्यांना अजून पुरता करतां आला नाहीं; तथापि मध्यंतरीं सन १९३२ मध्यें यशवंत खंडेराव कुळकर्णी यांच्या 'मानस-निष्यंद' कवितासंग्रहाला प्रस्तावना लिहिण्याचा योग आला असतांना त्यांनीं त्यावेळीं आपला हा जुना संकल्प त्या रूपांत साधून घेतला आहे. विष्णु गुरुजींच्या 'काव्य-परिचयां'त त्यांच्या 'वाग्विहारा'चें रहाळकरांनीं सहृदयतेनें केलेलें परीक्षण वाचून महाराष्ट्रीय वाचकांस या मध्यभारतीय जुन्या कवि-श्रेष्ठाचा परिचय घडून येऊन त्याच्या कवितेविषयीं आदर उत्पन्न झाला आहे, हें येथें सांगणें अवश्य आहे. 'केशवसुत आणि त्यांची कविता' हें रहाळकरांचें दुसरें पुस्तक, केशवसुतांच्या कवितेवर आज-पर्यंत जेवढें परीक्षणात्मक वाङ्मय निर्माण झालें त्यांत, बऱ्याच वरच्या प्रतीचें ठरलें आहे. हें पुस्तक प्रथम मुंबईच्या 'मासिक मनोरंजनां'

तून लेखमाला रूपांत प्रसिद्ध होत असतांनाच साहित्याचार्य नरसिंह चिंतामण केळकर, प्रो. वासुदेव बळवंत पटवर्धन, प्रो. श्रीनिवास निळकंठ चाफेकर प्रभृति विद्वद्वर्यांच्या स्तुतीस पात्र झालें होतें. रसिक, काव्य-मर्मज्ञ टीकाकार ह्मणून रह्याळकरांचा लौकिक वास्तविक याच पुस्तका-मुळें महाराष्ट्रांत पसरला आहे. पुढें भास्कर रामचंद्र तांबे यांच्याविषयीं व्यक्ति व वाङ्मय या दोन्हींसंबंधांत परिचय–परीक्षणात्मक अशीं लिहिलेलीं तीन पुस्तकें प्रसिद्ध झालीं. त्यांतील ' कवि तांब्यांचा सुवर्ण-संदेश ' हें पुस्तक प्रो. ( नंतर प्रिं. ) वासुदेव कृष्ण ताटके यांनीं सन १९२७ मध्यें ग्वाल्हेर राज्यस्थ मराठी साहित्य संमेलनाच्या प्रथमाधिवेशन प्रसंगीं लिहून प्रसिद्ध केलें. वस्तुतः रस्किननें ह्मटल्या-प्रमाणें कवीचें हृदय ओळखणें हें सोन्याच्या खाणींतून सुवर्णकण एकत्र करण्याइतकेंच कठिण आहे; तथापि तें श्रमसाध्य अवश्य आहे. ताटके यांनीं तांब्यांचें हृदय असेंच श्रमानें ओळखून त्यांच्या कवितेच्या अंतर्बाह्य स्वरूपाचा परिचय करून देतदेत त्या कवितेंतले गूढ सुवर्ण संदेश या लहानशा निबंधांत सुबोध रीतीनें निवेदिले आहेत. ' रसाचे तीन घट ' हें दुसरें पुस्तक नारायण वासुदेव केळकर यांनीं लिहून सन १९३४ मध्यें प्रसिद्ध केलें. याच्या दोन वर्षें अगोदर ' सौंदर्य-मीमांसा व कलाविज्ञान ' हें तांब्यांच्या सौंदर्य व कला विषयावरील त्यांच्या कवितेंतून प्रकट झालेल्या विचारांचें विवेचन करणारें पुस्तक याच केळकरांनीं प्रसिद्ध केलें होतें, त्याचा परिचय मागें ' भाषा व साहित्यविषयक वाङ्मय ' या प्रकरणांत करून दिलेलाच आहे. ' रसाचे तीन घट ' या पुस्तकांत केळकरांनीं ' घट तिचा रिकामा झऱ्यावरी ' ' घट भरे प्रवाहीं बुडबुडुनी ' व ' घट भरा शिगोशिग भरा भरा ' या तीन घट–गीतांतील चित्तवेधक रस, रमणीय ध्वनि, सहजसुंदर अलंकार, बव्हर्थगर्भी शब्दयोजना, गूढ अर्थ इत्यादि गोष्टींचें विवेचन सुबोध रीतीनें केलें आहे व त्यास प्रिं. ताटके यांची लहानशी प्रस्तावना

जोडली आहे. तांब्यांच्या संबंधाचें तिसरें पुस्तक ' तांबे—व्यक्ति आणि कला ' हें होय. हें पुस्तक ग्वाल्हेर येथें साजरा करण्यांत आलेल्या तांब्यांच्या एकसष्टाव्या वाढदिवसानिमित्त ( ता. २७ नोव्हेंबर १९३४) त्यांस समर्पण केलें गेलें आहे; परंतु कांहीं अपरिहार्य कारणामुळें हें पुस्तक योग्य वेळीं प्रसिद्ध न होता पुढें ता. ६ नोव्हेंबर १९३५ रोजीं प्रसिद्ध झालें आहे. तांबे यांचें चरित्र, त्यांचे गद्य लेख व त्यांचा काव्यगुणगौरव असे या पुस्तकाचे तीन खंड केलेले आहेत. त्यांतील पहिल्या खंडांतला मुख्य भाग कुलवृत्तांत हा प्रो. ना. बा. पराडकर यांनीं लिहिला असून प्रो. भवानीशंकर श्रीधर पंडित, वि. रा. डोंगरे व प्रो. माधव त्रिंबक पटवर्धन यांचे लेख त्यास पुरवणी ह्मणून जोडले आहेत. त्यांवरून पोलिस सुपरिटेंडेंट, न्यायाधीश, दिवाण यासारखीं महत्त्वाचीं अधिकारपदें संस्थानांत पूर्वीं मिळवून व हल्लींही ग्वाल्हेर संस्थानांतील शिक्षणखात्यांत अधिकारपदावर राहून आपली साधी राहणी व उच्च विचारसरणी अविरत कायम राखणाऱ्या तांब्यांचें बोधप्रद आयुर्वृत्त व त्यांच्या भावमय अंतःकरणांत विलसणारी नितांत रमणीय काव्यात्मकता यांचा यथार्थ परिचय होतो. दुसऱ्या खंडांत आधुनिक चिंतनपर काव्यें, इंदूर येथील प्रथम मध्यभारतीय कविसंमेलन प्रसंगींचें अध्यक्षीय भाषण, ललित कला निसर्गाची नक्कल आहे काय?, कोल्हापुर येथील १७ व्या मराठी साहित्यसंमेलनांतर्गत कविसंमेलनांतलें अध्यक्षीय भाषण, कला आणि नीति, कलेचा उद्भव व संगीताचें मराठीकरण एवढे तांब्यांचे सात गद्य लेख दिलेले आहेत. या लेखांत आतांपावेतों प्रत्यक्ष अनुभवानें व अभ्यासानें परिपक्व बनलेलीं काव्यासंबंधींचीं व तसेंच कला आणि नीतिसंबंधाचीं तांब्यांचीं मतें व विचार पूर्णपणें प्रतिबिंबित झालेलीं दिसून येतात. नंतर तिसऱ्या खंडांत वि. स. खांडेकर यांनीं तांबे यांना कलादृष्टि, प्रो. माधव त्रिंबक पटवर्धन यांनीं वृत्तरचना आणि संगीत, प्रो. वा. गो. मायदेव यांनीं कविवर्य तांबे आणि

सामाजिक सुधारणा, यशवंत खंडेराव कुळकर्णी यांनीं भास्कर-प्रदीप, गं. के. शिराळकर यांनीं कविवर्य तांब्यांचें काव्यविषयक तत्त्वज्ञान व कविसंदेश, रामचंद्र अनंत काळेले यांनीं तांब्यांचीं काव्यचित्रें, गोविंद सदाशिव फडके यांनीं तांब्यांचें कवित्व व प्रो. के. ना. वाटवे यांनीं तांबे व संस्कृत साहित्य या शीर्षकांखालीं तांब्यांच्या काव्यावर गुण-गौरवपर परंतु विवेचक लिहिलेले लेख दिलेले आहेत. यांतील काळेले व प्रो. वाटवे यांचे लेख वैशिष्ट्यपूर्ण असून फडके यांचा लेख अत्यंत मार्मिक व बहारीचा आहे. तांब्यांच्या काव्यशारदेवर सडकून प्रतिकूल टीका करण्याची फडक्यांची मूळ ईर्षा शेवटीं त्या काव्यशारदेच्या दिव्य गुणसौंदर्यावर लुब्ध होऊन तिच्या चरणीं भक्तिरूपांत कशी परिवर्तन पावली हें दृश्य यांत पाहण्यासारखें आहे. भास्कर-प्रदीप या प्रदीर्घ लेखांत तांब्यांच्या काव्याचा सर्व दृष्टीनें घेतलेला परामर्ष व काव्य-विषयक तत्त्वज्ञान आणि कविसंदेश या लेखांत तांब्यांचें ग्रथित केलेले साहित्यिक सिद्धांत महत्त्वपूर्ण व मननीय आहेत. प्रस्तावनाकार रा. ब. लक्ष्मण भास्कर मुळे यांनीं प्रस्तावनेंत ह्मटल्याप्रमाणें तांब्यांच्या काव्यांतील गूढवादासंबंधीं एकादा स्वतंत्र लेख या तिसऱ्या खंडांत आला असतां तर तांब्यांच्या काव्यावरील चर्चेंत आमच्याही मतें कोणत्याच प्रकारची उणीव तूर्त तरी राहिली नसती. अस्तु. या पुस्तकद्वारें खरोखर एका विद्यमान कविश्रेष्ठाचा यथोचित सन्मान, त्याचें व्यक्तित्त्व व कलानिर्मिति यांचा जनतेला उद्बोधक परिचय आणि मराठी साहित्यांत एका सुंदर कृतीची विशेष भर अशा त्रिविध कार्यांची संसिद्धि एकसमयावच्छेदेंकरून घडून आली आहे, यांत संदेह नाहीं.

शेवटीं येथपर्यंत करून दिलेल्या काव्यवाङ्मयाच्या परिचयावरून मध्यभारतीय कवींनीं आतांपर्यंत कशी व किती कामगिरी बजाविली आहे याची कल्पना कोणासही सहज करतां येईल. वरील एकंदर

परिचित काव्यांची प्रत्यक्ष संख्या मोजूं जातां ती १६० होते; परंतु याशिवाय आणखीं कांहीं काव्यांचीं नुसतीं नांवें आमच्या कानांवर आलीं असून बाळकृष्ण मल्हार हंस यांचें 'यशवंत स्तोत्र', बळवंत कमळाकर भाकोडे यांचा 'पुष्पबाणविलास' (भाषांतर), शांताराम अनंत देसाई यांचे 'मराठी काव्यांतील वेंचे', ग्वाल्हेरचे महामहोपाध्याय रघुपतिशास्त्री यांचे 'इंदुविनोदावहा' व नरहर शंकर रहाळकर यांचें 'बिल्वदल' अशा कांहीं काव्यांचा परिचय करून देण्याचें चुकून राहून गेलें आहे, हें येथें निर्देशिणें जरूर आहे.

## प्रकरण पांचवें

# इतिहास, चरित्रें व इतर ऐतिहासिक वाङ्मय.

धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितम् ।
पूर्ववृत्त कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥

### ऐतिहासिक वाङ्मयाचें पूर्वकथन

इति व ह हीं दोन अव्ययें आणि अस् हा धातु यांपासून तयार झालेल्या इतिहास शब्दाचा मूलार्थ पूर्वस्थिति हा होय. पुरावृत्त अर्थात् मागें घडलेली हकीकत हा त्याला दुसरा समानार्थी शब्द अमरकोशांत आढळतो. आर्यांच्या पूर्वकालीन वाङ्मयांत इतिहास व पुराण हीं दोन नांवें जोडीजोडीनें आलीं असून त्या दोघांना पांचव्या वेदाचा मान दिला गेला आहे व बार्हस्पत्य स्मृतींत आणि ब्राह्मण ग्रंथांत वेदांच्या अर्थनिर्णयासाठीं इतिहास व पुराणें यांचा आश्रय घेणें योग्य असल्याचें सांगितलें आहे. त्यामुळें इतर शास्त्रांबरोबर इतिहास, पुराणांचेंही अध्ययन करण्याचा पूर्वकालीं परिपाठ पडला होता या गोष्टीला एक प्रत्यक्ष प्रमाणही उपलब्ध आहे. छांदोग्योपनिषदांतील नारद–सनत्कुमार–संवादामध्यें आपण कोणकोणती विद्या शिकलों

हें सनत्कुमाराला सांगतांना नारदानें ह्मटलें आहे. " ऋग्वेद भगवोऽ ध्येमि यजुर्वेद सामवेदमाथर्वेदं चतुर्थं इतिहासपुराणं पंचमं वेदानां वेदं." उत्तरकालीन संस्कृत वाङ्मयांत इतिहासाचा दंतकथा, गोष्ट असा अगदीं साधा अर्थ होऊं लागला व त्याच्याबद्दल आख्यान, आख्यायिका, कथा इत्यादि दैविक किंवा चमत्कृतिप्रधान वृत्तांताचे निदर्शक असे प्रतिशब्द उपयोगांत येऊं लागले. कौटिल्यानें इतिहासाची महती बरीच गाइली असून राजा आणि प्रधान या दोघांना त्यांच्या कर्तव्यकर्मांत इतिहासाचें श्रवण–कथन अत्यावश्यक असल्याचें प्रतिपादिलें आहे. " पुराणमितिवृत्तमाख्यायिकोदाहरणं धर्मशास्त्रमर्थशास्त्रं चेतीतिहासः " या त्याच्या वचनावरून त्याची इतिहासाची व्याख्या स्पष्ट कळून येते. पुराण, इतिवृत्त, आख्यायिका, उदाहरण, धर्मशास्त्र आणि अर्थशास्त्र इतक्यांचा त्यानें इतिहासांत अंतर्भाव केला आहे; परंतु त्यांपैकीं पुराण, इतिवृत्त, आख्यायिका व उदाहरण यांचा अर्थ काय, हें मात्र निश्चितपणें सांगितलें नाहीं; तथापि सुप्रसिद्ध जर्मन पंडित याकोबी यानें त्यावर ऊहापोह करून पुराण ह्मणजे दंतकथांचा संग्रह, इतिवृत्त ह्मणजे ऐतिहासिक गोष्टींचा संग्रह, आख्यायिका ह्मणजे गद्य कथानक व उदाहरण ह्मणजे नैतिक उपदेशपर भाग असा त्यांचा अर्थ जुळविला आहे, तो अर्थ अगदींच अप्रस्तुत वाटत नाहीं; परंतु इतिहास ह्मणजे धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष या चतुर्विध पुरुषार्थ-साधनासंबंधींचें उपदेशपूर्ण पूर्ववृत्त अशी प्रकृत प्रकरणाच्या आरंभीं दिलेल्या श्लोकांतील इतिहासाची व्याख्या फार जुनी व व्यापक अर्थाची असून त्या व्याख्येनुसार वेद, श्रुति, स्मृति हे आर्यांचें आदि वाङ्मय व रामायण, महाभारत, पुराणें आदि ग्रंथ पूर्वीपासून इतिहास ह्मणविले जातात. या सर्व ' इतिहासां ' विषयीं आपणां भारतीयांच्या अंतःकरणांत नितांत आदर वसत आहे. " नाना इतिहास हेच देच। त्यांच्या आश्रयें राहती सर्व। मुख्य वैकुंठपति रमाधव। तोचि तेथें

बसत असे ॥ " हे ' हरिविजयां ' तील श्रीधराचे उद्गार केवळ त्याच नितांत आदरांतून बाहेर निघालेले आहेत; तसेंच मॅक्समुल्लर, ओल्डन-बर्ग, व्हॉन श्रोडर, सिल्व्हां लेव्ही प्रभृति पाश्चात्य संस्कृतज्ञ पंडितांनींही या वाङ्मयाचें आस्थापूर्वक अध्ययन करून त्याची थोरवी गाइली आहे इतिहासाबद्दल पूज्य भाव तर प्रायः सर्वच सुसंस्कृत व सुविद्य राष्ट्रांत दिसून येतो. ' ज्या राष्ट्राला पूर्वेतिहास नाहीं त्याला भवितव्यही नाहीं ' ही आंग्लोक्ति प्रसिद्ध आहे. यावरून, इतिहासाविषयीं आर्यांच्या व पाश्चात्यांच्या असलेल्या कल्पनांत कांहीं बदल असला तरी पुरुषार्थसाधनाचें कार्य इतिहासापासून होतें, ही आर्यांची श्रद्धा पाश्चात्यांतही वसत आहे, हें अगदीं उघड दिसून येतें. निरनिराळे अर्थ योजून, परंतु पुरुषार्थसाधनाची एकच एक दृष्टि ठेवून, महाभारतादि ग्रंथांत इतिहासाला दीपाची उपमा दिली गेली आहे. या उपमेंत जितकी समर्पकता दिसते तितकीच समर्पकता आज इतिहासाविषयीं प्रचलित असलेल्या निराळ्या कल्पनेला अनुसरून त्यास देण्यांत येणाऱ्या गलबताच्या शिडाच्या उपमेंतही आढळते. शिडामुळें गलबताला गति मिळते त्याप्रमाणें इतिहासापासून राष्ट्र कार्यप्रवण बनतें. उदाहरणार्थ भारतीय वीरपुंगवाच्या कथा ऐकूनच छत्रपति शिवाजी महाराजांना गोब्राह्मणप्रतिपालनार्थ स्वराज्योद्योगाची स्फूर्ति झाली व त्याबरोबर महाराष्ट्र जागा होऊन तत्काळ त्यांच्या पाठीशीं सहाय्यार्थ उभा राहिला. तसेंच मराठशाहींतील रामलक्ष्मण ह्मणविणाऱ्या पेशवेकुलमणि बाजी-चिमाजीचा निःसीम भ्रातृभाव व मराठी दळभारानिशीं सर्वत्र दिग्विजययात्रा करण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा या दोहोंचीही उत्पत्ति रामायण, महाभारताच्या कथांपासूनच झाली. अस्तु. इतिहासाला शिडाची दिलेली ही उपमा दुसऱ्याही एका कारणानें योग्य वाटते. तें कारण ह्मणजे शीड व हल्लीचे इतिहास या दोहोंच्या बाह्य रूपरचनेंत असलेलें साम्य हें होय. शीड कधींही

एका सलग कापडाचें तयार होत नसतें तर हजारों चिंध्या किंवा निरनिराळीं फडकीं दोऱ्यांनीं एकत्र गांठून तें बनविलें जातें. राष्ट्राचा आधुनिक पद्धतीचा इतिहासदेखील तसा कोणात्याही एकाच साधनापासून तयार होत नाहीं तर त्याकरितां शिलांवर किंवा धातूंच्या पत्र्यांवर कोरलेले पूर्वकालीन लेख, पुरातन उध्वस्त वास्तूंचे व शिल्पकलेचें अवशेष, सुवर्णरौप्यताम्रादींचीं जुनीं नाणीं, निरनिराळ्या ऐकींव व लेखी दंतकथा किंवा आख्यायिका, जुन्या ग्रंथांतील ऐतिहासिक माहिती, देशी–विदेशी लेखकांनीं व प्रवाश्यांनीं लिहिलेल्या हकीकती, बखरी, कैफियती, रोजनिश्या व तसेंच, करीणे, कुळकटें, महजरे, भेस्तकें वगैरे कागदपत्रें अशी नानाविध साधनसामुग्री प्रथम एकत्रित करून आणि नंतर त्या सर्व साधनांचे धागेदोरे दक्षतापूर्वक योग्य रीतीनें जुळवून इतिहासाचा पट तयार केला जातो. ही इतिहासरचनेची पद्धति वस्तुतः मुसलमान व इंग्रज या परस्थांकडून आपण शिकलों. आपल्या खऱ्या इतिहासाचा प्रारंभ छत्रपति शिवाजी महाराजांच्या स्वराजस्थापनेच्या कालापासून आढळतो. मुसलमानांचें अनुकरण करून छत्रपतींनीं व पेशव्यांनीं पदरीं बाळगलेल्या मल्हारराव रामराव, कृष्णाजी शामराव, कृष्णाजी सभासद, रघुनाथ यादव प्रभृति बहुश्रुत अखबरनवीस मंडळीनीं बखरी व कैफियती रचिल्या आणि रोजनिश्या वगैरे लिहिल्या. त्यावरून स्वराज्याच्या उदयापासून तों पेशवाईच्या अस्तापावेतोंचा मराठशाहीचा विश्वसनीय इतिहास आज आपणांस उपलब्ध आहे. तत्पूर्वींचा मुसलमानी अमदानीचाही तसा इतिहास मुसलमान लेखकांच्या ग्रंथांवरून मिळतो; परंतु मुसलमानांच्या भारतप्रवेशापूर्वींचा इतिहास मात्र अद्याप असंगत व अंधुकच आहे. तो सप्रमाण सुसंगत व सुस्पष्ट करून तेथपासून सांप्रत कालापावेतोंचा इतिहास सांगोपांग तयार करण्याबद्दल संशोधनाचा उद्योग गेल्या १५० वर्षांपासून अव्याहत चालू आहे. या उद्योगाला सुरुवात सर वुइल्यम

जोन्स या अत्यंत तल्लख बुद्धीच्या, २८ भाषा ज्ञात असलेल्या व कवि-कुलगुरु कालिदासाचे शाकुंतल नाटक आणि मनुस्मृत्यादि ग्रंथ यांचें अगदीं प्रथम इंग्रजींत भाषांतर करून भारतीयांची अचाट बुद्धिमत्ता, अलौकिक प्रतिभाशक्ति व लेखनांतील सव्यसाचित्त्व यांचा पाश्चात्य पंडितांना पूर्ण परिचय करून देणाऱ्या आंग्ल विद्वानानें केली. सन १७८४ मध्यें जोन्सनें 'ऐशियाटिक सोसायटी ऑफ बेंगॉल' ही संस्था स्थापन केली. तिच्या विद्यमानें पुढें सन १७८८ मध्यें 'एशियाटिक रिसर्चेस' ही ग्रंथमाला सुरू होऊन तींतून भारतवर्षासह सर्व आशियाखंडाच्या भाषा, वाङ्मय, इतिहास, शिल्प वगैरे बाबींचें संशोधन बाहेर येऊं लागलें. त्यानंतर सन १८२३ मध्यें लंडन येथें 'रॉयल एशियाटिक सोसायटी' स्थापन झाली. तिच्या शाखा लौकरच मुंबई व सिलोन येथें काढण्यांत आल्या. अशा प्रकारच्या आणखीही कांहीं संस्था जर्मनी, फ्रान्स, इटली, रशिया वगैरे देशांत निघून त्यांच्यांत अद्यापपावेतों सहकार्य चालू आहे. या सर्व संस्थांच्या अव्याहत प्रयत्नांनीं भारतवर्षाच्या प्राचीन इतिहासावर बराच प्रकाश पडला आहे व पडत आहे. खास भारतवर्षांत सन १८६१ मध्यें कर्नल कनिंगहॅम यांच्या खटपटीनें सरकारी 'पुराणवस्तुसंशोधन खातें' (आर्कियॉलाजीकल डिपार्टमेंट) स्थापन झालें व त्या खात्याची सुसंगत घटना पुढें लॉर्ड कर्झन यांनीं सन १९०३ मध्यें ठरवून दिली तीच हल्लीं कायम आहे. या खात्यामार्फत संशोधनाचें कार्य हिंदुस्थानच्या सर्व भागांत व्यवस्थित रीतीनें चालू होऊन पाटलीपुत्र, बुद्धगया, तक्षशिला, नालंदा, मोहेंजोदारो, हरप्पा आदि भूगर्भांत गडप झालेलीं प्राचीन शहरें उत्खनन करून बाहेर काढण्यांत आलीं आहेत व त्याशिवाय दुसरेही कित्येक प्रकारचे महत्त्वाचे शोध लावले गेले आहेत. या कामांत ज्यांचे प्रयत्न विशेष प्रशंसनीय व फलदायी झाले त्यामध्यें डॉ. कनिंगहॅम, डॉ. बर्जेस, डॉ. फ्लीट, डॉ. किलहार्न वगैरे इंग्रज

व डॉ. भाऊ दाजी, सर रामकृष्ण गोपाळ भांडारकर, डॉ. देवदत्त रामकृष्ण भांडारकर, राजेंद्रलाल मित्र, भगवानलाल इंद्र, काशीप्रसाद जयस्वाल, महामहोपाध्याय गौरीशंकर ओझा, काशिनाथ नारायण दीक्षित वगैरे भारतीय पंडितांची गणना प्रामुख्यानें होते. महाराष्ट्रियांतही इतिहाससंशोधनाची अभिरुचि गेल्या ६०–६५ वर्षांपासून उत्पन्न झालेली आहे व त्यांत रा. ब. काशीनाथ नारायण साने, विश्वनाथ काशीनाथ राजवाडे, रा. ब. दत्तात्रय बळवंत पारसनीस, नारायण भवानराव पावगी, वासुदेव वामनशास्त्री खरे, ‘ रियासतकार ’ गोविंद सखाराम सरदेसाई, भारताचार्य चिंतामण विनायक वैद्य, विनायक लक्ष्मण भावे, यशवंत राजाराम गुप्ते, प्रो. दत्तो वामन पोतदार प्रभृति मंडळींनीं केलेली कामगिरी बरीच महत्त्वाची आहे; परंतु यांपैकीं बऱ्याच जणांच्या संशोधनाची भर मराठ्यांच्या इतिहासावरच विशेष आहे. या इतिहास--संशोधनासाठीं राजवाड्यांच्या प्रयत्नानें सन १९१० मध्यें पुण्यास ‘ भारत इतिहास संशोधक मंडळ ’ स्थापन झालें. नंतर तेथेंच सन १९२७ मध्यें प्राच्य विद्येच्या संशोधनासाठीं व अभ्यासासाठीं ‘ भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिट्यूट ’ ही संस्था निघाली. सन १९२५ मध्यें साताऱ्यास रा. ब. पारसनीस यांचा ‘ हिस्टॉरिकल म्यूझियम ’ उघडला गेला. धुळें येथें समर्थवाङ्मय प्रकाशित करणारी शंकर श्रीकृष्ण देव यांची ‘ सत्कार्योत्तेजक सभा ’ यापूर्वीच स्थापन झाली होती. तिचें द्वितीयांग ‘ राजवाडे–संशोधक–मंदिर ’ थोड्याच वर्षांपूर्वी देव, भट प्रभृति मंडळींच्या प्रयत्नानें स्थापन झालें. या नूतन संस्थेच्या विद्यमानें राजवाड्यांच्या अलीअलीकडील ऐतिहासिक पत्रसंग्रहाचें योग्य रीतीनें जतन होऊन तो यथावकाश प्रकाशित होणार आहे. वऱ्हाडांतही इतिहास–संशोधनासाठीं तीन संस्था निघाल्या आहेत. त्यांपैकीं ‘ विदर्भ साहित्य संघ ’ ही पहिली संस्था कविभूषण बळवंत गणेश खापर्डे यांच्या प्रयत्नानें उमरावती येथें सन १९२३

मध्यें स्थापन होऊन दुसरी 'शारदाश्रम' ही संस्था यशवंत खुशालराव देशपांडे यांच्या खटपटीनें यवतमाळ येथें सन १९२६ मध्यें स्थापन झाली आहे व तिसरी 'मध्यप्रांत संशोधक मंडळ' ही संस्था अलीकडेच निघाली आहे. अस्तु. वरील सर्व संस्थांच्या विद्यमानें व तद्व्यतिरिक्त ऐतिहासिक वाङ्मय प्रकाशनार्थ कांहीं नियतकालिकें आणि मालाही महाराष्ट्रांत व बृहन्महाराष्ट्रांत निर्माण झाल्या. त्यांतील जनार्दन बाळाजी मोडक यांच्या संपादकत्वाखालीं सन १८७८ मध्यें निघालेलें 'काव्येतिहाससंग्रह' हें मासिक पहिलें होय. त्यानंतर 'काव्यसंग्रह', 'ऐतिहासिक लेखसंग्रह', 'इतिहाससंग्रह', 'इतिहास व ऐतिहासिक', 'कायस्थ प्रभूंच्या इतिहासाचीं साधनें', 'महाराष्ट्र-इतिहास', 'सरस्वती मंदिर', 'भारतवर्ष', 'रामदास व रामदासी' वगैरे मासिकें, त्रैमासिकें व माला मराठींत निघाल्या. परंतु त्यांपैकीं केवळ 'रामदास व रामदासी' सोडून कोणालाही दीर्घायुष्य लाभलें नाहीं. मुंबईचे 'विविधज्ञानविस्तार' व 'प्रभात' या मासिकांतून व कोल्हापूरच्या 'ग्रंथमालें'तून ऐतिहासिक वाङ्मय पूर्वी बरेंच प्रकाशित झालें आहे. आजही कांहीं विद्यमान मराठी मासिकांतून ऐतिहासिक लेख येत असतात; परंतु केवळ इतिहासास वाहिलेलें असें काय तें एकच 'भारत इतिहास संशोधक मंडळा'चें त्रैमासिक मराठींत असून याच मंडळाच्या व वर निर्देशिलेल्या पहिल्या दोन वैदर्भीय संस्थांच्या स्वीय पुस्तकमालांतून इतिहासासंबंधीं कांहीं ग्रंथपुष्पें गुंफिलीं गेलीं आहेत.

मध्यभारतांतही राजेरजवाडे व विद्वान् मंडळी यांच्यांत इतिहासाविषयीं सदभिरुचि उत्पन्न झालेली आहे आणि धार, इंदूर, ग्वाल्हेर व भोपाळ या राज्यांत तर आतां इतिहासाचीं स्वतंत्र खातींच निघालीं आहेत. त्या खात्यांकडून आपापल्या मुलुखांतील जुन्या महत्त्वाच्या स्थानांसंबंधांत व राजघराण्यांसंबंधांत निरनिराळे शोध लाविले जाऊन

इतिहासांत महत्त्वाची भर घातली जात आहे. तसेंच उपलब्ध होणाऱ्या जुन्या ऐतिहासिक वस्तूंचा संग्रहही तेथें केला जात आहे. खास मध्य-भारताच्या इतिहासांत विशेष महत्त्वाच्या वाटणाऱ्या अशा ज्या थोड्याबहुत वस्तु गेल्या ५० वर्षांत सांपडल्या आहेत त्यांत माळव्यांतील भाग भद्र राजाच्या दरबारीं येऊन वैष्णव धर्म स्वीकारणाऱ्या ग्रीक राजदूत हेलिओडोरसचा बेसनगर येथील इ. स. पू. १५० च्या सुमारचा गरुडध्वज ( खांब बाबा ), हूणांचा नायनाट करणाऱ्या मालव–राजा यशोधर्मांचा सौंदणी येथील सन ५३८ चा जयस्तंभ, गांगेय तेलंगणांना जिंकणाऱ्या परमार राजा भोजदेवाचा धार येथील जयस्तंभ ( गांगी तेलण की लाट ) व तेथीलच अर्जुनवर्मदेवाचा गुरु सरस्वतीमदन याची शिलोत्कीर्ण पारिजात मंजरी नाटिका, परमार घराण्याची वंशावळ दाखविणारी उदैपूर ( ग्वाल्हेर राज्य ) येथील प्रशस्ति व ओंकारेश्वर येथील अमरेश्वर मंदिराच्या भिंतींत कोरलेलें सन १०६३ चें महिम्नस्तोत्र या वस्तु प्रमुख होत. मध्यभारताच्या इतिहासावरही अलीकडे मराठींत ग्रंथनिर्मिति झाली आहे तिचा परिचय प्रस्तुत प्रकरणांत पुढें यथास्थानीं करून दिला जाईल. तत्पूर्वी पाश्चात्य संशोधकांनीं आपल्या भाषेंतून एतत्संबंधीं जें वाङ्मय निर्माण करून ठेविलें आहे तें आपण पाहूं. मध्यभारताचा एक प्रकारें इतिहासच ह्मणतां येईल असे सर जॉन मालकम यांचे ' रिपोर्ट ऑन धि सेटलमेंट ऑफ माळवा अँड अॅडजॉयनिंग प्रॉव्हिन्सेस ' व 'ए मेमॉयर ऑफ सेंट्रल इंडिया ' हे दोन ग्रंथ होत. हे ग्रंथ सन १८२१ च्या सुमारास प्रथम प्रसिद्ध झाले व त्यांपैकीं दुसऱ्या ग्रंथाच्या ३ आवृत्त्या आतांपावेतों निघाल्या. मालकमच्या या ग्रंथानंतर सन १९०८ मध्यें कॅ. ल्युअर्ड यांनीं काशीनाथ कृष्ण लेले यांच्या साह्यानें ' धि परमार्स ऑफ धार अँड मालवा ' हें पुस्तक लिहिलें. यापूर्वी जी. बुह्लर यांनीं निरनिराळ्या शिलालेखांतील माहिती एकत्र करून व

परमार घराण्याची वंशावळ नीट जुळवून त्या घराण्याचा इतिहास लिहिण्याचा प्रयत्न ' इंडियन ॲंटिक्केरी ' मध्यें केला. सन १९०८-०९ मध्यें हिंदुस्थान सरकारच्या हुकुमावरून मध्यभारतीय देशी संस्थानांची सर्वांगीण माहिती देणारीं ' सेंट्रल इंडिया गॅझेटियरें ' प्रसिद्ध झालीं. या कामीं कॅ. ल्युअर्ड यांची सुपरिटेंडेंट ह्मणून योजना झाली होती. महाराष्ट्रांत ग्रँट डफ व राजपुतान्यांत कर्नल टॉड यांना तत्रस्थ इतिहासाच्या बाबतींत जी कामगिरी बजाविली आहे तीच कामगिरी सर जॉन मालकम यांनीं पूर्वी व कॅ. ल्युअर्ड यांनीं अलीकडे बजाविली आहे, हें येथें सांगणें अवश्य आहे. सन १९२२ मध्यें ' रूलिंग प्रिंसेस अँड चीफ्स अँड नोबल्स ऑफ सेंट्रल इंडिया ' हें पुस्तक कॅ. ल्युअर्ड यांनीं प्रथम लिहिलें व नंतर त्याच्याच, वेळोवेळीं नवीन घटनानुसार योग्य तो बदल करून, ' रूलर्स, लीडिंग फॅमिलीज अँड ऑफिशियल्स इन् धि स्टेट्स् ऑफ सेंट्रल इंडिया ' या नांवानें सेंट्रल इंडिया एजन्सीनें आतांपावेतों दोनतीन आवृत्त्या काढविल्या. असाच मध्यभारतांतील राजेरजवाडे व प्रमुख व्यक्तींच्या चरित्रांसंबंधाचा प्रयत्न जी. आर. ॲबेरे मॅके यांनीं ' धि चीफ्स ऑफ सेंट्रल इंडिया ' हा ग्रंथ लिहून व दुसऱ्या आणखी एका इंग्रज लेखकानें ' रिप्रेझेंटेटिव्ह मेन ऑफ सेंट्रल इंडिया ' हा ग्रंथ रचून पूर्वी केला होता. ॲचिसनचें ' ए कलेक्शन ऑफ ट्रीटीज, एंगेजमेंट्स अँड सनद्स् ऑफ सेंट्रल इंडिया ', जे. सिल्व्हेस्टरचें ' रिकलेक्शन्स ऑफ धि कॅंपेन इन् मालवा अँड सेंट्रल इंडिया ' (१८६०), टी. लोव यांचें ' सेंट्रल इंडिया ड्यूरिंग धि रिबेलियन् ऑफ १८५७–५८ ' (१८६०) हे तिन्ही ग्रंथ मध्य-भारताच्या इतिहासांत महत्त्वाची भर घालणारे आहेत. माळव्याचा इतिहास व तेथील नाणीं यांची त्रोटक माहिती दिलेला एल. डब्ल्यु. किंग यांचा ' न्युमिसमॅटिक क्रॉनिकल ' मधील ' हिस्टरी अँड कॉयनेज ऑफ मालवा ' (१९०४) हा लेखही उपयुक्त आहे. तसेंच

मध्यभारतांतील इतिहासपूर्व कालांतल्या वस्तूंच्या अवशेषांवर रिव्हेट कार्नाक यांचा 'एशियाटिक सोसायटी बेंगाल' च्या जर्नलमधील 'प्रीहिस्टॉरिक रिमेन्स इन् सेंट्रल इंडिया' लेख (१८७९) व निरनिराळ्या स्मारकाचिन्हांवरील सर ग्रिफिन लिपेल यांचा 'फेमस मान्युमेंट्स ऑफ सेंट्रल इंडिया' हा ग्रंथ (१८८६) हे दोन्ही इतिहास-संशोधकांस मार्गदर्शक आहेत. यांशिवाय कांहीं प्रमुख मध्यभारतीय ऐतिहासिक स्थळांवरही लहान मोठे बरेच ग्रंथ व लेख प्रकाशित झाले आहेत. त्यांतील भोपाळ संस्थानांतल्या अशोककालीन प्रचंड बौद्ध स्तूपाविषयीं विख्यात असलेल्या सांचीसंबंधांत सर ए. कनिंगहॅम यांचें 'धि भिल्सा टोप्स' (१८५४), व 'ट्री अँड सर्पट वर्शिप—फॉर सांची अँड अमरावती' (१८७३), एच. एच. कोल यांचा 'ग्रेट बुद्धिस्ट टोप अॅट सांची' (१८८५), एफ. सी. मेसी यांचा 'सांची अँड इट्स् रिमेन्स' (१८९२), अल्फ्रेड फोचर यांचा 'ला पोर्टे ओरिएंटले डु स्टुपा डी सांची' (१९१०) व सर जॉन मार्शल यांचा 'ए गाइड टु सांची' (१९१७) हे ग्रंथ प्रसिद्ध असून 'आर्कियालॉजिकल सर्व्हे रिपोर्ट' मधील सर जॉन मार्शल यांचाच 'एक्स्कॅव्हेशन अॅट सांची', 'जर्नल ऑफ धि रॉयल एशियाटिक सोसायटी बेंगाल' मधील कॅ. जे. डी. कनिंगहॅम यांचा 'नोट्स् ऑफ धि अँटिक्विटीज ऑफ धि डिस्ट्रिक्ट्स् वुइदिन धि भोपाल एजन्सी' आणि 'जर्नल ऑफ धि रॉयल एशियाटिक सोसायटी बॉम्बे' मधील जेम्स बर्गेज यांचा 'धि ग्रेट स्टुपा अॅट सांची अँड कनखेडा' हे लेखही महत्त्वाचे आहेत. याचप्रमाणें धार व मांडववरही कांहीं ग्रंथ व लेख लिहिले गेले आहेत. त्यांतील कॅ. ब्लेक यांचा 'धि हिस्टरी ऑफ मांडू, धि एंशंट कॅपिटल् ऑफ मालवा' (१८४४ व १८७९ दोन आवृत्त्या), कॅ. हॅरिस यांचा 'रुइन्स ऑफ मांडू' (१८६०), व कॅ. ल्युअर्ड यांचा 'धार अँड मांडू' (१९१२) हे ग्रंथ उत्तम असून मुंबईच्या 'जर्नल ऑफ

धि रॉयल एशियाटिक सोसायटी बॅांबे ' मधील सर जॉन कॅंबेल यांचा ' मांडू ' व कॅ. बार्न्स यांचा ' धार अॅंड मांडू ' लेखही सुंदर आहेत. ग्वाल्हेर राज्यांतील बाग येथील इ. स. च्या ६ व्या ७ व्या शतकांतील गुंफावरही दोनतीन ग्रंथ लिहिले गेले आहेत. त्यांपैकीं इंडिया सोसायटीनें व ग्वालियर स्टेट ऑर्किआलॉजिकल डिपार्टमेंटनें प्रसिद्ध केलेले ' धि बाघ केव्हज ' हे ग्रंथ उत्तम आहेत. ' लंडन टाइम्स ' व ' डेली टेलिग्राफ ' पत्रांनीं या गुंफांतील चित्रकलेची मागें स्तुति केली होती. ग्वाल्हेर राज्यांतीलच पवाया, पिछोर व नरवर या तीन स्थळांपैकीं एका स्थळाला प्राचीन नागराजांची पद्मावती नगरी ठरविण्यासंबंधांत कनिंगहॅम प्रभृति इतिहाससंशोधकांनीं रॉयल एशियाटिक सोसायटीच्या जर्नलमधून व इतरत्र बराच ऊहापोह व चर्चा केली होती, हें प्रसिद्धच आहे. अशीच चर्चा व ऊहापोह माहिष्मती वगैरे आणखीही कांहीं प्राचीन स्थळांसंबंधांत झालेली आढळते. याशिवाय पाश्चात्य इतिहासकारांनीं लिहिलेल्या अनेक इतिहास ग्रंथांत व तसेंच नियतकालिकांत मध्यभारतीय राजांविषयीं व स्थळांविषयीं त्रुटित अशी विपुल माहिती सांपडते. अस्तु. आतां भारतीय इतिहास संशोधकांनीं याच संबंधांत जें वाङ्मय इंग्रजींत व मराठींत निर्माण करून ठेविलें आहे त्याचाही निर्देश याबरोबरच येथें करणें योग्य होईल. त्या वाङ्मयांत माळव्याच्या सन १६९८ पासून १७६५ पर्यंतच्या इतिहासावर सीतामहूचे महाराजकुमार रघुवीरसिंह यांचा नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या ' मालवा इन् ट्रॅंझिशन ' ग्रंथाचा निर्देश सकृद्दर्शनीं करणें अवश्य आहे. श्रीमंत बळवंतराव भैया शिंदे यांनीं लिहिलेला ' धि हिस्टरी ऑफ ग्वालियर ', एस्. एन्. रॉय यांनीं लिहिलेला ' ग्वालियर ' ( १८८८ ), दे यांनीं लिहिलेला ' माय पिलिग्रिमेज टु अजंटा अॅंड बाघ ', जी. यझदानी यांनीं लिहिलेला ' मांडू, धि सिटी ऑफ जॉय ' वगैरे स्थलवर्णनात्मक इंग्रजी ग्रंथ उत्तम असून कुंवर राजेंद्रसिंह यांचा ' लीजंड्स ऑफ

विक्रमादित्य ' व एस्. सी. दे यांचा विक्रमादित्य अँड कालिदास ' हे ग्रंथही महत्त्वाचे आहेत. या विक्रमादित्य आणि कालिदासाच्या काल निर्णयाविषयीं आजपावेतों पाश्चात्य व भारतीय विद्वानांनीं जितकी चर्चा केली आहे तितकी चर्चा जगाच्या पाठीवरील कोणत्याही दुसऱ्या ऐतिहासिक व्यक्तीविषयीं झाली नसल. त्या सर्व चर्चात्मक लेखांचा जर एकत्र संग्रह केला तर त्याचा महाभारता-एवढा दुसरा बृहत् ग्रंथ खात्रीनें तयार होईल. त्या चर्चेंत भाग घेणाऱ्या विद्वानांत डॉ. कीलहार्न, डॉ. होर्नल, सर भांडारकर, भारताचार्य वैद्य, प्रो. पाठक, काशीनाथ कृष्ण लेले, महावीरप्रसाद द्विवेदी वगैरे मंडळी प्रमुख होत. प्रो. वासुदेव विष्णु मिराशी यांनीं अलीकडे ' कालिदास ' नांवाचें, कालिदासाच्या एकंदर चरित्रावर सुंदर प्रकाश पाडणारें, मराठी पुस्तक लिहिलें आहे. कालिदासा-प्रमाणेंच भर्तृहरि व वराहमिहिर यांच्या कालावरही विद्वान् मंडळींत बरीच चर्चा झाली आहे. परमारांच्या वेळीं मध्यभारतांत हिंदु व जैन ग्रंथकार अनेक होऊन गेले त्यांचींही चरित्रें निरनिराळ्या नियतकालिकां-तून बरींच लिहिलीं गेलीं आहेत. तीं सर्व एकत्र केल्यास त्यावरून मध्यभारताच्या तत्कालीन वाङ्मयेतिहास सहज तयार करतां येईल. या ग्रंथकारांची ग्रंथसूचि सन १९०८ मध्यें कॅ. ल्युअर्ड यांनीं ' ए बिब्लिऑग्राफी ऑफ धि लिटरेचर डीलिंग वुइथ धि सेंट्रल इंडिया एजन्सी ' या पुस्तकद्वारें प्रकाशितही केली होती, हें येथें उल्लेखिणें अवश्य आहे. मराठ्यांची सत्ता इकडे स्थापन झाल्यानंतरचा राजकीय इतिहास लिहिण्यास उपयोगीं पडणारीं साधनेंही नियतकालिकांतून व जुन्या घराण्याच्या दफ्तरांतून बरींच मिळण्यासारखीं आहेत. अशीं साधनें एकत्र करण्याची कल्पना अलिजाबहादूर श्रीमंत माधवराव महाराज शिंदे यांना मागें एकदां झाली होती. त्यावेळीं त्यांनीं नाना फडणविसांच्या मेणवली दफ्तरांतून शिंदे घराण्याच्या उपयोगाचीं

बरींच कागदपत्रें निवडवून त्यांचे पांच खंड रा. ब. पारसनीस यांच्याकडून संपादवून छापविले व तसेंच ' शिंदे सरकारची शकावली ' ही (१९११) त्यांच्याकडूनच तयार करून प्रसिद्ध केली. शिवाय ' श्रीमंत बायजाबाई शिंदे यांचें चरित्र ' ( १९०२ ) आणि ' श्रीब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर यांचें चरित्र ' (१९००) या त्यांच्या दोन ग्रंथांस भरपूर देणग्या दिल्या. ' झांशी संस्थानच्या महाराणी लक्ष्मीबाई ' (१८९४) हें पुस्तक पारसनिसांनीं तत्पूर्वीं लिहिलें असून त्यांत लक्ष्मीबाईच्या चरित्राबरोबर सन १८५७ सालच्या बंडांतील मध्यभारताची स्थिति चित्रित केलेली आहे. सन १८७२ मध्यें जगन्नाथ प्रभाकर सरंजामे यांनीं लिहिलेला ' शिंदे अलिजाबहादूर यांचे घराण्याचा इतिहास ' प्रसिद्ध असून सन १८९७ मध्यें विनायक कोंडदेव ओक यांनीं लिहिलेलें ' रावराजे दिनकरराव राजवाडे यांचें चरित्र ' आणि तसेंच सन १९०७ मध्यें नरहर व्यंकाजी राजाध्यक्ष यांनीं लिहिलेलें ' जिवाजी बल्लाळ [ बक्षी ] केरकर यांचें चरित्र ' यांतही शिंदे घराण्याविषयीं बरीच माहिती मिळते. यानंतर बुल व हक्सर यांनीं इंग्रजींत लाइफ ऑफ माधवराव सिंदिया ' पुस्तक लिहिलें आहे. त्याच्या अगोदर विष्णु रघुनाथ नातु यांनीं मराठींत ' अलिजाबहादुर माधवराव शिंदे यांचें चरित्र ' (१८९४) प्रसिद्ध केलें होतें. हीं दोहीं पुस्तकें माहितीपूर्ण आहेत. मध्यंतरीं ग्वाल्हेर दरबारनें भारत इतिहास संशोधक मंडळामार्फत दिनकर विनायक काळे यांस बोलावून आपला गोरखींतील पोथीखाना व्यवस्थित लावून घेतला होता. हल्ली ग्वाल्हेरचे सरदार आनंदराव भाऊसाहेब फाळके हे ' शिंदेशाही इतिहासाचीं साधनें ' खंडशः प्रसिद्ध करून शिंदेशाहीच्या भावी इतिहासाचा सुदृढ पाया तयार करीत आहेत. अशीच कामगिरी होळकरशाहीच्या इतिहासाविषयीं अनंत नारायण भागवत यांनीं होळकर दरबारच्या आश्रयानें कांहीं वर्षांपूर्वी आरंभिली होती ती त्यांच्या मृत्यूनंतर वासुदेव वामन

ठाकूर हे बजावित आहेत. श्रीमंत सवाई तुकोजीराव महाराज होळकर यांनीं आपल्या घराण्यासंबंधींचीं हिंदुस्थानांत अनुपलब्ध असलेलीं अशीं कांहीं महत्त्वाचीं पत्रें विलायतेहून मुद्दाम नकलवून मागविलीं होतीं तीं सांप्रत होळकर दरबारीं ठेविलेलीं आहेत. मुर्लीधर मल्हार अत्रे यांनीं सन १८९२ मध्यें ' मल्हारराव होळकर यांचें चरित्र ' लिहिलें होतें व अनंत केशव चितळे यांनीं त्याच सुमारास ' विठोजी होळकर यांचा मृत्यु ' ह्मणून एक पुस्तक प्रसिद्ध केलें होतें. तीं दोन्हीं पुस्तकें चांगलीं आहेत. अहल्याबाईच्या चरित्रावर तर इंग्रजींत व मराठींत बरींच पुस्तकें लिहिलीं गेलीं आहेत त्यांपैकीं रावजी विठ्ठल पुणेंकर व गजानन चिंतामण देव यांनीं लिहिलेलीं स्वतंत्र लघु चरित्रें उल्लेखनीय आहेत. रा. ब. पारसनीस यांनीं मागें ' इतिहाससंग्रहां ' तून ' महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें ' प्रसिद्ध करून अहल्याबाईच्या कारकीर्दीवर चांगला प्रकाश पाडला आहे. रामचंद्र विनायक टिकेकर ऊर्फ धनुर्धारी यांनींही आपल्या ' महाराष्ट्र कुटुंब संग्राह्य पुस्तकावली ' मधून होळकर व शिंदे घराण्यांतील कांहीं व्यक्तींचीं लहानलहान, सुंदर, स्फूर्तिप्रद चरित्रें गुंफिलीं आहेत. इंदूरचे मुकुंदराव वामन बर्वे यांनीं मल्हारराव, अहल्याबाई व दुसरे तुकोजीराव होळकर यांचीं चरित्रें आणि इंदूर संस्थानचा इतिहास या ग्रंथांबरोबर राणोजी व महादजी शिंदे यांचीं चरित्रें व ' इंट्रोडक्शन टु धि हिस्टरी ऑफ ग्वाल्हेर ' (१९०२) हेही ग्रंथ इंग्रजींत लिहिले आहेत. होप यांचा ' हाउस ऑफ सिंदिया ' ( १८६४ ), कर्नेल मॅलेसत यांचा ' एसे ऑन महादजी सिंदिया ' ( १८६९ ) व एच् जी. कीनी यांचा ' महादजी सिंदिया ' ( १८७२ ) या प्रसिद्ध ग्रंथांपेक्षां बरवे यांचे ग्रंथ अनेक दृष्टींनीं सरस आहेत. ' सॅव्हेनूर ऑफ इंदोर ' व रा. ब. विष्णु केशव कुंटे यांनीं लिहिले इंदूरच्या राव रामचंद्रभाऊ रेशीमवाले यांच्या इंग्रजी चरित्रांत होळकरशाहीविषयीं बरीच उपयुक्त माहिती आली आहे. तशीच

माहिती धारच्या राज्याविषयीं धारचे दिवाण बापू रघुनाथ दिघे यांच्या दत्तात्रय अमृत दिघे यांनीं लिहिलेल्या इंग्रजी चरित्रांत आढळते. लीवार्नर, कर्नल मॅलेसन प्रभृति ग्रंथकारांनी जसे देशी संस्थानांचे त्रोटक इतिहास इंग्रजींत लिहिले आहेत तसे इतिहास लिमये, गोडबोले वगैरे ग्रंथकारांनींही मराठींत लिहिले आहेत त्यांतून देखील मध्यभारतीय संस्थांनांविषयीं थोडीबहुत माहिती मिळते. मध्यभारताच्या इतिहासावर काशीनाथ कृष्ण लेले, भास्कर रामचंद्र भालेराव व कृष्णाजी गंगाधर कवचाळे यांचे अनेक स्फुट लेख निरनिराळ्या मराठी व हिंदी मासिकांतून प्रकाशित झाले आहेत. महामहोपाध्याय गौरीशंकर ओझा यांचा 'मध्यभारतीय संस्कृति' हा ग्रंथ प्रसिद्ध असून त्यांचाच 'राजपूताने का इतिहास' व विश्वेश्वरनाथ रेऊ यांचा 'भारत के प्राचीन राजवंश' या ग्रंथांतही मध्यभारताच्या इतिहासासंबंधीं बरीच माहिती आलेली आहे; परंतु ती माहिती विशेषतः लेले यांच्या शोधावरूनच लिहिलेली दिसते. 'मालव–मयूर' या हिंदी मासिकांतूनही मागें हरिभाऊ उपाध्याय यांनीं माळव्याच्या इतिहासासंबंधीं एक लेखमाला व कांहीं स्फुट लेख लिहिले होते. तसेंच 'सरस्वती' मासिकांतूनही परमारांच्या इतिहासावर एक लेखमाला प्रकाशित झाली होती. उज्जयिनीचे कन्हैयालालजी ठाकुर व ज्योतिषाचार्य सूर्यनारायण व्यास, रामेश्वरप्रसाद ओझा, सुखसंपत्तिराय भंडारी, प्रभृति हिंदी लेखक मधूनमधून माळव्याच्या इतिहासाविषयीं लेख लिहीत असतात. कित्येक संस्कृत ग्रंथ व युरोप आणि चीन देशांतील प्रवाश्यांचे भारत-प्रवासवर्णनात्मक ग्रंथ यांतून देखील मध्यभारतासंबंधींची त्रोटक माहिती आढळते, तशीच माहिती फारशी व उर्दू तवारिखांतूनही मधूनमधून मिळते. शिवाय 'तवारिख मालवा' म्हणून माळव्याच्या इतिहासावरचा एक फारशी बृहद्ग्रंथ प्रसिद्ध असून शिंदे घराण्याच्या इतिहासासंबंधीं 'तारीख सिंदिया' व 'ताजिरात गवालियर' आणि

त्यांच्या सरदारांच्या इतिहासासंबंधीं ‘ तारीख जागीरदारान ’ हे दोन ऊर्दू भाषेंतले ग्रंथही प्रकाशित झालेले आहेत.

### मध्यभारतांतील इतिहास ग्रंथांचा आरंभ

मध्यभारतांतही महाराष्ट्राप्रमाणें प्रथम बऱ्याच बखरी लिहिल्या गेल्या. त्यांतील महत्त्वाच्या बखरींची माहिती मागें ‘ पूर्वपीठिकें ’ त [ पृ. ३९–४० ] देण्यांत आलीच आहे. त्यानंतर ‘ इतिहास ’ नांवाला शोभण्यासारखी ग्रंथनिर्मिति १९ व्या शतकाच्या उत्तरार्धापासून सुरू झाली असल्याचें दिसून येतें. महाराष्ट्रांत पहिला इतिहास ग्रंथ ‘ हिंदुस्थानचा इतिहास ’ हा सन १८४६ मध्यें बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर यांनीं लिहून प्रसिद्ध केला, असें मानलें जातें; परंतु त्यापूर्वी सन १८४० मध्यें कुशाबा लिमये यांचें ‘ महाराष्ट्र देशाचें वर्णन ’ हें इतिहासात्मक लघु पुस्तक प्रसिद्ध झालेलें आढळून येतें. मात्र हें पुस्तक विद्यार्थ्यांच्या उपयोगाकरितां होतें, ही गोष्ट उघड असली तरी तेवढ्यासाठीं त्याचा महाराष्ट्राच्या पहिल्या प्रकाशित इतिहास ग्रंथाचा मान मात्र अमान्य करतां येत नाहीं. याबरोबरच आतां मध्यभारताच्या इतिहास ग्रंथानिर्मितीकडे वळून पाहतां ग्वाल्हेरचे शंकर तात्या फडके यांचा ‘ शिंद्यांचे घराण्याचा इतिहास ’ हा सन १८६४ मध्यें प्रसिद्ध झालेला ग्रंथ पहिला ठरतो. यानंतर सन १८७१ मध्यें रा. ब. विनायक जनार्दन कीर्तने यांचा ‘ मध्यहिंदुस्थानचा इतिहास,’ सन १८९३ मध्यें प्रो. रामकृष्ण सखाराम आठवले यांचा ‘ स्पानिश मूर लोक ’, सन १८९४ मध्यें माधवराव सखाराम तर्टे यांचा ‘ चीनचा इतिहास ’ व विश्वनाथ काशिनाथ फडके यांचा ‘ परमार घराण्याचा इतिहास ’ असे लहानमोठे इतिहास ग्रंथ हळुहळू बाहेर पडूं लागले. त्या सर्व ग्रंथांचा परिचय आतां पूर्वावलंबित वर्गीकरणपद्धतीनें करून देऊं.

## मध्यभारताचे व तदंगभूत संस्थानांचे इतिहास

प्रथम आपण मध्यभारत व तदंगभूत संस्थानें, राजघराणीं व इतर थोर महत्त्वाचीं घराणीं यांच्या इतिहासाकडे वळूं. मध्यभारताच्या इतिहाससंबंधांत आजपावेतों प्रसिद्ध झालेले असे दोनच ग्रंथ आढळतात. एक उपर्युक्त 'मध्यहिंदुस्थानचा इतिहास' व दुसरा 'मध्यहिंदुस्थानांतील गॅरंटीड संस्थानें.' यांपैकीं पहिला ग्रंथ सर जॉन मालकमकृत 'ए मेमॉयर ऑफ सेंट्रल इंडिया' या इंग्रजी ग्रंथाचें भाषांतर असून तें भाषांतर श्रीमंत द्वितीय तुकोजीराव होळकर यांच्या आज्ञेवरून रा. ब. विनायक जनार्दन कीर्तने यांनीं तयार केलें होतें. कीर्तने यांचा हा ग्रंथ प्रसिद्ध होण्यापूर्वीं त्यांनीं 'थोरले माधवराव' व 'जयपाळ' हीं दोन उत्कृष्ट नाटकें लिहिलीं होतीं. तीं नाटकें अजूनही नाट्यरचनाकौशल्य व भाषासौंदर्य या दोन्ही दृष्टींनीं विद्वन्मान्य आहेत. त्यांचा 'मध्यहिंदुस्थानचा इतिहास' हा भाषांतरित ग्रंथही उत्कृष्ट होईल अशी लोकांची अपेक्षा होती; परंतु तो तसा झाला नाहीं. याची भाषा अगदीं निर्जीव व बोजड असून त्या भाषेबद्दल विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं आपल्या 'निबंधमाले' तील इंग्रजी भाषा या निबंधांत प्रतिकूल अभिप्राय प्रकट केला आहे व त्याबरोबरच मूळ इंग्रजी ग्रंथ उत्तम असल्याचेंही ध्वनित केलें आहे, तें अगदीं यथार्थ होय. 'मेमॉयर' लिहिणाऱ्या मालकमची मुत्सद्देगिरी व तरवारबहादरी या गुणांबद्दल जेवढी ख्याति आहे तेवढीच ख्याति त्याचा सत्यप्रियता व लेखनपाटवा या गुणांबद्दलही आहे. सुप्रसिद्ध आंग्ल चरित्रलेखक के यानें मालकमचें दोन खंडांत विस्तृत चरित्र लिहिलें असून विनायक कोंडदेव ओक यांनींही आपल्या 'महन्मणिमाले' त त्याचें लहानसें चरित्र दिलें आहे. पेशवाईचें तिलोदक सोडून याच साहेबापुढें राव बाजी शरण गेला होता व त्यास ८ लक्ष रुपयांची वार्षिक नेमणुकही याच साहेबाच्या खटपटीनें मिळाली होती. कर्नल

टॉडला राजपुतांविषयीं जेवढें प्रेम वाटत होतें तेवढेंच प्रेम मालकमला महाराष्ट्रियांविषयीं वाटत होतें. तो महाराष्ट्रियांत बराच मिसळत असे. लॉर्ड वेलस्लीच्या स्मरणार्थ पुण्यास संगमावर जो पूल बांधला गेला आहे त्याच्या उद्‌घाटन समारंभाच्या वेळीं मालकमनें ब्राह्मणांना विपुल दक्षिणा वाटली असल्याचें सांगतात! परंतु असें असतांही तो अंधश्रद्ध मूळींच नव्हता. त्याची चिकित्साबुद्धि विलक्षण दांडगी होती. ह्मणूनच त्याचा मध्यहिंदुस्थानचा इतिहास टॉडच्या राजस्थानच्या इतिहासाप्रमाणें अद्‌भुतरम्य कथांनीं भरलेला नाहीं. त्यानें अनेक जुन्या विश्वासु लोकांकडून मिळविलेली माहिती, स्वतः पाहिलेले प्रसंग व कित्येक ऐतिहासिक घटनांशीं प्रत्यक्ष संबंध असलेला व्यक्तींच्या तोंडून ऐकलेल्या हकिकती अशा शक्य तितक्या प्रामाणिक साधनांच्या पायावर आपल्या ग्रंथाची उभारणी सुंदर रीतीनें व सहृदयतेनें केलेली आहे. माळव्यावर मराठ्यांची स्वारी व होळकरांचे कुळ हीं या ग्रंथांतील दोन प्रकरणें माहितीबरोबर भाषेच्याही दृष्टीनें अत्यंत सरस आहेत. 'मध्यहिंदुस्थानांतील गॅरंटीड संस्थानें' हा लघु ग्रंथ कोल्हापुरच्या प्रो. विष्णु गोविंद विजापुरकर यांच्या 'ग्रंथमालें'तून प्रसिद्ध झाला असून तो रा. ब. सरदार माधवराव विनायक किबे यांनीं लिहिला आहे. गॅरंटी, हमी व किफायत हे भिन्न भाषेंतील एकाच अर्थाचे शब्द होत. या सर्व शब्दांचा मूलार्थ कोणत्याही दोन पक्षांत विशिष्ट बाबींसंबंधांत झालेले ठराव पाळण्याविषयीं उभय पक्षांनीं जबाबदारी पत्करणें असा आहे. इंग्रजांनीं आपली सत्ता हिंदुस्थानांत प्रस्थापित केल्यावर येथील जुन्या लहानलहान सत्ताधाऱ्यांशीं करारमदार करून ते पाळण्याची जबाबदारी त्यांच्यांत व आपल्यांत यथोचितपणें वाटून घेतली. या सत्ताधाऱ्यांत कांहीं भले व कांहीं लूटमार करणारे उपद्रवीही होते. अशा सत्ताधाऱ्यांशीं करारमदार झाल्यावर इंग्रज सरकारनें

त्यांच्या सत्तांकित मुलुखाला ' गॅरंटीड संस्थानें ' हें नांव दिलें हीं संस्थानें प्रायः देशी संस्थानिकांच्याच मुलुखांत किंवा मुलुखाला लागून असल्यामुळें इंग्रज सरकारनें त्यांच्यावर दाब ठेऊन व्यवस्थितपणा राखण्याकरितां ज्या ज्या संस्थानिकांच्या हद्दींत किंवा हद्दीला लागून तीं येत होतीं त्या त्या संस्थानिकांच्या निग्रहाणीखालीं त्यांना ठेऊन दिलें. मध्यहिंदुस्थानांत अशीं गॅरंटीड संस्थानें लालगड, निमखेडा ( टिरला ) बागळी, भाटखेडी वगैरे पुष्कळ आहेत. त्यांच्यासंबंधींची माहिती सरदार किबे यांनी या ग्रंथांत साधार देऊन त्याबरोबर ' गॅरंटी 'चा पूर्वेतिहास व त्यापासून फायदे हेही निवेदिले आहेत. यानंतर आतां मध्यभारतांतील संस्थांनच्या प्रसिद्ध झालेल्या इतिहासांकडे वळून पाहतां त्यांत धार संस्थानच्या इतिहासावरील ग्रंथ सकृद्दर्शनींच डोळ्यापुढें उभे राहतात. काशीनाथ कृष्ण लेले व त्यांचे सहाय्यक शिवराम काशीनाथ ओक यांनी धार संस्थानच्या इतिहासावर तयार केलेले तीन ग्रंथ आतांपावेतों प्रसिद्ध झाले आहेत. त्यांपैकीं पहिला ग्रंथ ' धार संस्थानचा संक्षिप्त प्राचीन इतिहास ' सन १९१९ मध्यें प्रसिद्ध झाला. यांत दोन भाग केलेले आहेत. पहिल्या भागांत सन ८०० पासून १३१० पर्यंत माळव्यांत अधिराज्य गाजाविणाऱ्या परमारवंशाचा थोडक्यांत महत्त्वपूर्ण असा वृत्तांत दिला असून दुसऱ्या भागांत परमारसत्तेचें निर्मूलन करून तेथें आपली सत्ता स्थापन करणाऱ्या सुलतानांची सन १५६४ पर्यंतची संक्षिप्त हकीगत दिली आहे आणि शेवटीं धार व मांडव येथील ऐतिहासिक प्रेक्षणीय स्थळांच्या वर्णनाचें परिशिष्ट जोडलें आहे. यांतला परमारांचा इतिहास अपूर्व व प्रमाणाधिष्ठित असा असल्यानें तो प्रायः सर्व इतिहासकारांना विश्वसनीय होऊन त्याचा उपयोग अलीकडे ज्या त्या मराठी, हिंदी व इंग्रजी ग्रंथांतून मुक्त हस्तानें केला जात असलेला दिसून येतो. पुढें ' धार संस्थानचा इतिहास अर्वाचीन काळ १ ' व ' अर्वाचीन काळ २ ' असे दोन ग्रंथ

अनुक्रमें सन १९२६ व १९३४ मध्यें प्रसिद्ध झाले. यांपैकीं पहिल्या ग्रंथांत पवारांच्या विशेषतः धारकर पवारांच्या घराण्यांतील पुरुषांनीं सन १६४० पासून तों सन १८१५ पर्यंत मराठी साम्राज्यविस्तारांत जी तनमनधनेंकरून बहुमोल कामगिरी बजाविली तिचें सालवार व तपशीलवार वर्णन केलेलें आहे. त्यांत सन १७०९ मध्यें माळव्यांत शिरून मराठ्यांचा झेंडा प्रथम मांडवगडावर फडकाविणारा, दिल्लीस सय्यद बंधूंच्या मदतीसाठीं बाळाजी विश्वनाथ पेशव्यांबरोबर फौजेनिशीं जाणारा, तिरल्याच्या लढाईत अद्‌भुत पराक्रम गाजविणारा व 'अर्जुनतुल्य रणधीर रणशूर' म्हणून ब्रह्मेंद्रस्वामींकडून प्रशंसित होणारा उदाजीराव; दिल्लीच्या बादशाहतीशीं व अन्य राज्यांशीं पेशव्यांनीं चालविलेल्या राजकारणांत दोन्हीं पक्षांमध्यें मध्यस्थ अथवा जामीनदार म्हणून राहणारा, सिंदखेडच्या लढाईत निजामास चिंर्डीत अडवून धरून त्याजपासून मुलुखाच्या सोडचिठ्या लिहविणारा व पानिपतच्या रणयज्ञांत मराठी साम्राज्यासाठीं आपली प्राणाहुति देणारा यशवंतराव वगैरे वीराग्रणींच्या कामगिऱ्या विशेष महत्त्वाच्या आहेत. ग्रंथाच्या शेवटीं माळव्यांतील मोगल सुभेदार राजा गिरिधरबहादुर याच्या मृत्यूच्या कालनिर्णयासंबंधाचा एक लेखही परिशिष्ट म्हणून जोडला आहे. नंतर 'अर्वाचीन काळ २' या ग्रंथांत स्वराज्याच्या आरंभापासून तों पानिपतच्या युद्धापर्यंत मराठी साम्राज्यांत शौर्य, धैर्य, स्वामिनिष्ठा व मुत्सद्देगिरी या गुणचतुष्टयाच्या बलावर धारकर पवारांनीं जें महत्त्व संपादून थोर दर्जा प्राप्त करून घेतला होता त्याचा वृत्तांत उपलब्ध असलेल्या अस्सल कागदपत्रांच्या छायाचित्रांसह सुसंगत असा दिला आहे. वरील तिन्ही ग्रंथाच्या कामीं लेले व ओक या दोघांनीं साधनसामुग्री एकत्र करण्यांत जे श्रम घेतले आहेत व ती साधनसामुग्री पडताळून पाहण्यांत जी चिकित्सकता दाखविली आहे त्याबद्दल ते खरोखर प्रशंसेस पात्र आहेत. धाराशिवाय देवास येथें पवार राजघराण्याच्या

दोन शाखा आहेत. त्या दोन व धार येथील शाखा अशा तिन्ही शाखांचा एकत्र इतिहास, त्यांच्या प्राचीन वृत्तांतसह, सन १८९४ मध्यें देवास येथील मराठी शाळेचे हेडमास्तर विश्वनाथ काशिनाथ फडके यांनीं लिहून प्रसिद्ध केला. या इतिहासाचें नांव 'परमार घराण्याचा इतिहास' हें होय. शिलालेख, बखरी, मराठ्यांचे व मध्यहिंदुस्थाचे इतिहास, भाटांचीं वर्णनें इत्यादिकांच्या आधारावर फडक्यांनीं आपला हा इतिहास रचिला आहे. ब्राह्मणांत पटवर्धनांचें कुळ किंवा मुसलमानांत मोंगलांचें कुळ तसें मराठ्यांत पवारांचें कुळ हरळीच्या वेलीप्रमाणें अतिविस्तृत आहे. राजपुतांतील प्रतिष्ठित अग्न्युद्भव कुळांत परमार नांवाचें जें कुळ परिगणित आहे तेंच पवारांचें मूळ कुळ होय. याच कुळांत मुंजभोजादि दिगंतकीर्ति राजांनीं जन्म घेऊन मालवचक्रवर्तित्व गाजविलें होतें व त्यांच्या पूर्वजांनीं आणि वंशजांनी रापुताना, बुंदेलखंड, खानदेश वगैरे भागांत कित्येक ठिकाणीं राज्यें स्थापिलीं होतीं. छत्रपति शिवाजी महाराजांच्या अभ्युदयापूर्वी या कुळांतल्या बिजोलिया येथील शाखेंतला साबूसिंग नांवाचा पुरुष दाक्षिणेंत गेला व तेथें आपल्या शौर्यबळावर मान पावून सुपें येथें स्थायिक होऊन राहिला. त्याचे वंशज पुढें छत्रपतींच्या व पेशव्यांच्या दरबारीं उदयास आले आणि त्यांनीं शिंदे, होळकरांबरोबर उत्तर हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं तरवार गाजविली. नंतर माळवा मराठ्यांच्या अंकित झाल्यावर त्या प्रांताची जी वांटणी झाली तींत काळोजी व संभाजी या दोघां पवार कुलोत्पन्न पुरुषांना अनुक्रमें देवास व धारचे मुलख प्राप्त झाले. पुढें काळोजीनें स्वतःच आपल्या दोघां मुलांत देवासच्या मुलुखाची विभागणी करून दिली. याप्रमाणें माळव्यांत पवारांच्या तीन शाखा निर्माण झाल्या. फडक्यांनीं आपल्या ग्रंथांत या तिन्ही शाखांचा सन १८९४ पावेतोंचा राज्येतिहास वर्णन केला आहे. त्याचीं पहिली १० पानें विशेषतः

दंतकथा व भाटांची रसभरित वर्णनें यांच्या आधारावरच प्रामुख्यानें लिहिलीं गेलीं आहेत तीं सोडतां बाकीचा भाग साधार आहे. पवारांनंतर शिंद्यांच्या घराण्याकडे वळतां या घराण्याचा पहिला प्रसिद्ध झालेला इतिहास सन १८६४ चा असून तो शंकर तात्या फडके नांवाच्या गृहस्थानें लिहिलेला असल्याचें आढळतें. त्या इतिहासाचें नांव 'शिंद्यांचे घराण्याचा इतिहास' हें होय. याचे एकंदर १२ भाग असून त्यांत सन १८५९ पावेतोंची विस्तृत हकीगत आलेली आहे. उज्जयिनीचे बाळकृष्ण रामचंद्र मुळे (खडकतकर) यांनींही एक 'शिंदे घराण्याचा इतिहास' रचिला आहे; परंतु तो अप्रकाशित आहे. तो इतिहास व फडक्यांचा इतिहास यांत बरेंच भाषासाम्य असल्याचें सरदार आनंदराव भाऊसाहेब फाळके यांचें ह्मणणें आहे. अस्तु. याशिवाय शिंदे घराण्याच्या इतिहासावर स्वतंत्र असा दुसरा ग्रंथ अद्याप निर्माण झालेला नाहीं. आपल्या घराण्याचा सविस्तर व साधार इतिहास लिहिला जावा अशी श्रीमंत माधवराव महाराज शिंदे यांची उत्कट इच्छा होती व तत्प्रीत्यर्थच त्यांनीं शिंदेशाहीसंबंधीं शकावलीं ( १९११ ), शिंद्यांचे अस्सल पत्र-व्यवहाराचे पांच खंड, श्रीमंत बायजाबाई शिंदे यांचें चरित्र वगैरे ग्रंथांच्या प्रकाशनाच्या कामीं पुष्कळ प्रयत्न व द्रव्यव्यय केला. सरदार आनंदराव भाऊसाहेब फाळके यांचा 'शिंदेशाही इतिहासाचीं साधनें प्रसिद्ध करण्याचा उपक्रमही केवळ याच हेतूचा आहे. या 'साधनां'चे त्यांनीं आतांपावेतों २७ भाग योजिले असून त्यांपैकीं ४ भाग प्रकाशितही झाले आहेत. पहिला भाग सन १९२९ मध्यें निघाला. यांत कोटा संस्थानांतील शिंदे सरकारचे वकील गुलगुले यांच्या दप्तरांतून मिळालेला राणोजी, जयाजी, जनकोजी, दत्ताजी, साबाजी, केदारजी, खलोजी वगैरे शिंदे घराण्यांतील पुरुषांचा व राणोजी शिंद्यांची पत्नी निंबाबाई यांचा गुलगुले घराण्यांतील पुरुषांबरोबर

झालेला वि. सं. १७१० ते १८२४ पर्यंतचा अस्सल पत्रव्यवहार दिला असून या पत्रव्यवहारावरून केवळ शिंदेशाहीविषयींच नव्हे तर तिच्या बरोबरीच्या होळकरशाही, पवारशाही वगैरे विषयींही माहिती मिळून इतर कांहीं तत्कालीन व्यक्तींच्या चरित्रावरदेखील थोडाफार प्रकाश पडतो. 'शिलेदाराची भालेराई' म्हणून सरदार फाळक्यांनीं या ग्रंथाला लिहिलेल्या प्रस्तावनेंत शिंदेशाही इतिहासाच्या जुन्या व नव्या साधनांविषयीं दिलेली माहिती उपयोगाची आहे व तसेंच ग्रंथांतल्या प्रत्येक पानावर खुलाशाच्या दिलेल्या पादटीपाही महत्त्वाच्या आहेत. नंतर सन १९३० मध्यें या 'साधनां' चा दुसरा भाग बाहेर पडला. यांतही गुलगुल्यांच्याच दफ्तरांतील गायकवाड, पेशवे, पवार [धार व देवास उभय पाती] आणि होळकर या राजघराण्यांचा वि. सं. १७९४ ते १८७१ पर्यंतचा पत्रव्यवहार दिलेला आहे. या पत्रव्यवहारावरून महत्त्वाची अशी विशेष कांहीं माहिती मिळत नसली तरी त्या सर्व घराण्यांतील व शिंदे घराण्यांतील पुरुषांचे आपसांतील संबंध त्या काळीं कशा प्रकारचे होते हें मात्र विशेषेंकरून कळून येतें. यापुढें प्रसिद्ध झालेला 'साधनां' चा तिसरा भाग 'शिंदेशाही मुत्सद्यांचा पत्रव्यवहार' हा होय. यांतील कांहीं मुत्सद्यांचीं पत्रें महत्त्वाचीं आहेत. नंतर सन १९३५ मध्यें 'साधनां' चा चौथा भाग 'वाकणकर संग्रह' म्हणून प्रसिद्ध झाला. धारच्या राणी मैनाबाईसाहेब पवार यांचे बाळाजी लक्ष्मण वाकणकर नांवाचे विश्वासु कारभारी होते. प्रस्तुत भागांत त्या वाकणकरांच्या दफ्तरांतून मिळालेले दौलतराव शिंदे, यशवंतराव होळकर, गहिनाबाई गायकवाड, रामचंद्रराव पवार [धारकर], मैनाबाई पवार, बडोद्याचे दिवाण सीताराम रावजी व रघुनाथ महिपत फणसे, बापूजी रघुनाथ दिघे व इतर धारकर मुत्सद्यांचा पत्रव्यवहार आणि यादी, कैफियती वगैरे कागद दिलेले आहेत. त्यावरून रावबाजींचा

राज्यत्यागाचा प्रसंग; शिंदे, होळकर व पवार यांचे आपसांतील स्नेहसंबंध; मैनाबाईसाहेब पवारांवर ओढवलेलीं दुर्धर संकटें व त्यांच्याविषयीं होळकरांच्या घराण्यांतील स्त्रियांनीं दाखविलेली सहानुभूति वगैरे गोष्टींचें उत्तम आविष्करण होतें. शेवटीं महादजी शिंद्यांची एक अप्रकाशित बखरही यांत दिली आहे. या भागाचें संपादन बाळाजी लक्ष्मण वाकणकर यांचे विद्यमान वंशज प्रो. अनंत वामन वाकणकर यांनीं केलें असून त्यास त्यांनीं स्वतः लिहिलेली प्रस्तावनाही विस्तृत, माहितीपूर्ण आहे. ‘ शिंदेशाहीचीं राजकारणें ’ या नांवाचें नुकतेंच ‘ सातारा हिस्टॉरिकल रिसर्च सोसायटी ’ नें एक पुस्तक प्रसिद्ध केलें आहे त्याचा व त्याबरोबर ‘ भारत इतिहास संशोधक मंडळा ’ कडून प्रसिद्ध झालेल्या वाटारकर निंबाळकर घराण्याचा त्रोटक इतिहास ’ या शिंदेशाहीशीं संबंध ठेवणाऱ्या पुस्तकाचा येथें माहितीकरितां निर्देश करणें जरूर आहे. याशिवाय शिंद्यांच्या पदरचे फाळके, शितोळे, आंग्रे वगैरे आणखी सरदार घराण्यांच्याही कैफियती लिहिल्या गेल्या आहेत; परंतु त्या सर्व मध्यभारताबाहेरच्या लेखकांनीं लिहिलेल्या आहेत. फक्त सरदार ‘ फाळके यांच्या घराण्याची कैफियत ’ काय ती मध्यभारतीय लेखकांकडून लिहिली गेली आहे. ते लेखक ह्मणजे सरदार फाळके यांचे आश्रित हनुमंत गोपाळ फाळके ( ब्राह्मण ) व खळतकर हे होत. ही कैफियत मुंबईच्या ‘ कादंबरी संग्रह ऐतिहासिक पुस्तकमालें ’ तून दहावें पुस्तक ह्मणून सन १९०२ मध्यें प्रसिद्ध झाली. सरदार फाळके हे मूळचे तवर राजपूत असून त्यांच्या घराण्याचा मूळ पुरुष बहादुरसिंग नांवाचा होता. या बहादुरसिंगाचे सहारूपसिंग व महारूपसिंग असे दोन नातु गोवळकोंड्याच्या बादशहाच्या पदरीं नोकर होते. ते दोघेही बंधु पराक्रमी असून बादशहाची त्यांच्यावर पूर्ण कृपा होती. एकदां बादशहानें प्रसन्न होऊन त्या उभयतां बंधूंस मिळून पोषाक ( मंदील १, दुपेटा १, किनखाप १ व महामुद्या २ )

बक्षिस दिला असतां त्यांनीं तो घरीं नेऊन समसमान वांटून घेतला. उभा मंदील, उभा दुपेटा, उभा किनखाप आणि एकेक महमुदी अशी वांटणी झाली. ही गोष्ट बादशहाच्या कानीं गेल्यावर त्यांच्या बंधुप्रेमाचें त्यास मोठें कौतुक वाटलें. त्यानें मुद्दाम त्या दोघांस दरबारांत बोलावून पोषाकाची काय व्यवस्था केली ह्मणून प्रश्न केला त्याबरोबर त्या उभयतांनीं नम्रतापूर्वक उत्तर दिलें "हुजूर, दो दो फालकर लिये.' हें उत्तर ऐकून बादशहा खुष झाला व त्या दिवसापासून तो त्या उभयतां बंधूंना 'फालके' ह्मणूं लागला. याप्रमाणें सन १४४६ सालीं झालेल्या फाळके उपनांवाच्या उत्पत्तीची मनोरंजक गोष्ट या कैफियतींत दिली असून अशाच प्रकारच्या त्या घराण्यांतील कांहीं पुरुषांच्या अचाट शक्तीच्या व अद्‌भूत पराक्रमाच्याही आणखी गोष्टी तींत दिल्या आहेत. असो. आतां पुढें होळकर घराण्याच्या इतिहास ग्रंथांकडे वळून पाहतां त्या घराण्याचा पहिला प्रकाशीत ग्रंथ ह्मणजे सन १९०० मध्यें मुंबईच्या 'दामोदर सांवळाराम आणि मंडळी' नें प्रसिद्ध केलेली 'इंदूर संस्थानची बखर' असल्याचें आढळून येतें. ही बखर हरिराव होळकरांच्या कारकीर्दीपासून तों शिवाजीराव होळकरांच्या कारकीर्दीपर्यंत (सन १८९७) इंदूर राज्यांत नोकर असलेल्या धोंडो मोरेश्वर राजे नांवाच्या एका वृद्ध कारकुनानें लिहिली आहे. हिच्यांतील माहिती बरीच त्रोटक असली तरी ती प्रत्यक्ष माहितगार अशा एका व्यक्तीनें लिहिलेली असल्यामुळें सत्यपूर्ण आहे व होळकरशाहीच्या भावी इतिहासकारास तिचा बराच उपयोग होण्यासारखा आहे. होळकरशाहीची एक आणखीही बखर बाळकृष्ण आत्माराम गुप्ते यांनीं प्रसिद्ध केली असल्याचें समजतें. आपल्या राज्याचा साद्यंत इतिहास तयार केला जावा अशी द्वितीय तुकोजीराव होळकर यांची फार इच्छा होती व त्यासाठीं त्यांनीं आपल्या संस्थानांत एक स्वतंत्र इतिहास खातेंही स्थापन करण्याचें ठरविलें होतें; परंतु

त्यांच्या आकस्मिक निधनामुळें त्यांची इच्छा अपूर्णच राहिली, ती पुढें त्यांचे नातु श्रीमंत सवाई तुकोजीराव महाराज यांच्या राजवटीच्या उत्तरार्धांत फलद्रूप झाली. या तुकोजीराव महाराजांनीं स्वतंत्र इतिहास खातें स्थापन करून त्यावर कामगार ह्मणून अनंत नारायण भागवत या व्यासंगी इतिहाससंशोधकाची योजना केली. भागवतांनीं होळकर राज्यांतील सर्व सरकारी दफ्तरें व इतर सरदार दरखदारांचीं दफ्तरें धुंडाळून आणि टिपणें वगैरे तयार करून ' होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें ', खंडशः प्रसिद्ध करण्याचें ठरविलें. एकंदर १५ खंडांची त्यांची योजना असून त्या सर्व खंडांची विषयवार आंखणीही त्यांनीं करून ठेविली आहे व ज्या ज्या खंडांची माहिती संपूर्ण मिळत गेली ते ते खंड लगेच तयार करून प्रसिद्धही केले आहेत. त्यामुळें खंड क्रमशः प्रसिद्ध न होता १, ५, ६ व १२ असे चार अधूनमधूनच आतांपावेतों ( भागवत यांच्या हयातींत त्यांच्या हातून ) प्रसिद्ध झाले आहेत. या चार खंडांपैकीं पहिला खंड ' पत्रव्यवहार—पूर्वार्ध ' सन १९२४ मध्यें ' होळकर सरकार पुस्तकमालें ' तील १६ वें पुस्तक ह्मणून प्रसिद्ध झाला. जेजूरीचे तीर्थोपाध्ये खाडे, श्री मल्हारी—गौतमेश्वराचे पूजारी आगलावे, पंढरपुरचे बडवे उत्पात, बाघ्राच्या नबाबाचे दिवाण बळंवतराव पांडुरंग ऊर्फ तात्या गोरे, इंदूरचे सरदार फणसे, दिवाण सरदार पळशीकर, हुजुर चिटणीस नीळकंठ गिरमाजी वगैरेंच्या दफ्तरांतून सांपडलेलीं निवडक पत्रें यांत दिलीं आहेत. शिवाय मथुरेच्या स्वारीमधील ( सन १७८८—९२ ) अलीबहादुराचा पत्रव्यवहारही शेवटीं परिशिष्ट ह्मणून जोडला आहे. या खंडांतील कित्येक पत्रें महत्त्वाचीं असून कांहीं पत्रें मनोरंजक माहितीनें भरलेलीं आहेत. पुढें पांचवा खंड ' भवानीशंकर बक्षी याची रोजनिशी ' या नांवानें सन १९२६ मध्यें प्रसिद्ध झाला. यांत यशवंतराव होळकरांच्या कारकीर्दीचें सविस्तर वर्णन आहे. त्यावरून यास ' यशवंतराव

होळकराची रोजनिशी' अथवा 'बखर' असें नांव देतां आलें असतें; परंतु हें पुस्तक वस्तुतः ज्या फारशी ग्रंथाचें भाषांतर आहे तो ग्रंथ यशवंतराव होळकरांचा समकालीन दिल्लीचा वकील भवानीशंकर यानें 'भवानीशंकराची रोजनिशी' हें नांव देऊन दिलसुखराम नामक पंडिताकडून आपल्या सांगण्याप्रमाणें लिहविला आहे. त्यामुळें भागवतांना या पुस्तकाचें तेंच मूळ नांव कायम ठेवावें लागलें आहे. हें भाषांतर तयार करण्याचें श्रेय इंदूरचे वयोवृद्ध महाराष्ट्रीय फारशी पंडित नानाजी केशव भवरासकर यांस आहे. भवानीशंकर हा खत्री जातीचा गृहस्थ दिल्लीचा राहणारा होता. मोगल घराण्यांतील शेवटचा दुर्दैवी बादशहा शहाअलम याच्या वेळीं तो होऊन गेला. दिल्लीस चांदणीचौकांत निमकहरामाचा वाडा ह्मणून जें स्थान दाखविण्यांत येतें तेथें याचा भव्य वाडा उभा होता. बादशहाशीं बेइमान होऊन इंग्रजांशीं सूत बांधल्यामुळें या भवानीशंकरास दिल्लीची प्रजा निमकहराम नांवानें संबोधूं लागली व सर्व प्रकारें त्याचा उपमर्द करूं लागली. त्यामुळें त्यास तेथें राहणेंही कठिण झालें. तेव्हां त्यानें यासंबंधांत इंग्रजांकडे तक्रार केल्यावरून भवानीशंकरास जो कोणी निमकहराम ह्मणेल किंवा त्याचा अपमान करील त्यास कडक शासन करण्यांत येईल, अशा आशयाचा इंग्रजांकडून दिल्लींत एक जाहीरनामा प्रसिद्ध केला गेला. पुढें भवानीशंकरानें दिल्ली कायमची सोडून ग्वाल्हेरीस शिंद्यांच्या फौजेंत नोकरी धरली व तेथें बक्षीगिरीचें काम बरेंच दिवस केलें. याच्या रोजनिशीचा समाप्तिकाल ता. ३० डिसेंबर सन १८१० हा असून तिच्यांतील बरीचशी माहिती महत्त्वाची आहे. पुढें सातवा खंड सन १९२९ मध्यें प्रसिद्ध झाला. तो 'होळकरांची कैफियत' या ग्रंथाच्या द्वितीयावृत्तीचा आहे. प्रथमतः ही कैफियत काशिनाथ नारायण साने यांनीं बळवंतराव कमळाकर माकोडे यांच्याकडून अर्थनिर्णायक व इतर माहितीच्या टीपा लिहवून सन १८८० च्या

सुमारास 'काव्येतिहास संग्रहां'तून प्रसिद्ध केली होती. त्यावेळीं तिच्यांतील २४ पानें गळालीं होतीं, तीं पुढें १५–२० वर्षांनी रा. ब. दत्तात्रय बळवंत पारसनीस यांना उपलब्ध झाल्यावर त्यांनीं तीं 'भारतवर्ष' व 'इतिहास संग्रह' या मासिकांतून प्रसिद्ध केलीं. सदर कैफियत गोपाळबाबा खासगीवाले ( पुण्यश्लोक देवी श्री अहिल्याबाई होळकर यांचे खासगी कारभारी गोविंदपंत गानु यांचे चिरंजीव ) यांनीं लिहिली आहे. या गोपाळबाबांनी अहल्याबाईची राजवट स्वतः पाहिली होती व पुढें द्वितीय तुकोजीराव होळकरांच्या अज्ञानदशेंत 'कौन्सिल ऑफ रीजन्सी' मध्येंही ते होते. या कैफियतीच्या शेवटीं लेखनकाल निर्देशिलेला नाहीं; तथापि तिच्यांत आलेल्या मालकीन, अग्नी, वळदळी, बोर्तिक वगैरे इंग्रज अधिकाऱ्यांच्या व अज्युटंट, आपसर, लेन, रजमंट, कंपू, कपतान, कर्नेळ वगैरे इंग्रजी हुद्यांच्या अपभ्रष्ट नांवांवरून ती सन १८१८ नंतर लिहिली गेली असावी, असें भागवतांनीं अनुमान काढलें आहे. या कैफियतींत सुभेदार मल्हारराव होळकर यांच्या जन्मापासून ( सन १६९४ ) तों हरिराव व खंडेराव होळकर यांच्या निधनापर्यंत (सन १८४४) सुमारें १५० वर्षांचा वृत्तांत दिलेला आहे. या दीर्घ कालावधींतील होळकर राजघराण्यांतल्या राजांच्या व राण्यांच्या कारकीर्दी; त्यांचे स्वभावविशेष; त्यांनीं केलेल्या कामगिऱ्या, मारलेल्या लढाया आणि साधलेलीं राजकारणें इत्याद्यनेक गोष्टींचें वर्णन फारच सुंदर रीतीनें केलेलें आहे. शिवाय त्या वर्णनांत सुभाषितांची जागोजागीं रेलचेल करून सोडली आहे. त्यावरून गाढ माहितीबरोबरच लेखकाची लेखनशैली व बहुश्रुतपणा यांचाही उत्तम परिचय होतो. ज्या ज्या गोष्टी लेखकानें प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिल्या किंवा ज्यांच्यांत त्याचें स्वतःचेंही अंग होतें त्यांची वर्णनें त्यानें बिनचूक कालानुक्रमानें केलेलीं आहेत. ग्रंथाच्या शेवटी

नगर जिल्ह्यांतील काळेगांवचे जहागीरदार फडणीस यांच्या संग्रहीं असलेल्या सदर कैफियतीच्या प्रतींत जी अधिक माहिती दिलेली आहे ती परिशिष्ट ह्मणून जोडली आहे. या खंडाचें संपादन भागवत यांनीं खरोखरच परिश्रमपूर्वक केलेलें दिसतें. नंतर सन १९२५ मध्यें बारावा खंड 'होळकरशाहींतील ऐतिहासिक स्त्रियांचा पत्रव्यवहार' या नांवानें प्रसिद्ध झाला. यांत थोरल्या तुकोजीरावांच्या द्वितीय पत्नी रखमाबाई व उपस्त्री राधाबाई, यशवंतरावांच्या पत्नी लाडाबाई व उपस्त्री तुळसाबाई, शिवाजीरावांच्या मातुश्री भागीरथीबाई वगैरे होळकर घराण्यांतील राजस्त्रिया तसेंच धारच्या द्वितीय आनंदराव पवारांच्या पत्नी मैनाबाई, महादजी शिंद्यांच्या पत्नी लक्ष्मीबाई, बढवाणीच्या राणी बखतकुंवरबाई, मथुराबाई फडणीस वगैरे बाहेरच्या राजस्त्रिया व थोर स्त्रिया आणि लांभाते, फणसे, बाघमारे, बुळे, बाघ, पिंगळे, शिंदे, रखमाबाई किबे वगैरे होळकरांच्या पदरच्या सरदारदरखदार घराण्यांतलि स्त्रिया यांचा पत्रव्यवहार दिलेला आहे व कांहीं अहल्याबाईंचींही पत्रें समाविष्ट करून घेतलीं आहेत. या पत्रव्यवहारावरून किरकोळ गोष्टींबरोबरच तत्कालीन ऐतिहासिक घटनांचीही बरीचशी माहिती मिळते. होळकरशाहीच्या इतिहासाच्या साधनांचे वरील चारी खंड भागवतांनीं खरोखरच अत्यंत चिकाटीनें, प्रयासानें व आस्थेनें ठिकठिकाणच्या दफ्तरांतून पत्रें वाचून, त्यांची संगति लावून आणि त्यांवर टीपा वगैरे लिहून प्रसिद्ध केले आहेत. वरील प्रमुख मध्यभारतीय संस्थानांच्या राजघराण्यांबरोबर भोपाळ संस्थानच्याही मुसलमान राजघराण्याचा इतिहास 'भोपाळ संस्थानचा इतिहास' या नांवानें सन १८९४ मध्यें प्रसिद्ध झाला आहे. भोपाळच्या शहाजान बेगम यांनीं लिहिलेल्या 'ताजुल्इकबाल' या फारशी ग्रंथाचें हें भाषांतर होय. हें भाषांतर माधवराव व्यंकटेश लेले यांनीं उत्तम रीतीनें केलें आहे. बेगम साहेबांच्या

'ताजुल्इकबाल' ग्रंथाचा उपसंहार त्याच्या पतीनें स्वतः लिहिला असून त्यांत त्यांनीं हा इतिहास बेगम साहेबांनीं वस्तुस्थितीचा कोठेंही विपर्यास न होऊं देतां मोठ्या निःपक्षपातानें, चौकस बुद्धीनें व उदार अंतःकरणानें लिहिला असल्याबद्दल ग्वाही दिली आहे. सन १७३१ पासून १८८४ पर्यंतची हकीगत या इतिहासांत थोडक्यांत चटकदार रीतीनें वर्णिली आहे. मध्यभारत व तदंतर्गत संस्थानादीचे आतांपावेतों प्रकाशित झालेले इतिहासविषयक ग्रंथ एवढेच होत.

## महाराष्ट्र व तदंतर्गत संस्थानांचे इतिहास

आतां मध्यभारतीय लेखकांनीं लिहिलेल्या महाराष्ट्र व तदंतगत संस्थानांच्या इतिहास ग्रंथांकडे वळूं. त्या इतिहास ग्रंथांत खास महाराष्ट्राविषयीं 'मराठी स्वराज्य वैभव' व 'अर्वाचीन महाराष्ट्र' हे केवळ दोनच ग्रंथ लिहिले गेले असल्याचें कळून येतें. यांपैकीं पहिला ग्रंथ ग्वाल्हेरचे बाळाजी काशीनाथ बक्षी यांनीं लिहिला आहे; परंतु तो आम्हास उपलब्ध झाला नाहीं. दुसरा ग्रंथ 'अर्वाचीन महाराष्ट्र' हा जगन्नाथ रावजी टुल्लु यांनीं मुरूड जंजिऱ्याकडे नोकरीस असतांना सन १९१४ मध्यें लिहिला. जस्टिन मक्कार्थी यांच्या 'हिस्टरी ऑफ अवर ओन टाइम्स' या लोकप्रिय ग्रंथाप्रमाणें टुल्लु यांनीं आपल्या प्रस्तुत ग्रंथाची रचना केली आहे. सन १८१७ पासून १९११ पर्यंतच्या काळांत विशेषतः महाराष्ट्रांत व सामान्यतः महाराष्ट्रियांची वसति असलेल्या हिंदुस्थानच्या अन्यान्य भागांत ज्या राजकीय, सामाजिक, शिक्षणविषयक व इतर घडामोडी झाल्या त्यांतील ठळक घडामोडींचें वर्णन थोडक्यांत या ग्रंथांत केलेलें आहे. अशा प्रकारचा मराठींत झालेला हाच पहिला ग्रंथ होय. अनंत नारायण भागवत यांना मध्यंतरीं बराच काळ महाराष्ट्रांत कंठावा लागला होता त्यावेळीं त्यांनीं पुण्यास रा. ब. पारसनिसांच्या मागोमाग पेशवे दफ्तरांत शिरण्याचा पुष्कळ प्रयत्न केला; परंतु त्यांत त्यांना यश आलें नाहीं

तेव्हां त्यांनीं फलटन, भोर, अक्कलकोट, सावंतवाडी, औंध, विशालगड वगैरे संस्थानांतून तेथील अधिपतींच्या आश्रयानें इतिहास लिहिण्याचा उद्योग केला. अशा त्यांनीं लिहिलेल्या इतिहासांपैकीं 'औंध संस्थानच्या इतिहासा' चे दोन खंड अलीकडे प्रसिद्ध झाले असल्याचें समजतें. 'भोर संस्थानचा इतिहास' सन १९०४ मध्यें प्रसिद्ध झाला व तत्पूर्वीं आणि तदनंतर अक्कलकोट, फलटन व विशालगड या तीन संस्थानांचे इतिहास प्रसिद्ध झाले. हे इतिहास लिहिण्याकरितां संस्थानांतील जुने दफ्तरखाने धुंडाळून व त्यांतील महत्त्वाच्या कागदपत्रांची निवड करून इतिहास लिहून काढण्यांत भागवतांना किती परिश्रम पडले असतील हें सांगावयाचें झाल्यास 'विद्वानेव हि जानाति विद्वज्जन परिश्रमम्' एवढेंच आम्हास ह्मणतां येईल! भागवतांप्रमाणें माधवराव व्यंकटेश लेले हेही महाराष्ट्रांत नोकरीमागें हिंडत असतांना त्यांनीं रॉबर्ट सेवेल यांच्या 'ए फरगॉटन एम्पायर' या विजयानगर साम्राज्येतिहाससंबंधीं ग्रंथाचें 'एक नष्टस्मृति साम्राज्य' या नांवानें भाषांतर तयार केलें होतें, तें पुढें सन १९१९ मध्यें 'होळकर सरकार पुस्तकमालें' तून सहावें पुस्तक ह्मणून प्रसिद्ध झालें. हें पुस्तक वाचीत असतांना एके काळीं अखिल भारतवर्षास ललामभूत होऊन दिगंतकीर्ति पावलेल्या व आज लोकांना अगदीं विस्मृत असलेल्या विजयानगरच्या साम्राज्याच्या राजकीय, सामाजिक व सांपत्तिक स्पृहणीय स्थितीचा भव्य चित्रपट आपल्या डोळ्यांपुढून झरझर चालला आहे, असा भास होतो.

**हिंदुस्थानचा इतिहास व इतिहासविषयक ग्रंथ**

'हिंदुस्थानचा इतिहास' ह्मणून मध्यभारतांत आजपावेतों एकच ग्रंथ तयार झाला आहे व तोही ईश्वरीप्रसाद यांच्या ग्रंथाचें भाषांतर असून खास प्रौढ विद्यार्थ्यांसाठींच आहे; तथापि या ग्रंथांत प्राचीन काळापासून तों लॉर्ड आयर्विनच्या कारकीर्दीपावेतोंची सर्व

महत्त्वाची माहिती संक्षिप्त व सुसंगत अशी दिली असल्यामुळें इतरांनाही त्याचा संदर्भ ग्रंथाप्रमाणें उपयोग होण्यासारखा आहे. या ग्रंथाचे (भाषांतर) कर्ते केशव रामचंद्र रुद्र हे असून तो सन १९३५ मध्यें प्रसिद्ध झाला आहे. याच्या बरेच वर्षांपूर्वी माधवराव व्यंकटेश लेले यांनीं अबुलफजलकृत 'आयने अकबरी' व महंमदकासिम फेरिस्ताकृत 'तारीख फेरिस्ता' अर्थात् हिंदुस्थानचा इतिहास या ग्रंथांचीं भाषांतरें तयार करून प्रसिद्ध केलीं. हे दोन्ही मूळ ग्रंथ मोगलसम्राट् अकबराच्या कारकीर्दींत लिहिले गेलेले आहेत. 'तारीख फेरिस्त्यां'त दिल्ली, गुलबुर्गा, विजापूर, अहमदनगर, गोवळकोंडे, वऱ्हाड, बेदर, गुजराथ (अमदाबाद), माळवा (मांडव), खानदेश, बंगाल व बिहार, जौनपुर, मुलतान, सिंध व ठट्ठा आणि काश्मीर येथील मुसलमानी राज्यांचा अनेक ग्रंथांच्या आधारें विस्तृत वृत्तांत दिला असून 'आयने अकबरीं'त प्रथम अकबरानें केलेले नियम व सुधारणा देऊन नंतर हिंदुस्थानच्या मोगलसत्तांकित प्रदेशाचा इतिहास वर्णन केला आहे. यांत माळव्यासंबंधांत बरीच मनोरंजक कल्पित माहिती आढळते. माळव्याची मर्यादा सांगतांना म्हटलें आहे कीं, "याची लांबी कळ्यापासून बांसवाड्यापर्यंत २४५ कोस व रुंदी चंदेरीपासून नंदुरबारपर्यंत २३० कोस असून याच्या पूर्वेस बंधनू (बुंदेलखंड), उत्तरेस नरवरचा पहाड, दक्षिणेस बागलाण व पश्चिमेस गुजराथ व अजमीर हे प्रांत आहेत." पुढें एके ठिकाणीं माळव्यांतील एक चमत्कार वर्णिला आहे कीं, "आपण (अबुलफजल) बादशहाच्या हुकुमानें दक्षिणेस जात असतांना मार्गांत उज्जनीस मुक्काम केला तेव्हां तेथील लोकांनीं आपणास खात्रीनें सांगितलें कीं आठ दिवसांपूर्वीच (फरवरदीन महिन्याच्या १६ व्या तारखेस) ५ घटका रात्र झाली असतां येथें असा लोकोत्तर चमत्कार घडला कीं नदी (क्षिप्रा) दुधानें भरून वाहते आहे. त्यावेळीं हिंदु व मुसलमान

लोकांनीं नदींतून कांहीं दूधही भरून घेतलें ! केव्हां केव्हां ही नदी अशीच दुधानें भरून वाहत असते !" अशा चमत्कारवर्णनानंतर माळव्याच्या राजांचा संक्षिप्त इतिहास यांत दिला आहे; परंतु तोदेखील बव्हंशीं काल्पित कथांवरच उभारलेला आहे. त्या इतिहासवर्णनांत अबुलफजलनें ह्मटलें आहे कीं, "या ग्रंथाची रचना होण्याच्या २३५५ वर्षें ५ महिने व २७ दिवसांपूर्वी महामहा नांवाच्या एका ऋषीनें या देशांत ( माळव्यांत ) एक अग्निमंदिर बांधिलें. तेथें एक अग्निकुंड होतें. पुष्कळ भाविक लोक पुण्यप्राप्तीच्या हेतूनें आपले देह त्या कुंडांतील अग्निनारायणास समर्पण करीत असत. बौद्ध लोकांनीं राजाकडून ही अग्न्युपासना सक्तीनें बंद करविली. पुढें कांहीं लोकांनीं बौद्ध लोकांचा उच्छेद होऊन ब्राह्मण धर्माची पुनः स्थापना करणाऱ्या वीर पुरुषाचा अवतार व्हावा ह्मणून परमेश्वराची प्रार्थना केली. त्यावेळीं बरेच दिवसांपासून नष्ट झालेला अग्निमंदिरांतील अग्नि परमेश्वराच्या कृपेनें एकदम प्रज्वलित होऊन त्यांतून एक दिव्यरूप, खड्गपाणि, मानवदेहधारी पुरुष अवतीर्ण झाला. त्याचें नांव धनजी होतें. लवकरच तो स्वपराक्रमानें ( माळव्याचा ) राजा झाला." परमारांचा मूळ पुरुष अग्निपाळ याच्या उत्पत्तीसंबंधाची भाटचारणांनीं वर्णिलेली कथाही विशेषतः याच प्रकारची आहे, हें येथें निर्देशिणें जरूर आहे. अस्तु. पुस्तकांत माळव्याच्या व इतर प्रांतांच्या निरनिराळ्या वंशांतील राजांच्या राजवटींचे काळ नुसती वर्षांची संख्या देऊनच नव्हे तर, महिने व दिवस यांचीही संख्या निश्चित स्वरूपांत देऊन अबुलफजलनें सत्यकथनाचा बराच आव आणला आहे; परंतु तो सर्वथा निरर्थक आहे. लेले यांनीं वरील दोन्ही ग्रंथांचीं फारशीवरून मराठी भाषांतरें इतकीं उत्तम केलीं आहेत कीं, त्याबद्दल तज्ज्ञांनीं त्यांच्या फारशी भाषेंतील पारंगततेची मुक्तकंठानें प्रशंसाच केली आहे. कल्हणाच्या संस्कृत 'राजतरंगिणी'चेंही मराठी भाषांतर

लेले यांनीं केलें असून तें सन १९२९ मध्यें प्रसिद्ध झालें आहे. हल्लीं काश्मीरमध्यें श्रीनगरहून ३० मैल लांब असलेल्या एका उंच पर्वताच्या शिखरावर, एखाद्या प्राचीन आर्य ऋषीप्रमाणें आश्रम बांधून व तेथें अति प्राचीन बौद्ध ग्रंथांचा आणि बौद्धकालीन वस्तूंचा अत्यंत प्रेक्षणीय असा संग्रह तयार करून, बौद्ध वाङ्मयाच्या अभ्यासांत सतत आनंदानें आयुष्य व्यतीत करीत असलेल्या सर आरियल स्टीन यांनीं सन १८९२ मध्यें 'राजतरंगिणी' चें इंग्रजी भाषांतर विस्तृत टीपांसह प्रसिद्ध केलें आहे, त्याचाच लेले यांनीं आपल्या ग्रंथाच्या कामीं मुख्यत: उपयोग करून घेतला आहे त्यामुळें हा ग्रंथ नि:संशय सुंदर, संग्राह्य झाला आहे. शिवाय लेले यांनीं स्टीनसाहेबांच्या ग्रंथाच्या विद्वत्तापूर्ण प्रस्तावनेचेंही भाषांतर त्यास जोडलें असल्या कारणानें या ग्रंथाच्या महत्त्वांत अधिक भर पडली आहे. मूळ कल्हणकृत 'राजतरंगिणी' ची योग्यता सर्वपरिचित असल्यानें त्याविषयीं अर्थात्च येथें अधिक लिहिण्याची आवश्यकता नाहीं.

## देशांतराचे इतिहास

मध्यभारतांत देशांतराचे दोनच इतिहास आतांपावेतों प्रसिद्ध झाले आहेत. ते दोन ह्मणजे 'चीन देशाचा इतिहास' व 'टयूडर घराणें' हे होत. 'चीन देशचा इतिहास' हा ग्रंथ इंदूर मदरशाचे माजी हेडमास्तर माधव सखाराम तर्टे यांनीं लिहिला असून तो त्यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या चिरंजिवांनीं सन १८९४ मध्यें प्रसिद्ध केला. या ग्रंथाचा फक्त पूर्वार्ध तर्टे यांच्या हातून लिहिला गेला व उत्तरार्ध लिहित असतांनाच त्यांचा आकस्मिक मृत्यू झाला. त्यामुळें तो उत्तरार्ध अर्धवटच राहिल्या कारणानें प्रसिद्ध होऊं शकला नाहीं. या पूर्वार्धांत अरबी व फारशी भाषेंतील चीनच्या तवारिखांवरून त्या देशाच्या पंधरा सुभ्यांची जमीन, उत्पन्न, व्यापार, लोक, उद्भिजें, कारागिरी, वसूल, जनावरें, रीतभात वगैरे संबंधाची माहिती थोडक्यांत दिलेली

आहे. ' टयूडर घराणें ' हा लघु ग्रंथ दामोदर बळवंत दांडेकर यांनीं सन १९३० मध्यें लिहिला. विश्वविद्यालयाच्या परीक्षेस बसणाऱ्या प्रौढ विद्यार्थ्यांना ' मार्गदर्शक ' ह्मणून उपयोगी पडण्यासारखीं इंग्लंड देशाच्या इतिहासावरील टिपणें लिहिण्याचा उद्देश मनांत बाळगून त्यांतलें पहिलें टिपण ह्मणून दांडेकरांनीं हा ग्रंथ प्रसिद्ध केला. यांत सन १४८५ पासून सन १६०३ पर्यंत इंग्लंड देशावर राज्य करणाऱ्या टयूडर घराण्यासंबंधाची महत्त्वाची तेवढीच माहिती थोडक्यांत पण चटकदार रीतीनें वर्णन करून लिहिली असल्यानें इतर जिज्ञासु वाचकांनींही हा ग्रंथ एक वेळ अवश्य वाचण्यासारखा झाला आहे.

### प्राकरणिक व किरकोळ इतिहास

आतां मध्यभारतीय लेखकांनीं लिहिलेल्या लहानमोठ्या प्राकरणिक व किरकोळ इतिहास-ग्रंथांकडे वळूं. अशा ग्रंथांत पौराणिक कालाशीं संबंध असलेलीं गोविंद बळवंत माकोडेकृत ' रामायणांतील अनार्य नांवें ' व रामचंद्र लक्ष्मण देसाई ऊर्फ मायानंद चैतन्यकृत ' संजयाची कैफियत ' हीं दोनच पुस्तकें आतांपावेतों प्रसिद्ध झालीं असल्याचें समजतें. यांतील दुसरें पुस्तक आमच्या पाहण्यांत आलें नसून पहिलें पुस्तक सन १९३४ मध्यें प्रसिद्ध झालें आहे. ' जर्नल ऑफ धि बिहार अँड ओरिसा रीसर्च सोसायटी ' च्या मार्च सन १९२५ च्या अंकांत जी. रामदास यांचा ' ॲबॉरिजिनल नेम्स इन् धि रामायण ' हा लेख प्रसिद्ध झाला होता. या लेखानें संशोधनाचें एक नवीनच क्षेत्र उपलब्ध झालें. त्याकडे महाराष्ट्रीय विद्वानांचें लक्ष वेधावें ह्मणून माकोडे यांनीं मुद्दाम त्या लेखाचें मराठी भाषांतर करून तें या स्वतंत्र लघु पुस्तकद्वारें प्रसिद्ध केलें. यानंतर इतिहासाशीं संबंध असलेली अशीं ' काशीची कसल ', ' मराठ्यांचा दरारा ', ' महाराणी बायजाबाई शिंदे यांच्या अज्ञातवासाची हकीगत ' व ' प्रतापगडचें युद्ध ' हीं चार पुस्तकें कालानुक्रमानें प्रसिद्ध झालीं. हीं सर्व पुस्तकें

महत्वाचीं आहेत. 'काशीची कत्तल' हें पुस्तक सन १९०६ मध्यें प्रकाशित झालें असून तें अनंत नारायण भागवत यांनीं लिहिलेलें आहे; परंतु तें आज उपलब्ध नाहीं. 'मराठ्यांचा दरारा' हें पुस्तक वासुदेव गोविंद आपटे यांनीं सन १९१४ मध्यें इंदुरास असतांना लिहून प्रसिद्ध केलें. यांत मराठ्यांच्या बंगालवरील स्वाऱ्या वर्णन करून त्यांचा दरारा त्या मुलखांत कसा बसला होता याचें मनोवेधक चित्र काढलें आहे. यापूर्वी मराठ्यांच्या इतिहासांत हा भाग जवळ-जवळ वगळल्यासारखाच होता, ती अपूर्णता आपटे यांनीं प्रस्तुत पुस्तकद्वारें उत्तम रीतीनें भरून काढली आहे यांत संदेह नाही. बंगाली, फारशी व इंग्रजी या तिन्ही भाषांच्या वाङ्मयांतले या विषयाला साधनभूत होणारे जेवढे ग्रंथ आज उपलब्ध आहेत तेवढ्या सगळ्यांचा उपयोग आपटे यांनीं आपल्या पुस्तकाच्या कामीं करून घेतला असून खास त्यानिमित्त ते बंगालमध्यें कांहीं दिवस फिरतही राहिले होते. 'महाराणी बायजाबाई शिंदे यांच्या अज्ञातवासाची हकीगत' हें पुस्तक सन १९२६ मध्यें प्रसिद्ध झालें. उत्तर हिंदुस्थानांत धर्मनिष्ठ साध्वी राणी ह्मणून देवी अहल्याबाईच्या खालोखाल दौलतराव शिंदे यांच्या पत्नी बायजाबाई यांची ख्याति आहे. दौलतराव निपुत्रिक वारल्यावर बायजाबाईनीं जनकोजीरावांस दत्तक घेऊन आपल्या विश्वासू कारभाऱ्याच्या सल्लेनें सात वर्षें राज्यशकट मुरळितपणें चालविला व कंपनी सरकारांतही आपलें वजन राखिलें; परंतु या अवधींत वयांत आलेल्या जनकोजीरावांनीं हळुहळू तंटेबखेडे माजवून शेवटीं राज्यकारभार आपल्या हातीं घेतला व बायजाबाईस वनवास घडविला; परंतु त्याचा परिणाम जनकोजीरावांस लौकरच भोगावा लागला. बायजाबाईनीं आपले वनवासाचे दिवस आप्तजनांकडून व वरिष्ठ अधिकाऱ्यांकडून परोपरीनें अपमान व त्रास सोसण्यांतच घालविले; तथापि तशा परिस्थितींतही त्यांनीं आपल्या मनाची शांति

तिळमात्र ढळूं दिली नाहीं व धैर्यही मुळींच सोडलें नाहीं. इतकेंच नव्हे तर, पुढें बंडाच्या वेळीं गत गोष्टी सर्व विसरून जाऊन त्यांनीं ग्वालेरचे तत्कालीन अधिपति जयाजीराव यांना योग्य तोच सल्ला कळवून त्यांच्याकडून इंग्रज सरकारशीं दोस्ती कायम ठेवविली. यावरून बायजाबाईच्या मनाचा थोरपणा उत्तम रीतीनें व्यक्त होतो. रा. ब. पारसनीस यांना सन १९०२ मध्यें बायजाबाईचें चरित्र लिहिते वेळींही बायजाबाईच्या अज्ञातवासाची हकीगत उपलब्ध झाली नसल्यामुळें त्या चरित्रांत हा भाग अपूर्णच राहिला होता त्याची पूर्तता आतां या पुस्तकद्वारें झाली आहे. या अज्ञातवासाची सन १८२९ पासून १८६४ पावेतोंची हकीगत बायजाबाईचे खास जामदारखान्यावरील अधिकारी विनायक रामचंद्र ऊर्फ दादा कुंटे यांनीं लिहिली असून हे गृहस्थ नेहमीं बायजाबाईच्या बरोबर असत, त्यामुळें अर्थात् त्यांनीं लिहिलेली हकीगत विश्वसनीयच आहे. या पुस्तकांत उल्लेखित व्यक्ति व प्रसंग यांच्या संबंधांत खुलाशाच्या टिपा मुळींच दिलेल्या नाहींत. वास्तविक अनभिज्ञ वाचकांच्या 'सोईसाठीं त्या देणें अत्यंत आवश्यक होतें. 'प्रतापगडचें युद्ध' हा ग्रंथ ग्वाल्हेर संस्थानच्या लष्करांतील एक (माजी) अमलदार कॅ. गणेश वासुदेव मोडक यांनीं सन १९२७ मध्यें ग्वाल्हेर येथें लिहून प्रसिद्ध केला. या ग्रंथाच्या नांवावरून शिवाजीमहाराज व अफजुलखान यांच्यामधील युद्धप्रसंगाचें सविस्तर वर्णन यांत केलें असावें अशी एकदम कल्पना होते; परंतु तसें नसून केवळ उदाहरणादाखल तो प्रसंग घेऊन कॅ. मोडक यांनीं मराठ्यांच्या युद्धशास्त्राचें सांगोपांग व सविस्तर विवरण यांत केलेलें आहे. आजपर्यंत मराठींत युद्धशास्त्रविषयक वाङ्मय निर्माण करणारे लेखक फारच थोडे झाले व ते बहुधां युद्धशास्त्राशीं अनभिज्ञच असल्यामुळें त्यांच्या कृतींत युद्धाचेंतंत्र (टेकनिक्) कधींच पहावयास मिळालें नव्हतें. ती उणीव मराठी वाचकांच्या सुदैवानें बडोद्याचे जनरल नानासाहेब शिंदे

व कॅ. मोडक यांसारखे प्रत्यक्ष लष्करी खात्यांतील तज्ञ अमलदार लेखक ह्मणून पुढें आल्यापासून हळुहळू दूर होत चालली आहे, ही आनंदाची गोष्ट होय. अस्तु. कॅ. मोडक यांनीं आपल्या ग्रंथाच्या शेवटीं युद्धशास्त्राचा इंग्रजी--मराठी शब्दकोश, त्या शास्त्रावरील निवडक वाचनीय ग्रंथांची सूचि व अकरा नकाशांची पिशवी दिली आहे. सप्रमाण माहिती, सुगम विवरण आणि तडफदार भाषा हे या ग्रंथाचे गुणविशेषही उल्लेखनीय आहेत. जनरल शिंदे यांनीं सदर पुस्तकावर लिहिलेली टीकादेखील वाचनीय व मननीय आहे. इंदूर राज्याची सामान्य माहिती देणारा असा एक महत्त्वाचा ग्रंथ मध्यभारतांत लिहिला गेला आहे त्याचाही निर्देश याबरोबरच येथें करणें उचित होईल. हा ग्रंथ ह्मणजे सीताराम लक्ष्मण नाडकर्णी यांचें 'होळकरांच्या राज्याचें सामान्य वर्णन' हा होय. हा ग्रंथ 'होळकर सरकार पुस्तक मालें' तून ८ वें पुस्तक ह्मणून सन १९१९ मध्यें प्रसिद्ध झाला असून तो 'इंदोर स्टेट गॅझेटियर' वरून तयार करण्यांत आला आहे.

## धर्म व ज्ञातिविषयक इतिहास

या सदराखालीं मोडणारीं मोजकीं चारच पुस्तकें आजवर मध्यभारतांत लिहिलीं गेलीं आहेत. त्यांपैकीं धर्मविषयक असें 'बौद्धपर्व अथवा बौद्ध धर्माचा साद्यंत इतिहास' हें एकच पुस्तक असून तें सन १९१४ मध्यें वासुदेव गोविंद आपटे यांनीं इंदुरास असतांना लिहिलेलें आहे. यांत बौद्ध धर्माविषयीं महत्वाची साद्यंत माहिती थोडक्यांत पण चांगली दिली आहे. ज्ञातिविषयाचीं 'याजुषांचा इतिहास' व 'शहाण्णव कुळीं' हीं दोन पुस्तकें होत. 'याजुषांचा इतिहास' धारचे यज्ञेश्वर दीक्षित भिंगारकर यांनीं बऱ्याच वर्षांपूर्वी लिहिला, असें म्हणतात; परंतु आह्मास तें पुस्तक पहावयास मिळालें नाहीं व तें प्रकाशित झालें आहे किंवा नाहीं हेंही बरोबर माहित नाहीं. 'शहाण्णव कुळीं'चे कर्तेही कोणी धारकरच आहेत. हें पुस्तक प्रसिद्ध

झालें आहे; पण तें आह्मास उपलब्ध झालें नाहीं. गायकवाड सरकारच्या आज्ञेप्रमाणें अनेक इंग्रजी खेळांवर मराठींत ग्रंथ लिहिणारे प्रो. रामकृष्ण सखाराम आठवले यांनीं इंदुरास होळकर कॉलेजांत प्रोफेसर असते वेळीं सन १८८३ मध्यें लिहिलेल्या व बडोद्याच्या 'राष्ट्रकथामाले'तून प्रसिद्ध झालेल्या 'स्पॅनिश मूर लोक' या ग्रंथाचाही येथें याच सदरांत नामनिर्देश केल्यास वावगें होणार नाहीं.

## शालोपयोगी इतिहास

आतां शाळांतील विद्यार्थ्यांसाठीं लिहिले गेलेल्या इतिहासांकडे वळूं. या इतिहासांची, मागें उल्लेखिले गेलेले फडकेकृत 'परमार घराण्याचा इतिहास', रुद्रकृत 'हिंदुस्थानचा इतिहास' व दांडेकर-कृत 'ट्यूडर घराणें' हीं तीन पुस्तकें परत येथें जमेस धरून आणि त्यांत दुसरीं आणखीं लिहिलीं गेलेलीं पांच पुस्तकें मिळवून, एकंदर संख्या मोजूं जातां ती आठ होते. या नवीन पांच इतिहासांपैकीं 'महाराष्ट्राचा बालबोध इतिहास', 'पेशवाईची हकीगत' व 'हिंदुस्थानचा सचित्र मनोरंजक इतिहास' हीं तीन लहान लहान पुस्तकें वासुदेव गोविंद आपटे यांनीं इंदुरास असतांना अनुक्रमें सन १९०७, १९०८ व १९१३ मध्यें लिहिलीं असून त्यांच्या आतांपावेतों दोन-दोन तीनतीन आवृत्त्या प्रसिद्ध झाल्या आहेत. यांतल्या पहिल्या दोन पुस्तकांत मराठ्यांच्या व पेशव्यांच्या तेजस्वी इतिहासाची माहिती थोडक्यांत मनोरंजक गोष्टींच्या द्वारें करून देण्यांत आली आहे व तिसऱ्या पुस्तकांत, सांप्रत इंग्लंड, जर्मनी, अमेरिका वगैरे देशांतून विद्यार्थ्यांना इतिहास शिकविण्यासंबंधांत जी Concentric method प्रचलित आहे त्या पद्धतीनें, हिंदुस्थानच्या इतिहासाची सामान्य रूपरेषा गोष्टीरूपानें दाखविण्यांत आली आहे. यानंतर चौथें पुस्तक 'बालोपयोगी शिंदेशाही' हें ग्वाल्हेर येथील 'हितचिंतक' मासिकाचे संपादक रघुनाथ विष्णु शिरढोणकर यांनीं सन १९३१ मध्यें लिहिलें

असून त्यांत शिंदे घराण्याची माहिती थोडक्यांत गोष्टींच्या रूपानेंच देण्यांत आली आहे. ' इंदूर संस्थानचा संक्षिप्त इतिहास ' हें पांचवें पुस्तक ' बालोपयोगी शिंदेशाही ' पूर्वी सन १९२४ मध्यें इंदूरचे वकील प्रभाकर सदाशिव चिने यांनीं इंदूर राज्यांतील शाळाखात्यासाठीं मुद्दाम लिहिलें असून त्याच्या आतांपावेतों तीनचार आवृत्त्याही निघाल्या आहेत. या इतिहासांत होळकरशाहीविषयींची सर्वच महत्त्वाची माहिती संक्षिप्तांत सुबोध व सुसंगत अशी दिली आहे.

## चरित्र वाङ्मयाचें पूर्वकथन

मध्यभारतीय लेखकांच्या प्रसिद्ध झालेल्या एकंदर इतिहास ग्रंथांचा परिचय येथवर करून दिला आतां यापुढें चरित्र ग्रंथांकडे वळूं. महाराष्ट्रांत चरित्र ग्रंथ या संज्ञेस पात्र होण्यासारखा पहिला ग्रंथ ' नाना फडणविसाचा वृत्तांत ' हा सन १८५९ मध्यें प्रसिद्ध झाला असल्याचें समजतें, तसाच मध्यभारतांतला पहिला चरित्र ग्रंथ इंदूरचे कै. बाळकृष्ण नारायण देव यांचा 'रामशास्त्री प्रभुणे' हा त्यानंतर सुमारें ३३ वर्षांनीं ह्मणजे सन १८९२ मध्यें प्रसिद्ध झाला असून ' बाळशास्त्री जांभेकर यांचें चरित्र' हा त्यांचा दुसराही ग्रंथ त्याच वर्षी प्रसिद्ध झाला आहे. माधवराव व्यंकटेश लेले यांचें ' अकबर बादशहाचें चरित्र ' पुढें सन १८९८ मध्यें बाहेर पडलें व नंतर हळुहळू चरित्र ग्रंथांची निपज मध्यभारतांत होऊं लागली. बाळकृष्ण मल्हार हंस यांचीं तुकाराम, मोरोपंत व वामन पंडित यांच्यावरील निबंधांचीं पुस्तकें यापूर्वीच ह्मणजे अनुक्रमें सन १८८०, १८८२ व १८८३ मध्यें प्रसिद्ध झालीं होतीं; परंतु त्यांत लेखकानें चरित्रापेक्षां काव्यालोचनाकडेच अधिक दृष्टि ठेविली असल्या कारणानें त्या पुस्तकांची सामान्यतः चरित्र वाङ्मयांत गणना करतां येत नाहीं. अस्तु. आतां मध्यभारतीय लेखकांनीं लिहिलेल्या चरित्र ग्रंथांचा परिचय विषयवार करून देऊं.

### पौराणिक व्यक्तिचरित्र

प्रथम पौराणिक व्यक्तिचरित्रांकडे वळतां या सदरांत मोडणारा असा एकच ग्रंथ मध्यभारतांत आतांपावेतों प्रसिद्ध झालेला आढळतो, तो ग्रंथ ह्मणजे सौ. कमलाबाई साहेब किबे यांनीं सन १९१६ मध्यें लिहिलेला ' सीता चरित्र ' हा होय. हें ' सीता चरित्र ' श्रीराम शर्मा नांवाच्या ग्रंथकारानें मूळ हिंदींत लिहिलेल्या चरित्राचें भाषांतर असून त्यांत निःसीम पतिभक्ति व अलौकिक त्यागवृत्ति यांच्यायोगें सतिमूर्धन्या समजल्या जाणाऱ्या सीता देवीच्या जीवनांतील एकेक प्रसंगाचें केलेलें वर्णन खरोखरच चित्तवेधक व बोधप्रद आहे. प्रत्येक हिंदु स्त्रीनें हें चरित्र एक वेळ तरी अवश्य वाचण्यासारखें आहे.

### साधुसंतांचीं चरित्रें

यानंतर साधुसंतांच्या चरित्र ग्रंथांकडे वळून पहातां तसे चरित्र ग्रंथ आतांपावेतों दहाबारा प्रसिद्ध झाले असल्याचें आढळून येतें. ' बरवीं संतचरित्रें हो । पावन परम पवित्रें हो ' ह्मणून आत्मोद्धारार्थ परम पावन संतचरित्रें लिहिण्याची प्रथा प्राचीन कवींनीं अहमहमिकेनें सुरूं केली; परंतु तीं चरित्रें, प्रायः चरित्रनायकाविषयीं अंधभक्ति व विभूतिमत्त्वाची भावना बाळगूनच लिहिलीं गेलीं असल्या कारणानें बव्हंशीं चमत्कारयुक्त, पाल्हाळिक व अतिशयोक्तिपूर्ण अशीं बाडेंच झालीं आहेत; मात्र चालू विचारसंक्रमणाच्या युगांत लोकांच्या अंतःकरणांतून तशी अंधभक्ति व विभूतिमत्त्वाची भावना शनैःशनैः निवळत चालली असल्यामुळें अलीकडे लिहिलीं गेलेलीं साधुसंतांचीं चरित्रें, चरित्रनायकांचें व्यक्तित्व कोणत्याही प्रकारच्या कल्पनोदात्त भावनापटलाखालीं आच्छन्न न होता, औचित्यानें यथारूप लिहिलीं गेलीं आहेत. याचें प्रत्यंतर, अधिक नसलें तरी, बऱ्याच प्रमाणांत मध्यभारतीय लेखकांनीं लिहिलेल्या साधुसंतांच्या चरित्र ग्रंथांतही दिसून येतें. मध्यभारतांतील पहिला प्रकाशित असा चरित्र ग्रंथ ह्मटला

म्हणजे केशव गणेश गोळे यांनीं सन १८८९ मध्यें प्रसिद्ध केलेली ‘जयरामस्वामींची बखर’ हा होय. ही बखर जयरामस्वामींचे गुरु शांतीश्वर महाराज यांच्या शिष्यपरंपरेंतील सहावे पुरुष महादेव यांनीं लिहिली असून ती अस्सल त्यांच्या बहिणीचे वंशज राजाराम मनोहर दिवाणजी बुधकार यांच्या संग्रही अजून आहे. जयरामस्वामी हे महाराष्ट्रांत एक थोर साधु पुरुष होऊन गेले. त्यांचे अनेक दैविक चमत्कार पाहून विजापूरच्या बादशहाची त्यांच्यावर मोठी भक्ति बसली व त्यानें त्यांस वडगांव आणि रायगड हीं दोन गांवें इनाम म्हणून दिलीं. त्याबद्दलच्या सनदा अद्याप आहेत. जयरामस्वामींचें वास्तव्य वडगांवासच विशेषेंकरून असे. प्रस्तुत बखरींत त्यांचें अनेक चमत्कारांनीं युक्त असें चरित्र विस्तृतपणें दिलेलें आहे. यानंतर सन १९०३ मध्यें ग्वाल्हेरचे विष्णु गिरमाजी राखे यांनीं लिहिलेलें ‘श्रीरघुनाथदेव महाराज यांचें चरित्र’ प्रसिद्ध झालें; परंतु यांत चरित्रनायकाच्या चरित्रविषयक माहितीपेक्षां त्याच्या लीलाच अधिक वर्णिलेल्या आहेत, त्यामुळें या पुस्तकाला ‘चरित्रा’ ऐवजीं ‘लीलामृत’ हें नांव देणें युक्त झालें असतें. रघुनाथदेव ऊर्फ देवजी महाराज हे कऱ्हाडे ब्राह्मण असून श्रीक्षेत्र काशीचे रहाणारे होते. तरुण असतांनाच त्यांनीं विरक्त होऊन एकनिष्ठेनें भगवदाराधना केली व सिद्धि प्राप्त करून घेतली. ते विशेषतः ग्वाल्हेरीस रहात असत. भांगेची त्यांना अत्यंत आवड होती. स्वतः भांग वाटतांना जो पदार्थ समोर येईल, मग तो साप किंवा विंचू कां असेना, त्याला भांगेंत वाटून ती भांग ते खुशाल पीत असत; परंतु त्यापासून त्यांना अपाय म्हणून कधींच झाला नाहीं! चारी वेद त्यांना मुखोद्गत होते. मोठमोठ्या भुजंगांना समोर बसवून त्यांच्यापुढें ते वेदाच्या ऋचा सुस्वरांत म्हणत असत! ग्वाल्हेरचे महाराज जयाजीराव शिंदे यांची त्यांच्यावर मोठी भक्ति होती व विठोबा महाराज आणि झांशीचे तात्या महाराज हे त्यांचे

मुख्य शिष्य होते. या शिष्यद्वयाच्या संबंधांतही त्रोटक माहिती राखे यांनीं आपल्या पुस्तकाच्या शेवटीं दिली आहे. लष्कर, झांशी, जालवण व सागर या भागांत देवजी महाराजांची ख्याति अजूनही ऐकूं येते. पुढें सन १९१० मध्यें बाबाजी काशीनाथ बक्षी यांनीं लिहिलेलें 'श्रीमज्जगद्गुरुलीलाकैवल्य–भाग १' हें पुस्तक प्रसिद्ध झालें. यांत श्रीमदाद्य शंकराचार्यांचें अद्वितीय जीवनचरित्र वर्णन केलें आहे. यानंतर सन १९१४ मध्यें हनुमंत गोपाळ फाळके यांनीं 'श्रीवासुदेवानंद सरस्वती टेंभे स्वामीमहाराज यांचें चरित्र' प्रसिद्ध केलें. विसाव्या शतकाच्या सुरुवातीस ज्या थोर संतविभूति आपल्याकडे होऊन गेल्या त्यांत श्री वासुदेवानंद सरस्वतींची गणना प्रामुख्यानें होते. त्यांचा जन्म सावंतवाडी संस्थानांतील माणगांवासारख्या क्षुद्र खेड्यांत होऊन त्यांचें पूर्वाश्रमींचें आयुष्यही तिकडे दक्षिणेंतच गेलें असलें तरी पुढचें सर्व आयुष्य मात्र उत्तर हिंदुस्थानांतील उज्जयिनी, सारंगपूर, नरसिंगगड, पिछोर, नेमावर, ओंकारेश्वर, बडवाय, सनावद, मंडलेश्वर, चिखलदा वगैरे मध्यभारतांत असलेल्या गांवींच व्यतीत होऊन शेवटीं निर्वाणही नर्मदातटाकीं गरुडेश्वर क्षेत्रा झालें. पाश्चात्य विद्या आणि संस्कृति यांच्या अभ्यासानें व संसर्गानें दिशाभूल झालेल्या अनेक हिंदु नास्तिकांस त्यांनीं पुनः सद्धर्माकडे वळविण्याचें प्रशंसनीय कार्य केलें. ते उत्तम वेदांती व कवीही होते. संस्कृत व मराठी या दोन्ही भाषांत त्यांनीं ग्रंथनिर्मिति केलेली आहे. 'श्री गुरुसंहिता ऊर्फ समश्लोकी गुरुचरित्र' व 'सप्तशती गुरुचरित्र' हे त्यांचे अनुक्रमें संस्कृत व मराठी काव्यग्रंथ प्रासादिक असून त्यांनीं आपल्या अवतारसमाप्तीच्या वेळीं लिहिलेला 'श्री दत्तात्रय षोडशावतार' हा ग्रंथ तर केवळ अपूर्वच आहे! मनाच्या षोडश कला उत्तरोत्तर विकसित होत जाऊन शेवटीं त्या योगनिद्रेंत कशा निमग्न झाल्या आहेत, हें या ग्रंथांत दाखविलें आहे. गंभीर तत्वज्ञान सोप्या

भाषेंत विशद करून सांगण्याची त्यांची हातोटी या ग्रंथावरून उत्तम प्रकारें दिसून येते. त्यांची शिष्यशाखाही बरीच मोठी आहे. इंदूर येथील वासुदेव वामन ठाकुर यांनींही अलीकडे सन १९३४ मध्यें 'श्रीवासुदेवानंद सरस्वती टेंबे यांचें अल्पचरित्र' म्हणून त्यांचें एक लहानसें चरित्र प्रसिद्ध केलें आहे. सन १९१५ मध्यें 'श्री विद्यारण्य-स्वामी यांचें संक्षिप्त चरित्र' व सन १९१६ मध्यें 'श्री मन्मध्वचरित्रा-मृत' अशीं दोन वैष्णव-चरित्रें रामचंद्र हयग्रीव मणूरकर यांनीं लिहिलेलीं प्रसिद्ध आहेत. हीं दोन्हीं चरित्रें मूळ कानडींतून मराठींत अनुवादिलेलीं आहेत. सुमारें ६०० वर्षांपूर्वी विद्यारण्य ही एक महान् राजकारणी, सद्धर्मप्रवर्तक व सुविद्य अशी थोर विभूति कर्नाटकांत होऊन गेली. या विभूतीनें दक्षिणेंतील यवनांच्या वर्धमान सत्तेला आळा घालण्यासाठीं हरिहर बुक्करायास हाताशीं धरून विजयानगरचें बलिष्ठ व ऐश्वर्यसंपन्न साम्राज्य स्थापन केलें आणि स्वजनांत उत्पन्न झालेल्या द्वैत, विशिष्ट द्वैत आदि मतमतांतरामुळें सनातन धर्माचा होणारा ऱ्हास आपल्या असाधारण ज्ञानबलानें व प्रशंसाह वादकुशलतेनें थांबवून त्या धर्माचा पुनरुद्धार केला. तसेंच वेदांत, न्याय, मीमांसा, व्याकरण, वैद्यक, राजकारण, युद्धकला, ज्योतिष, धर्मशास्त्र, इत्याद्यनेक निरनिराळ्या विषयांवर मोठमोठे प्रमाणभूत ग्रंथही निर्माण केले. विद्यारण्यांच्या या त्रिविध कामगिरींची तुलना करावयाची झाल्यास ती अनुक्रमें आर्यचाणक्य, श्रीमदाद्य-शंकराचार्य व ॲरिस्टॉटल या महान् पुरुषांच्या कामगिरींशीं करतां येईल. मणूरकरांनीं अनुवादिलेलें हें चरित्र त्रोटक जरी असलें तरी चांगलें आहे. या चरित्राचें परीक्षण करण्याच्या निमित्तानें काशीनाथ कृष्ण लेले यांनीं 'विविधज्ञानविस्तार' (१९१६) मधून 'श्रीविद्या-रण्यस्वामी यांची धार्मिक, राजकीय व वाङ्मयात्मक कामगिरी' नांवाचा एक विस्तृत लेख लिहिला होता तोही अत्यंत मार्मिक व महत्वपूर्ण

आहे. मणूरकरांनीं अनुवादिलेलें दुसरें चरित्र ' श्रीमन्मध्वचरित्रामृत ' हें विद्यारण्यस्वामींच्या चरित्रापेक्षां मोठें आहे. तेराव्या शतकांत कर्नाटकामध्यें वैष्णव मताचे जे थोर थोर आचार्य होऊन गेले त्यांत मध्वाचार्यांची गणना प्रामुख्यानें होते. ते महामेधावी व वादकुशल पंडित असल्यामुळें त्यांनीं आसेतुहिमाचल दिग्विजय करून सत्सिद्धांताची सर्वत्र स्थापना केली; परंतु आज मात्र त्यांचें नांव कर्नाटक व मद्रास इलाखा याच भागांत काय तें प्रसिद्ध आहे. वासुदेवाचे भीम, हनुमान व मध्व हे तीन अवतार होत, अशी वैष्णवांची दृढ भावना आहे आणि त्या भावनेला पोषक अशा कांहीं गोष्टी मध्वाचार्यांच्या चरित्रांत आढळूनही येतात. प्रस्तुत पुस्तकाच्या दहाव्या भागांत पौराणिक व इतर कांहीं ग्रंथांच्या आरंभीं किंवा शेवटीं असलेल्या वचनांपेक्षां शिलालेख व मठस्थ आचार्यांच्या कारकीर्दी आणि व्यवहार यांस प्राधान्य देऊन त्यांतून केलेला मध्वाचार्यांचा कालनिर्णय विचारार्ह आहे. यानंतर सन १९२० मध्यें रामचंद्र नारायण कुळकर्णी ऊर्फ नाथसेवक यांनीं ' श्रीमाधवनाथ-संजीवनी ' या नांवानें श्रीमाधवनाथ महाराज संस्थान चित्रकूट यांचें चरित्र प्रसिद्ध केलें. हें चरित्र कुळकर्णी यांनीं भक्तिनिर्भर अंतःकरणानें मोठ्या रसाळ भाषेंत लिहिलें आहे. नाथ महाराजांचें जन्मापासूनचें वृत्त, बोधवचनें, चमत्कार, दिनचर्या वगैरे गोष्टी यांत दिल्या असून श्रीमंत सरदार माधवराव विनायक किबे यांनीं त्यास सुंदर प्रस्तावना लिहिली आहे. याची सुधारून वाढविलेली द्वितीयावृत्तीही अलीकडे सन १९३२ मध्यें निघाली आहे. नागपूरचे जनार्दन माधव कायंदे यांनीं देखील नाथ-महाराजांचें मूळ इंदूरच्या ' आत्मबोध ' मासिकांतून लेख रूपानें लिहिलेलें, संक्षिप्त चरित्र ' नाथकार्य-प्रवर्तक मंडळ इंदूर ' नें लघु पुस्तकद्वारें सन १९२७ मध्यें प्रसिद्ध केलें आहे. तें सुद्धां वाचनीय आहे. पुढें सन १९२८ मध्यें केशव सदाशिव केळकर यांनीं लिहिलेला

'श्रीतुकाराम महाराज' हा चरित्र ग्रंथ बाहेर पडला. या ग्रंथाच्या साहित्य, वारकरी व विद्यार्थी अशा तीन निरनिराळया आवृत्त्या, योग्य तीं प्रकरणें कमीजास्ती करून, केळकरांनीं काढल्या आहेत. शिवाय देवावरचा दावा, मायबापाची उपासना, सगुण साक्षात्कार वगैरे यांतील कांहीं प्रकरणें त्यांनीं स्वतंत्र पुस्तकरूपानेंही पूर्वी प्रसिद्ध केलीं आहेत. तुकोबांच्या अभंगांवरून व त्यांची आध्यात्मिक अवस्था कोणत्या वेळीं कशी होती, हें दाखवीत दाखवीत त्यांचें संपूर्ण चरित्र या ग्रंथांत केळकरांनीं मोठ्या मार्मिकतेनें व सहृदयतेनें वर्णन केलें आहे. भाविक व अभ्यासक या दोघांसही हा ग्रंथ सारखाच उपयुक्त व प्रिय होणारा आहे.

## ऐतिहासिक थोर व्यक्तींचीं चरित्रें

इतिहासांत प्रसिद्ध असलेल्या किंवा ऐतिहासिक घराण्यांत नांवारूपास चढलेल्या थोर व्यक्तींच्या चरित्रांकडे आतां वळूं. असे लहानमोठे चरित्र ग्रंथ मध्यभारतांत आजपावेतों दहाबारा लिहिले गेलेले आढळतात. त्यांपैकीं 'माळव्यांतील प्राचीन विद्वद्रत्नें—भाग १' व 'भारतवर्षीय युवातिरत्नमाला' हे दोन ग्रंथ संकलनात्मक असून त्यांत निरानिराळीं लहान लहान व्यक्तिचरित्रें दिलेलीं आहेत. 'माळव्यांतील प्राचीन विद्वद्रत्नें—भाग १' हा लघु ग्रंथ कृष्णाजी गंगाधर कवचाळे यांनीं सन १९३८ मध्यें 'शारदोपासक मंडळ देवास' च्या पुस्तकमालेंतून तिसरें पुस्तक म्हणून प्रसिद्ध केला. यांत आपल्या अपूर्व यशस्तेजानें माळव्याचा इतिहास मंडित करणाऱ्या परमार राजा मुंजदेव, भोजदेव, भर्तृहरि व शूद्रक या चार प्राचीन साहित्यभक्त नृपश्रेष्ठांचीं चरित्रें दिलेलीं असून हीं चरित्रें पूर्वी कवचाळे यांनीं देवासच्या 'श्री शिवाजी' साप्ताहिकांतून स्वतंत्र लेखमालारूपानें लिहिलीं होतीं. याच्या बरेच वर्षांअगोदर सन १८९९ मध्यें 'भारतवर्षीय युवतिरत्नमाला' हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. वांईच्या 'मकरंद पुस्तकमाले' चे

उत्पादक व संपादक अनंत केशव चितळे यांनीं तो इंदूर येथील शाळेंत शिक्षक असतांना लिहिलेला आहे. यांत २० ऐतिहासिक युवतिरत्नांचीं मनोज्ञ चरित्रें वर्णिलीं असून त्यांतील संयोगिता, कर्मदेवी व दुर्गावती यांच्या ठायीं दिसून आलेली इच्छित पतिप्राप्तीस्तव तीव्र उत्कंठा, अढळ पातिव्रत्य आणि प्रखर क्षात्रतेज; पद्मिनीनें कपटी अल्लाउद्दिनाच्या गोटांतून पतीची सुटका करण्यांत दाखविलेलें अद्वितीय चातुर्य, अर्गलच्या राणीनें असहाय स्थितींतही अयोध्येच्या नबाबाच्या सैनिकांपुढें प्रकट केलेली असाधारण वीरवृत्ति; (मध्यभारतांत भोपाळजवळ असलेल्या) गनोरच्या राणीनें पठाणाच्या दुर्वासनेबद्दल त्याचा सूड उगविण्यास आत्मत्यागपूर्वक योजिलेला आसुरी उपाय; राणी असरेश्वरीनें आपल्या दुर्वृत्त पतीच्या ठायीं निष्ठा ठेवून केलेला दिव्य आत्मोत्सर्ग; जोधपूरच्या राणीनें दिल्लीहून औरंगजेबाच्या जबड्यांतून आपली सुटका करून घेण्यांत प्रकट केलेली दुर्दमनीय तैजस्विता; इंदूरची राणी अहल्याबाई व नटोरची राणी भवानी यांनीं दाखविलेली प्रशंसनीय धर्मनिष्ठा आणि राजकारणपटुता; बंगाल्यांत इंग्रज सत्तेला तिच्या आरंभकालीं धाब्यावर बसविणाऱ्या लुटारूंचें पुढारीपण स्वीकारलेल्या चौधाराणीनें चमकविलेली अनुपम वीरता; धारची राणी मैनावती, झांशीची राणी लक्ष्मीबाई, महाराणा रणजितसिंहाची राणी चंद्रावती व बढवाणची राणी राजबाई यांनीं स्वराज्यसंरक्षणासाठीं स्वतःच्या हिंमतीवर गाजविलेली वीरोपम रणधीरता इत्यादि गोष्टी वाचून वाचकांच्या अंतःकरणांत त्या सर्व योषिद्रत्नांविषयीं आदरभाव उत्पन्न झाल्याशिवाय रहात नाहीं! या ग्रंथाची द्वितीयावृत्ति सन १९११ मध्यें निघाली आहे. सन १९१३ मध्यें विश्वनाथ नारायण देव ऊर्फ पुरुषोत्तम यांनीं 'देवी श्री अहल्याबाई होळकर हिचें सचित्र चरित्र' लिहून प्रसिद्ध केलें. अहल्याबाईचें नांव माहित नाहीं अशी व्यक्ति हिंदुस्थानांत विरळाच सांपडेल. धर्मनिष्ठा,

सुशीलता, न्यायीपणा, कर्तव्यदक्षता व तेजस्विता या सद्गुणांच्या बलावर अखिल भारतीय पुण्यश्लोक विभूतींच्या नाममालिकेंत 'देवी' या सन्माननीय उपपदासह आपलें नांव सन्निविष्ट करून घेणाऱ्या या महाभाग राणींचें उदात्तरम्य चरित्र आजपर्यंत अनेक देशीविदेशी ग्रंथकारांचा गेय विषय झालेलें आहे. लॉरेन्स नामक एका इंग्रज ग्रंथकारानें रशियाची राणी क्याथराइन, इंग्लंडची राणी इलिझाबेथ व डेन्मार्कची राणी मार्गारेट या पाश्चात्य थोरथोर राण्यांशीं अहल्याबाईची तुलना करून त्या सर्वांपेक्षां अहल्याबाई श्रेष्ठ होत्या असें सप्रमाण प्रतिपादिलें आहे आणि आंग्ल कवयित्री मिसेस जोना बेली हिनें अहल्याबाईवर एक अत्यंत मधुर काव्य रचिलें आहे. याशिवाय पाश्चात्य देशांतील व हिंदुस्थानांतील निरनिराळ्या भाषांत अहल्याबाईचीं लहानमोठीं बरींचशीं चरित्रें लिहिलीं गेलीं आहेत, त्यांतील कांहीं महत्त्वाच्या चरित्रांचा निर्देश देव यांनीं आपल्या या अहल्याबाईच्या चरित्रास लिहिलेल्या प्रस्तावनेंत केला असून तेवढ्या सर्वांचा उपयोगही त्यांनीं योग्य रीतीनें त्या चरित्र–लेखनाच्या कामीं करून घेतला आहे, त्यामुळें त्यांचा हा ग्रंथ माहितीपूर्ण सरस व नमुनेदार असा झाला आहे. आमच्या मतें मराठींत इतका व्यवस्थित रीतीनें व आपलेपणानें लिहिला गेलेला चरित्र ग्रंथ आजपर्यंत दुसरा झालेला नाहीं. चिंतामण विनायक वैद्य यांनीं 'विविधज्ञानविस्तारा'च्या ऑक्टोबर सन १९१३ च्या अंकांत या चरित्राचें केलेले विस्तृत परीक्षण मोठें मार्मिक व उद्बोधक आहे. तसेंच 'विविधज्ञानविस्तार' मधून (सन १९०५ अंक ९) बाळकृष्ण नारायण देव यांनीं व (सन १९०७ अंक ५) रा. ब. पारसनीस यांनीं अहल्याबाईच्या चरित्राचें सत्य स्वरूप दाखविणारें सुंदर लेख लिहिले होते आणि त्याच्या उलट प्रो. चिंतामण गंगाधर भानु यांनीं अहल्याबाईच्या राजनीतीवर कुटिलतेचा आरोप करून अवास्तविक दोषाविष्करण

केलें होतें. त्या तिन्ही लेखांचा येथें निर्देश करणें अयोग्य होणार नाहीं. इंदूर येथील सन १९२५ मधील अहल्योत्सव प्रसंगीं अनंत नारायण भागवत यांनीं 'देवी अहिल्याबाई यांचें संक्षिप्त चरित्र' ह्मणून एक लहानसें पुस्तक प्रसिद्ध केलें होतें, त्यांत अहल्याबाईच्या चरित्राचें सार चांगलें दिलेलें आहे. इंदूरचे विद्यमान अधिपति श्रीमंत सरकार यशवंत होळकर यांच्या दिवंगत भगिनी 'राजकन्या स्नेहलता राजे' यांचेंही एक लहानसें चरित्र राधाबाई इनामदार यांनीं सन १९२६ मध्यें लिहिलेलें प्रसिद्ध आहे. हें चरित्र विशेषतः मुलां-मुलींना उद्बोधक होण्यासारखें आहे. उदाजीराव पवार मल्ठणकर यांच्या पराक्रमाचा व कर्तबगारीचा निर्देश धारच्या इतिहासविषयक ग्रंथांत यथास्थानीं आलेला आहे; तथापि त्यांचें स्वतंत्र चरित्र प्रसिद्ध करण्यासारखें असल्यानें काशीनाथ कृष्ण लेले यांनीं तत्संबंधीं अधिक माहिती मिळवून तें सन १९३० मध्यें 'उदाजीराव पवार (मल्ठण) यांचें चरित्र' ह्मणून प्रकाशित केलें आहे. येथपर्यंत परिचय करून दिलेल्या चरित्र ग्रंथांपैकीं कांहीं ग्रंथ बरेच लहान व कांहीं साधारण मोठे असे आहेत. सर्वांत मोठा असा काय तो एकच चरित्र ग्रंथ आतांपावेतों मध्यभारतीय लेखकानें लिहिलेला प्रसिद्ध आहे, तो ह्मणजे 'श्रीमंत थोरले सयाजीराव गायकवाड यांचें चरित्र' हा होय. हा ग्रंथ गायकवाड सरकारच्या आज्ञेनें व आश्रयानें अनंत नारायण भागवत यांनीं सन १९०९ मध्यें लिहिला. याचे दोन खंड असून प्रत्येक खंडाची पृष्ठसंख्या हजाराच्या जवळजवळ आहे. चरित्रनायकाविषयीं कोणत्याही प्रकारची अंधभक्ति किंवा वृथाप्रेम यांना मनांत थारा न देतां त्याच्या अंगचे सर्व गुणदोष धारवाडी काट्यानें तोलून निर्भिडतेनें ते पुढें मांडणें व एकही निराधार विधान कोठें न करणें हे या चरित्र-ग्रंथाचे दोन महत्त्वाचे विशेष लक्षांत घेण्यासारखे आहेत. इंदूरचे विख्यात टीकाकार बाळकृष्ण

नारायण देव यांनीं 'विविधज्ञानविस्तारां' तून (जुलै व ऑगस्ट १९०९) या ग्रंथाचें विस्तृत परीक्षण केलें असून त्याच्याविषयीं आपला अनुकूल अभिप्राय प्रकट केला आहे. असाच दुसरा एक उत्तम; परंतु त्यापेक्षां बराच लहान, चरित्रग्रंथ माधवराव व्यंकटेश लेले यांनीं सन १८९८ मध्यें प्रसिद्ध केला आहे, त्याचें नांव 'अकबर बादशहाचें चरित्र' हें होय. 'रूलर्स ऑफ इंडिया' या इंग्रजी चरित्रग्रंथमालेंतील कर्नल मॅलेसनकृत 'अकबर चरित्रा' चें हें वास्तविक भाषांतर असून तें भाषांतर लेले यांनीं इतक्या सुंदरतेनें व कौशल्यानें केलें आहे कीं, वाचकांना त्याच्या भाषांतरत्वाचा भास सहसा कोठेंही होत नाहीं! लेले यांच्या या 'अकबर बादशहाच्या चरित्रा' नंतर सन १९०३ मध्यें ग्वाल्हेरचे बा. आ. भिसे यांनीं लिहिलेला 'महाराणी व्हिक्टोरिया' हा चरित्र ग्रंथ प्रसिद्ध झाला. हा ग्रंथ आमच्या पाहण्यांत आला नाहीं; तथापि 'केसरी' वर्तमानपत्रानें त्याची वाखाणणी केली होती, असें ऐकिवांत आहे. अस्तु. येथपर्यंत राजांच्या, राण्यांच्या व राजकुलोत्पन्न व्यक्तींच्या चरित्र ग्रंथांचा परिचय करून देण्यांत आला. आतां राजकारणी व्यक्तींच्या चरित्र ग्रंथांचा परिचय करून देऊं. असे राजकारणी व्यक्तींचे चारच चरित्र ग्रंथ आतांपावेतों मध्यभारतांत प्रसिद्ध झाले आहेत. त्यांत एक स्त्रीचेंही चरित्र आहे. ती स्त्री रखमाबाई किबे या होत. एके काळीं होळकर राज्याचा आधारस्तंभ असलेल्या विठ्ठल महादेव ऊर्फ तात्या जोग * यांच्या रखमाबाई या पत्नी होत. पतीप्रमाणें याही मोठ्या मुत्सद्दी असून त्यांचें होळकर राजकुटुंबांत मोठें वजन होतें. त्यांच्या घराण्यांतील विद्यमान विदुषी सौ. कमलाबाई साहेब किबे यांनीं त्यांचें चरित्र

* तात्या जोग यांचें विस्तृत चरित्र रा. बा. दत्तात्रय बळवंत पारसनीस हे लिहिणार असल्याचें 'ग्रंथमालें' तील एका निबंधांत प्रसिद्ध झालें होतें; परंतु तो सुयोग मात्र पुढें आला नाहीं.

'रखमाबाई किबे यांचें चरित्र' या नांवानें लिहून प्रसिद्ध केलें आहे. हें चरित्र लहानसें असलें तरी मोठें चटकदार व उद्बोधक आहे. या पुस्तकाच्या बरेच वर्षांअगोदर रामशास्त्री प्रभुणे व नाना फडणीस या पेशवाईतल्या दोन प्रमुख व्यक्तींचीं बाळकृष्ण नारायण देव यांनीं लिहिलेलीं चरित्रें अनुक्रमें सन १८९२ व १९०४ मध्यें प्रसिद्ध झालीं. अव्वल दर्जाचे चरित्र लेखक व मार्मिक चरित्र टीकाकार ह्मणून महाराष्ट्रांत देवांचें नांव सर्वत्र विख्यात असून त्यांनीं या उभय नात्यांनीं मराठींत चरित्र वाङ्मयनिर्मितीच्या बाबतींत जी कामगिरी बजाविली आहे, ती सर्वथा बहुमोल आहे. राजकारण, समाजकारण, धर्मकारण, साहित्य आदि विविध विषयांच्या क्षेत्रांत कर्तबगारी गाजविणाऱ्या अनेक व्यक्तींचीं कितीतरी लहानमोठीं चरित्रें त्यांनीं मागें 'विविधज्ञानविस्तारां'तून लिहिलीं आहेत व चरित्रें कशीं लिहिलीं जावींत यासंबंधांत मार्मिक विचारही वेळोवेळीं प्रकट केले आहेत. वासुदेवराव मुंडले, रा. ब. पारसनीस, रियासतकार सरदेसाई, प्रो. भानु, अळेकर प्रभृति कसलेल्या लेखकांवर त्यांनीं ऐतिहासिक व्यक्तींच्या चरित्रांच्या बाबतींत भयंकर हल्ले चढविले आहेत. विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या, त्यांच्या सहोदर बंधूंनीं लिहिलेल्या, चरित्रावर देवांनीं 'ग्रंथमालें'तून चढविलेला भयंकर हल्ला तर कधींच विसरतां यावयाचा नाहीं. त्यांच्या लेखणीला प्रांजलपणाचें पाणी चांगलेंच होतें ही गोष्ट त्यांच्या विरोधकांनींदेखील मान्य केली आहे! अस्तु. 'रामशास्त्री प्रभुणे' हा देव यांनीं लिहिलेला चरित्र ग्रंथ बराच लहान ह्मणजे लघु आकाराच्या अवघ्या ४३ पानांचा आहे व त्यांतील माहितीही बरीच त्रोटक आहे; परंतु यांत देवांचा दोष नाहीं. कारण शागीर्दाचा शास्त्री होऊन ब्रह्मपदपादशाहीचें सिंहासन आपल्या नैतिक बलप्रभावानें देदिप्यमान करणाऱ्या या निर्भीड व निस्पृह पुरुषाची चरित्रविषयक माहिती वास्तविक फारशी मिळत

नाहीं आणि ह्मणूनच देवांनंतर दुसऱ्या एकाही लेखकाकडून या पुरुषाच्या चरित्रलेखनाचा प्रयत्न अद्यापपावेतों झालेला नाहीं. देवांचा ' नाना फडनीस ' हाही चरित्र ग्रंथ लघूच आहे. प्रथम ' विविधज्ञान-विस्तारां ' तून तो लेखरूपानें प्रसिद्ध झाला होता. यांत नाना फडण-विसाला ' खूप शर्तिनें राज्य राखिलें यशवंत नानानें ' असें शाहिरांनीं पोवाडे गाऊन व पेशवाईतल्या ' साडेतीन शाहण्यांतील अर्ध शाहणा म्हणून विद्वानांनीं नांवाजणी करून असाधारण कोटींतला मुत्सद्दी पुरुष बनविलें होतें तें किती निरर्थक आहे, हें त्याच्या कारकीर्दीचा मार्मिक पर्यालोचनावरून देवांनीं विशद करून दाखविलें असल्यामुळें अर्थातच हा लेख ' विविधज्ञानविस्तारां ' तून प्रसिद्ध होताच त्याचे वाभाडे उडविण्यास फडणीसभक्त मंडळी पुढें सरसावली व तो वाद बरेच दिवस चालू राहिला. प्रो. भानु हे या मंडळींत अग्रगण्य होते. त्यांनीं मांडलेली नानाची बाजू व वासुदेव वामनशास्त्री खरे यांनीं ' नाना फडणविसांचें चरित्र ' आणि त्याचेंच पुरवणीरूप ' नानांचा अधिकारयोग ' यांतून नानाच्या मुत्सद्दीपणाची केलेली प्रशंसा वास्त-विक किती लंगडी व फोल आहे, हें आतां रियासतकार सरदेसाई यांच्या सवाई माधवरावाच्या नव्या इतिहास खंडावरून स्पष्ट जाहीर झालें आहे. रियासतकारांना आज ही गोष्ट सिद्ध करावयाला तत्वतः बरींच साधनें प्राप्त झालीं आहेत; परंतु तीच गोष्ट सुमारें ३० वर्षीपूर्वी त्याच्या अर्धीही साधनें उपलब्ध नसतांना देवांनीं तेवढ्याच साधनांच्या आधारावर सिद्ध केली आहे, यावरून देवांचें मार्मिक अध्ययन व तीव्र विचक्षणा यांचें कौतुक वाटल्यावांचून रहात नाहीं! मध्यभारतांत अलीकडच्या काळामध्यें जे थोर मुत्सद्दी पुरुष होऊन गेले त्यांचींही चरित्रें लिहिण्याचा देवांचा शेवटींशेवटीं विचार होता व त्याप्रमाणें त्यांनीं इंदूरचे राव रामचंद्रभाऊ रेशिमवाले यांचें एक चरित्र लिहूनही काढलें होतें; परंतु तें प्रसिद्ध झालें नाहीं. पुढें लवकरच वृद्धा-

वस्थेच्या नैसर्गिक कारणांनीं त्यांचें लेखनकार्य कायमचेंच थांबलें; तथापि अशा मुत्सद्यांपैकीं एका मुत्सद्याचें चरित्र माधवराव व्यंकटेश लेले या त्यांच्या खालोखाल प्रसिद्ध असलेल्या दुसऱ्या व्यासंगी लेखकानें लिहिलेलें सन १९२२ मध्यें प्रसिद्ध झालें आहे, त्याचें नांव 'रावबहादुर विष्णु केशव कुंटे यांचें चरित्र' हें होय. इंदूर व देवास (थोरली पाती) संस्थानांत मोठमोठ्या हुद्यांचीं व जबाबदारीचीं कामें, अनेक प्रतिकूल परिस्थितींतही, आपल्या मुत्सद्दीपणाच्या व सचोटीच्या जोरावर यशस्वी रीतीनें करून रा. ब. कुंटे यांनीं मोठी ख्याति मिळविली होती. इंदुरास नोकरीस असतांना राजा सर टी. माधवराव व दिवाणबहादुर आर. रघुनाथराव यांच्यासारख्या तेथील थोर राजकार्यधुरंधर दिवाणांना ते अत्यंत प्रिय होऊन द्वितीय तुकोजीराव होळकरांच्याही मर्जीस पात्र ठरले होते. पुढें देवास (थोरली पाती) येथें श्रीमंत कृष्णाजीराव बाबासाहेब पवार यांच्या कारकीर्दींत संस्थानचे सुपरिंटेंडेंट ह्मणून त्यांची योजना झाली. त्यावेळीं या देवास संस्थानची सांपत्तिक व इतर स्थिति बरीच बिकट होती आणि तशा स्थितींत गव्हर्मेंटनें त्यांच्यावर संस्थानची कुल जबाबदारी टाकली होती, ती जबाबदारी त्यांनीं केवळ अल्पकाळ नव्हें तर, सुमारें सव्वा तपाच्या दीर्घकाळापर्यंत मनस्वी त्रास सोसून मोठ्या चाणाक्षतेनें व नेटानें सांभाळली व तेथेंही सरकार कृष्णराव बाबासाहेबांची मर्जी संपादिली; परंतु असें असतांनाही सुख ह्मणून त्यांना नोकरींत कधींच लाभलें नाहीं. "Work killed me at Indore and worried at Dewas" असे आपल्या नोकरीसंबंधांत ते नेहमीं उद्गार काढीत असत. या त्यांच्या दगदगीच्या नोकरीचा पुढें वयपरत्वें त्यांच्या शरीरावर व मनावर प्रतिकूल परिणाम होत जाऊन शेवटीं त्यांची दृष्टि कायमची गेली. त्यांनीं आपली रोजनिशी मृत्युदिनापर्यंत सुमारें ४० वर्षें नियमानें लिहून व लिहवून ठेविली आहे, तिच्यावरून इंदूर

व देवास येथील तत्कालीन राजकीय आणि सामाजिक परिस्थितीसंबंधांत बरीच माहिती मिळते. त्यांचें चरित्र लिहितांना लेले यांना त्या रोजनिशीपासून पुष्कळ सामग्री अनायासेंच जरी मिळाली असली तरी त्या सामग्रीचा यथोचित् प्रमाणबद्ध उपयोग करून घेऊन तें चरित्र उत्तम वठविण्यांत त्यांनीं चांगलें कौशल्य दाखविलें आहे, यांत संदेह नाहीं. भारताचार्य चिंतामण विनायक वैद्य यांनीं सदर चरित्रास लिहिलेल्या प्रस्तावनेंत चरित्राचें खरें स्वारस्य कथन केलें आहे. एकंदरींत कुंटे यांचें हें चरित्र सामान्य वाचकांस मनोरंजक व बोधप्रद असून मध्यभारताच्या भावी इतिहासकारांसही तें बरेंच उपयुक्त होण्यासारखें आहे.

### साहित्यिक पुरुषांचीं चरित्रें

आतां साहित्यिक पुरुषांची जीं चरित्रें मध्यभारतांत लिहिलीं गेलीं आहेत त्याकडे वळूं. अशीं चरित्रें आतांपावेतों केवळ चारच लिहिलीं गेलीं असल्याचें आढळतें. त्यांपैकीं पहिलीं तीन बाळकृष्ण नारायण देव यांनीं लिहिलीं असून चौथें जगन्नाथ रावजी टुल्लु यांनीं लिहिलें आहे. देव यांनीं लिहिलेलें पहिलें चरित्र ‘ बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर ’ हें होय. तें सन १८९२ मध्यें प्रसिद्ध झालें आहे. अव्वल इंग्रजी अमदानींतील अष्टपैलू विद्वान् ग्रंथकार ह्मणून बाळशास्त्र्यांचें नांव सर्वश्रुत आहे. संस्कृत, मराठी, कानडी, बंगाली, गुजराथी, हिंदुस्थानी, फारशी, इंग्रजी व लॅटिन एवढ्या भाषा बाळशास्त्र्यांना चांगल्या अवगत होत्या. मराठीचे आद्यवर्तमानपत्र ‘ प्रभाकर ’ हें गोविंद विठ्ठल कुंटे ऊर्फ भाऊ महाजन व बाळशास्त्री या दोघांनीं मिळून काढलें होतें; परंतु पुढें लवकरच बाळशास्त्र्यांनीं स्वतःचें स्वतंत्र असें ‘ दर्पण ’ नांवाचें मराठी—इंग्रजी वर्तमानपत्र सुरू केलें. या वर्तमानपत्रानें त्यांचा लौकिक व मान वाढून सरकारकडून त्यांस ‘ जस्टिस ऑफ धि पीस ’ ही बहुमानाची पदवी मिळाली. ‘ दर्पण ’

बंद पडल्यावर त्यांनी कांहीं दिवस ‘ दिग्दर्शन ’ नांवाचें एक भारदस्त मासिकही चालविलें व विद्यार्थ्यांकरितां व इतरांकरितां प्रायः सर्वच विषयांवर लहानमोठीं अनेक पुस्तकें लिहिलीं. उत्तम शिक्षक ह्मणूनही महाराष्ट्रांत त्यांची प्रसिद्धि होती. डॉ. भाऊ दाजी, डॉ. नारायण दाजी, केरूनाना छत्रे, दादाभाई नौरोजी प्रभृति नामांकित कर्तबगार मंडळी त्यांच्या शिष्यवर्गांत मोडत असत. देव यांनीं त्यांचें हें चरित्र थोडक्यांत पण उत्तम असें लिहिलें आहे. याशिवाय विनायक कोंडदेव ओक यांनीं मराठींत व एका ‘ पोलिटिकल ऋषी ’ नें इंग्रजींत बाळशास्त्र्यांचीं चरित्रें आणखीं लिहिलीं आहेत; परंतु त्या दोन्हींपेक्षां देवांनीं लिहिलेलें हें चरित्र अधिक सरस असून राजाराम रामकृष्ण भागवत यांनीं त्याचा केलेला समारोपही सुंदर आहे. या भागवतांच्या मृत्यूनंतर लगेच त्यांचेही चरित्र देवांनीं लिहून तें ‘ राजारामशास्त्री भागवत यांचें चरित्र ’ ह्मणून सन १९०९ मध्यें ‘ विविधविस्तारां ’ तून स्वतंत्र पृष्ठांक देऊन व नंतर वेगळे पुस्तकरूपानेंही प्रसिद्ध केलें आहे. उत्तम वेदविद्यासंशोधक, दांडगा विद्वान्, धडाडीचा सुधारक, स्पष्टवक्ता व कसलेला लेखक असा राजारामशास्त्र्यांचा लौकिक महाराष्ट्रांत एके काळीं गाजत होता. त्यांनीं निर्माण केलेलें वाङ्मय बहुविध, बहुप्रमाण व बहुमोल असून त्यांच्या लेखनशैलींत आणि विचार-सरणींत एक प्रकारची विशिष्ट उद्बोधकता होती. संस्कृत भाषेची विचिकित्सा, प्राकृत भाषेची विचिकित्सा, मऱ्हाठ्यांसंबंधानें चार उद्गार, पंचजनविचार, शककालविचार, शिवछत्रपतींचें चरित्र, श्वेताश्वतर उपनिषद्, ऐतरेय उपनिषद् आदि त्यांनीं लिहिलेले ग्रंथ व लेख मोठे विचारप्रवर्तक आहेत. अस्पृश्योद्धाराच्या प्रश्नास प्रथमतः चालना देण्याचें श्रेयही त्यांनाच आहे. देवांनीं त्यांचें हें चरित्र मोर्लेसाहेबांच्या चरित्र ग्रंथाच्या पद्धतीस अनुसरून लिहिलें आहे व त्यांतील विवेचनही अथपासून इतिपर्यंत खरोखरच समतोलपणाचें

झालें आहे. पुढें सन १९०४ मध्यें ‘ रा. ब. विनायक जनार्दन कीर्तने यांचें चरित्र ’ देवांनीं प्रसिद्ध केलें. वयाच्या विशीबाविशींतच ‘ थोरले माधवराव पेशवे ’ व ‘ जयपाळ ’ हीं दोन अत्युत्कृष्ट नाटकें लिहून श्रेष्ठ प्रतीचे नाटककार ह्मणून रा. ब. कीर्तने यांनीं महाराष्ट्रांत चिरस्थायी कीर्ति प्राप्त करून घेतली; परंतु पुढें इंदूर आणि बडोदें येथील संस्थानी नोकरींत गुंतल्यावर वेळेच्या अभावामुळें ते वाङ्मयव्यवसाया-पासून जवळजवळ अलिप्तच राहिले; तथापि इंदुरास असतांना त्यांनीं मालकमकृत ‘ ए मेमॉयर ऑफ सेंट्रल इंडिया ’ या ग्रंथाचें मराठींत भाषांतर तयार करून तें प्रसिद्धही केलें व त्याशिवाय ‘ मथुरा ’ नामक मराठी नाटक आणि ‘ चाळीस वर्षांमागचें पुणें ’ नामक इंग्रजी कादंबरी लिहिण्यास सुरुवात केली. पुढें त्यांपैकीं ‘ मथुरा ’ नाटकाच्या कथानकाचें एका इंग्रजी नाटकाच्या कथानकाशीं साम्य असल्याचें आढळून आल्याबरोबर त्या नाटकाचें लेखन त्यांनीं अर्धवटच सोडलें व ‘ चाळीस वर्षांमागचें पुणें ’ या इंग्रजी कादंबरीचें पुढील लेखन इंदूरची नोकरी सोडून पुण्यास जाऊन राहिल्यावर झपाट्यानें सुरू केलें; परंतु तीही कादंबरी शेवटीं त्यांच्या आकस्मिक देहावसानामुळें अपूर्णच राहिली. तिचीं लिहिलीं गेलेलीं ४० प्रकरणें त्यांच्या पश्चात् सन १८९७ मध्यें ‘ ज्ञानप्रकाश ’ पत्रांतून प्रसिद्ध करण्यांत आलीं होतीं. रा. ब. विष्णु मोरेश्वर महाजनी यांनीं मार्च सन १९०७ च्या ‘ विविधज्ञानविस्तारा ’ च्या अंकांतून या कीर्तन्यांच्या चारित्राचें केलेलें परीक्षण वाचण्यासारखें आहे. अलीकडे कीर्तने यांचीं ‘ थोरले माधवराव पेशवे ’ व ‘ जयपाळ ’ हीं दोन्हीं नाटकें मुंबई विश्व-विद्यालयानें एम्. ए. च्या परीक्षेला लाविलीं असल्यानें कीर्तने बंधूंनीं तीं एकाच पुस्तकांत एकत्र छापून सन १९३२ मध्यें पुनः प्रसिद्ध केलीं आहेत व त्या पुस्तकास देवांनीं लिहिलेलें हें चरित्रही जोडून दिलें आहे. पुढें सन १९१९ मध्यें जगन्नाथ रावजी टुल्लु यांचें ‘ वनाचें उपवन ’

हें पुस्तक प्रसिद्ध झालें आहे. या पुस्तकांत टुल्लु यांनीं आपलें आत्मवृत्त दिलें असून तें वाचनीय आहे. मराठींत कर्मवीर धोंडो केशव कर्वे यांच्या आत्मवृत्तानंतर प्रसिद्ध झालेलें असें नांव घेण्यासारखें हेंच आत्मवृत्त होय, अशा आशयाचा प्रो. लक्ष्मण गणेशशास्त्री लेले यांनीं त्याच्यावर आपला अभिप्राय प्रकट केला होता. मागें 'काव्यवाङ्मया'च्या प्रकरणांत परिचय करून दिलें गेलेले हंसकृत तुकाराम, मोरोपंत व वामन या कवित्रयीवरील निबंध, तसाच रहाळकरकृत विष्णुगुरुजींवरील निबंध आणि तांबे स्मारक मंडळानें प्रसिद्ध केलेलें 'तांबे व्यक्ति आणि कला' हें पुस्तक या सर्वांत अर्धाभाग चरित्राचा असल्यानें त्यांचाही परत येथें नामनिर्देश करणें अवश्य आहे.

## इतर पुरुषांचीं चरित्रें

मध्यभारतीय लेखकांनीं इतर पुरुषांचींही चरित्रें लिहिलीं आहेत. अशीं चरित्रें एकंदर पांच असल्याचें आढळून येतें. त्यांतलि अनंत नारायण भागवत यांनीं सन १९१० मध्यें लिहिलेलें 'उमाजी नाईकाचें चरित्र' पहिलें होय. 'दैवायत्तं कुले जन्म मदायत्तं च पौरुषं' ही 'वेणीसंहार नाटकां'तील कर्णोक्ति रामोश्यासारख्या हीन कुलांत जन्मास येऊन पराक्रम गाजविणाऱ्या उमाजी नायकास यथार्थतेनें लागू पडतें. अव्वल इंग्रजी अमदानींत या उमाजी नायकानें पुणें व सातारा या दोन जिल्ह्यांत विलक्षण धुमाकूळ माजवून इंग्रजांच्या बलाढ्य लष्करास इतकें हैराण करून सोडलें होतें कीं, त्यास महत्प्रयासानें जिंकणाऱ्या कॅ. मॅकिंटॉशला त्याच्या शौर्याविषयीं नितांत आदर वाटून त्याचें चरित्र लिहिण्याचीही स्फूर्ति झाली. शिवाय एतद्देशीय लोकांनाही त्यचे पोवाडे रचावेसें वाटलें. भागवतांनीं त्याचें हें चरित्र कॅ. मॅकिंटॉशच्याच चरित्राधारें लिहिलें आहे. उमाजी जरी दरोडेखोर होता तरी त्याच्या ठायीं अनेक सद्गुण वास करीत होते. एकपत्नीव्रत

व निर्व्यसन हे त्याचे दोन गुण मोठे असून दीनांचा तो अतिशय कनवाळु होता. दिसण्यांतही तो फार रुबाबदार दिसे. त्याला कोणाची उपमा द्यावयाची झाल्यास ती रॉबिनहुडचीच देतां येईल!' काळाच्या प्रतिकूलतेमुळें तो दरोडेखोर झाला, नाहीं तर मराठी राज्यांत धाडसी सरदार ह्मणून त्याचा लौकिक गाजला असता', असें स्वतः कॅ. मॅकिंटॉशनें त्याच्यासंबंधांत उद्गार काढले आहेत! भागवतांनीं त्याचें चरित्र उत्तम प्रकारें लिहिलें असून साहित्यसम्राट् नरसिंह चिंतामण केळकर यांनीं त्या चरित्राचें 'केसरीं'तून (ता. ९ एप्रिल सन १९१०) केलेलें परीक्षणही मोठें सुंदर आहे. यानंतर ग्वाल्हेरचे भाऊराव कृष्ण कदम यांनीं आपले वडील 'कृष्णराव कदम यांचें चरित्र' प्रसिद्ध केलें; परंतु तें आमच्या पहाण्यांत आलें नाहीं. पुढें सन १९२७ मध्यें 'त्र्यंबक भैया गंध्ये यांचें चरित्र' त्यांचे कनिष्ट बंधु बॅरिस्टर गणेश शंकर गंध्ये यांनीं लिहून प्रसिद्ध केलें. त्र्यंबक भैया यांचा जन्म देवास ( धाकटी पाती ) संस्थानच्या पिढीजाद दिवाण घराण्यांत झाला होता व अवघ्या तेवीस वर्षांच्या आयुष्यांत बी. ए. होऊन वक्तृत्वकलेंत त्यांनीं बरेंच प्राविण्य संपादिलें होतें. त्यांचा स्वभाव अत्यंत प्रेमळ असून त्यांची राहणी जितकी साधी तितकीच विचारसरणी उच्च होती. जगांत येऊन प्रत्येक माणसानें कांहींतरी विधायक कार्य करावें व मृत्यूनंतर आपलें नांव मागें ठेवावें, असें त्यांना नेहमीं वाटें. देवास येथील आपल्या मित्र मंडळींत त्यांनीं लष्करी शिक्षण, स्वदेशी व्रत व समाजसेवा यांचा थोडाबहुत प्रचार केला होता. त्यांचें विलक्षण मनोधैर्य व निःसीम कार्यतत्परता यांकडे पाहतां देवदयेनें त्यांना अधिक आयुष्य लाभलें असतें तर त्यांच्या हातून पुढेंमागें खात्रीनें मोठें समाजकार्य झालें असतें, असें कोणासही वाटेल. बॅ. गंध्ये यांनीं आपल्या बंधूचें हें चरित्र साध्या भाषेंत सुंदर व बोधप्रद होईल असें लिहिलें आहे. व त्याच्या शेवटीं त्र्यंबक भैयांच्या कांहीं मित्र मंडळींनीं लिहिलेल्या आठवणींचें परिशिष्ट

जोडलें आहे. पुढें सन १९३५ मध्यें इंदूरचे श्रीकृष्ण वामन पंतवैद्य यांचें, सौ. अहिल्याबाई किर्लोस्कर यांनीं लिहिलेलें 'माझा भाई' हें चरित्र प्रसिद्ध झालें. हें चरित्र म्हणजे अहर्निश ध्येयसिद्धीसाठीं झटत असतां दिवंगत झालेल्या एका अत्यंत कर्तृत्ववान् व तेजस्वी महाराष्ट्रीय तरुणाची शोकांत जीवनकथाच होय. ही 'भाई'ची कथा खास त्याच्या पाठच्या 'माई'नेंच लिहिली असल्यानें तिच्यांत स्वाभाविकपणें अपूर्व जिव्हाळा उत्पन्न झालेला दिसून येतो. शिवाय सौ. अहिल्याबाईची लेखनशैलीही मुळांत बरीच चटकदार आहे. त्यांनीं 'भाई'च्या चरित्रांतील महत्त्वाचे विविध प्रसंग इतक्या उत्तम रीतीने वर्णिले आहेत कीं ते वाचीत असतांना आपण एखादी कल्पित कादंबरीच वाचीत अहोंत, असा ठिकठिकाणीं भास होतो! या चरित्रांत 'भाई'नें विलायतेहून पाठविलेल्या पत्रांतले बरेच उतारे दिले आहेत, त्यांवरून आनंदी वृत्ति, दांडगा आत्मविश्वास, विलक्षण धडाडी आणि अंगीकृत कार्यांत जिवाचीही नसलेली पर्वा हे 'भाई'चे सर्व गुण चांगल्या प्रकारें दिसून येतात. "माझें कार्य करीत असतां मला त्यांत मरण आलें तरी मला आनंदच वाटेल" हे त्याचे उद्गार जणुं काय त्याच्या तेजस्वी जीवनाचें ध्येयवाक्यच होतें व शेवटीं दैवयोगानें त्यास अनुसरून त्याच्या प्राणांचें बलिदान विमानविद्येच्या पूर्ततेसाठीं झालेंही! अस्तु. तरुणांना हें चरित्र खरोखरच बोधप्रद व स्फूर्तिदायी असून त्यानें मराठी चरित्र-वाङ्मयांत निःसंशय एका चांगल्या पुस्तकाची भर पडली आहे!

### अवांतर किरकोळ पुस्तकें

आतां इतिहासाच्याच सदरांत अंतर्भाव होणारीं जीं अवांतर किरकोळ पुस्तकें मध्यभारतांत प्रसिद्ध झालीं आहेत त्यांकडे वळूं. अशा पुस्तकांत शिवराम रामचंद्र गुते यांनीं लिहिलेलें 'भ्रमनिरास' हें पुस्तक कालानुक्रमानें पहिलें ठरतें. श्रीमंत शिवाजीराव होळकरांच्या

विरुद्ध कांहीं वर्तमानपत्रांतून व विशेषत: 'विक्षिप्त' पत्रांतून जे टीका–लेख आले होते ते सर्व एकत्र करून व्ही. एन्. भावे यांनीं 'इंदूर संस्थान' नांवाचें पुस्तक दोन भागांत सन १८९५ व १८९६ मध्यें प्रसिद्ध केलें, त्यास उत्तरादाखल गुप्ते यांनींही हें 'भ्रमनिरास' पुस्तक दोन भागांत लिहून तें 'इंदूर संस्थान' च्या दोन्ही भागांच्या पाठोपाठच सन १८९५ व १८९६ मध्यें प्रसिद्ध केलें. यांत गुप्ते यांनीं वाचकांचें मत सहज अनुकूल होईल अशा प्रकारें शिवाजीराव महाराजांची बाजू मोठ्या कुशलतेनें पुढे मांडली आहे व त्या त्यांच्या मांडण्यानें शिवाजीराव महाराजांच्या कारकीर्दीवर अनायासेंच चांगला प्रकाश पडला आहे. याच्या नऊ वर्षें अगोदर ह्मणजे सन १८८६ मध्यें 'श्रीमंत जिवाजीराव पवार रावसाहेब महाराज संस्थान देवास पाती खुर्द यांस मिळालेलीं शिफारसपत्रें, सनदापत्रें वगैरे' चें एक लहानसें पुस्तक प्रसिद्ध झालेलें आढळतें. हे रावसाहेब देवास धाकट्या पातीचे अधिपति हैबतराव यांचे दत्तक पुत्र होते. त्यांना दत्तक घेतल्यावर लवकरच हैबतरावांना नारायणराव दादासाहेब नामक एक औरस पुत्र झाला. हैबतरावांच्या पश्चात् त्यांचे औरस पुत्र ह्मणून नारायणराव दादासाहेबांस गादी मिळाली. रावसाहेब व नारायणराव दादासाहेब हे दोघेही सुशील असून त्यांच्यांतील बंधुप्रेम प्रशंसनीय होतें. नारायणराव दादासाहेब रावसाहेबांना आपला ज्येष्ठ बंधु मानून नेहमीं मोठा मान देत असत, ही गोष्ट प्रस्तुत पुस्तकांतील खास नारायणराव दादा-साहेबांनीं दिलेल्या सनदांतील मजकुरांवरून स्पष्ट दिसून येते व रावसाहेबांच्या अंगीं वास करणाऱ्या गुणांची ओळखही त्यांचे शिक्षक, चाहते, इंग्रज अधिकारी व कांहीं राजे यांनीं लिहिलेल्या पत्रांवरून चांगली पटते. पुढें सन १९३४ मध्यें देवास ( धाकट्या पाती ) चे विद्यमान अधिपति श्रीमंत सदाशिवराव खासेसाहेब महाराज पवार यांच्या राज्यारोहण प्रसंगीं पं. सूर्यकुमार वर्मा व नारायण केशव

सोरटी यांनीं संपादिलेला ‘ राज्यारोहण गौरव ग्रंथ ’ प्रसिद्ध झाला. या ग्रंथांत समयोचित प्रशस्तिपर असे निरनिराळ्या लेखकांनीं इंग्रजी, मराठी, हिंदी आणि संस्कृत या भाषांत लिहिलेले लेख व कविता देऊन त्याच्या आरंभीं मोठ्यामोठ्या व्यक्तींनीं महाराजांना गादी मिळाल्याबद्दल पाठविलेलीं आशीर्वादात्मक व अभिनंदनपर पत्रें आणि शेवटीं कांहीं वृत्तपत्रांनीं प्रकट केलेल्या अभिप्रायांचे उतारे दिले आहेत. यानंतर सन १९३५ मध्यें देवास ( धाकट्या पाती ) चे दिवंगत अधिपति श्रीमंत मल्हारराव बाबासाहेब पवार यांच्या प्रथम सांवत्सरिक श्राद्धतिथीस त्यांच्या अमर आत्म्यास अर्पण केलला ‘ स्मृतिग्रंथ ’ प्रसिद्ध झाला. या ग्रंथांत मल्हारराव बाबासाहेबांशीं परिचित असलेल्या अनेक लहानमोठ्या मंडळींनीं मराठी, हिंदी व इंग्रजी या भाषांत लिहिलेल्या आठवणी व कविता दिल्या असून त्याद्वारें प्रकाशकानें आपल्या स्वर्गस्थ महाराजांविषयीं पूज्यभाव प्रकट करण्याचा खरोखरच स्तुत्य प्रयत्न केला आहे.

### बालोपयोगी चरित्रें

मध्यभारतांत बालोपयोगी अशीं चारच लघु चरित्र पुस्तकें आतांपावेतों प्रसिद्ध झालेलीं आढळून येतात. त्यांपैकीं ‘ स्नेहलता राजे यांचें अल्पचरित्र ’ या राधाबाई इनामदारकृत पुस्तकाचा परिचय मागें करून दिला गेलाच आहे. बाकीचीं तीन पुस्तकें पौराणिक असून तीं वासुदेव गोविंद आपटे यांनीं इंदुरास असतांना लिहिलीं आहेत. त्यांचीं नांवें ‘ बालरामायण ’, ‘ बालभारत ’ व ‘ बालभागवत ’ हीं होत. यांतलि पहिलीं दोन सन १९०२ मध्यें प्रसिद्ध झालीं असून त्यांत अनुक्रमें रामायण व भारत या ग्रंथांतील आदर्श व्यक्तींच्या कथा साररूपानें चरित्राच्या वेषांत दिल्या आहेत. तिसरें ‘ बालभागवत ’ हें पुस्तक सन १९०९ मध्यें प्रसिद्ध झालें. त्याचेंही स्वरूप अशाच प्रकारचें आहे. आपट्यांचीं हीं तिन्हीं पुस्तकें त्यांच्या इतर पुस्तकांप्रमाणें मुलांना

प्रिय होऊन त्यांच्या आतांपावेतों दोनदोन तीनतीन आवृत्त्याही निघाल्या आहेत.

अस्तु. वरील एकंदर माहितीवरून ऐतिहासिक वाङ्मयनिर्मितीच्या बाबतींत मध्यभारतीय लेखकांनीं आतांपावेतों कशी व किती महत्त्वाची कामगिरी बजाविली, हें स्पष्टपणें दिसून येतें. या लेखकांतील काशीनाथ कृष्ण लेले, माधवराव व्यंकटेश लेले, बाळकृष्ण नारायण देव व अनंत नारायण भागवत या मंडळींची कामगिरी वैशिष्ट्यपूर्ण व बहुमोल असून अखिल महाराष्ट्रीय इतिहास-लेखकांत त्या सर्वांना स्वतंत्र स्थानेंही मिळालीं आहेत, ही गोष्ट मध्यभारतास अभिमानास्पद असल्यानें येथें तिचा निर्देश करणें अप्रस्तुत होणार नाहीं. तसेंच इंदूरचे एम्. आर. महाडिक व श्री. ना. घाटोळे यांनीं लिहिलेला ' इंदूर संस्थानचा गोष्टीरूप इतिहास ' ( १९३६ ) व तत्सदृश आणखी कांहीं किरकोळ पुस्तकांचा परिचय या प्रकरणांत पूर्वी करून देण्याचें राहून गेलें आहे सबब तेंही येथें नमूद करणें जरूर आहे.

---

## प्रकरण सहावें

# प्रवासवर्णन, स्थलवर्णन व भूवर्णनविषयक वाङ्मय

तीर्थानामवलोकनं परिचयं सर्वत्र वित्तार्जनं ।
नानाश्चर्यनिरीक्षणं चतुरता बुद्धेः प्रशस्ता गिरः ॥
एते सन्ति गुणाः प्रवासविषये............ ।

*   *   *   *

केल्यानें देशाटन पंडितमैत्री सभेंत संचार ।
शास्त्रग्रंथविलोकन, मनुजा चातुर्य येतसें फार ॥

### प्रवासाची महती व पूर्वकथन

वर उद्‍धृत केलेल्या श्लोकांत प्रवासाची उपयुक्तता व थोरवी या दोन्ही गोष्टींचें वर्णन यथार्थतेनें करण्यांत आलें आहे. जगांत ज्ञानार्जनाचीं जीं नानाविध साधनें आहेत त्यांतलेंच प्रवास हें एक महत्त्वाचें साधन होय. प्रत्यक्षावलोकनानें मिळविलेलें ज्ञान हें ग्रंथावलोकनानें किंवा श्रवणादिकानें मिळविलेल्या ज्ञानापेक्षां केव्हांही श्रेष्ठ असूं शकेल. अर्थात् या दृष्टीनें प्रवास व प्रवासविषयक वाङ्मयाची

महती विशेष मानणें अनुचित होणार नाहीं. आतांपावेतों मराठी वाङ्मयांतीलच काय पण एकंदर भारतीय वाङ्मयांतीलही प्रवासवर्णन-विषयक ग्रंथनिर्मितीचें प्रमाण इतर विषयांच्या ग्रंथनिर्मितीच्या प्रमाणा-पेक्षां अत्यल्प असलेलें पाहून पाश्चात्य विद्वानांनीं भारतीयांत प्रवासाची जात्याच आवड नाहीं, असे जे उद्गार काढले आहेत ते आपणांस बव्हंशीं अमान्य करतां यावयाचे नाहींत; तथापि प्रवासाची आवड पूर्वीपासून आपल्यांत आहे व अति प्राचीन काळींसुद्धां आपले पूर्वज प्रवास करीत होते यासंबंधांत अनेक दाखलेही आपणांस दाखवितां येतील. रामायण, महाभारत, पुराणें वगैरे ग्रंथांतदेखील असे दाखले कांहीं थोडेथोडके नाहींत. मात्र एवढें खरें कीं, आपल्या पूर्वजांचा प्रवास, ज्ञानसाधनाच्या हेतुऐवजीं त्यांच्या मनावर त्या काळीं दृढतर प्राबल्य गाजविणाऱ्या धर्मभावनेनें होत असे. महाभारतांतील "संसार-तापतप्तानां भेषजं तीर्थमुत्तमम्" ही भीष्म व पुलस्त्य यांच्यांत तीर्थाटन महात्म्यासंबंधांत झालेल्या संवादामधील उक्ति प्रसिद्धच आहे आणि शास्त्रोक्त नियमद्वारें पापक्षालन होऊन चित्तशुद्धि व चित्तस्थैर्य लाभण्याकरितां प्रापंचिकांना धार्मिक स्थळांचें दर्शन आवश्यक असल्याची सनातन श्रद्धा आजही आपल्या लोकांत कांहीं कमी झालेली नाहीं. शिवाय अलीकडे लोहमार्ग व बाष्पयानें उपयोगांत येऊं लागल्यापासून "किं सुखमप्रवासगमनं" असे भर्तृहरीप्रमाणें उद्गार काढण्यासारखे पूर्वीइतकें प्रवास करणें दगदग आणि पैसा या दोन्ही दृष्टींनीं दुष्कर राहिलें नसल्यानें व ज्ञानाबरोबर करमणूक, विश्रांति, आरोग्य आणि थारेपालट यांचाही लाभ घेणें हे प्रवासाचे आणखी हेतु पाश्चात्यांपासून आपण शिकून घेतले असल्यानें या वरील करणांपैकीं कोणत्या ना कोणत्या कारणासाठीं आपणांतील बहुतेकांना ऐपतीप्रमाणें थोडाफार प्रवास करण्याचा नेहमीं योग येताचे. तसेंच आपल्यांत पूर्वी धर्मानें मानण्यांत येणारी परदेशगमनाची

निषिद्धताही कमी झाल्यापासून देशांतरांत विशिष्ट शिक्षणाच्या निमित्तानें किंवा तिकडील चैनीखातर आपल्यांतील धनवंत लोक देशांतराचा बराच प्रवास करूं लागले आहेत, यामुळें प्रवासवर्णनात्मक ग्रंथांची आणि त्याबरोबर स्थलवर्णनपर आणि भूवर्णनपर ग्रंथांची निपज आपल्यांतील प्रवासी व इतर लेखकांकडून अलीकडे पुष्कळ होऊं लागली आहे. त्यांतील कांहीं ग्रंथ तर खरोखरच सरसतेंत नाटकें, कादंबऱ्यांनाही मागें टाकणारे आहेत. तसें आपल्या मराठी वाङ्मयांत प्रवासवर्णनाचा आरंभ केव्हांपासून झाला हें पाहूं गेलें असतां तो अगदीं सुरुवातीपासून झालेला आढळतो. आपले प्राचीन मराठी कवि मोठे प्रवासप्रिय होते, त्यामुळें त्यांनीं प्रत्यक्ष प्रवास करून आपल्या काव्यांतून अनेक स्थळांचीं व देशांचीं रसभरित वर्णनें करून ठेविलीं आहेत. त्या कवींतील ज्ञानदेव, नामदेव, मुक्तेश्वर, रामदास, जयराम, रंगनाथ, वामन, मोरोपंत, एकनाथ, कृष्णदयार्णव, सोहिरोबा, देवनाथ व अवाचितसुत काशी यांनीं तर बहुतेक सगळें हिंदुस्थान पाहिलें असावें असें अनुमान काढतां येण्यासारखीं बरींच स्थानें त्यांच्या काव्यांत आढळतात. निरंजन माधवाचा प्रवासवर्णनपर एक स्वतंत्र ग्रंथच आहे व तसा एक ग्रंथ दत्तपदांकित मुकुंद कवीचाही असल्याचें समजतें. नाना फडणविसांनींदेखील आपल्या आत्मचरित्रांत तीर्थयात्रेचें त्रोटक पण चटकदार वर्णन करून ठेविलें आहे. अस्तु. महाराष्ट्रांतील अगदीं पहिलें प्रवासवर्णनात्मक व स्थलवर्णनपर ग्रंथांचें प्रकाशन सन १८६३ मध्यें एकसमयावच्छेदेंकरून झालेलें आहे. 'गोकर्ण-महाबळेश्वराचे यात्राप्रकरणीं वृत्तांत' हा प्रवासवर्णनात्मक पहिला ग्रंथ जगन्नाथ विठोबा खत्री यांनीं लिहिला असून 'मुंबईचें वर्णन' हा पहिला स्थलवर्णनपर ग्रंथ गोविंद नारायण शेणवी माडगांवकर यांनीं लिहिला आहे. तत्पूर्वी सन १८५२ मध्यें शामराव मोरोजी यांचा 'काशीप्रकाश' हा स्थलवर्णनपर ग्रंथ तिकडे प्रसिद्ध झाला

होता; परंतु तो अगदींच लहान व सामान्य असल्यानें विद्वानांकडून नगण्य ठरविला गेला आहे. भूवर्णनपर अर्थात् भूगोलात्मक असा पहिला ग्रंथ विश्वनाथ कृष्ण यांचा 'कोल्हापूर प्रांताचें वर्णन' मात्र वरील पहिल्या दोन ग्रंथांच्या पांचसहा वर्षें अगोदर ह्मणजे सन १८५७ मध्यें प्रसिद्ध झाला आहे. आपल्या मध्यभारतांतील दाजीसाहेब किबे कृत 'प्रसिद्ध स्थळें भाग १' हा पहिला प्रवासवर्णनात्मक ग्रंथ सन १८६१ मध्यें बाहेर पडून माधवराव व्यंकटेश लेलेकृत 'सेतुबंध रामेश्वर यात्रा' हा पहिला स्थलवर्णनपर ग्रंथ सन १८८६ मध्यें निघाला. त्यानंतर ७ वर्षांनीं ह्मणजे सन १८९३ मध्यें विश्वनाथ काशीनाथ फडकेकृत 'देवास संस्थानचें भूवर्णन' हा पहिला भूगोलात्मक ग्रंथ प्रसिद्ध झाला. पुढें हळुहळूं सदर तिन्ही प्रकारचे ग्रंथ मध्यभारतीय लेखकांकडून निर्माण होऊं लागले. त्या सर्वांचा आतां पृथक् पृथक् परिचय करून देऊं.

**प्रवासवर्णनपर ग्रंथ**

मध्यभारतीय लेखकांनीं लिहिलेले प्रवासवर्णनपर असे लहानमोठे सहाच ग्रंथ आहेत. त्यांतील वर निर्देशिलेल्या 'प्रसिद्ध स्थळें' या ग्रंथाचे दोन भाग अनुक्रमें सन १८६१ व १८६४ मध्यें प्रसिद्ध झाले. सदर ग्रंथाचे लेखक गणेश विठ्ठल ऊर्फ दाजीसाहेब किबे हे सरदार माधवराव विनायक किबे यांचे आजे व तात्या जोग यांचे चिरंजीव होत. गेल्या शतकांत जसे बडोद्याचे मैराळ व नागपूरचे बूटी हे अनुक्रमें गुजराथ व मध्यप्रांताचे नवकोट नारायण ह्मणून प्रसिद्ध होते तसे इंदूरचे किबे हेही त्यांच्या जोडीला मध्यभारताचे नवकोट नारायण ह्मणून विख्यात होते. संपत्तीबरोबर धर्मनिष्ठेचाही वास किब्यांच्या घराण्यांत त्यावेळीं चांगला होता. दाजीसाहेब मोठे धार्मिक पुरुष होते. त्यांनीं आपल्या वैभवाला अनुसरून हौशीनें व धार्मिक भावनेनें भारतवर्षांत बराच प्रवास केला. त्यावेळीं त्यांनीं निरनिराळ्या

स्थळांच्या माहितीचें टांचण लिहून ठेविलें होतें तेंच 'प्रसिद्ध स्थळें' या ग्रंथरूपानें प्रकाशित केलें गेलें. इंग्रजींत गाइडबुकें असतात तशा स्वरूपाचा हा लहानसाच ग्रंथ असून तो शिलाप्रेसवर छापला गेला आहे. न्या. मू. महादेव गोविंद रानडे यांनीं 'नोट ऑन धि ग्रोथ ऑफ धि मराठी लिटरेचर' या आपल्या पुस्तकांत सदर ग्रंथाचा उल्लेख केला आहे. पुढें सन १९०५ मध्यें अनंत नारायण भागवत यांचा 'तीर्थयात्रा प्रबंध' हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. याच नांवाचा एक आणखी ग्रंथ गणेश सदाशिवशास्त्री लेले यांनींही सन १८८५ मध्यें लिहिला आहे. त्यांत सरदार विंचुरकरांनीं केलेल्या यात्रांचें व यात्राविधींचें वर्णन केलेलें असून मधूनमधून योग्य स्थळीं पौराणिक कथा आणि दंतकथाही दिलेल्या आहेत. भागवतांचा हा ग्रंथदेखील अशाच प्रकारचा आहे. यांत भोर संस्थानाधिपति श्रीमंत शंकरराव चिमणाजी ऊर्फ रावसाहेब सचिव यांनीं हिंदुस्थानांत केलेल्या तीर्थयात्रा व तेथील यात्राविधि आणि मार्गांत पाहिलेलीं इतर प्रेक्षणीय स्थळें यांसंबंधांत दैनिकींत लिहून ठेविलेली हकीकत प्रथम दिली असून नंतर निरनिराळ्या स्थळांचा पौराणिक व ऐतिहासिक वृत्तांत दिला आहे. हा ग्रंथ मोठा व चांगला आहे. पुढें सन १९२८ मध्यें ग्वाल्हेर येथें भरलेल्या मराठी साहित्य संमेलनाच्या अधिवेशन प्रसंगीं ग्वाल्हेर गव्हर्मेंटच्या आर्कियालॉजी डिपार्टमेंटचे सुपरिंटेंडेंट मोरेश्वर बळवंत गर्दे यांनीं लिहिलेलें 'ग्वाल्हेर येथील व आसपासच्या ऐतिहासिक प्रेक्षणीय स्थळांचें संक्षिप्त वर्णन' हें चिमुकलें पुस्तक प्रसिद्ध झालें. यांत सांची, बेसनगर, भेलसा, उदयपुर, देवगड, चंदेरी, पद्मावती, शिवपुरी, ग्वाल्हेर आदि स्थळांसंबंधांत थोडक्यांत महत्त्वाची तेवढीच माहिती दिलेली आहे. नंतर सन १९३४ मध्यें इंदूरचे ना. र. नेवासकर यांनीं लिहिलेलें 'निसर्ग विहार' हें पुस्तक बाहेर पडलें. इंदूरच्या आसमंतांतील सुमारें वीस मैलांच्या प्रदेशामधील

निसर्गसौंदर्यमंडित अशीं जेवढीं स्थळें आहेत त्यांच्यासंबंधींची माहिती प्रत्यक्ष त्या त्या स्थळांचें दर्शन घेऊन प्रसिद्ध करण्यासाठीं एक तरुण उत्साही मंडळ खास इंदूर येथें स्थापन झालें आहे, त्याच्या विद्यमानें प्रकाशित होणाऱ्या पुस्तक-मालेचें हे पहिलें पुष्प होय. यांत गिदयाखोचा धबधबा, तिनशा व मेंदीकुंड या तीन स्थळांचें वर्णन थोडक्यांत आलेलें आहे; तथापि तेवढेंच वर्णन वाचून प्रत्यक्ष त्या स्थळांचें दर्शन घेण्याची वाचकांस इच्छा झाल्यावांचून रहात नाहीं ! या ‘ निसर्ग विहारा ’ च्या पाठो-पाठच सन १९३५ मध्यें ‘ काश्मिरी फुलांची पखरण ’ हें धारच्या प्रो. बा. ग. चव्हाण यांचें पुस्तक प्रसिद्ध झालें. हें पुस्तक खरोखरच अत्युत्कृष्ट असून त्याच्यायोगानें मध्यभारतीय वाङ्मयांतच काय पण एकंदर महाराष्ट्रीय वाङ्मयांतही एका चांगल्या पुस्तकाची भर पडली आहे. अगोदरच प्रो. चव्हाण यांची लेखनशैली अतिशय मोहक व त्यांतून भूलोकींचें नंदनवन म्हणून गाजलेल्या काश्मीरच्या अद्‌भुतरम्य दृश्यांनीं त्यांची प्रतिभा प्रफुल्लित झालेली, तेव्हां अशा स्थितींत त्यांच्या हातून काश्मीर प्रवासाचें हें वृत्त नितांत हृद्य असें उतरावें यांत आश्चर्य तें कोणतें? सृष्टिवर्णनाबरोबरच प्रसंगानुसार केलेली समाज, नीति, धर्म, शिक्षण, तरुणांची बेकारी, स्त्रिया आणि रंगभूमि अशा अनेक विषयांवरील मार्मिक व उद्‌बोधक चर्चाही पण या पुस्तकांत पहावयास मिळते. त्यामुळें मनोरंजनाबरोबर मनोविकसनाचादेखील लाभ त्या-पासून वाचकांना अनायासें होतो. अस्तु. या पुस्तकाचें नांव जरी गोड असलें तरी त्यावरून प्रवासवर्णनाऐवजीं काव्यविषयाचा आभास उत्पन्न होत असल्यानें तें अर्थात्‌च अन्वर्थक वाटत नाहीं. सुमारें चाळीस वर्षांपूर्वी माधवराव व्यंकटेश लेले यांनीं लिहिलेलें ‘ समुद्रांत पाण्याखालून १५००० कोस पर्यटन ’ हें पुस्तक कोल्हापूरच्या ‘ ग्रंथ-मालें ’ तून स्वतंत्र प्रकरणरूपानें प्रसिद्ध झालें होतें, त्याचाही निर्देश

येथें करणें अवश्य आहे. पॅरिस म्युझियमचे प्रोफेसर मि. आरोना यांच्या इंग्रजी पुस्तकाचें हें मराठी भाषांतर असून यांत समुद्राच्या पोटांत काय काय चमत्कारिक गोष्टी सांठविलेल्या आहेत त्याचें मनोवेधक वर्णन करण्यांत आलें आहे.

**स्थलवर्णनात्मक ग्रंथ**

मध्यभारतीय लेखकांच्या स्थलवर्णनात्मक ग्रंथांची संख्यादेखील अशीच हातांच्या बोटांवर मोजण्याइतकी सहाच आहे. त्यांतला माधवराव व्यंकटेश लेले यांचाच सन १८८६ मध्यें प्रसिद्ध झालेला 'सेतुबंध रामेश्वर यात्रा' हा ग्रंथ पहिला होय; परंतु हा ग्रंथ आह्मास पाहावयास मिळाला नाहीं. पुढें सन १८९७ मध्यें ग्वाल्हेर रियासतींतील पोरसा तहसीलचे चिटणीस नारायण पांडुरंग कुळकर्णी यांनीं लिहिलेला 'श्रीगोपगडमणि ऊर्फ ग्वाल्हेर किल्ला व मराठे, पेशवे, शिंदे यांचा संक्षिप्त इतिहास' हा लघु ग्रंथ प्रसिद्ध झाला. यांत प्रथम ग्वाल्हेर किल्ल्याचा सन २७५ पासूनचा मनोरंजक इतिहास देऊन नंतर सातारकर छत्रपति भोंसले ( मराठे ), पुणेंकर पेशवे व ग्वाल्हेरचे शिंदे यांच्या घराण्यांचा लावणीबद्ध संक्षिप्त इतिहास मणिकाव्य या शीर्षकाखालीं दिला आहे. नारायण गणेश शिरसाळकर यांचा 'सीतामहूवर्णन' नांवाचा एक लघु ग्रंथही याच सालीं प्रसिद्ध झाला असल्याचें समजतें; परंतु तो आज अनुपलब्ध आहे. याच्या चार वर्षें अगोदर सन १८९३ मध्यें बळवंत कमळाकर माकोडे व रामचंद्र बळवंत डोंगरे या दोघांनीं मिळून लिहिलेलें 'उज्जयिनी क्षेत्रयात्रा' हें चिमुकलें पुस्तक प्रसिद्ध झालें. उज्जयिनी हें हिंदूंचें सनातन तीर्थक्षेत्र विख्यात असून तेथील अधिदैवत श्रीमहाकालेश्वर द्वादश ज्योतिर्लिंगांत परिगणित असल्यामुळें हिंदुस्थानच्या चारी भागांतील श्रद्धाळु लोक यात्रेनिमित्त तेथें नेहमीं येत असतात. त्यांना तेथील निरनिराळ्या स्थानांची ओळख होऊन दर्शन घेण्यास सुलभ जावें

म्हणून हें पुस्तक वरील विद्वद्वयांनीं तयार केलें असून यांत उज्जयिनीच्या बऱ्याच स्थानांची त्रोटक जंत्रीवजा माहिती दिली आहे. या ‘उज्जयिनी क्षेत्रयात्रा’ पुस्तकाच्या उपर्युक्त दोन लेखकांपैकीं एक लेखक रामचंद्र बळवंत डोंगरे यांनीं अलीकडे सन १९३१ मध्यें ‘श्रीक्षेत्र अवंतिका अर्थात् उज्जयिनी मार्गदर्शिका’ हें आणखी एक मोठें पुस्तक लिहिलें असून तें त्यांचे बंधु केशव बळवंत डोंगरे यांनीं प्रसिद्ध केलें आहे. यांत उज्जयिनीची धार्मिक, सामाजिक, ऐतिहासिक व विद्याकला-व्यापारविषयक जुनीनवी माहिती अत्यंत शोधपूर्वक दिली आहे आणि त्याशिवाय येथील अनेक दर्शनीय महत्त्वाच्या स्थानांचीं सचित्र वर्णनें देऊन पुस्तकाचें ‘मार्गदर्शिका’ नांव सार्थ केलें आहे, त्यामुळें जिज्ञासु वाचकांबरोबर प्रवाश्यांनाही हें पुस्तक निःसंशय उपयुक्त व संग्राह्य झालें आहे. याच पुस्तकांत कांहीं कमीजास्त करून त्याचें ‘इन् टच वुइथ उज्जैन’ नांवाचें इंग्रजी भाषांतरही डोंगरे यांनीं सन १९३५ मध्यें प्रसिद्ध केलें आहे. या सन १९३५ मध्येंच इंदूर येथें मराठी साहित्य संमेलनाचें विसावें अधिवेशन भरलें त्यावेळीं संमेलन व्यवस्था मंडळानें बाहेरगांवच्या प्रतिनिधींना इंदूर शहरांतील प्रमुख स्थळांची व संस्थांची माहिती संकलित स्वरूपांत मिळावी म्हणून भास्कर गोविंद गवारीकर यांच्याकडून ‘इंदूर–दर्शिका’ नांवाचें पुस्तक लिहवून प्रकाशित केलें. त्या उद्दिष्ट माहितीबरोबरच पर्यायानें गेल्या ५०–६० वर्षांत इंदूर शहराची बौद्धिक, औद्योगिक, व्यापारिक व शैक्षणिक क्षेत्रांत क्रमशः कशी वाढ होत गेली याचाही परामर्श या पुस्तकांत घेतला गेला आहे. यानंतर नुकतेंच सन १९३६ मध्यें ग्वाल्हेरच्या ‘मातृभूमिकार्यालय’ संस्थेनें ‘ग्वाल्हेर’ नांवाचें स्वीय पुस्तकमालेचें पहिलें पुष्प प्रसिद्ध केलें. याचें संपादन डॉ. हरि रामचंद्र दिवेकर व ना. शि. पाठक या दोघांनीं मिळून केलें असून यांत प्राचीन ग्वाल्हेर, महाराष्ट्रियांचें ग्वाल्हेर, ग्वाल्हेर दिग्दर्शन, ग्वाल्हेरांत एक दिवस

ग्वाल्हेरची राज्यव्यवस्था, ग्वाल्हेर संस्थानांतील कायदे, ग्वाल्हेर आणि शेतकी, आरामोपवनें, ग्वाल्हेर येथील शिक्षण, ग्वाल्हेर राज्यांतील स्त्रीशिक्षण, ग्वाल्हेरची धर्मव्यवस्था, ग्वाल्हेरचें धार्मिक जीवन, ग्वाल्हेरचा महाराष्ट्रीय व त्याचें महाराष्ट्रीयत्व, ग्वाल्हेर संस्थानांतील हरिजनसेवेचें कार्य, ग्वाल्हेरींतील मराठी भाषेचें स्वरूप इत्यादि विषयांवर निरनिराळ्या विद्वान् व व्यासंगी लेखकांनीं लिहिलेले लेख संकलित केले आहेत ते प्रायः सर्वच वाचनीय आहेत. आधुनिक ग्वाल्हेरचा सर्वांगीण परिचय होण्यास हें पुस्तक खरोखरच उपयुक्त आहे. यांतील शेवटचा प्रो. रा. वा. पंतोजी यांचा ग्वाल्हेरींतील मराठी भाषेचें स्वरूप हा लेख विशेष उल्लेखनीय आहे. याच्या जोडीला ग्वाल्हेरच्या साहित्यसंबंधांतही एखादा लेख देणें उचित व अवश्य होतें. ही उणीव कशी राहून गेली हें लक्षांत येत नाहीं. ग्वाल्हेर संस्थानाधिपति श्रीमंत जॉर्ज जिवाजीराव महाराज शिंदे यांच्या राज्याधिकारग्रहण प्रसंगीं मातृभूमिकार्यालयाकडून हें पुस्तक त्यांस अर्पण करण्यांत आलें आहे. ग्वाल्हेरचे महामहोपाध्याय रघुपतिशास्त्री यांनीं सन १९१४ मध्यें ‘ शृंगेरी यात्रा ’ नांवाचें एक पुस्तक लिहिलें आहे; परंतु तें आमच्या पहाण्यांत आलें नसल्यानें त्याचा येथें नुसतां नामनिर्देश करून ठेवणें प्राप्त आहे.

## भूवर्णनविषयक ग्रंथ

भूवर्णन ऊर्फ भूगोलविषयक असे मोजके चारच ग्रंथ आतांपावेतों मध्यभारतांत झाले असून ते चारीही शाळेंतील विद्यार्थ्यांच्या उपयोगासाठीं लहानलहान असे लिहिले गेले आहेत. त्यांतील ‘ देवास संस्थानचें भूगोलवर्णन ’ हें सन १८९३ मध्यें प्रथम प्रसिद्ध झालें. यांत विश्वनाथ काशीनाथ फडके यांनीं देवास उभय पातींची भौगोलिक महत्त्वाची माहिती थोडक्यांत दिली आहे. अशाच माहितीचीं ‘ग्वाल्हेर संस्थानचा भूगोल’ या एकाच नांवाचीं दोन पुस्तकें सन १९३०

व १९३४ मध्यें प्रकाशित झालीं आहेत. हीं दोन पुस्तकें अनुक्रमें गंगाधर गणेश जोशी व र. ज. मोघे या ग्वाल्हेरस्थ लेखकांनीं लिहिलीं असून मोघे यांचें पुस्तक लल्लूप्रसाद यांच्या एतद्विषयक हिंदी पुस्तकाचें भाषांतर आहे. इंदूरचे मोरेश्वर विठ्ठल तेरेदेसाई यांचा सन १९३३ मध्यें प्रसिद्ध झालेला ' इंदूर संस्थानचा भूगोल ' हा चांगला आहे. असाच परंतु यापेक्षां पुष्कळ लहान ' धार संस्थानचा भूगोल ' देवासचे लक्ष्मणसिंग चौधरी यांनीं लिहिला आहे.

अस्तु. मध्यभारतीय लेखकांकडून येणेप्रमाणें प्रवासवर्णन, स्थलवर्णन व भूवर्णनविषयक ग्रंथनिर्मिति आतांपावेतों झाली आहे. ही निर्मिति प्रमाणांत, विविधत्वांत व मोलांत जरी अल्प असली तरी यापुढें मध्यभारतीय उदीयमान लेखकांकडून प्रस्तुत शाखेंत बरीच विधायक कामगिरी होण्याची आशा करतां येण्यासारखी आहे.

---

## प्रकरण सातवें

# धर्म, नीति, समाज व शिक्षणविषयक वाङ्मय

आलोकस्तिमिरे विपद्विषमणिः पाते करालंबनम् ।
यात्राकल्पतरुर्जगज्जयरथः पाथेयमंत्ये पथि ॥
दुःखव्याधिमहौषधं भवभयोद्भ्रांताशयाश्वासनम् ।
तापे चंदनकाननं स्थिरसुहृत्धर्मः सतां बांधवः ॥

*　*　*　*

सर्वे धर्मपथा भिन्नास्ते हि मानवकर्तृकाः ।
नीतिस्त्वेकैव सर्वत्र परमेश्वरकर्तृकः ॥

*　*　*　*

न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।

भगवान् श्रीकृष्ण.

प्रस्तुत प्रकरणांत धर्म, नीति, समाज व शिक्षण या मानवी जीवनोन्नतीशीं निगडित असलेल्या, किंबहुना तिला कारणीभूतच होणाऱ्या, विषयांवर जी वाङ्मयनिर्मिति मध्यभारतांत झाली आहे तिचा परिचय करून देण्याचें योजिलें आहे.

**धर्मविषयक ग्रंथ**

या वाङ्मयनिर्मितींतील प्रथम धर्मविषयक ग्रंथांकडे वळूं. धर्म ह्मणजे काय व आपल्या भारतवर्षांत त्याची उपयुक्तता, महती व प्राबल्य सनातन काळापासून किती आहे, हें वर्णन करण्याची येथें तादृश आवश्यकता नाहीं. प्राचीन ऋषीमुनींनीं व श्रद्धाळु विद्वानांनीं धर्माची व्याख्या आणि थोरवी यांसंबंधांत बराच ऊहापोह करून त्यावर पुष्कळ ग्रंथरचना करून ठेविली आहे. त्या सर्वांचा इत्यर्थ वर उद्धृत केलेल्या पहिल्या श्लोकांत सुंदर रीतीनें ग्रथित झालेला आहे; परंतु आजच्या पालटलेल्या मनूंत धर्म हा जोंपाळण्यास अवघड व निरुपयोगी असा पदार्थ बनला आहे. त्याचें ईश्वरप्रणीतत्व कोणास मान्य होत नाहीं व त्याच्यावर सारें जग प्रतिष्ठित असून त्याला ग्लानि आली असतां त्याच्या पुनरुज्जीवनार्थ परमेश्वर स्वतः वेळोवेळीं अवतार घेत असतो यावरही कोणाची श्रद्धा राहिली नाहीं. पूर्वींच्या काळीं जशी धर्माच्या बळावर मानवी जीविताची उन्नति अवलंबित असल्याचें मानलें जात असे तशी हल्लींच्या काळीं ती भौतिक शास्त्राच्या बळावर अवलंबित असल्याचें मानलें जातें. तेजोमेघांतून ही सृष्टि निसर्गतःच कशी निर्माण झाली व जीव मनुष्यत्वापर्यंत कसाकसा उत्क्रांत होत आला हें भौतिकशास्त्र बुद्धीला चांगल्या रीतीनें पटवूं लागल्यापासून सृष्टि निर्माण करणारा व मनुष्याला जन्मास घालणारा कोणी एक ईश्वर आहे, असें मानणें लोकांना मूढपणाचें वाटावें हें साहजिक आहे. मग अशा स्थितींत देवाचें अस्तित्वच जेथें अमान्य तेथें त्यानें रचिलेला धर्म कोठून मान्य होणार ! शिवाय व्यवहार दृष्टीनें पाहूं जातां देवधर्मावांचून आज कोणाचें कांहीं अडलें आहे, असें हमखासपणें दाखवितां यणेंही शक्य नाहीं. धर्मशास्त्राला एकार्थी कायदा ह्मटलें जातें; परंतु या अर्थी देखील त्याची अवज्ञा लोकांकडून होत असतांना आढळतेच, कारण साऱ्या जगावर अतुल

सामर्थ्य गाजविणाऱ्या साक्षात् साम्राज्य सरकारचे कायदे तुडविण्यास जेथें आज लोकांची तयारी आहे तेथें या अ--साक्षात् धर्मरूपी देवाज्ञांना कोण भीक घालणार? यामुळेंच हल्लीं लोकांना आरण्यक वचनें अरण्यरोदनवत् आहेत, श्रौतधर्म त्यांना अश्रुत आहे, सूत्र ग्रंथांशीं त्यांचें सूत नाहीं आणि स्मृति ग्रंथांचें स्मरण होताच ते तत्काल जाळण्यापावेतों त्यांची मजल पोंचलेली आहे! वास्तविक धर्मा-विषयींची आस्तिक्य बुद्धि नष्ट होऊन असें विपरीत मतांदोलन भारतीयांच्या मनांत व्हावयाला पाश्चात्यांची विद्या, सहवास आणि संस्कृति यांचें वारेंच कारणीभूत आहे आणि असा पाश्चात्यांचा पगडा त्यांच्यावर कां बरें बसूं नये! आज त्या पाश्चात्यांनीं सर्व भूतसामर्थ्यें आपल्या आटोक्यांत घेतलीं असून स्वर्गाचें काल्पनिक ऐश्वर्य भूवर प्रत्यक्ष निर्माण करण्यांत विरंचीचें कर्मकौशल्य ते लीलया दाखवित आहेत, वायुपुत्र हनुमंताप्रमाणें ते शीघ्रगामित्व प्रकट करीत आहेत, बकदालभ्याप्रमाणें दीन जनांचा उद्धार करण्याविषयीं व सर्वांस ज्ञान-संपन्न करण्याविषयीं ते प्रयत्न करीत आहेत आणि ‘अग्रतश्चतुरो वेदान् पृष्ठतः सशरं धनुः’ असें द्रोणाचार्यासारखें व्रत ते अहर्निश चालवित आहेत! अर्थात् या त्यांच्या अद्भुत गोष्टी प्रत्यक्ष पाहून भारतीयांचा बुद्धिभेद व्हावा व धर्मावरील त्यांची श्रद्धा उडावी हें क्रमप्राप्तच आहे. तेव्हां अशा परिस्थितीमुळें सहजिकच अर्वाचीन मराठी वाङ्मयांत धर्मविषयक ग्रंथांची निपज पहिल्यापासूनच फारशी होऊं शकली नाहीं. महाराष्ट्रांतील पहिला धर्मविषयक ग्रंथ ह्मणजे सन १८५२ मध्यें प्रसिद्ध झालेला गंगाधर-शास्त्री फडकेकृत ‘हिंदुधर्मतत्त्व’ हा होय. मध्यभारतांत यानंतर चौतीस वर्षांनीं तसे ग्रंथ निर्माण होण्यास सुरुवात झाली. सन १८८६ मध्यें पुणें येथील वसंतोत्सवांत नीळकंठ जनार्दन कीर्तने यांचें ‘लोकप्रिय हिंदुधर्म व त्याची पात्रता’ या विषयावर व्याख्यान झालें तेंच

त्यांनीं थोड्या दिवसांनंतर ( परंतु त्याच वर्षी ) पुस्तकरूपानें छापून प्रसिद्ध केलें. मध्यभारतांतील पहिल्या धर्मविषयक ग्रंथाचा मान याच पुस्तकाला आहे. याच्यानंतर सन १८८७ मध्यें इंदूर संस्थानचे माजी कारभारी आर. रघुनाथराव यांचें ‘ आर्यप्रश्नोत्तरावली ’ हें चिमुकलें पुस्तक प्रकाशित झालें. या पुस्तकांत आर्यधर्माविषयीं कांहीं प्रश्न व त्यांचीं उत्तरें दिलेलीं आहेत. पुढें सन १९१० मध्यें प्रो. शांताराम अनंत देसाई यांचा ‘ विद्यार्थी ’ मासिकांतून प्रसिद्ध झालेला ‘ वैदिक धर्माचें परम रहस्य ’ हा निबंध स्वतंत्र पुस्तकरूपानें बाहेर पडला. गीतेचें महत्त्व, ईश्वरशरणता आणि ज्ञान, ईश्वरशरणता आणि कर्म, ईश्वरशरणता आणि वैराग्य, ईश्वरशरणता आणि भक्ति व उपसंहार अशीं प्रकरणें पाडून वैदिक धर्माच्या रहस्याचें सोपपत्तिक विवेचन यांत त्यांनीं मुद्देसूदपणानें केलें आहे. वैदिक हिंदुधर्माच्या या महती व माहितीबरोबरच त्या धर्मांतील कांहीं प्रमुख कर्माचारांची महती व माहिती निवेदन करणारीं थोडींशीं पुस्तकें मध्यभारतांत झालीं आहेत. अशा पुस्तकांत सन १८८९ मध्यें बळवंत कमळाकर माकोडे यांनीं लिहिलेलें ‘ सार्थ गायत्री मंत्र ’ हें पुस्तक पहिलें होय. सूर्याजवळ बुद्धीच्या निर्मळतेची अनन्यभावें ज्यांत याचना केली आहे असा हा गायत्री मंत्र वेदांतील सर्वांत पवित्र मंत्र मानला जात असून प्रत्येक ब्राह्मणास या गायत्री मंत्राचा अर्थज्ञानपूर्वक जप करण्याची धर्मशास्त्राची आज्ञा आहे; परंतु त्या मंत्राचा अर्थ कित्येकांना कळत नसल्यामुळें त्यांच्याकडून तो जप यथार्थ रीतीनें होत नाहीं, हें पाहून माकोडे यांनीं मुद्दाम सदर पुस्तक तयार केलें आहे. या पुस्तकांत गायत्री मंत्र व त्यावरील विद्यारण्य, याज्ञवल्क्य, भारद्वाज व शंकराचार्य यांचीं भाष्यें व व्याख्या मराठींत सुबोध अर्थासह दिलीं आहेत. वैदिक धर्मांत यज्ञ संस्थेला पूर्वी फार महत्त्व होतें. तें महत्त्व आधुनिक काळांत लोकांना पटवून देण्याचें कार्य पांचवड ( जिल्हा सातारा ) येथील

स्वाध्याय मंदिराचे प्रतिष्ठापक श्रौताचार्य धुंडिराज गणेश दीक्षित बापट यांनीं हातीं घेतलें असल्याचें प्रसिद्ध आहे. सन १९२९ मध्यें दीक्षित हे आपल्या संस्थेच्या प्रचार कार्यासाठीं इंदुरास आले असतांना त्यांची तेथील 'महाराष्ट्र ब्राह्मण सभे' तर्फे गीतेंतील यज्ञसंस्था या विषयावर सात श्रवणीय व्याख्यानें झालीं. त्या व्याख्यानांचें सार इंदूरचे वेदांततीर्थ दिगंबर वासुदेव नेने यांनीं त्याच वर्षी 'वैदिक राष्ट्रधर्म अथवा भगवद्गीतांतर्गत यज्ञसंस्था' या पुस्तकद्वारें प्रसिद्ध केलें आहे. पूर्वींच्या काळीं यज्ञाचरण हा राष्ट्र कल्याणाच्या कामीं एक उपयुक्त विधि मानला जात असे हें खरें परंतु तो आजच्या काळीं तसा कितपत मानतां येईल हें सांगणें कठिण आहे; तथापि पशुहननाची बाब सोडून बाकीचा यज्ञविधि हल्लींच्या काळींही करीत गेल्यास त्यापासून लोकसंग्रह साधून प्राचीन आर्यसंस्कृतीची परंपराही चालू ठेवल्याचें श्रेय लाभणार आहे, यांत संदेह नाहीं. दीक्षित यांनीं या पुस्तकांत यज्ञसंस्थेची माहिती चांगली दिली आहे. पुढें सन १९३५ मध्यें दीक्षितांचे 'रुद्राध्याय' नांवाचें एक आणखी पुस्तक वासुदेव वामन ठाकुर यांनीं प्रसिद्ध केलें त्याचाही येथें नामनिर्देश करणें जरूर आहे. उज्जयिनीचे डॉ. तारानाथ कृष्ण वैद्य यांनीं देवास धाकट्या पातीचे श्रीमंत मार्तंडराव पवार यांच्या यज्ञोपवीत समारंभाच्या वेळीं त्यांस उपहार ह्मणून 'ब्रह्मजन्म' नांवाचें एक पुस्तक प्रसिद्ध केलें होतें. यांत डॉ. तारानाथ यांनीं आर्य व पाश्चात्य या उभयतांच्या दृष्टींनीं ब्रह्मचर्य व्रत धारण करणाऱ्याची उदात्त हेतुप्रेरित असलेलीं विविध कर्तव्यें थोडक्यांत साकल्येंकरून निवेदिलीं आहेत. ब्रह्मचर्यानंतर विवाहसंस्काराला धर्मानें महत्व दिलें आहे. आपल्या हिंदु समाजांत हा संस्कार जितक्या महत्त्वाचा तितकाच पवित्रही मानला गेला आहे. या संस्कारासंबंधांत सुबोध माहिती देणारें एखादें पुस्तक श्रीमंत सरकार यशवंतराव होळकर यांच्या विवाहाच्या मंगल प्रसंगीं

प्रसिद्ध करून तें नूतन श्रीमंत वधूवरांना उपायन रूपानें अर्पण करावें, असें इंदूरच्या हाउसहोल्ड डिपार्टमेंटनें ठरवून त्याप्रमाणें त्र्यंबक बळवंत गोगटे व रामचंद्र हयग्रीव मणूरकर यांच्याकडून लिहवून घेतलेलें 'विवाहादर्श' नांवाचें पुस्तक योग्य वेळीं सन १९२४ मध्यें प्रसिद्ध केलें. या पुस्तकाच्या पहिल्या पांच प्रकरणांत विवाह संस्काराची आवश्यकता, विवाहाचें कार्य, कुलपरीक्षा, वरपरीक्षा व वधूपरीक्षा याविषयींची शास्त्रोक्त माहिती देऊन नंतर सहाव्या प्रकरणांत विवाहविधीसंबंधांतील बारीकसारीक गोष्टीसुद्धां सर्व प्रकारची माहिती दिली आहे. या पुस्तकाच्या प्रस्तावनेवरून इंदूर हाउसहोल्ड डिपार्टमेंटनें राजवाड्यांत होणाऱ्या कोणत्याशा दोन सणावारांसंबंधांतील माहितीचीं निरनिराळीं पुस्तकें यापूर्वीं गोगटे आणि मणूरकर यांच्याकडून लिहवून प्रसिद्ध केलीं असल्याचें समजतें: परंतु तीं आमच्या पाहण्यांत आलीं नाहींत. 'उत्सवादर्श' नांवाचा वरील लेखकद्वयांनींच लिहिलेला व इंदूर हाउसहोल्ड डिपार्टमेंटनें सन १९२९ मध्यें प्रसिद्ध केलेला सुमारें साडेसातशें पानांचा एक मोठा ग्रंथ मात्र आमच्या पाहण्यांत आला आहे. यांत संवत्सर प्रतिपदेपासून तों रंगपंचमीपावेतों इंदूर राजवाड्यांत होणारे धार्मिक व राजकीय स्वरूपांचे सर्व सणवार व श्राद्धपक्षादि कर्मे यांसंबंधांत आवश्यक तेवढी माहिती देऊन त्यांतील प्रत्येक प्रसंगीं कारखानदारींनीं बजावावयाच्या कामगिऱ्यांचा विस्तृत खुलासाही दिला आहे. याशिवाय गोगटे यांनीं मणूरकरांच्या सहाय्यानें लिहिलेलें 'श्रीमंगळागौरी' नांवाचें एक आणखीही पुस्तक इंदूर हाउसहोल्ड डिपार्टमेंटनें सन १९२४ मध्यें प्रसिद्ध केलें आहे. यांत संपूर्ण गौरीव्रतांची व तत्संबंधीं पूजाविधींची सामान्य माहिती आणि मंगळागौरीची सार्थपूजा, कथा, कहाणी इत्यादि गोष्टी देऊन गौरीव्रतांचें महात्म्य पटण्याकरितां गौरीचें, चरित्र पतिव्रता धर्म, पतिपत्नींची एकरूपता व सायुज्यतेचा उपाय यांचेंही

थोडक्यांत सुबोध विवेचन केलें आहे. दसरा, दिवाळी व होळी हे आर्यांचे प्रमुख सण होत. या सणांवर अनंत केशव चितळे उर्फ वांईकर मास्तर यांनीं इंदुरास असतांना तीन लहान लहान स्वतंत्र पुस्तकें लिहिलीं होतीं; परंतु तीं आह्मांस उपलब्ध आलीं नाहींत. संक्रांति हाही हिंदूंचा एक महत्त्वाचा सण समजला जातो. या सणानिमित्त 'संक्रमणोपायन' नांवाचें एक पुस्तक उज्जयिनीचे डॉ. तारानाथ कृष्ण वैद्य यांनीं अलीकडे लिहिलेलें प्रसिद्ध आहे. या पुस्तकांत प्रथम आर्या वृत्तांत 'संक्रमण रहस्य' कथन करून नंतर त्याचा गद्यांत सुबोध आशय दिला आहे. हें पुस्तक लहान असलें तरी वाचनीय आहे यांत शंका नाहीं. मध्यभारतांत धार्मिक सदराखालीं मोडणारीं हीं एवढींच पुस्तकें आतांपावेतों प्रसिद्ध झालीं आहेत. हल्लीं कलियुगांत वैदिक धर्माची अत्यंत शोचनीय स्थिति झालेली पाहून त्यावर बळवंत कमळाकर माकोडे यांनीं सन १९०० मध्यें 'वैदिक धर्मविलाप' नांवाचें एक लहानसें पुस्तक लिहिलें आहे. त्याचाही परिचय येथें करून देणें योग्य होईल. या पुस्तकांत वैदिक धर्मावर चेतना गुणाचा आरोप करून त्याच्याकडूनच स्वतःची दैन्यदशा वदविली आहे. वैदिक धर्म सर्व आर्यजनांस टाहो फोडून ह्मणतो "अहो मी तुमचा वृद्ध पिता सांप्रतकाळीं जर्जर होऊन मरणासन्न झालों आहे. माझ्यांत तुह्मांस हांक मारण्याचेंही सामर्थ्य राहिलें नाहीं. माझ्यानें बोलवत नाहीं. पायानें चालून तुमच्याजवळ येण्याची मला शक्ति नाहीं. डोळ्यांनीं दिसत नाहीं...ज्यानें स्वर्ग, भूमि व पाताळ या त्रैलोक्यांत सहस्रावधि वर्षें निष्कंटक राज्य केलें; ब्रह्मा, विष्णु, महेश, इंद्र, वरुण, यम, अग्नि इत्यादि तेहतीस कोटी देव; मनु, पृथु, वेन, राम, बळी, सहस्रार्जुन यांसारखे पराक्रमी राजे; बृहस्पति, व्यास, वाल्मीकि, वसिष्ठ, पराशर, विश्वामित्र यांसारखे सहस्रावधि ऋषि; आणि कालिदास, भवभूति, बाण, सुबंधु यांसारखे

अगणित कवि हे ज्याच्या आज्ञेंत वागत होते–माझ्या आज्ञेचें उल्लंघन करण्यास थरथरा कांपत होते, त्या मला आज असा दिवस प्राप्त व्हावा काय ?" अस्तु. अशा प्रकारें एकंदरींत वैदिक धर्माची सांप्रतची दैन्यावस्था लोकांपुढें मांडण्याचा माकोडे यांनीं कल्पक-बुद्धीनें केलेला प्रस्तुत प्रयत्न निःसंशय अभिनव व स्तुत्य असून तो चांगला साधलाही आहे. हा 'वैदिक धर्मविलाप' प्रथम लेखरूपानें उज्जयिनीच्या 'वैदिक धर्म' मासिकांतून प्रकाशित झाला होता.

## नीतिविषयक ग्रंथ

आतां यानंतर नीतिविषयक ग्रंथांकडे वळूं. वास्तविक नीति ह्मणजे काय व तिची खरी व्याख्या कोणती, हें निश्चितपणें सांगता येणें कठिण आहे; तथापि प्रस्तुत प्रकरणाच्या आरंभीं उद्धृत केलेल्या नीतिविषयक श्लोकांत नीतीचें महत्व धर्मापेक्षां अधिक असल्याचें जें दाखविलें आहे तें कोणासही विचारांतीं ग्राह्य होण्यासारखें आहे. तसेंच तत्वतः पाहूं जातां नीतीसंबंधींच्या कल्पना सर्वत्र सारख्या आहेत असेंही दाखवितां येणार नाहीं. स्थलकालपरत्वें नीतीच्या कल्पनांत बदल हा दिसून यावयाचाच. आणि यामुळेंच समंजस लोक 'महाजनो येन गतः स पंथः' हें तत्व पुढें ठेवून तदनुसार आचरण करणें श्रेयस्कर समजतात. मराठींत आतांपावेतों नीतीसंबंधीं अनेक प्रकारचे ग्रंथ लिहिले गेले आहेत. त्यांतील 'बालोपदेश' हा विष्णु वामन शास्त्री बापट यांचा सन १८३८ मध्यें प्रसिद्ध झालेला महाराष्ट्रांतील पहिला नीतिविषयक ग्रंथ होय, असें रा. सा. गणेश जनार्दन आगाशे यांनीं 'विविधज्ञानविस्तारा' च्या जुलै सन १८९८ च्या अंकांत दिलेल्या मराठी पुस्तकांच्या यादीवरून दिसून येतें. हा ग्रंथ त्याच्या नांवा-वरूनच मुलांकरितां लिहिला गेला होता, हें उघड होतें. मध्यभारतांत त्यानंतर तीस वर्षांनीं ह्मणजे सन १८६८ मध्यें, इंदूरचे आप्पाजी लक्ष्मण टिकेकर यांनीं लिहिलेल्या 'गुण सागर' (भाग पहिला) या

ग्रंथापासून तसे ग्रंथ निर्माण व्हावयास सुरुवात झाली. हा ‘ गुणसागर ’ ग्रंथ शिळा प्रेसवर छापलेला असून त्याच्या प्रस्तावनेंतील खालील दोन आर्यांत टिकेकरांनीं ह्मटलें आहे:--

“ बहुधां मम बुद्धीनें, सद्ग्रंथांतील अर्थ लिहिला हो ।
बहु यत्नें काढीला, रसिकजनालाचि पाहिजे लाहो ॥१॥
कांहीं प्राकृत गोष्टी, येथें लिहिल्या मुलांसि कळवाया ।
अनुभव आल्यावांचुनि, लागे कैसी उगाचि कळ वायां ॥२॥

अर्थात् हा ग्रंथ टिकेकरांनीं आबालवृद्धांकरितां लिहिला आहे. यांत मुलांना उद्बोधक होतील अशा अनेक गोष्टी दिलेल्या असून थोरांसाठीं रतिशास्त्र, गणिकासंगदोष, मद्यादि व्यसनांचा निषेध, श्रीमंतांना मुलें कां होत नाहींत, बायको कशी असावी व तिला कसें वागवावें, चाकरी कोणाची व कशी करावी, कचेरीस जाण्याचीं लक्षणें काय काय आहेत वगैरे पुष्कळच गोष्टी दिल्या आहेत. अमुक विषय यांत नाहीं, असें कोणालाही सहसा दाखवितां यावयाचें नाहीं इतका हा सर्वविषयपरिपूर्ण ग्रंथ आहे! राम, कृष्ण, युधिष्ठिरापासून तों बाळाजीपंत दादा जठार, गणपतराव खडगे, बाबासाहेब बिवलकर, सीतारामशास्त्री, गणपतराव भागवत, गणपतराव विठ्ठल किबे, बाबासाहेब आपटे वगैरे पावेतों निरनिराळ्या थोर पुरुषांचीं निरनिराळ्या बाबतींत उदाहरणें देऊन व प्राचीन संस्कृत ग्रंथांतील सूक्तींचीं जागोजागीं यथेच्छ पेरणी करून उपदेशाबरोबर मनोरंजनही करण्याचें कार्य या ग्रंथानें अनायासें साधलें आहे. पृष्ठ ५१ वर टिकेकरांनीं ग्वाल्हेरचे अलिजाबहादुर जयाजीराव महाराज शिंदे हे छत्रपति शिवाजी महाराजांपेक्षां श्रेष्ठ होते असें ह्मटलें आहे. कारण, अलिजाबहाद्दरांनीं कार्तिकी पौर्णिमा व सबंध श्रावणमास काशीपासून कर्नाटकापर्यंत सर्व क्षेत्रांत पक्वान्नांचीं ब्राह्मणभोजनें करविलीं; लष्कर (ग्वाल्हेर) मध्यें होत्या तेवढ्यां दांपत्यांचीं पूजनें एक दिवस केलीं, दर कन्या-

दानास तीनशें रुपयांप्रमाणें जेवढ्या मुलीं एका महिन्यांत आल्या त्यांच्या बापांस दिले; झांशींत एक दिवस पुरुष, सुवासिनी (विटाळश्या व बाळंतिणीसुद्धां) आणि विधवा हेन्यास आलीं त्यांस प्रत्येकीं शंभर रुपयांप्रमाणें चार घटकेंत पाऊण लक्ष रुपये वांटिले; भागवताची पारायणें यथाशास्त्र करवून तो एक अपूर्व महोत्सव केला; एका वर्षांत शंभर शिवालयें बांधून त्यांच्या पूजेचा बंदोबस्त केला; श्रीक्षेत्र काशींत आपल्या समक्ष ब्राह्मणांकडून शिवपंचाक्षरी मंत्राचें मोठें अनुष्ठान करविलें; मथुरेंत राधाकृष्णाचें उत्तम देऊळ बांधून येथील पूजानैवेद्याचा उत्कृष्ट बंदोबस्त केला; काशी, ब्रम्हावर्त व लष्कर येथें अन्नछत्रें घालून दर महिन्यास ब्राह्मणांचें लक्ष भोजन चालविलें; एकादशी, सोमवार व प्रदोष हीं व्रतें स्वत: करून पदरच्या माणसांनाही करावयास लाविलीं; ब्राह्मणांकडून एक वर्षपर्यंत रोज तुळशीपत्रांचा लक्ष वाहवून राममंत्र सव्वा लक्ष लिहविला; दर शनिवारीं रात्रौ बांकेबिहारीची पूजा उत्कृष्ट रीतीनें बांधून स्वतः भजन केलें आणि आषाढ शुद्ध ११ स व कार्तिक शुद्ध ११ स देवाचा रथोत्सव शहरांत समारंभानें मिरविला अशी कितीतरी मोठमोठीं धर्मकृत्यें जीं छत्रपति शिवाजी महाराजांना यावत्‌जन्म करतां आलीं नाहींत तीं जयाजीराव महाराजांनीं केलींत म्हणून शिवाजी महाराज त्यांच्यापेक्षां योग्यतेनें कनिष्ठ झाले ! पुढें टिकेकरांच्या मनांत जयाजीराव महाराजांस कोणाची तरी उपमा द्यावयाचें आलें तेव्हां त्यांनीं म्हटलें कीं, "या महाराजांना जर रामदासस्वामींची किंवा एकनाथस्वामींची उपमा द्यावी तर ते केवळ भक्तच होते, राजे नव्हते. दुसरी उपमा धर्मराज किंवा नळ राजाची द्यावी तर त्या उभयतांस बहुत दुःखें भोगावीं लागलीं, त्यांचें पुराण चालतें तेव्हां श्रोत्यांस रडें येतें तेव्हां उपमेस योग्य असा एक जनक राजाच दिसतो. कारण राज्य यथापद्धति करून व विषयोपभोग घेऊन तो शेवटीं विदेही झाला. सबब ही उपमा योग्य दिसते !" अस्तु.

अशा कितीतरी मजेदार गोष्टी या ग्रंथांत दिलेल्या आहेत. या ‘ गुणसागरा ’ नंतर धारचे वकील भालचंद्र पुरुषोत्तम पटवर्धन यांनीं सन १८९५ मध्यें लिहिलेलें ‘ विदुरनीति ’ हें पुस्तक प्रकाशित झालें. यांत भारतांतर्गत उद्योग पर्वाच्या ३०–४० अध्यायांचें नीळकंठी टीकेस अनुलक्षून मराठी भाषांतर केलेलें आहे. पुढें सन १९०२ मध्यें प्रो. शांताराम अनंत देसाई यांचें ‘ग्रीक नीतिमीमांसा’ हें पुस्तक बाहेर पडलें. हें पुस्तक प्रसिद्ध करते वेळीं संपूर्ण यूरोपीय नीतिमीमांसेचा संक्षिप्त इतिहास वाचकांस सादर करण्याचा आपला उद्देश प्रो. देसाई यांनीं प्रकट केला होता. ग्रीस हा थ्वीच्या पाठीवरील एक अति-प्राचीन व संस्कृतिसंपन्न असा देश होय. आज जगांत नीतिविषयक जेवढे सिद्धांत प्रचलित आहेत ते सर्व १५०० वर्षांपूर्वीच प्रतिपादन करून ठेवणारे साक्रेटिस, प्लेटो, आरिस्टाटल यांसारखे अद्वितीय बुद्धि-मत्तेचे पुरुष याच ग्रीस देशांत होऊन गेले. त्यांचीं नीतितत्त्वें त्यांच्या चरित्रासह या पुस्तकांत उत्तम रीतीनें विवेचिलीं आहेत. अगोदर ‘ विविधज्ञानविस्तारां ’ तून या पुस्तकांतला बहुतेक सर्व भाग लेख-रूपांत प्रसिद्धही झाला होता. पुढें सन १९३५ मध्यें इंदूरचे श्रीपाद-शास्त्री हसूरकर यांचें ‘ नीतिधर्मशिक्षणा ’ चें पहिलें पुस्तक प्रसिद्ध झालें. हें पुस्तक शास्त्रीबुवांनीं खास मुलांकरितां रचिलेलें आहे. ‘ राष्ट्रें उदयास येतात तीं सर्वथा राष्ट्राच्या शीलामुळेंच; तें शील ह्मणजे नीतिधर्माचरण होय. ’ अशा आशयाचे ‘ सूत उवाच ’ करून नीतिधर्माचरणाचा थोडक्यांत सहज समजण्यासारखा उपदेश या पुस्तकांत केलेला आहे. यापूर्वी सन १९३० मध्यें इंदूरचे नारायण रामचंद्र देशपांडे यांचें ‘ पिंडीं तें ब्रम्हांडी ’ या नांवाचें पुस्तक प्रसिद्ध झालें होतें. त्यांत प्राचीन भारतीय ऋषींनीं ज्या दिनचर्येच्या योगानें दैविक शक्ति संपादन करून जगांत अद्भुत कार्यें करून दाखविलीं त्या दिनचर्येची रूपरेखा देऊन तिचें महत्त्वही पटवून देण्याचा प्रयत्न

केला गेला आहे. भाषेच्या दृष्टीनें हें पुस्तक सामान्य असलें तरी विषयाच्या दृष्टीनें मात्र तें उत्कृष्ट आहे. या नीतिविषयक ग्रंथांच्या सदरांत विशेष भर घालणारें किंबहुना त्यास एक प्रकारें भूषणभूतच होणारें असें आणखी एक पुस्तक प्रसिद्ध झालें आहे तें ह्मणजे श्रीमंत सौ. महाराणी चंद्रावती बाईसाहेब होळकर यांनीं लिहिलेलें व सन १९३२ मध्यें प्रसिद्ध झालेलें 'सुविचार–माला' हें होय. या 'सुविचार–मालें' त गुंफिलेलीं पुष्पें एकंदर सोळा असून त्यांत स्त्रियांचें कर्तव्य, स्वधर्म, सत्संग, संतस्वरूप, इंद्रियनिग्रह, सदाचार, अहिंसा, नम्रपणा, माया, नामस्मरण, सुखदुःखविचार आदि उपयुक्त विषयांचें सुबोध विवेचन केलेलें आहे. यांतील प्रायः सर्वच विचार बहुश्रुतपणा आणि यथोचित मनन यांच्या पायावर उभारलेले आहेत. आपले सुपुत्र श्रीमंत सरकार यशवंतराव महाराज होळकर यांच्या पंचविसाव्या जन्मदिनोत्सवानिमित्त प्रिय बालबालिकांना 'बाल मेवा' ह्मणून महाराणीसाहेबांनीं हें पुस्तक मुद्दाम प्रसिद्ध केलें होतें. आबाल-वृद्धांना उद्बोधक होतील अशीं निरनिराळीं सुमारें तीनशें नीतिवचनें संकलित करून त्यांचेंही एक पुस्तक धारचे सदाशिव लक्ष्मण बापट यांनीं सन १८८८ मध्यें 'सुबोधवचनसंग्रह' या नांवानें प्रसिद्ध केलें आहे. असेंच आणखी एक पुस्तक प्रसिद्ध करण्याचा विश्वनाथ नारायण देव ऊर्फ पुरुषोत्तम यांचा मनोदय होता व त्याची तयारीही त्यांनीं केली होती; परंतु त्यांच्या आकस्मिक निधनामुळें तो मनोदय शेवटीं फलद्रूप होऊं शकला नाहीं.

### समाजविषयक ग्रंथ

यापुढें आतां मध्यभारतांत निर्माण झालेल्या समाजविषयक ग्रंथांकडे वळूं. 'मनुष्यप्राणि हा जन्मतः समाजप्रिय आहे' अशा आशयाचे उद्गार अनेक पौर्वात्य व पाश्चात्य विद्वानांनीं काढले आहेत आणि ते तत्वतः खरेही आहेत. मनुष्य समाज करून राहतो अर्थात्

पर्यायानें समाज अनेक व्यक्तींचा मिळून तयार होतो. यामुळें ' व्यक्ति तितक्या प्रकृति ' या म्हणीअन्वयें समाजांतील व्यक्तिभिन्नत्व अनेक वादाला कारणीभूत होऊन नेहमींच निरनिराळे जटिल प्रश्न लोकां-समोर उभे रहातात व त्यांचा कालमानानुरूप विचार करणें त्यांस प्राप्त होतें. यास्तव समाजशास्त्र हा पूर्वीपासून एक स्वतंत्र महत्वाचा व अभ्यसनीय असा विषय होऊन बसला आहे. या शास्त्रावर ग्रंथनिर्मिति करण्यास चौकस बुद्धि, सूक्ष्म अवलोकन, दीर्घ अनुभव व परिपक्क विचार यांची अतिशय आवश्यकता असते. परंतु अशा गुणविशिष्ठ लेखकांची संख्या समाजांत नेहमींच अल्पप्रमाण रहात असल्यामुळें मराठी वाङ्मयांतच काय; पण एकंदर जागतिक वाङ्मयांतदेखील समाजशास्त्रावर विशेष ग्रंथनिर्मिति आतांपावेतों होऊं शकली नाहीं. महाराष्ट्रांतील या विषयावरचा पाहिला ग्रंथ म्हणजे एका अज्ञात व्यक्तीनें लिहिलेला ' ब्राह्मणांची उत्पत्ति ' हा असावा, असें दिसतें. हा ग्रंथ पूर्णतया ब्रम्हद्वेषमूलक असून तो सन १८६४ मध्यें ' इंदुप्रकाश ' संस्थेमार्फत प्रसिद्ध झाला होता. मध्यभारतांतील या विषयावरच्या पहिल्या ग्रंथाचा शोध बरोबर लागत नाहीं त्यामुळें जे ग्रंथ आज उपलब्ध आहेत त्यांत वडीलकीचा मान प्रायः ' अब-लोन्नति लेखमाला ' या ग्रंथाकडे जातो. हा ग्रंथ भारताचार्य चिंतामण विनायक वैद्य यांनीं उज्जनीस डिस्ट्रिक्ट जज्ज असतांना सन १८९० ते १८९२ पर्यंत चार लेखांकांत लिहून व प्रसिद्ध करून ' केसरी'च्या ग्राहकांस विनामूल्य वांटला आहे. ' गृहे लक्ष्मौ मान्याः सततमबला मानविभवैः ' हें वराहमिहिरोक्त वचन डोळ्यांपुढें ठेवून हिंदुज्ञातीय महिलांच्या विवाहाच्या बाबतींत असलेले आपले उन्नत–प्रगतिपर विचार वैद्य यांनीं या ग्रंथांत शास्त्राधार देऊन निर्भिडपणानें पुढें मांडिले आहेत. यांतील पहिल्या लेखांकांत सामाजिक सुधारणेच्या चळवळीच्या खटपटीचा वृत्तांत व ती सिद्धीस नेण्याचे उपाय; दुसऱ्या लेखांकांत

लग्नाच्या चालीरीतींचा संक्रमणेतिहास व लग्नाचे खरे उद्देश आणि त्यांचें परस्पर महत्त्व; तिसऱ्या लेखांकांत बालविवाहापासून होणारे दुष्परिणाम व बालविवाहाचा इतिहास आणि चौथ्या लेखांकांत बालविवाह शास्त्रसंमत नाहीं, अशा सर्व महत्त्वाच्या विषयांचें सुंदर विवेचन करून वैद्यांनीं आपलें मतप्रतिपादन धर्मशास्त्र ग्रंथांचें दीर्घ परिशीलन व थोर बुद्धिमत्ता यांच्या बलावर योग्य रीतीनें केलें आहे. शिवाय कांहींकांहीं ठिकाणीं पाश्चात्यांच्या आचरणीय गोष्टींसंबंधांत विचारही पुढें मांडले आहेत. सन १८९० मध्येंच ‘ हिंदुस्थानांतील लोकमत ’ व ‘ सार्वजनिक टीका ’ हीं दोन लघु पुस्तकें रा. सा. बाळकृष्ण आत्माराम गुप्ते यांनीं इंदुरास असतांना लिहिलीं होतीं; परंतु तीं आमच्या पाहण्यांत आलीं नाहींत. यांतील ‘ हिंदुस्थानांतील लोकमत ’ हें पहिलें पुस्तक सर डब्ल्यु. लिवार्नर यांच्या एका इंग्रजी व्याख्यानाचें भाषांतर असून तें वाचनीय आहे, असें म्हणतात. या पुस्तकानंतर लौकरच ‘ आधुनिक असंतोष ’ व ‘ विचार भ्रमण ’ हीं दोन पुस्तकें प्रो. मोरो केशव दामले यांनीं उज्जनीस लिहून तीं कोल्हापूरच्या ‘ ग्रंथमालें’तून प्रसिद्ध केलीं. यांतील ‘ विचार भ्रमण ’ हें पुस्तक चांगलें आहे. सुखदुःख, स्वातंत्र्यास्वातंत्र्य आणि सुशिक्षण व सुधारणा हे तीन पृथक्पृथक् निबंध यांत एकत्रित केले असून त्या तिन्हींतील विषयविवेचन बरेंच मार्मिक व उद्बोधक झालें आहे. पुढें सन १९२१ मध्यें इंदूरच्या माजी ‘ मल्लारि मार्तंड विजया’चे संपादक विनायक सीताराम सरवटे यांनीं लिहिलेलें ‘ सामाजिक वाद ’ हें पुस्तक ‘ होळकर सरकार ग्रंथमालें’तून बारावें पुष्प म्हणून प्रसिद्ध झालें. यांत कांहीं प्रमुख समाजसत्तावादी ग्रंथकारांच्या ग्रंथाधारें सोशियालिझम, बोल्शेव्हिझम, सिंडिकॅलिझम, स्वातंत्र्य, अराजक पंथ वगैरेंचें स्वरूप थोडक्यांत देऊन शेवटीं वर्णव्यवस्था शुद्ध स्वरूपांत पुनरुज्जीवित केल्यास हिंदुस्थानांत कोणताच वाद केव्हांही उद्भवणार नाहीं, असा निष्कर्ष काढला आहे. सामाजिक

वादांवर व चळवळींवर उत्तम दृष्टिकोन साधून लिहिलें गेलेलें असें मराठींत आतांपावेतों प्रसिद्ध झालेलें हें एकच पुस्तक होय, हें येथें निर्देशिणें अवश्य आहे. इंदूर संस्कृत मिहाविद्यालयांतील एक पंडित पुरुषोत्तम नारायणशास्त्री काशीकरकृत 'अस्पृश्यतेच्या शास्त्रार्थांतील पंचस्थली' (१९३५) व रामचंद्र लक्ष्मण देसाई ऊर्फ मायानंदचैतन्य-कृत 'स्पर्शास्पर्शविवेक' हीं दोन सांप्रतकालीन हिंदुसमाजापुढील प्रश्नास चालना किंवा वळण देणारीं पुस्तकें अलीकडे प्रसिद्ध झालीं आहेत. तीं जरी लहानलहान असलीं तरी बरीं आहेत. सन १८९० मध्यें रा. सा. बाळकृष्ण आत्माराम गुप्ते हे विलायतेहून आल्यावर त्यांनीं मद्यपानासंबंधांत पुणें येथील हिंदू यूनियन क्लबपुढें एक व्याख्यान दिलें होतें तेंच नंतर 'दारू पिणें' या नांवानें पुस्तकरूपांत प्रसिद्ध झालें आहे. त्याचाही उल्लेख याच सदरांत येथें करणें वावगें होणार नाहीं. या पुस्तकांत गुप्ते यांनीं आपण विलायतेस असतांना मद्याला कधींच स्पर्श केला नसतांही तेथें आपली प्रकृति नेहमीं निकोप राहिली असल्याचें निवेदन करून नंतर मद्यपानाच्या दुष्परिणामांचें वर्णन केलें आहे. याशिवाय ब्रिटिश लोकांच्या जीवनक्रमावर यथार्थ रीतीनें प्रकाश पाडणारें असेंही एक पुस्तक माधवराव व्यंकटेश लेले यांनीं लिहून सन १९१६ मध्यें प्रसिद्ध केलें आहे तें म्हणजे 'ब्रिटिश लोकांचा जीवनक्रम' हें होय. इचलकरंजीचे चीफ श्रीमंत नारायणराव बाबा-साहेब यांनीं मूळ इंग्रजींत लिहिलेल्या पुस्तकाचें हें भाषांतर आहे. ग्वाल्हेरचे माजी सेशन्सजज त्रिंबक अनंत साठे यांच्या 'विधवा-विवाह संवाद' या लघु पुस्तकाचाही याच सदरांत जातांजातां निर्देश करणें जरूर आहे.

### शिक्षणविषयक ग्रंथ

सदाचार, व्यवहार व विद्या या शिक्षण वर्गांत समाविष्ट होणाऱ्या विविध विषयांवर जी ग्रंथनिर्मिति मध्यभारतांत झाली आहे तिच्याकडे

आतां वळूं. अशा ग्रंथनिर्मितींत राजे व राजकुमार यांच्यासाठीं तीन पुस्तकें तयार झालेलीं आहेत, त्यांतील पहिलें 'श्रीमंत माधवराव महाराज शिंदे यांच्या हुजुरांत विज्ञापना ' हें पुस्तक सन १८९४ मध्यें उक्त महाराजांच्या राज्यारोहण प्रसंगीं बळवंत कमळाकर माकोडे यांनीं लिहून प्रसिद्ध केलें होतें. यांत राजाचीं कर्तव्यें कोणतीं हें थोडक्यांत प्राचीन ग्रंथांतील वचनाधारें सांगून मंत्रिमंडळ, सरदार, अधिकारी वगैरेंपासून तों कारकून, शिपाईप्याद्यांपर्यंत निरनिराळ्या दर्जाच्या लोकांशीं राजानें कसकसें वर्तन ठेवावें यासंबंधांत चार गोष्टी सांगितल्या आहेत. पुढें ' राजकुमाराचें संगोपन आणि शिक्षण ' हें ग्वाल्हेरचे धर्मवीर सरदार चंद्रोजीराव संभाजीराव आंग्रे ऊर्फ माधवशिष्य यांनीं लिहिलेलें दुसरें पुस्तक सन १९२६ मध्यें प्रसिद्ध झालें. यांत युवराजाच्या शिक्षणाचें वैशिष्ट्य कोणतें; राजमाता, राजपिता व राजगुरू यांचीं त्याच्या शिक्षणादि बाबतींत कर्तव्यें कोणतीं; राजकुमाराचे मित्र, सहाध्यायी व सेवक कसे असावेत; राजकुमाराचें सर्वसाधारण शिक्षण आणि राजनीतीचें शिक्षण कशा प्रकारचें पाहिजे इत्याद्यनेक गोष्टींची सांगोपांग चर्चा केली असून कांहीं मननीय विचारही प्रकट केले आहेत. यानंतर तिसरें पुस्तक ' गृहशिक्षणाचे दोन नमुने ' हें सन १९३५ मध्यें प्रसिद्ध झालें आहे व त्यांत वासुदेव वामन ठाकुर यांनीं श्रीमंत नानासाहेब पेशवे यांच्या पत्नी गोपिकाबाई यांनीं आपले चिरंजीव श्रीमंत माधवराव पेशवे यांना लिहिलेलें पत्र आणि देवी श्री अहल्याबाई होळकर यांनीं आपले चिरंजीव मालूजीराव होळकर यांना लिहिलेलें पत्र अशीं दोन पत्रें सटीप देऊन त्यांवरून राजपुत्राची दिनचर्या कशी असावी, हें दिग्दर्शित केलें आहे. सर्वसाधारण लोकांसाठींही एतद्विषयक तीनच पुस्तकें मध्यभारतांत लिहिलीं गेलीं आहेत. त्यांतील जगन्नाथ रावजी दुल्लु यांनीं लिहिलेलें 'मातृपितृसंबंध' हें पुस्तक कोल्हापूर ' ग्रंथमाले ' तून प्रकरणरूपानें सन १९०६ मध्यें

बाहेर पडलें. या पुस्तकांत ( त्याच्या पहिल्या दोन पानांवर दिलेल्या यादीप्रमाणें ) निरनिराळ्या लेखकांच्या बत्तीस ग्रंथांतून कांहीं मूळ व कांहीं भाषांतरित अवतरणें घेऊन आणि त्यांत मधूनमधून स्वतःचेही कांहीं विचार गोंवून देऊन विवाह व प्रजोत्पादन; आईबापांचें मुलांच्या शारिराविषयीं व शिक्षणाविषयीं कर्तव्य; मुलांचें आईबापांविषयीं कर्तव्य; आईबापांची थोरवी आणि आतांच्या आईबापांचें शिथिल बंधन व तें दृढ करण्याचे उपाय एवढ्या विषयांचें प्रतिपादन करण्यांत आलें आहे. या पुस्तकास ' दक्षिणा प्राइझ कमिटी ' कडून बक्षिसही मिळालें होतें. पुढें ' आईबापांस चार शब्द ' हें विनायक सीताराम सरवटे यांचें पुस्तक सन १९१६ मध्यें प्रसिद्ध झालें. आपली भावी पिढी सुज्ञ, सुदृढ व नीतिमान् निपजण्याकरितां आईबापांनीं आपलीं कर्तव्यकर्में समजून काय काय गोष्टी करावयास पाहिजेत याचें दिग्दर्शन यांत केलेलें असून त्यास ( हल्लींचे देवास थाकट्या पाती संस्थानचे अधिपति ) श्रीमंत सदाशिवराव पवार खासेसाहेब महाराज यांनीं लहानशीच पण उद्बोधक अशी प्रस्तावना लिहिली आहे. नंतर सन १९१९ मध्यें वासुदेव गोविंद आपटे यांनीं इंदुरास असतांना लिहिलेलें ' अरविंदबाबूंचीं आपल्या पत्नीस पत्रें ' हें लहानसें पुस्तक प्रकाशित झालें. अढळ धर्मश्रद्धा, परोपकाराविषयीं उत्कट इच्छा, अप्रतिम स्वार्थत्याग आणि पतीविषयीं हिंदु पत्नीचें कर्तव्य यांचें चटकदार विवेचन या पत्रांतून पहावयास मिळतें. पुढें सन १९३६ मध्यें धर्मवीर सरदार चंद्रोजीराव संभाजीराव आंग्रे यांचें ' संदेश ' हें पुस्तक प्रसिद्ध झालें. यांत सरदार साहेबांनीं आपल्या ज्येष्ठ चिरंजीवास एका वर्षाच्या अवधींत लिहिलेलीं १८ पत्रें संकलित केलीं आहेत. हीं १८ पत्रें म्हणजे शिक्षणांत व व्यवहारांत मुलास मार्गदर्शक होतील अशा १८ विषयांवरील लघु निबंधच होत. या पत्रांची भाषा ओजस्वी असून त्यांत प्रदर्शित केलेले

विचारही भारदस्त आहेत. मुलांच्या गृहशिक्षणाच्या बाबतींत हल्लीं जी अनास्था आपल्या समाजांत दिसून येत आहे त्याकडे लोकांचें लक्ष वेधावें, असा सरदार आंग्रे यांनीं हें पुस्तक प्रसिद्ध करतांना आपला हेतु ध्वनित केला आहे. या पुस्तकांतील कित्येक पत्रें लॉर्ड चेस्टरफील्डनें आपल्या चिरंजीवास लिहिलेल्या पत्रांची आठवण करून देणारीं आहेत. खास मुलींच्या गृहशिक्षणाबावत स्वतंत्र असें 'घरांतील कामें' या नांवाचें एक पुस्तक ग्वाल्हेरचे त्र्यंबक नारायण लेले व वासुदेव गोविंद आपटे या दोघांनीं मिळून लिहिलेलें असून तें त्यांच्या 'संसार पुस्तक माले'चें पहिलें पुष्प म्हणून सन १९१४ मध्यें प्रसिद्ध झालें व नंतर त्याचं सुधारून वाढविलेली द्वितीयावृत्ति 'टापटिपीचा संसार' हें नांव देऊन सन १९१८ मध्यें काढण्यांत आली. या पुस्तकाच्या पहिल्या आवृत्तींत फक्त मुलींनाच उपयुक्त होतील असे साधे विषय दिले गेले होते; परंतु दुसऱ्या आवृत्तींत मात्र मुलींबरोबर गृहिणींनाही उपयुक्त होणाऱ्या अशा आणखी कांहीं विषयांची त्यांत भर घालून एकंदरींत केरवाऱ्यापासून तों स्वयंपाकापर्यंत व बालसंगोपनापासून तों प्रपंचांतील मोठमोठ्या जबाबदारीच्या कामापर्यंत प्रायः सर्वच गोष्टींची माहिती थोडक्यांत सुबोध रीतीनें दिली गेली आहे, त्यामुळें एक प्रकारें 'गृहिणीपदाची गुरुकिल्ली'च म्हणतां येईल असें हें पुस्तक झालें आहे. याच्या पूर्वीं सन १९१० मध्यें त्रिंबक अनंत साठे यांचें 'अक्कल' नांवाचें एक पुस्तक प्रसिद्ध झालें होतें. त्यांत साठे यांनीं पुराणमतवाद्यांवर अकारण कटाक्ष ठेवून प्रश्नोत्तर रूपानें अगदीं सामान्य व्यवहारांतल्या गोष्टीही मोठ्या शहाणपणानें शिकविण्याचा आव आणला आहे. "या पुस्तकाच्या वाचनानें लेखकाच्या इच्छेप्रमाणें अक्कल प्राप्त होईल तर ४ आणे दिल्याचें कोणासही दुःख होणार नाहीं", असें 'विविधज्ञानविस्तार' (एप्रिल सन १९१२)च्या संपादकांनीं म्हटलें आहे त्यास आम्हीही सहमत

आहों. सन १९१३ मध्यें 'विद्यार्थ्यांचें नोटबुक' या नांवाचें त्र्यंबक नारायण लेले यांचें एक पुस्तक प्रसिद्ध झालें आहे. हें पुस्तक शालेय शिक्षणविषयक असून त्याच्याद्वारें मुंबई इलाख्यांतील बुक कमिटीनें तयार केलेलें व मॅकमिलन कंपनीनें छापलेलें 'मराठी पहिलें पुस्तक' मुलांना शिक्षकाच्या सहाय्याशिवाय शिकतां यावें, असा लेले यांचा या पुस्तकरचनेचा उद्देश आहे; परंतु तो कितपत सफल होण्यासारखा आहे, हें सांगतां येत नाहीं. या पुस्तकांत शिमगा हा शूद्रांचा सण म्हटला असून अशा प्रकारच्या आणखीही कांहीं चुका झालेल्या दिसून येतात. या पुस्तकाच्या अगोदर सौ. लक्ष्मीबाई नवरे यांचें एक 'मराठी प्रायमर' प्रसिद्ध झालें असल्याचें समजतें सबब त्याचाही येथें नामनिर्देश करून ठेवणें जरूर आहे. पुढें 'पालक-शिक्षक संघ अड्यार व ग्वाल्हेर' या संस्थेच्या विद्यमानें कांहीं शिक्षणविषयक लघु पुस्तकें इंग्रजींत माला रूपांत प्रसिद्ध झालीं त्यांपैकीं 'बालक' (१९२१) 'शिक्षेवांचून शिस्त' (१९२०), 'मुलांची जोपासना व शिक्षण याविषयीं चार शब्द' (१९१८), 'गृहशिक्षण' (१९२०), 'बालशिक्षणासंबंधीं स्त्रियांची जबाबदारी' (ले. सौ. सुलोचनाबाई हुदलीकर १९२३), व 'गृह-शिक्षण अथवा प्रेममय शिक्षण' (१९२३) हीं आठ पुस्तकें मराठींत भाषांतर करून तीं ग्वाल्हेरचे प्रसिद्ध शिक्षणतज्ञ प्रो. रामकृष्ण केशव कुळकर्णी यांनीं प्रकाशित केलीं आहेत. सदरचीं पुस्तकें पालक, शिक्षक व विद्यार्थी या सर्वांनाच मार्गदर्शक आणि उद्बोधक अशीं आहेत.

**किरकोळ**

प्रस्तुत प्रकरणांतच परिचय करून देण्यासारखीं अशीं आणखीं दोन पुस्तकें राहिलीं आहेत तीं म्हणजे एक माधवराव व्यंकटेश लेले यांनीं सन १९११ मध्यें लिहिलेलें 'म्युनिसिपालिट्या व त्यांचीं कामें' व दुसरें भारताचार्य चिंतामण विनायक वैद्य यांनीं सन १९३० मध्यें लिहिलेलें व इंदूरच्या 'श्रीनाथ-कार्य-प्रवर्तक मंडळा'नें प्रसिद्ध केलेलें

'समर्थांची शिकवणूक' हीं होत. म्युनिसिपालिटी ह्मणजे आरोग्य-रक्षणाची व शहरसुधारणेची मुख्य संस्था होय. अशा संस्थेशीं साहजिकपणेंच प्रत्येक मनुष्याचा व प्रत्येक कुटुंबाचा संबंध येतो. तेव्हां म्युनिसिपालिटी ह्मणजे काय, तिचीं कर्तव्यें कोणतीं, जनतेचा तिच्यावर कितपत हक्क आहे, तिच्या सभासदांवर किंवा चालकांवर जबाबदाऱ्या कोणकोणत्या वगैरे गोष्टींचें सोपपत्तिक विवेचन 'म्युनिसिपालिट्या व त्यांचीं कामें' या पुस्तकांत लेले यांनीं थोडक्यांत केलें आहे. मुंबईच्या 'नवाकाळ' दैनिकाचें उपसंपादक नरहर रघुनाथ फाटक यांनीं श्रीरामदासस्वामींच्या जीवनचरित्राविषयीं व त्यांनीं वापरलेल्या राजकारण शब्दाच्या अर्थाविषयीं सन १९२९ मध्यें 'विविधज्ञानविस्तारां' तून एक मोठी टीकात्मक लेखमाला लिहिली, तिनें समर्थसांप्रदायी व समर्थप्रेमी लोकांत बरीच खळबळ उडवून दिली. त्यावेळीं फाटक यांना तोंड देण्याकरितां ह्मणून वैद्य यांनीं इंदूरच्या 'आत्मबोध' मासिकांतून 'समर्थांची शिकवणूक' या नांवाचा एक विस्तृत लेख लिहिला तोच पुढें पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्यांत आला. यांत वैद्य यांनीं राजकारण शब्दाचा वास्तविक अर्थ काय, समर्थांनीं तो किती यथार्थतेनें वापरला, छत्रपति शिवाजी महाराजांचे गुरु होऊन राजकारणांत त्यांनीं प्रत्यक्ष किती भाग घेतला, तेजस्वीपणामुळें समाजावर त्यांचें किती वजन होतें, देशधर्मोद्धाराच्या बाबतींत त्यांची शिकवणूक कशी होती वगैरे गोष्टींचें मुद्देसूद रीतीनें विवरण करून फाटकांच्या विरुद्ध उत्तरपक्ष उत्तम रीतीनें केला आहे.

धर्म, नीति, समाज व शिक्षणविषयक असें मध्यभारतांत निर्माण झालेलें हें एवढेंच वाङ्मय होय. यांत बालोपयोगी वाङ्मय अत्यल्प असल्यानें त्याचा पृथक् परिचय करून न देतां तो एकंदर परिचयांतच करून देण्यांत आला आहे; तथापि माहितीसाठीं तसा निर्देश मात्र ज्या त्या ठिकाणीं स्पष्टपणें केला गेला आहे.

# प्रकरण आठवें

# आध्यात्मिक वेदांतपर व तत्त्वज्ञानविषयक वाङ्मय

किमस्तं किं ध्वस्तं किमु विलुलितं किन्नुगलितं ।
विशीर्णा चागीर्णा ननु सपदि जीर्णं किमथ वा ॥
अमन्दे स्वच्छन्दे निरुपम निजानन्द जलधौ ।
मयि स्वान्ते शान्ते जगदिदमशेषं न कलये ॥

## पूर्व कथन

अध्यात्म ह्मणजे आत्मा व अनात्मा यांचें विवरण, वेदांत ह्मणजे जीव, ईश्वर आणि ब्रह्म यांचें विवरण व तत्त्वज्ञान ह्मणजे सजीव-निर्जीवाचा किंवा दृश्यादृश्याचा विचार असें जरी तिन्ही विषयांचें सामान्यतः स्पष्टीकरण करतां येत असलें तरी ते तिन्ही विषय प्रायः एकाच स्वरूपाचे आहेत, किंबहुना यांतले अध्यात्म व तत्त्वज्ञान हे दोन विषय तर थोड्याफार फरकानें एकच असल्याचेंही ह्मणतां येईल. कित्येकांच्या मतें इंग्रजींत ज्याला फिलॉसफी असें ह्मणतात तेंच वास्तविक आपलें तत्त्वज्ञान होय; परंतु पूर्वकाळीं आपल्या भारतीयांनीं अध्यात्म व तत्त्वज्ञान यांत कांहीं तात्त्विक भेद करून त्या दोहोंचा समन्वय ज्यांत झालेला आहे त्याला ब्रह्मज्ञान असें तिसरेंच नांव दिलें

असल्याचें दिसून येतें. अध्यात्म व तत्त्वज्ञान यांत विशेषेंकरून वेदादि ग्रंथांतील ज्ञानाची माहिती मिळते तशी वेदांतांत उपनिषदांतर्गत ज्ञानाची माहिती मिळते. शास्त्रज्ञ लोक या वेदांताची षड्दर्शनांत गणना करतात व त्याचा प्रकृतिप्रत्ययार्थ वेदनाचा अंत म्हणजे अखेरचें जाणणें, अर्थात् जें जाणल्यानें पुढें जाणण्यास योग्य असें कांहींच उरत नाहीं, असा दाखवितात. आपल्या धर्मप्रधान भारतवर्षांत या विषयत्रयीचा ( अध्यात्म, वेदांत व तत्त्वज्ञान ) धर्माशींच सतत संबंध राहून पूर्वकालीन पूर्णप्रज्ञ ऋषिमुनींनीं त्यावर बहुमोल व बहुसंख्य वाङ्मय निर्माण करून ठेविलें आहे. ज्या काळीं त्यांनीं हें वाङ्मय निर्माण केलें त्या काळीं आज उन्नतीच्या शिखरावर आरूढ झालेलीं पाश्चात्य राष्ट्रें पुरती जन्मही पावलेलीं नव्हतीं. " आम्हांस जिवंतपणीं या आर्य ग्रंथांचा परिचय झाला हें आमचें महद्भाग्यच होय " असे धन्योद्गार जर्मन पंडित शोपनहार व डॉ. मोक्षमुल्लर यांनीं ज्या ग्रंथां-विषयीं मुक्तकंठानें काढले आहेत ते भारतीयांचे तत्त्वतः अध्यात्म व वेदांत शास्त्रांचे केवळ सागरच असलेले वेद व उपनिषद् ग्रंथ आणि सुविद्य अशा सर्व विद्यमान राष्ट्रांनीं ज्या ग्रंथापुढें आदरानें मान वांकवून आपापल्या भाषांतून त्याचीं सभाष्य भाषांतरें करून घेण्यांत भूषण मानलें आहे तो भारतीय तत्त्वज्ञानाचा केवळ चिंतामणीच असलेला ' श्री भगवद्गीता ' ग्रंथ हीं भारतवर्षाचीं अनुपम व अनर्घ्य ग्रंथरत्नें त्या काळच्याच वाङ्मयभांडारांतील होत. हल्लीं पाश्चात्य राष्ट्रांत जशी भौतिक शास्त्राची अभूतपूर्व प्रगति होत आहे तशी अध्यात्म, वेदांत व तत्त्वज्ञान या विषयांची प्रगति भारतवर्षांत त्याकाळीं झालेली होती. या विषयांचें अध्ययन, मनन व चिंतन त्या काळीं इतकें वाढलें होतें कीं, पुरुषांबरोबर स्त्रियाही या विषयांत पारंगत होऊं लागल्या होत्या व तत्संबंधींचे विचार अहोरात्र ऐकून ऐकून विद्वानांच्या घरांतील पिंजऱ्यांतल्या राघूमैनाही त्यावर चर्चा करूं लागल्या होत्या ! अस्तु.

प्राचीन काळांतील ऋषिमुनि सोडून ऐतिहासिक काळाच्या आरंभापासून तों आजपर्यंत एतद्विषयांत चिरस्मरणीय कामगिरी करणाऱ्या भारतीय महापुरुषांची मोजदाद करूं गेल्यास त्यांत श्रीआद्यशंकराचार्य, रामानुजाचार्य, सायणाचार्य, वल्लभाचार्य, ज्ञानेश्वर, तुकोबाराय, रामदास, रामकृष्ण परमहंस, रामतीर्थ, विवेकानंद व लोकमान्य टिळक एवढ्यांचीं नांवें प्रामुख्यानें घ्यावीं लागतील. या सर्वांचीच व्यक्तिगत कामगिरी वैशिष्ट्यपूर्ण आहे. आपल्याकडे अशा प्रकारें पूर्वी अध्यात्म, वेदांत व तत्त्वज्ञान या विषयांची उन्नति झालेली असली तरी हल्लीं मात्र आपल्या लोकांची धर्माप्रमाणेंच याही विषयांवर श्रद्धा राहिलेली नाहीं; इतकेंच नव्हे तर या विषयांचा उघडउघड उपहासही होऊं लागला आहे! ज्या भारतीय वेदांताचे झेंडे गेल्या शतकांत स्वामी विवेकानंदांकडून अमेरिकेसारख्या सुधारलेल्या उन्नत राष्ट्रांत फडकले व इंग्लंडांतही महाराणी मेरीसारख्या थोरामोठ्यांना शिशिरकुमाराच्या कादंबरीइतकीच त्या विवेकानंदांचीं वेदांतपर व्याख्यानें प्रिय झालीं त्याच वेदांताविषयीं आपलेच अलीकडचे पाखंडी लोक अनादर दाखवून सर्व वेदांत्यांसंबंधांत " कलौ वेदान्तिनो भान्ति फाल्गुने बालका इव " अशा प्रकारचीं सर्रास उपहासात्मक सुभाषितें ऐकवितात हा काळाचा विपरित महिमाच होय! परंतु एवढें खरें कीं, या पाखंड्यांत कणादाप्रमाणें शेवटपर्यंत एकबाणी नास्तिक रहाणारे लोक फारच थोडे निपजतात. कारण संसारतापत्रयानें पीडित झाल्यावर त्यांतील बरेचसे लोक आपण होऊनच वेदांताचा आश्रय घेतांना व त्यापासून शेवटीं समाधान पावतांना दिसून येतात. अस्तु. आतां मराठींत आधुनिक गद्यामध्यें अध्यात्म, वेदांत व तत्त्वज्ञान या विषयांवर झालेल्या वाङ्मयनिर्मितीकडे वळूं. महाराष्ट्रांतला या विषयावरचा अगदीं पहिला आधुनिक ग्रंथ 'आत्म्याचे अमरत्त्वाविषयीं' हा असल्याचें दिसून येतें. हा ग्रंथ गोविंद गंगाधर नांवाच्या विद्वानानें सन १८५५ मध्यें

लिहिला असून यांत अध्यात्म, वेदांत व तत्वज्ञान या तिन्हींची चर्चा करण्यांत आलेली आहे त्यावरून आधुनिक गद्य वाङ्मयांत या तिन्ही विषयांवरच्या ग्रंथरचनेस एकसमयावच्छेदेंकरूनच नव्हे तर अगदीं एकाच कृतिद्वारें सुरुवात झालेली आहे, ही गोष्ट येथें नमूद करण्या-सारखी आहे. त्यानंतर महामहोपाध्याय वासुदेवशास्त्री अभ्यंकर, काशीनाथ वामन लेले, विष्णु वामन बापट, राजारामशास्त्री बोडस, शंकर पांडुरंग पंडित, भीमाचार्य झळकीकर, खंडो कृष्ण गर्दे, सीताराम महादेव फडके, नारायण लक्ष्मण फडके, परशुराम गोविंद चिंचाळकर, सदाशिवशास्त्री भिडे, प्रो. चिंतामण गंगाधर भानु, प्रो. वामन मल्हार जोशी वगैरे मंडळींनीं पुढें येऊन संस्कृतांतील एतद्विषयक सर्व ग्रंथांचीं सुंदर भाषांतरें करून व थोडेसे स्वतंत्र ग्रंथही रचून महाराष्ट्र वाङ्मयभांडारात उत्तम भर घालण्याचें कार्य केलें आहे. त्यांतच लो. टिळकांनीं 'गीतारहस्य' हा एकमेव अपूर्व ग्रंथ रचून जी भर घातली आहे ती निःसंदेह अतिशय मोलाची होय! मध्य-भारतांत मात्र आतांपावेतों एतद्विषयक वाङ्मयनिर्मिति हातांच्या बोटांवर मोजण्याइतकीच अल्प झालेली आहे; तथापि ती महाराष्ट्राच्या स्तुतीस सर्वथैव पात्र होऊन उच्च व वैशिष्ट्यपूर्ण ठरली आहे. त्या वाङ्मय-निर्मितीचा आरंभ ग्वाल्हेरचे सरदार रामराव कृष्ण जटार यांच्या सन १८९७ मध्यें प्रसिद्ध झालेल्या 'अव्यक्तबोध' या ग्रंथापासून झालेला दिसतो. त्यानंतर याच सरदार जटारांचें 'स्वानंद साम्राज्य', रामचंद्र बळवंत डोंगरे यांचें 'श्री अनुभवामृत', प्रो. शांताराम अनंत देसाई यांचे कित्येक लघु ग्रंथ, केशव गणेश आठले यांचें 'श्रीदासबोध गूढार्थदीपिका' वगैरे ग्रंथ यथावसर प्रसिद्ध झाले आहेत. त्यांचा परिचय आतां विषयानुसार करून देऊं; परंतु त्या परिचयाला सुरुवात करण्यापूर्वी येथें हें सांगून ठेवणें अवश्य आहे कीं, अध्यात्म, वेदांत व तत्त्वज्ञान हे सर्व विषय पूर्वी सांगितल्याप्रमाणें थोड्याफार फरकानें

एकच असल्यामुळें अर्थात्‌च या विषयांवरील ग्रंथांचें वर्गीकरण स्थूल मानानें करावें लागणार आहे, त्यावरून पुढें यांतील अमुक ग्रंथ या विषयाच्या ऐवजीं त्या विषयाच्या वर्गात जाणें योग्य होतें, असा कोठेंकोठें वाचकांत विचारभिन्नत्वामुळें मतभेद होणें संभवनीय आहे.

**आध्यात्मिक ग्रंथ**

मध्यभारतांतील आतांपावेतोंचे आध्यात्मिक ग्रंथ एकंदर सहा होत. त्यांपैकीं पहिले तीन ग्रंथ प्रो. शांताराम अनंत देसाई यांनीं लिहिलेले आहेत. त्यांतील पहिला ग्रंथ 'गहन विषयावर अल्प विचार–भाग पहिला' सन १९०६ मध्यें प्रसिद्ध झाला. प्रो. देसाई यांचा पाश्चात्य व पौर्वात्य अध्यात्मज्ञान, वेदांत व तत्वज्ञान यांवरील व्यासंग खरोखरच दांडगा असून त्यांनीं एतद्विषयक निर्माण केलेलें वाङ्मयही उच्च व विचारप्रवर्तक असें आहे. 'गहन विषयावर अल्प विचार' या त्यांच्या ग्रंथांत प्राच्य ज्ञानमार्ग आणि पाश्चात्य ज्ञानमार्ग, पदार्थविज्ञान शास्त्र विरुद्ध खिस्ती धर्म व ब्राह्म धर्म आणि वैदिक धर्म असे तीन निबंध संकलित केलेले असून ते निबंध अगोदर प्रो. देसाई यांनीं आपल्या 'विद्यार्थी' मासिकांतून प्रसिद्ध केले होते. आपल्या धर्मग्रंथांत परमार्थप्राप्तीचे एकंदर तीन मार्ग दाखविले गेले आहेत, त्यांतील ज्ञानमार्ग हा एक होय. या ज्ञानमार्गाची व पाश्चात्य ज्ञानमार्गाची सप्रमाण तुलना या ग्रंथाच्या पहिल्या निबंधांत प्रो. देसाई यांनीं केलेली आहे. त्यावरून प्राच्य ज्ञानमार्ग अध्यात्मवादाचा पुरस्कार करणारा आहे तर पाश्चात्य ज्ञानमार्ग भौतिक शास्त्राला प्राधान्य देणारा आहे, ही गोष्ट स्पष्टपणें कळून येते. नंतर दुसऱ्या निबंधांतही हाच विषय पुनः चर्चेसाठीं घेण्यांत आला आहे व त्याकरितां एका बाजूस पदार्थविज्ञान शास्त्र घेऊन दुसऱ्या बाजूस कॅथोलिक व प्रोटेस्टंट चर्च यांच्यांतील वादाचें कारण घेतलेलें आहे. यांतील चर्चा अभिनव विचारयुक्त असून ती

बरीच मननीयही आहे. शेवटीं तिसऱ्या निबंधांत ब्राह्म धर्म आणि वैदिक धर्म यांचा परस्पर संबंध काय ? याचा विचार केला आहे व त्यांत त्यांनीं श्री आद्य शंकराचार्यांचा उपदिष्ट अथवा प्रतिपादित असा जो तत्वविषयक व आचरणाविषयक हिंदू धर्म तोच खास वैदिक धर्म होय, असें मानिलें आहे. हा निबंध विशेष चिकित्सापूर्ण असून त्यांतील विचारसरणीही प्रांजल आहे. यानंतर 'पाश्चात्य पंडित आणि वैदिक पारमार्थिक विचार' हा प्रो. देसाई यांचा दुसरा ग्रंथ प्रसिद्ध झाला. हाही प्रथम 'विद्यार्थी' मासिकांतून निबंधरूपानें प्रकाशित झाला होता. पहिल्या ग्रंथासारखा हा ग्रंथ चर्चात्मक नसून परिचयात्मक असा आहे. वैदिक वाङ्मयांतून जागोजागीं अनेक पारमार्थिक विचार प्रकट झालेले आहेत, त्यांतील कांहीं उद्‍बोधक विचार संकलित करून त्यांचें सुबोध विवेचन यांत केलेलें आहे. पुढें 'उपनिषदांतील वचनांचा संग्रह' हा प्रो. देसाई यांचा तिसरा ग्रंथ सन १९१० मध्यें प्रसिद्ध झाला. हाही अगोदर निबंधरूपानें 'विद्यार्थी' मासिकांतून बाहेर पडला होता. आर्यांच्या आत्मानात्मविचारांचें खरें प्रचंड भांडार ह्मणजे उपनिषद् ग्रंथ होत. उपनिषदें अनेक आहेत; परंतु ब्रह्मसूत्रांत ज्यांचा वारंवार उल्लेख येतो अशीं उपनिषदें केवळ १४ च आहेत. त्यांतील बृहदारण्यक हें एक होय. या बृहदारण्यकोपनिषदांत ब्रह्मासंबंधीं वचनें जेवढीं आहेत त्यांचा नुसता संग्रहच नव्हे तर, त्यांचें निरूपणही प्रो. देसाई यांनीं आपल्या या ग्रंथांत केलें आहे. प्रथम उपनिषद्वचन, नंतर त्यावरील शांकरभाष्य व शेवटीं त्याचा मराठींत सरळ अर्थ याप्रमाणें प्रस्तुत ग्रंथाची रचना असून क्वचित् स्थळीं अर्थाच्या अधिक स्पष्टीकरणार्थ आनंदगिरीच्या टीकेंतील वाक्यैंही उद्‍धृत केलेलीं आहेत. शिवाय अद्वैत सिद्धांत शिकणाऱ्यास पहिल्यापासून शेवटपर्यंत कोणकोणत्या गोष्टींचें ज्ञान करून घेणें अवश्य आहे याचेंही अखेरीस यथानुक्रम वर्णन केलेलें

आहे. एकंदरींत ब्रह्मजिज्ञासूंना हा ग्रंथ विशेष बोधप्रद होण्यासारखा आहे. पुढें ' अनुभवामृत ' व ' श्रीदासबोध--गूढार्थदीपिका ' हे दोन विवरणात्मक टीकाग्रंथ प्रसिद्ध झाले. हे दोन्ही ग्रंथ फार महत्त्वाचे आहेत. ' अनुभवामृत ' हा ग्रंथ रामचंद्र बळवंत डोंगरे यांनीं लिहिला असून तो जवळजवळ आठशें पानांचा आहे. ज्ञानेश्वर महाराजांचा 'श्रीअमृतानुभव ' हा उपनिषदोक्त तत्त्वप्रतिपादक असा आध्यात्मिक ग्रंथ उच्च प्रतीचा जरी असला तरी सामान्य वाचकांस तो बराच दुर्बोध आहे ह्मणून तो सुबोध होऊन त्यातील मर्म त्यांना कळण्याकरितां डोंगरे यांनीं प्रस्तुत प्रयत्न केला आहे व त्यांत त्यांना बरेंच यशही आलें आहे. ' श्रीदासबोध-गूढार्थदीपिका ' हा ग्रंथ केशव गणेश ऊर्फ केशवबुवा आठले यांनीं लिहिला असून तो सन १९३० मध्यें प्रसिद्ध झाला आहे. हा ग्रंथ बराच मोठा ह्मणजे सुमारें १०५० पृष्ठांचा आहे. समर्थांच्या ' श्रीदासबोधा ' वर आजपर्यंत जेवढे टीकाग्रंथ लिहिले गेले आहेत त्या सर्वांत हा ग्रंथ अधिक सरस असल्याबद्दल तज्ञांचा अभिप्राय आहे. बुवासाहेबांनीं या टीकेकरितां खास आपल्या पणजोबांच्या संग्रही असलेल्या ' श्रीदासबोधाच्या ' एका जुन्या प्रतीचा उपयोग केला असून ती प्रत कल्याणस्वामींच्या प्रतीशीं बरीच जुळती आहे व कांहीं ठिकाणीं त्यांत जो फरक आहे तो वाचकांसमोर ठेवण्याकरितां मुद्दाम त्यांचे स्वतंत्र परिशिष्टही या ग्रंथाच्या शेवटीं जोडण्यांत आलें आहे. बुवासाहेब हे अध्यात्मज्ञानांत अगोदरच पारंगत असल्यामुळें ' श्रीदासबोधा ' वरील त्यांची ही टीका विशेष प्रामाणिक व महत्त्वाची व्हावी हें साहजिकच आहे. प्रस्तुत ग्रंथाला प्रो. अनंत वामन वाकणकर यांनीं लहानशी प्रस्तावना लिहिली आहे. तींत त्यांनीं कांहीं ऐतिहासिक महत्वाच्या मुद्यांचें सुंदर विवेचन केलेलें आहे. या ' श्रीदासबोध-गूढार्थदीपिके ' बरोबरच ' चिरस्मरणीय बैचे ' नामक एक लघुग्रंथ सन १९३० मध्यें प्रसिद्ध झाला. सुप्रसिद्ध

कान्हेरेशास्त्री यांची सन १९२९ मध्यें इंदुरास 'श्रीभगवद्गीतेवर कांहीं प्रवचनें झालीं होतीं त्या प्रवचनांतील कांहीं महत्वाचे वेचे इंदूरचे शिवराम श्रीकृष्ण पंडित यांनीं मुद्दाम टिपून घेऊन त्यांचें संकलन या ग्रंथांत केलें आहे. शास्त्रीबुवांचा वेदांतावरील अधिकार, त्यांची मोहक भाषाशैली व अध्यात्मविषयाची सांसारिक विषयाशीं असलेली सांगड अनेक दृष्टांतद्वारें पटवून देण्याची हातवटी हे त्रिविध गुण खरोखरच असामान्य आहेत. या ग्रंथांत संकलित केलेलीं त्यांचीं वचनें अध्यात्मविचाराचीं असून तीं सर्व मननीय आहेत. येथें जातां जातां याच सदरांत आणखी एका ग्रंथाचा नामनिर्देश करणें अस्थानी होत असलें तरी तो करणें अवश्य आहे. हा ग्रंथ म्हणजे सन १९२६ मध्यें प्रसिद्ध झालेला खेडीघाटचे स्वामी कृष्णानंदसरस्वतीकृत 'परमार्थसारामृत अथवा भवरोग-नाशक मात्रा' हा होय. या ग्रंथांत कांहीं सुंदर आध्यात्मिक पदें संकलित केलेलीं आहेत. वास्तविक काव्य वाङ्मयाच्या प्रकरणांतच या ग्रंथाचा निर्देश करणें उचित होतें; परंतु तो तेथें करावयाचा चुकीनें राहून गेल्यामुळें येथें करणें भाग झालें आहे.

### वेदांतपर ग्रंथ

मध्यभारतांतील आतांपावेतोंचे वेदांतपर ग्रंथ म्हणजे 'अव्यक्तबोध', 'स्वानंदसाम्राज्य', आनंदपदावर चौदा चवकड्याचें राज्य' व 'वेदांत समजुतीपर पत्रें' हे मोजके चारच होत. यांतील पहिले दोन सरदार रामराव कृष्ण जटार यांनीं लिहिलेले आहेत. 'अव्यक्तबोधा'ची पहिली आवृत्ति सन १८९७ मध्यें निघून 'स्वानंदसाम्राज्या'च्या दोन खंडांच्या तशा आवृत्त्या अनुक्रमें सन १८९९ व सन १९०२ मध्यें निघाल्या आणि नंतर या सर्वांचीच एक संयुक्तावृत्ति सन १९२५ मध्यें प्रसिद्ध झाली. वेदांताचा जुन्या पद्धतीनें अभ्यास करणाऱ्यांत या ग्रंथांची विशेष मान्यता आहे. 'अव्यक्तबोध' हा

ग्रंथ लहान आहे. व्यक्त नमणारें तें अव्यक्त अर्थात् अदृश्य किंवा गुप्त असं जें परब्रह्म ऊर्फ ईश्वर त्याचा बोध ह्मणजे ज्ञान, अर्थात् ईश्वराचें ज्ञान करून देणें हा या ग्रंथाच्या नांवावरून स्पष्ट होणारा त्याचा मूळ विषय होय. हा विषय अति गहन आहे; तथापि सरदार जटार यांनीं आपल्या या लहानशा ग्रंथांत अनेक सोप्या व्यावहारिक दृष्टांतांनीं तो बराच सुलभ करून पुढें मांडला आहे. ग्रंथाच्या अगदीं आरंभींच अनंत वृक्षाचें एक सुंदर चित्र दिलें आहे त्यावरून जीव-तत्त्वाची व ब्रह्मतत्त्वाची ओळख होऊन श्रीमद्भगवद्गीतेंतील ' ऊर्ध्वमूलमधः शाखं ' ह्मणून वर्णिलेल्या वृक्षाची कल्पना मनांत उत्तम रीतीनें बिंबते. पुरुष ( परमात्मा ), प्रकृति ( माया ), नाम, रूप, कारण, श्रुति व उपसंहार असे या ग्रंथाचे सात विभाग ( प्रकरणें ) आहेत; त्यांतले पहिले चारच विभाग मुख्य आहेत. पुरुष विभागांत सत्, चित्, आणि आनंद या त्रिगुणांचें ऐक्यरूप सिद्ध केलें आहे व नंतर प्रकृति विभागांत मायेचें स्वरूप सांगून ॐ नामाचा महिमा विस्तारानें वर्णिला आहे. तदुपरांत बिंदूपासून रेषा व आकृति उत्पन्न होतात आणि त्या सर्वांचा बिंदु शब्दांतच समावेश होतो हें गणितशास्त्राच्या दृष्टीनें स्पष्ट करून दाखविलें आहे; तथापि त्यावरून गणितशास्त्राच्या व्याख्यांची कशी लटपट उडते हें पहावयास मिळून अद्वैत सिद्धांताची व्यापकताही कळून येते. ॐ या नामाचें या ग्रंथांत केलेलें विवरण खरोखरच मौजेचें आहे. त्यांत ॐ हें ओं असें न लिहिण्याचें कारण सांगून त्याचा आकार आठ तुकड्यांनीं कसा तयार होतो हें दाखविलें आहे व त्याच आठ तुकड्यांत स्वर, वर्ण व अंक हे तर राहोच पण जारज, अंडज, स्वेदज व उद्भिज यांचे आकारदेखील कसे व्याप्त आहेत तें निरनिराळ्या आकृतींनीं स्पष्ट करून दाखविलें आहे. यानंतरच्या पुढच्या विभागांत प्रकृतिपुरुषांच्या गुणांचा ठसा मनावर यथार्थतेनें

उमटण्यासाठीं नाटकामें रूपक रचण्यांत आलें आहे. वास्तविक वेदांताचा विषय हा अनंताचें अनंतत्व प्रतिपादन करण्याचा आहे, अर्थात् हा एवढा गहन विषय केवळ या ग्रंथाच्या १०० पृष्ठांत संकलित करणें ह्मणजे समुद्राची कल्पना संध्येच्या पळींतील पाण्यावरून करून देण्यासारखें आहे ह्मणून सरदार जठार यांनीं मुद्दाम नंतर या ग्रंथाच्या दहापट अधिक पृष्ठसंख्या असणारा 'स्वानंद साम्राज्य' हा द्विखंड ग्रंथ रचून त्यांत तोच विषय पुनः यथाविस्तार प्रतिपादिला आहे. याच्या पहिल्या खंडांत ब्रह्मानंद प्रदेश, मायानंद प्रदेश, ईशानंद प्रदेश, सृष्ट्यानंद प्रदेश आणि जीवानंद प्रदेश अशीं पांच प्रकरणें आहेत. ब्रह्मानंद प्रदेशांत ब्रह्मस्वरूप वर्णन, ब्रह्ममाया, ॐकाराचें ऐक्य व त्याची स्वरूपसिद्धि इ. गोष्टी दिल्या असून मायानंद प्रदेशांत मायेचें स्वरूप, तिचें गुणधर्मशक्तिनामरूप व विभूति आणि ॐ श्रीबीजाचें स्वरूपैक्य इ. गोष्टी वर्णिल्या आहेत. नंतर ईशानंद प्रदेशांत ईश्वराचें स्वरूपवर्णन, त्याचें सर्वेश्वरादि अखंडषड्गुणैश्वर्य, विराट देहावर लोकरचना व त्याच्या स्वतंत्र अवताराची सिद्धि इ. गोष्टी देऊन सृष्ट्यानंद प्रदेशांत सृष्टीचें आपातरमणीय त्रिविध स्वरूप, तिची उत्पत्तिस्थितिलयघटना, तिची कर्मप्रधानता व त्यामुळें जीवेश्वरसंबंध, ईश्वर सृष्टि, ॐकाराचें स्वरूपैक्य आणि लयचिंतन इ. गोष्टी विवेचिल्या आहेत. व शेवटीं जीवानंद प्रदेशांत राजा शीलनिधि व परमहंस या गुरुशिष्यांतील संवादानें जीवाचें स्वरूप, त्याच्या शोधार्थ तीन कक्षा, एकोणीस त्रिपुटी, देहत्रय, अवस्थात्रय, त्रिविध कर्म, प्रारब्धप्रयत्न वाद, पुनर्जन्ममरणसिद्धि व संसारात्मक लिंगशरीर यांचा विचार करून पुढें जीवाचें जीवनचरित्र दिलें आहे. त्यांत प्रत्येक वाचकाला आपल्या चरित्राचा आदर्श पहातां येण्यासारखा आहे. एकंदरींत अशा प्रकारें 'स्वानंदसाम्राज्या'च्या या पूर्वखंडांत जीवाचे गर्भप्रदेशापासून तों मरणापर्यंतचे सर्व कौटुंबिक

व्यवहार वर्णिले आहेत. पुढें 'स्वानंदसाम्राज्या 'च्या उत्तर खंडांत साधकानंद प्रदेश, कर्मानंद प्रदेश, तपानंद प्रदेश, भक्त्यानंद प्रदेश व ज्ञानानंद प्रदेश अशीं पांच प्रकरणें दिलीं आहेत. हीं सर्व प्रकरणें शीलनिधि–परमहंस–संवादरूप आहेत. साधकानंद प्रदेशांत राजाची तीव्र विरागोक्ति, गुरूचें सांत्वन, ब्रह्मशिखराची रचना, सिद्धांचीं व साधकांचीं लक्षणें, राहणी व अधिकार, कर्म, भक्ति व ज्ञान यांचे साधनाधिकारी आणि त्यांचीं कर्तव्यसाधनें इ. गोष्टी देऊन कर्मानंद प्रदेशांत वर्णधर्मोक्त कर्मांचे सहा प्रकार, निष्काम कर्माची प्रधानता, सात्त्विक–राजस–तामस मनोवृत्तींच्या भावना व त्यांत येणाऱ्या वेधशक्तीचीं साधनें, गुणधर्मानुरूप वर्णव्यवस्थेच्या प्रचलित शंकेचें समाधान, जातीस जन्मच कारण, केवळ कर्मानें मोक्षाची असिद्धि अतएव उपासनेची अपेक्षा इ. गोष्टी दिल्या आहेत. पुढें तपानंद प्रदेशांत तपसाधनांगाचीं १० लक्षणें, वाङ्मय जपोपासना, वर्णांची बीजरूपता, भगवन्नामाचें स्मरणसंकीर्तन व वेदांतपठन इ. गोष्टी देऊन भक्त्यानंद प्रदेशांत ध्यानलक्षण, निर्गुण ब्रह्माच्या सगुणाकारतेची अपूर्व सिद्धि, जुन्या कणादभट्टादि न्यायवाद्यांचे व नव्या पाश्चात्य रसायनशास्त्रवादी स्पेन्सरादिकांचें समूळ मतखंडन करणारी परमाणुवादाची अभिनव मीमांसा, ध्यानयोगांगसाधनानंतर राजपुत्रास वैराग्यधारणेनें भगवत्प्राप्ति होऊन झालेली कृतार्थता इ. गोष्टी दिल्या आहेत व शेवटीं ज्ञानानंद प्रदेशांत राजाची तीव्र ब्रह्मजिज्ञासा, अज्ञान व अहंकार यांचें स्वरूपभेद, वृत्तीच्या स्वरूपावस्था, आत्मानुभूतीनें राजाची कृतार्थता, पिंडब्रह्मांडाची ऐक्यानुभूति, आरूढ भावनेचा कल्लोळ, जीवन्मुक्ताच्या त्रिविधावस्था व वृत्तीच्या सप्तभूमिका इ. गोष्टी दिल्या आहेत. एकंदरींत अशा प्रकारें विचारप्रधान पूर्वखंड व क्रियाप्रधान ऊर्फ साधनप्रधान उत्तरखंड असलेला हा 'स्वानंद साम्राज्य' ग्रंथ मोठा महत्त्वाचा आहे. यांतील ॐकाराची सर्व-

व्यापकता व सर्वस्वरूपता आणि परमाणुमीमांसा हे दोन सिद्धांत तर केवळ अपूर्व—अभिनवच आहेत; तथापि ते इतर प्राचीन सिद्धांतांना विरोधक मात्र नाहींत. पनवेलचे ' नवयुगधर्म ' कार सदाशिव कृष्ण फडके यांनीं ' यशवंत ' मासिकाच्या एप्रिल-मे सन १९३० च्या विशेषांकांत लिहिलेल्या धर्म नामक लेखामध्यें श्रद्धावंत जिज्ञासूंना हा ' स्वानंदसाम्राज्य ' ग्रंथ लो. टिळकांच्या ' गीतारहस्या ' पेक्षां अधिक हृदयस्पर्शी वाटण्याचा जास्त संभव आहे, असे प्रशंसोद्गार काढले आहेत ते यथायोग्य होत. या ' स्वानंदसाम्राज्या ' नंतर ' आनंद-पदावर चौदा चवकड्यांचें राज्य ' हा देवास येथील भागीरथीबाई वैद्य यांनीं लिहिलेला ग्रंथ सन १९२८ मध्यें प्रसिद्ध झाला. हा ग्रंथ संवादरूप असून यांत भागीरथीबाई यांनीं आपले गुरु श्रीबलभीम महाराज देशमुख सेडकर यांस विचारलेले कांहीं गूढ वेदांतविषयक प्रश्न व त्यावर महाराजांनीं दिलेलीं समर्पक, मार्मिक व उद्बोधक उत्तरें ग्रथित केलेलीं आहेत. उत्तम मुमुक्षु, मध्यम मुमुक्षु, कनिष्ठ मुमुक्षु, लघु मुमुक्षु, सबोध मुमुक्षु अर्थात् साधक, सिद्ध लक्षणें, बद्ध मुमुक्षूस बोध, सबोध मुमुक्षूस प्रबोध, सबोध साधकास निजबोध व प्रेमलक्षणा भक्ति हीं या ग्रंथाचीं दहा प्रकरणें असून त्या प्रकरणाच्या नांवांवरूनच ग्रंथाच्या अंतरंगाविषयीं स्थूल कल्पना सहज होऊं शकते. ग्रंथांत विषय-प्रतिपादनामध्यें प्रमाणादाखल दासबोध, दीपरत्नाकर, रंगनाथी योगवासिष्ठ, तुकारामाची गाथा, एकनाथी भागवत ज्ञानमोदक इ. पारमार्थिक अद्वैत ग्रंथांतील कित्येक सुंदर वचनें ठिकठिकाणीं उद्धृत केलीं आहेत व शेवटीं ग्रंथकर्त्रीचें त्रोटक चरित्रही जोडलें आहे. मुमुक्षूंनीं हा ग्रंथ एक वेळ तरी अवश्य वाचण्यासारखा आहे. पुढें श्रीबलभीम महाराजांनीं आपल्या शिष्यवृंदाला वेळा या सहीनें जीं अनेक वेदांतविचारप्रदर्शक पत्रें लिहिलीं त्यांतील ३२ पत्रें निवडून घेऊन त्यांचा संग्रह ' श्रीसद्गुरु समर्थ बलभीम महाराज यांचीं

वेदांतसमजुतीपर पत्रें ' त्या नांवानें इंदूरचे शंकर काशीनाथ पानसे यांनीं सन १९३२ प्रसिद्ध केला. यांतील सर्व पत्रें प्रायः निरनिराळ्या व्यक्तींना उद्देशून लिहिलेलीं असलीं तरी तीं सर्वांनाच उद्बोधक होण्यासारखीं आहेत. संतांचे शब्द हे तत्त्वतः मुमुक्षूंच्या आत्मधनाचा ठेवाच होय. याचा अनुभव या ग्रंथांतील प्रतिपत्रावरून आल्यावांचून रहात नाहीं. ग्रंथारंभीं श्रीबलभीम महाराजांचें त्रोटक लघु चरित्रही देण्यांत आलें आहे.

## तत्वज्ञानविषयक ग्रंथ

तत्वज्ञानविषयक असा मध्यभारतांत आतांपावेतों एकच ग्रंथ प्रसिद्ध झालेला आढळतो तो म्हणजे प्रो. शांताराम अनंत देसाई यांचा ' वैदिक तत्वमीमांसा भाग १ ' हा सन १९०९ मध्यें प्रकाशित झालेला ग्रंथ होय. प्रथम वैदिक मीमांसेवर प्रो. देसाई यांनीं कांहीं लेख आपल्या ' विद्यार्थी ' मासिकांतून लिहिले होते त्यांपैकींच निवडक लेख एकत्र करून ते या ग्रंथांत उपोद्धात, परमार्थप्राप्तीचें साधन, श्रुतीचें प्रामाण्य, अनुमानादिकांचें प्रामाण्य, शून्य वादाचें खंडन, लोकायतिक वादाचें खंडन, विज्ञान वादाचें खंडन, क्षणभंगुर वादाचें खंडन, प्रधान वादाचें खंडन, परमाणु वादाचें खंडन, ईश्वरवादाचें खंडन याप्रमाणें विषयवार प्रकरण रूपांत क्रमशः जुळविण्यांत आले आहेत व त्यांतून मायावादी अद्वैत संप्रदायाचे प्रवर्तक श्री आद्य शंकराचार्य व परिणामवादी विशिष्टाद्वैत संप्रदायाचें प्रवर्तक श्रीरामानुजाचार्य यांच्यामध्यें कोणकोणत्या गोष्टींत मतैक्य असून शुद्ध तत्वमीमांसाविषयक अशा कोणकोणत्या गोष्टींत मतभेद आहेत यांचें सोपपत्तिक, मार्मिक विवेचन करण्यांत आलें आहे. प्रो. देसाई यांच्या व्यक्तिशः मताचा कल अद्वैताकडे अधिक आहे तरीही त्यांनीं या ग्रंथांत पक्षाभिनिवेशानें केवळ त्याच मताचें समर्थन केलेलें नाहीं तर दोन्ही

मतें योग्य स्वरूपांत वाचकांपुढें मांडिलीं आहेत. या ग्रंथाचा विषय एकंदरीत जितका गहन व व्यापक आहे तितकाच तो महत्वाचाही पण आहे; तथापि प्रो. देसाई यांनीं तो प्रकृत लघु ग्रंथांत शक्य तितका सुबोध रीतीनें विवेचिला आहे.

**अवांतर ग्रंथ**

वरील ग्रंथांशिवाय याच प्रकरणांत परिचय करून देण्यासारखे आणखी तीन लहान लहान ग्रंथ मध्यभारतांत आजवर प्रसिद्ध झाले आहेत. त्यांपैकीं दोन योगविषयक असून तिसरा चमत्कार—चर्चेसंबंधीं आहे. योग हा वास्तविक अध्यात्म व वेदांत यांचाच एक भाग होय. या योगावर योगविद्याविशारद विठ्ठलदेव सागरकर यांनीं एक निबंध ' आत्मबोध ' मासिकांतून लिहिला होता तोच पुढें सन १९३३ मध्यें ' अष्टांगयोगविधान ' या नांवानें स्वतंत्र लघु ग्रंथ रूपांत प्रसिद्ध झाला आहे. आमच्या माहितीप्रमाणें योगावर लिहिला गेलेला मराठींतला हाच पहिला ग्रंथ होय. योगाभ्यास करणाऱ्यास मधून मधून कसकसे अनुभव येतात हें या ग्रंथावरून क्रमशः समजून येऊन त्याच्या परिशीलनानें योगाभ्यासकांस भासणाऱ्या कित्येक अडचणी दूर होण्यासारख्या आहेत. मूळ हिंदी श्लोक व त्याचें मराठींत सुबोध विवरण अशी या ग्रंथाची मांडणी आहे; तथापि त्यांत आसनांच्या आकृतींची भर पडली असती तर हा ग्रंथ आहे त्यापेक्षांही अधिक सुबोध झाला असता. या ग्रंथापूर्वीं ' सर्वांगयोग—परीक्षणविषयक पत्रव्यवहार ' हा ग्रंथ ग्वाल्हेरचे श्रीधर रामचंद्र देसाई यांनीं प्रसिद्ध केला. ' नरनारायण ' ' श्रीमद्भगवद्गीतोपनिषद् ' व ' दिव्यदृष्टि ' या आपल्या पुस्तकांत मायानंद चैतन्य यांनीं कर्म, भक्ति, ज्ञान इ० योगांतील स्वतःचे प्रकट केलेले सिद्धांत अभंगांत गोवून ते 'सर्वांगयोग' नांवाच्या पुस्तकद्वारें प्रकाशित केले आहेत. या पुस्तकाचें परशुरामान्ते-वासी यांनीं अमळनेरच्या ' तत्त्वज्ञान मंदिर ' मासिकांतून जें परीक्षण

केलें तें कठोर वाटून देशाई यांनीं उक्त मासिकाच्या संपादकाशीं बराच पत्रव्यवहार केला तो सर्व या 'सर्वांगयोग-परीक्षणविषयक पत्रव्यवहार' पुस्तकांत दिलेला आहे. हा पत्रव्यवहार अवश्य वाचण्यासारखा आहे. वस्तुतः चमत्कार-चर्चेवरील 'चमत्कार निर्णय' हें एकच पुस्तक मराठींत झालें असून तें मायानंद चैतन्य यांनीं लिहून सन १९२७ मध्यें प्रसिद्ध केलें आहे. श्रुतिकालापासून आजपर्यंत अनेक ऋषि, मुनि, कवि इत्यादिकांनीं आपापल्या ग्रंथांतून चमत्कारांचें वर्णन केलेलें आहे; परंतु चमत्कार या संज्ञेनें लोकांत रूढ असलेल्या गोष्टीचा विवेचक बुद्धीनें विशेष विचार करून निर्णय करण्याचा प्रयत्न मात्र पूर्वी आपलेकडे कधींच केला गेला नव्हता तो मायानंद चैतन्य यांनीं या पुस्तकद्वारें केला आहे. सत्वगुणप्रधान मनुष्याची वृत्ति सामान्यतः यथार्थ ज्ञानाकडे असल्यामुळें तो चमत्काराकडे न वळतां ज्ञानाकडेच वळतो अर्थात् अशा पुरुषाची वृत्ति चमत्कारसामर्थ्यात न गुंततां ती ज्ञानाकडेच वळावी हें साहजिक आहे. याच ज्ञानाचें विवेचन मायानंद चैतन्य यांनीं प्रस्तुत पुस्तकांत केलें आहे.

अस्तु. येणेंप्रमाणें आतांपावेतों आध्यात्मिक, वेदांतपर व तत्वज्ञानविषयक वाङ्मय मध्यभारतांत निर्माण झालेलें आहे. हें वाङ्मय अल्प असलें तरी तज्ञांकडून उच्च प्रतीचें ठरलें गेलें असल्यामुळें तें मध्यभारतास केव्हांही अभिमानास्पद वाटणें साहजिक आहे.

## प्रकरण नववें

# आरोग्यविषयक वाङ्मय

धर्मार्थकाममोक्षाणां मूलमुक्तं कलेवरं ।
तच्च सर्वार्थसंसिद्धे भवेद्यापि निरामयं ॥

—भावप्रकाश.

* * * *

शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम् ।

* * * *

देहीं आरोग्य नांदतें । भाग्य नाहीं त्यापरतें ॥

### पूर्वकथन

वरील उक्तींमध्यें निरनिराळ्या प्रकारांनीं आरोग्यमहिमा गाइलेला आहे तो सर्वथा यथार्थ होय. तेवत्या दीपज्योतीला जसें तैल तसें कर्तव्येच्छु किंवा कार्यप्रवण व्यक्तीला निरामय देह अत्यावश्यक आहे. आपल्या उपनिषद् ग्रंथांत बळाचा महिमा ठिकठिकाणीं गाइलेला आढळतो. त्या सर्वांचा इत्यर्थ ह्मटला ह्मणजे हाच होय कीं, पुरुषा-

र्थाची इमारत सदृढ शरीरावर उभारली जाते किंवा बाहेरील कांचेच्या स्वच्छतेप्रमाणें आंतल्या ज्योतीचा प्रकाश बाहेर पडतो तद्वत् आत्मज्योतीचा प्रकाश बाहेर पडावयाला शरीराचीही अशीच आवश्यकता आहे. यावरून शरीराची योग्य काळजी घेणें हें प्रत्येक मनुष्याचें प्रधान कर्तव्य ठरतें. वास्तविक शरीराची काळजी घेणें ह्मणजे आरोग्य राखणें होय. यासाठीं भारतीय विद्वानांनीं आरोग्याचें स्वतंत्र शास्त्रच निर्माण करून ठेविलें आहे. या शास्त्राचे आहार, व्यायाम, ब्रह्मचर्य, स्वच्छता, चिकित्सा, अनुपान, निदान, शुश्रूषा, विशिष्ट रोगनिवारण आदिबरोबरच मानवेतर प्राणिरोगचिकित्सा वगैरे अनेक शाखा आहेत व त्यांतील प्रत्येक शाखेवर ग्रंथनिर्मिति झालेली आहे. महाराष्ट्रांत मराठीमध्यें या शास्त्रांतील ग्रंथनिर्मितीला सुरुवात कृष्णशास्त्री भाटवडेकर यांच्या सन १८६३ मध्यें प्रसिद्ध झालेल्या संस्कृतानुवादित ' त्र्यंबकी ' पासून झाली असल्याचें दिसून येतें व त्यानंतर जवळजवळ दोन तपांनीं सन १८८६ मध्यें इंदूरचे अण्णाजी बल्लाळ बापट यांच्या ' ज्वर प्रकाश ' ग्रंथापासून मध्यभारतांत तशा प्रकारच्या ग्रंथनिर्मितीस सुरुवात झाली असल्याचें आढळून येतें. आतांपावेतोंची आरोग्यशास्त्रावरील मध्यभारतांतील ग्रंथसंख्या मोजूं जातां ती २५ पर्यंत सहज जाईल. त्यांतले अधिकसंख्य ग्रंथ इंदूरचे माजी स्टेट सर्जन डॉ. गोपाळ रामचंद्र तांबे व माजी पॅलेस सर्जन डॉ. भास्कर महादेव टेंबे या दोघांनीं लिहिलेले आहेत. त्या सर्वांचा आतां विषयवार परिचय करून देऊं.

### आरोग्यविषयक ग्रंथ

मध्यभारतांतील आतांपावेतोंच्या आरोग्यावरील वाङ्मयाकडे वळून पहातां त्यांतील पहिलीं दोन पुस्तकें अनुक्रमें सन १९१३ व १९१४ मध्यें प्रसिध्द झालीं असून तीं दोन्हीं डॉ. भास्कर महादेव टेंबे यांनींच लिहिलेलीं आहेत. हीं दोन्हीं पुस्तकें ह्मणजे ' आरोग्याविषयीं

दोन शब्द ' या पुस्तकाचे दोन भाग होत. पहिल्या पुस्तकाचें विषयानुसार खुलाशाचें नांव ' पाणी ' असें असून दुसऱ्या भागाचें तसें नांव ' व्यक्ति व आरोग्य ' असें आहे. पहिल्या भागांत पाण्यासंबंधीं प्रथम वैज्ञानिक चर्चा देऊन नंतर आरोग्यास आवश्यक अशा त्याच्या शुद्धतेसंबंधीं चिकित्सापूर्ण माहिती दिली आहे व दुसऱ्या भागांत प्रत्येक व्यक्तीनें आपल्या आरोग्याविषयीं कोणकोणत्या बाबतींत काय काय काळजी घ्यावयास पाहिजे याचें योग्य दिग्दर्शन केलें आहे. पुढें सन १९१५ मध्यें ' स्वास्थ्यसंरक्षण ' हें इंदूरच्या इंग्रजी शाळेंतील एक माजी शिक्षक रामचंद्र वामन गोगटे यांनीं लिहिलेलें पुस्तक मुंबईच्या ' मनोरंजक ग्रंथ प्रसारक मंडळीच्या पुस्तकमालें ' तून प्रसिद्ध झालें. म. गांधींच्या याच नांवाच्या गुजराथी पुस्तकाचें हें भाषांतर होय. यांतील महात्माजींच्या आरोग्यासंबंधींच्या सूचना स्वानुभवाच्या असल्यामुळें त्या सर्वांस उपयुक्त होण्यासारख्या आहेत. नंतर सन १९१७ मध्यें ' आरोग्यशास्त्र ' या नांवाचें डॉ. टेंबे यांचें पुस्तक ' इंदूर शास्त्रीय संस्थे ' च्या पुस्तकमालेचें पहिलें पुष्प म्हणून प्रसिद्ध झालें. प्रो. सत्यबोध बाळकृष्ण हुदलीकर, पुरुषोत्तम केशव कोतवाल व विनायक सीताराम सरवटे या त्रिवर्गाचें एक संपादक मंडळ कायम होऊन त्या मंडळाच्या पसंतीनें शास्त्रीय पद्धतीनें लिहिलेलीं आरोग्याविषयक पुस्तकें प्रकाशित करण्याचें कार्य या ' इंदूर शास्त्रीय संस्थे ' नें आरंभिलें. आतांपावेतों या संस्थेच्या पुस्तकमालेंतून पांच पुस्तकें प्रकाशित झालीं आहेत व तीं सर्व डॉ. टेंबे यांनींच लिहिलेलीं आहेत. सदरहू सर्व पुस्तकांचा परिचय याच प्रकरणांत विषयानुरोधानें योग्य स्थळीं करून देण्यांत आला आहे. ' आरोग्यशास्त्र ' या पुस्तकांत डॉ. टेंबे यांनीं आरोग्याचें शास्त्रीय महत्त्व आणि म्युनिसिपालिट्या व तत्सदृश अन्य संस्थांनीं व व्यक्तिमात्रानें गांवाच्या व स्वतःच्या आरोग्यरक्षणासंबंधीं काय काय गोष्टी केल्या पाहिजेत

याची माहिती उत्तम प्रकारें दिली आहे. पुढें सन १९२८ व १९२९ मध्यें ' विद्यार्थी व त्यांचें आरोग्य ' आणि ' चाळीशी उलटल्यावर ' हीं दोन पुस्तकें डॉ. टेंबे यांनीं लिहिलेलीं निर्दिष्ट पुस्तकमालेंतून प्रकाशित झालीं. हीं दोन्हीं पुस्तकें महत्त्वाचीं आहेत. यांपैकीं पहिल्या पुस्तकांत विद्यार्थी दशेंतील मुलांमुलींचें आरोग्य व्यायाम, कार्यपद्धति व विश्रांति यांच्यायोगें कसें राखतां येईल हें दाखवून त्याबरोबरच मुलामुलींस शिक्षण कसें पाहिजे, शिक्षकांचे आवश्यक गुणधर्म कोणते व शिक्षकांनीं विद्यार्थ्यांना वळण लागण्याकरितां स्वतः कसें वागावें यांचीही माहिती दिली आहे. त्यामुळें विद्यार्थ्यांबरोबर शिक्षकांनाही हें पुस्तक सारखेंच लाभदायक व मार्गदर्शक आहे. ' चाळिशी उलटल्यावर ' हें पुस्तकही असेंच चांगलें आहे. देशाच्या भाग्योदयास तारुण्य, जोम, उत्साह आणि चाळिशीनंतरच्या माणसांचे अनुभव या गोष्टींची फार आवश्यकता असते याकरितां वृद्धांच्या आयुरारोग्याची काळजी घेणें केव्हांही इष्ट आहे. ती काळजी कशी घ्यावी व त्या वयांत वृद्धांकडून आरोग्याच्या बाबतींत न कळत होणाऱ्या चुका काय काय असतात आणि त्या कशा टाळतां येतात याबद्दलची माहिती प्रस्तुत पुस्तकांत दिलेली आहे.

### स्त्रियोपयुक्त आरोग्यविषयक ग्रंथ

स्त्रियांना स्वतःच्या व बालकांच्या आरोग्याकरितां उपयुक्त असलेलें वाङ्मय डॉ. तांबे व डॉ. टेंबे या दोघांनीच रचिलेलें आहे. त्यांतील ' शुश्रूषा ' व ' सेविका ' हीं दोन पुस्तकें ' नर्सिंग ' विषयावर लिहिलेलीं आहेत. संसारांत प्रत्येक गृहिणीला व त्याबरोबरच इतर व्यक्तींना सर्वसाधारण रोग व रोग्यांची शुश्रूषा यासंबंधाची जरूरीपुरती माहिती करून द्यावी या उद्देशानें डॉ. तांबे यांनीं ' गृहिणी गृहशिक्षणमाला ' सुरू करून तिचें पहिलें पुष्प म्हणून ' शुश्रूषा ' पुस्तक सन १९१० मध्यें प्रसिद्ध केलें व त्याच्या चार

वर्षांनंतर ह्मणजे सन १९१४ मध्यें 'सेविका' हें पुस्तक डॉ. टेंबे यांनीं लिहून प्रकाशित केलें. तशीं हीं दोन्हीं पुस्तकें नर्सेसकरितां विशेष उपयुक्त आहेत; तरीही त्यांतल्या त्यांत डॉ. टेंबे यांचें पुस्तक अधिक चांगलें आहे. या पुस्तकाचे एकंदर सहा भाग असून पहिल्या भागांत शरीर शास्त्र, दुसऱ्यांत इंद्रियधर्म शास्त्र, तिसऱ्यांत वैद्यक, चौथ्यांत शस्त्रक्रिया व पांचव्यांत शुश्रूषा यासंबंधाची माहिती देऊन सहाव्या भागांत मुख्यमुख्य औषधांची माहिती दिली आहे आणि विषप्रयोगनिदानासंबंधाचेंही अल्प विवेचन केलें आहे. वृक्षाचें मूळ जसें त्याच्या बीमध्यें असतें तसें राष्ट्राचें मूळ त्याच्या भावी पिढीमध्यें असतें अर्थात् या दृष्टीनें बालसंगोपन हा विषय विशेष महत्त्वाचा होय. या विषयावर देवासचे माजी स्टेट सर्जन डॉ. शंकर विश्राम सावंत यांनीं लिहिलेलें 'बालसंगोपन' याच नांवाचें एक पुस्तक सन १९२८ मध्यें प्रसिद्ध झालें आहे. हें पुस्तक लहान असलें तरी चांगलें आहे. असेंच दुसरें पुस्तक 'शिशुचिकित्सा' या नांवानें नुकतेंच सन १९३७ मध्यें उज्जयिनीचे शंकर रामचंद्र पळशीकर, वैद्यरत्न, यांनीं लिहिलेलें आहे. या दोन पुस्तकांच्या अगोदर डॉ. टेंबे यांचें 'शिशुसंवर्धन' नांवाचें पुस्तक सन १९२६ मध्यें प्रसिद्ध झालें. तें थोडें निराळ्या प्रकारचें आहे. बालकांची केवळ त्यांच्या जन्मापासूनच नव्हे, तर गर्भावस्थेपासून जोपासना कशी करावी व पुढें जन्मानंतर तीं जसजशीं मोठीं होत जातील तसतशीं त्यांच्या आरोग्यासंबंधांत कोणकोणत्या गोष्टींची काळजी घेण्यांत यावी या विषयाची माहिती सदर पुस्तकांत देऊन शेवटीं आई व दाई यांच्या अज्ञानामुळें किंवा नजरचुकीमुळें बालकांस होणाऱ्या कांहीं ठळक रोगांचें, त्यांवरील उपाययोजनेसह, स्पष्टीकरण केलें आहे. वास्तविक डॉ. टेंबे यांनीं हें पुस्तक आंग्ल-उपचार पद्धती-धरून लिहिलें असलें तरी त्यांनीं योग्य स्थळीं त्या पद्धतींतील दोषा-

विष्करणही केलेलें आहे. प्रत्येक मातृपदास पोंचणाऱ्या किंवा पोंचलेल्या स्त्रीनें हें पुस्तक अवश्य वाचण्यासारखें आहे. या पुस्तकाच्या पाठोपाठच उन १९२७ मध्यें ' मातृपद किंवा गर्भारपण व बाळंतपण' हें डॉ. टेंबे यांनीं आपलें दुसरें पुस्तक प्रसिद्ध केलें. यांत मातृपद पटकाविणाऱ्या स्त्रीवर्गास आवश्यक तेवढ्या शारीर व इंद्रिय विज्ञानाची माहिती सुगम रीतीनें संक्षिप्तांत दिली आहे. बायांबरोबर मुलींसाठींही एक पुस्तक मध्यभारतांत प्रसिद्ध झालें आहे. तें ह्मणजे ' बाल्यावस्था व कौमार्य यांचा आरोग्यदृष्ट्या विचार ' हें होय. हें पुस्तक सन १९१६ मध्यें प्रसिद्ध झालें व तें श्रीमंत राजराजेश्वर सवाई तुकोजीराव होळकर यांच्या जन्मगांठीनिमित्त इंदूरच्या ' श्रीमल्लारिमार्तंड विजय ' साताहिकातर्फे वर्गणीदारांस भेट ह्मणून देण्यांत आलें. या पुस्तकांत तान्ह्या मुली, यौवनदशेप्रत पोंचणाऱ्या मुली, प्रौढ स्त्रिया, कामकरी स्त्रिया वगैरेंच्या आरोग्यासंबंधांत घरांत, घराबाहेर, शाळेंत किंवा सार्वजनिक जागीं कोणकोणत्या गोष्टींची काळजी घेण्यांत यावी व त्यांनीं स्वतः कसें वागावें याबद्दलची नित्यनैमित्तिक कार्यासुद्धां माहिती दिली आहे. मुलांच्या दृष्टीसंबंधांत ' बालदृष्टि ' नांवाचें एक स्वतंत्र पुस्तक डॉ. तांबे यांनीं सन १९२१ मध्यें प्रसिद्ध केलें आहे. हें पुस्तक डॉक्टरसाहेबांनीं नरसिंगपुर ( मध्यप्रांत ) येथें सिव्हिल सर्जन असतांना प्रसिद्ध केलें असलें तरी तें वास्तविक त्यांनीं इंदूरास असतांना लिहिलेलें असून तेथेंच त्यांनीं सुरू केलेल्या गृहिणी गृहशिक्षण मालेचें दुसरें पुष्प ह्मणून प्रकाशित केलें आहे.

### विशिष्ट रोगचिकित्साविषयक ग्रंथ

मध्यभारतांत निरनिराळ्या विशिष्ट रोगांवरील चिकित्साविषयक वाङ्मयही कांहीं निर्माण झालें आहे त्यांतील अण्णाजी बल्लाळ बापट यांचा ' ज्वरप्रकाश ' हा सन १८८६ मध्यें प्रसिद्ध झालेला ग्रंथ पहिला होय. याच्या पुढच्याच वर्षी सन १८८७ मध्यें ' कुटुंब वैद्य '

या ग्रंथाचा पहिला भाग व त्याच्या पाठोपाठ सन १८८८ मध्यें त्याचा दुसरा भाग या बापटांनींच लिहून प्रसिद्ध केला. उक्त तिन्ही ग्रंथ आज अनुपलब्ध आहेत यानंतर सन १८८९ मध्यें उज्जयिनीचे डॉ. आनंदराव गंगाधर व परशुराम कृष्ण वैद्य या दोघांनीं मिळून लिहिलेलें ' प्लेग चिकित्सा ' हें चिमुकलें पुस्तक प्रसिद्ध झालें यांत फक्त प्लेगाच्या रोगापासून काळजी घेण्यासारखे कांहीं महत्वाचे नियम व उपचार दिलेले आहेत. प्लेगाची अधिक सोपपत्तिक माहिती व तत्संबंधीं बरेच प्रतिबंधक उपचार सांगितलेले ' प्लेग ' याच नांवाचें दुसरेंही एक पुस्तक प्रसिद्ध झालें आहे. हें पुस्तक डॉ. गोपाळ रामचंद्र तांबे यांनीं सन १९१७ मध्यें लिहिलें असून तें त्यांच्या स्वीय आरोग्य शिक्षण माला नामक पुस्तक मालेचें पहिलें पुष्प ह्मणून बाहेर पडलें आहे. सन १९१८ मध्यें इंदुरास इन्फ्लुएंझा (प्रतिश्याय ज्वरा) च्या सांथीनें कहर माजवून दिला असतांना डॉ. श्रीधर नारायण शारंगपाणी यांनीं त्या सांथींतून अनेक रोग्यांना मृत्यूच्या दाढेंतून सोडवितांना जे निरनिराळे उपाय योजिले व त्यांचे अनुकूल अनुभव त्यांस आले ते एकत्रित करून सदर रोगाची त्यावरील औषधोपचारासह माहिती देणारें व इतर कौटुंबिक अपघातांवरील उपाय सांगणारें ' आरोग्य मार्ग ' नांवाचें पुस्तक त्याच सालीं ( सन १९१८ ) लिहून प्रसिद्ध केलें. पुढें सन १९२५ मध्यें इंदूरचे दुसरें डॉ. वासुदेवराव गणेश गोडबोले यांचें ' आरोग्यादर्श ' नांवाचें पुस्तक प्रसिद्ध झालें. यांत निरनिराळे रोग कसे उद्भवतात व त्यांच्यावर कमकसे उपचार केले पाहिजेत यांची माहिती थोडक्यांत दिली आहे. अशाच प्रकारचें निरनिराळे रोग वं त्यांवरील वैद्यकी उपायांची माहिती देणारेंही ' अमृत निदान ' नांवाचें एक पुस्तक शंकर रामचंद्र पळशीकर, वैद्यरत्न, यांनीं लिहिलेलें सन १९३३ मध्यें प्रसिद्ध झालें आहे.

**बिषावरील उपचारविषयक ग्रंथ**

विषावरील उपचारावर आतांपावेतों मध्यभारतांत दोनच पुस्तकें झालेलीं आढळतात 'एक विषनिदान व चिकित्सा' व दुसरें 'पिसाळलेल्या कुत्र्याचें विष आणि त्यावर हिंदुस्थानांत होत असलेले उपाय'. यांपैकीं दुसरें पुस्तक इंदुराहून सन १९२२ मध्यें प्रसिद्ध झालें आहे; परंतु तें आमच्या पाहण्यांत आलें नाहीं. पहिलें पुस्तक मुंबईच्या सुप्रसिद्ध दामोदर सांवळाराम आणि मंडळीच्या ग्रंथ संपादक व प्रकाशक मंडळानें स्वीय पुस्तक मालेचें २४ वें पुस्तक ह्मणून सन १९०२ मध्यें प्रसिद्ध केलें आहे. या पुस्तकाचे लेखक वडनगर येथील डॉ. महादेव भिकाजी विंझे हे होत. मराठींतील आजपावेतोंच्या एकंदर विषविषयक पुस्तकांत या पुस्तकाची अग्रस्थानीं गणना होण्यासारखी आहे. विष ह्मणजे काय, त्याचे प्रकार किती, त्याच्या संपर्कानें शरीरावर कोणकोणतीं लक्षणें उद्भवतात व शरीराच्या आंतील भागांत निरनिराळीं विषें कोणकोणते परिणाम उत्पन्न करतात, त्यांच्या शमनार्थ कायकाय व कसकसे उपचार केले पाहिजेत वगैरे गोष्टींची माहिती या पुस्तकांत डॉ. विंझे यांनीं डॉ. टेलर, डॉ. वुइल्यम मुरेल, डॉ. ग्यारड, डॉ. नारायण दाजी, डॉ. गर्दे प्रभृति नामांकित आंग्ल व आर्य वैद्यकांच्या ग्रंथाधारें दिली आहे. हें पुस्तक लेखकाकडून 'धि आनरेबल् सर डाक्टराग्य: श्री भालचंद्राभिध कृष्णसूनुः' यांना अर्पण करण्यांत आलें आहे. जंतुशास्त्रावर अद्यापपावेतों उत्तम माहितीपूर्ण असा ग्रंथ मराठींत तयार झालेला नाहीं तो तयार करण्याचें इंदूरचे डॉ. बळवंत नारायण देव यांनीं मनावर घेऊन ग्रंथलेखनास सुरूवातही केली होती; परंतु त्यांच्या आकस्मिक निधनामुळें तो ग्रंथ अर्धवटच लिहिला गेला. या ग्रंथासाठीं डॉक्टर साहेबांनीं जंतुशास्त्राचा कित्येक वर्षें अभ्यास केला होता त्यावरून त्यांचा तो ग्रंथ पूर्ण होऊन प्रसिद्ध झाला असता तर त्यामुळें एका उत्कृष्ट ग्रंथाची भर मराठी वाङ्मयांत पडली असती यांत संदेह नाहीं.

### अवांतर ग्रंथ

आरोग्यशास्त्राशीं संबंध ठेवणारीं आणखीं दोन निराळीं पुस्तकें मध्यभारतांत झालीं आहेत त्यांपैकीं एक शरीरबलवर्धनासंबंधींचें असून दुसरें बुद्धिभ्रंशासंबंधींचें आहे. पहिल्या पुस्तकाचें नांव 'वज्रकाया अथवा यौगिक-शारीर-बल-पद्धति' हें होय. हें पुस्तक के. भ. मोकाशी यांनीं लिहिलें असून त्याची प्रथमावृत्ति सन १९१५ मध्यें व द्वितीयावृत्ति सन १९२३ मध्यें प्रसिद्ध झाली आहे. मोकाशी यांनीं मागें इंदुरास श्रीकृष्ण मिशन नांवाची, योगासनें करून शरीर कमाविण्याच्या पद्धतीचा प्रसार करणारी, संस्था काढिली होती. तिच्याच विद्यमानें हें पुस्तक प्रथम प्रसिद्ध करण्यांत आलें होतें. वयाच्या सहाव्या वर्षापासून तों शंभराव्या वर्षापावेतोंच्या पुरुषांस यौगिक व्यायाम पद्धतीनें शरीराच्या सर्व अवयवांना प्रमाणबद्ध पुष्टि आणून वज्रदेही कसें होता येईल याची सचित्र माहिती या पुस्तकांत देण्यांत आली आहे. या व्यायामपद्धतींतील संधी, नाड्या व स्नायु यांच्या चालनाच्या क्रिया वगळून बाकीच्या पद्धतीचें अवलंबन स्त्रियांनाही करतां येण्यासारखें आहे. दुसरें पुस्तक 'वेड' या नांवाचें असून तें सन १९०२ मध्यें कोल्हापूरच्या 'ग्रंथमालें' तून प्रसिद्ध झालें आहे. या पुस्तकाचे लेखक जगन्नाथ रावजी टुल्लु हे होत. अनेक प्राच्य व पाश्चात्य ग्रंथांच्या आधारें या पुस्तकाची रचना करण्यांत आली असून वेड ह्मणजे काय व त्याचे प्रकार किती आहेत हें सोदाहरण दाखवून मानसिक शास्त्रांत वेडाची उपपत्ति बसविणें, वैद्यक शास्त्रांत त्याचें निदान ठरवून तदनुरूप औषधयोजना करणें व धर्मशास्त्रांत त्यापासून सामाजिक आणि व्यक्तिविषयक हक्कांतील घोंटाळा मोडून टाकणें या गोष्टी सदर पुस्तकांत सुसंगत मांडण्यांत आल्या आहेत.

### शालिहोत्रविषयक ग्रंथ

मध्यभारतांत शालिहोत्रविषयकही दोन पुस्तकें निर्माण झालीं

आहेत. हीं दोन पुस्तकें ह्मणजे सन १८८८ मध्यें प्रसिद्ध झालेलें इंदूरचें नारायण महादजी खराटे यांचें ' अश्वसंजीवन अथवा घोड्यांच्या रोगाचें निवारण ' व सन १८९३ मध्यें प्रसिद्ध झालेलें धारचे मार्तंड सदाशिव धोंगडे यांचें ' अश्वारोग्याचे नियम ' हीं होत. ' अश्वसंजीवन ' हें पुस्तक मोठें असून त्यांत घोड्याची शरीर-रचना कशी आहे, त्याला बहुधां होणाऱ्या रोगांची उत्पत्ति कशी होते, त्याचे रोग कसे ओळखावे, त्या रोगांवर इंग्रजी अथवा देशी औषधांची योजना कशी करावी व तीं औषधें कशीं बनवावीं इ. गोष्टींचें सविस्तर वर्णन केलें आहे. ' अश्वारोग्याचे नियम ' या पुस्तकांत त्याच्या नांवाप्रमाणेंच नुसते नियम दिले गेले आहेत.

अस्तु. येणेप्रमाणें आतांपावेतों मध्यभारतांत आरोग्यविषयक वाङ्मय निर्माण झालें आहे. हें वाङ्मय जरी संख्येनें अल्प असलें तरी योग्यतेनें मात्र बरेंच मोलाचें आहे, असें केव्हांहीं निर्विवादपणें ह्मणतां येईल.

## प्रकरण दहावें

# शास्त्रीय व कलाविषयक वाङ्मय.

**नाना शास्त्रकला इथेंच अपुल्या जन्मोनि विस्तारल्या।**

—राधेय.

**पूर्वकथन**

शास्त्रें व कला यांचा वास्तविक परस्परांशीं निकट संबंध आहे. आपापल्या विषयांपुरते सृष्टिनियम शोधून काढणें हें कार्य शास्त्रें करीत असतात व त्या नियमांचा व्यवहारांत उपयोग करून घेण्यास कला अहर्निश झटत असतात. प्राचीन काळीं आपल्या देशांत ज्योतिष, गणित, अर्थ, तर्क, पदार्थविज्ञान, रसायन, वैद्यक, शिल्प, यंत्र, कृषि, व्यापार, संगीत इत्याद्यनेक शास्त्रें व कला यांचा अतिशय उत्कर्ष होऊन अनेक शास्त्रज्ञ व कलाभिज्ञ आणखीही नवीन नवीन शोध प्रत्यहीं लावीतच होते, त्यामुळें देशांत सर्वत्र समृद्धि नांदत होती; परंतु पुढें परकीयांच्या स्वाऱ्या व अंतःकलह सुरू झाल्याकारणानें जिकडे तिकडे अस्वस्थता माजून शास्त्रें व कला यांचा ऱ्हास होऊं लागला. हा ऱ्हास थांबविण्याचा प्रयत्न नंतर नेटानें कधींच झाला

नाहीं, त्यामुळें शास्त्रें व कला यांचें माहेरघर म्हणून एके काळीं गाजलेल्या या भारतवर्षास आतां शास्त्रीय ज्ञानाकरितां व कलाकौशल्याच्या पदार्थांकरितां दुसऱ्या देशांच्या तोंडाकडे पाहण्याची पाळी आली आहे! आपले अनेक प्राचीन बहुमोल शास्त्रीय ग्रंथ व कला आज पाश्चात्य ज्ञानपिपासु पंडितांच्या आश्रयास असून त्यांच्यापासून योग्य तो लाभ त्यांना होत आहे व हें आपण कुतूहलानें पहात आहोंत! ही स्थिति आपणांस प्राप्त व्हावी हा दैवदुर्विपाकच होय! तथापि इंग्रजी अंमलाखालीं पाश्चात्य शिक्षण सुरू झाल्यापासून शास्त्रीय ज्ञानाची व कलाकौशल्याची आवड परत आपल्यांत उत्पन्न होऊं लागून त्यांत आपली प्रगतिही होत आहे. ही प्रगति बरीच हळुहळूं होत असली तरी ती पूर्ण आशाजनक आहे, यांत संदेह नाहीं! डॉ. सर जगदीशचंद्र बोस, सर सी. व्ही. रामन् यांच्यासारखे असाधारण बुद्धीचे जगन्मान्य शास्त्रज्ञ पुरुष आतां आपल्यांत उत्पन्न होऊं लागले आहेत, ही मोठ्या अभिमानाची गोष्ट होय! अस्तु. गेल्या शंभर वर्षांत महाराष्ट्रामध्यें विविध शास्त्रें व कला यांचें ज्ञान संपादून त्यांवर मराठींत ग्रंथनिर्मिति करणारी कांहीं मंडळी झाली आहे त्यांत शंकर बाळकृष्ण दीक्षित, प्रो. बाळाजी प्रभाकर मोडक, डॉ. नारायण दाजी, कृष्णशास्त्री भाटवडेकर, विनायकशास्त्री खानापुरकर, हरिश्चंद्र चिंतामण, कृष्णाजी विनायक वझे इत्यादिकांचीं नांवें विशेष उल्लेखनीय आहेत. या सर्व मंडळींनीं केलेली ग्रंथरचना महत्त्वाची आहे. वास्तविक आधुनिक मराठी शास्त्रीय वाङ्मयाचा उगम मिशनरी लोकांनीं इंग्रजीवरून मराठींत भाषांतरें करून प्रसिद्ध केलेल्या शालेय क्रमिक पुस्तकांपासून झालेला आहे व पुढेंही कांहीं कालपर्यंत महाराष्ट्रीय विद्वानांकडून पहिल्या पहिल्यानें इंग्रजी ग्रंथांवरूनच मराठींत एतद्विषयक बरीचशी ग्रंथरचना झालेली आहे; परंतु त्यानंतर वर नामनिर्देश केलेल्या मंडळीपासून जी ग्रंथरचना होऊं लागलेली आहे

ती मात्र तशी निव्वळ परभृत नसून बरीच स्वतंत्र आहे, हें येथें सांगणें अवश्य आहे. महाराष्ट्रांत ज्याप्रमाणें शास्त्रें व कला यांच्या विविध शाखांवर ग्रंथनिर्मिति झालेली आहे तशी ती मध्यभारतांतही झालेली आहे ह्मणून आतां एकेक शाखा घेऊन त्यांतील ग्रंथांचा परिचय करून देऊं.

## ज्योतिषशास्त्रविषयक ग्रंथ

प्रथम आपण ज्योतिषाविषयक ग्रंथांकडे वळूं. ज्योतिष शास्त्राचें नांव घेतल्याबरोबर मध्यभारतांतील विसाजी रघुनाथ लेले व प्रिं. गोविंद सदाशिव आपटे या दोघांजणांचीं नांवें तत्काळ डोळ्यांपुढें दिसूं लागतात. हे दोघेही पुरुष अत्यंत बुद्धिमान् असून त्यांची दीर्घ-व्यासंगी ज्योतिर्विद् म्हणून ख्याति होती. सायन मानाचें पंचांग हेंच धर्मशास्त्रानुसार आहे असें लेले यांचें दृढ मत होतें. त्यांनीं प्रथम कांहीं दिवस ग्रहलाघवाच्या साह्यानें कामापुरतें सायन पंचांग काढलें व पुढें नाटिकल आल्मनाकवरून पंचांगाची रचना आरंभिली; परंतु त्यांच्या पंचांगाच्या प्रसिद्धीचा खरा योग कांहीं वर्षांनंतर आला. शके १७८७ ( इ. स. १८६५ ) पासून केरू नाना छत्रे हे शुद्ध निरयन पंचांग काढूं लागलें तेव्हां त्यांनीं सायन मान स्वीकारावें याबद्दल लेले यांनीं 'स्फुटवक्ता अभियोगी' या नांवानें अरुणोदय वगैरे वर्तमानपत्रांतून पुष्कळ वर्षें वाद केला; परंतु छत्रे यांनीं तिकडे लक्ष न दिल्यानें शेवटीं लेले यांनीं तो वाद करणें सोडून देऊन स्वतःच शके १८०६ पासून शंकर बाळकृष्ण दीक्षित व जनार्दन बाळाजी मोडक यांच्या साह्यानें श्रीमंत द्वितीय तुकोजीराव होळकर यांच्या आश्रयाखालीं 'श्रुतिस्मृतिपुराणविहित कालदर्शक सायन पंचांग' प्रसिद्ध करणें सुरू केलें; परंतु त्या पंचांगास लोकांची पाहिजे तशी सहानुभूति व आश्रय लाभला नाहीं आणि लेले यांचें नंतर लौकरच निधनही झालें त्यामुळें चारपांच वर्षांनंतर सायन पंचांग निघणें

कायमचें बंद पडलें. लेले यांच्या हातून ग्रंथनिर्मिति मात्र कांहींच झाली नाहीं. त्यांनीं सायन पंचांग ज्यावरून तयार करतां येईल असा एखादा ग्रंथ निर्माण केला असतां तर खरोखर एका विशेष महत्त्वाच्या ज्योतिष ग्रंथाची भर मराठी वाङ्मयांत पडली असती. लेले यांच्या प्रमाणेंच बाळ जोशी व त्रिंबक जोशी जुन्नरकर आणि मल्हारशास्त्री व हरिशास्त्री थत्ते हेही नामांकित ज्योतिषी ग्वाल्हेर येथें झाले. यांपैकीं त्रिंबक जोशी यांचें ग्वाल्हेरी पंचांग एके काळीं नांवाजलें गेलें असून थत्तेद्वयांचे व बाळ जोश्यांचे कांहीं अपूर्व ग्रंथ अप्रकाशित आहेत. मल्हारशास्त्री थत्ते हे ज्योतिषाबरोबर सर्व प्रकारचे गणितशास्त्र व सृष्टशास्त्र यांतही पारंगत होते. गेल्या महायुद्धाच्या वेळीं विलायतेंतील वॉर ऑफिसनें शत्रु किती अंतरावर आहे हें समजण्यास मेकॉमिटरार, स्टुअर्ड्स् टेलिमिटर वगैरे जीं यंत्रें प्रचलित आहेत तीं सर्व मोठीं असून त्यांत कांहीं दोषही आहेत ते दोष दूर करून वाहून नेण्यास सुलभ असें लहानसें यंत्र तयार करण्याबद्दल जाहिरात प्रसिद्ध केली होती. त्या जाहिरातीप्रमाणें या मल्हारशास्त्र्यानीं अल्पावधींत सर्व रीत्या समाधानकारक असें रेंजफाईंडर यंत्र तयार करून दिलें, त्यामुळें त्यांची मोठी वाहवा होऊन त्यांस द्रव्यलाभही चांगला झाला. शिवाय श्रीमंत अलिजाबहादर माधवराव महाराज शिंदे यांनींही आपलेकडून त्यांस रोख एक हजार रुपये बक्षिस व 'विद्यासागर' ही पदवी देऊन गौरविलें. ग्वाल्हेरप्रमाणें उज्जयिनींसही नारायणजी व्यास, सूर्यनारायण व्यास, रघुनाथशास्त्री वेलणकर प्रभृति उत्तम ज्योतिषी प्रसिद्धीस आले. उज्जयिनीचें पंचांग प्रतिवर्षी नियमानें निघत असतें इंदूरचे द्वितीय तुकोजीराव महाराज व शिवाजीराव महाराज होळकर यांनाही ज्योतिषाची मोठी आवड होती. तुकोजीराव महाराजांनीं इंदुर येथें राजवाड्यांत मुद्दाम वेध घेण्याकरितां दिशासाधन वगैरे सोय करून एक जागा तयार केली होती तेथें त्यांच्या पदरचे ज्योतिषी

वेध घेत असत. यांच्या वेळपासून इंदूरहून पंचांग निघूं लागलें तें आजपर्यंत अव्याहतपणें निघत आहे. हल्लींचे इंदूरी पंचांगकर्ते बाळकृष्ण केशव ज्योतिषी हे होत. हें पंचांग माळव्यांत विशेष प्रचारामध्यें आहे. विसाजी रघुनाथ लेले यांच्या सायन पंचांगापूर्वी सन १८७६ च्या सुमारास मुंबईचे ज्योतिषी जानोबा बाबा यांनाही द्वितीय तुकोजीराव महाराजांनीं इंग्रजी पद्धतीवर मराठींत दैनंदिनी प्रसिद्ध करण्याच्या कामीं बरींच वर्षें मदत केली होती. या दैनंदिनींत इंग्रजी डायरीप्रमाणेंच आरंभास विविध माहिती दिली जात असे. शिवाजीराव महाराजांच्या वेळीं इंदुरास एक मोठें ज्योतिष संमेलन झालें होतें व त्या संमेलनांत ज्योतिषविषयक अनेक वादग्रस्त प्रश्नांवर बरीच चर्चा व ऊहापोह होऊन तत्संबंधीं एक बृहत् ग्रंथ लिहिला गेला होता, असें सांगतात; परंतु कांहींसें निश्चितपणें पाहूं जातां मध्यभारतांतला पहिला ज्योतिषविषयक ग्रंथ शिवचंद्र बलदेव भारतियाकृत 'सिद्धेंदुचंद्रिका' हा असल्याचें आढळून येतें. मात्र हा ग्रंथ आमच्या पाहण्यांत आला नसून त्याच्या प्रकाशन कालाचाही आम्हांस शोध लागला नाहीं. शुद्ध पंचांग प्रवर्तनासाठीं अतोनात परिश्रम करणारे व उज्जयिनीच्या जिवाजी वेधशाळेचे माजी सुपरिंटेंडेंट असलेले गणकचूडामणि प्रिं. गोविंद सदाशिव आपटे यांनीं लिहिलेलें 'सर्वानंद लाघव' व 'पंचांगचिंतामणी' हे दोन्ही ज्योतिषविषयक ग्रंथ अलिकडेच अनुक्रमें सन १९३३ व १९३४ मध्यें प्रसिद्ध झाले आहेत. प्रिं. आपटे यांना पहिल्यापासूनच ग्रहगणिताची विशेष आवड होती व त्या विषयावर त्यांनीं दीर्घ व्यासंग करून पारंगतता प्राप्त केली होती. जुन्या पंचांगांतील दृक्प्रत्ययाभाव पाहून त्यांचें लक्ष पंचांगाच्या शुद्धतेकडे वळलें. जुन्या ग्रहलाघवी पंचांगापेक्षां बरेंच सूक्ष्म म्हणून त्यांनीं कांहीं वर्षें केतकी पंचांगाचा अंगिकार केला; परंतु पुढें सांगलीच्या ज्योतिष संमेलनांत

लो. टिळकांनीं शास्त्रोक्त शुद्ध अयनांश, शुद्ध वर्षमान व शुद्ध अयनगति घेण्याला संमति मिळविल्याचें कळवितांच ते टिळक पंचांगाचे एकनिष्ठ अनुयायी झाले. कांहीं वर्षांपूर्वी ' दि इनिशियल पॉइंट ऑफ अवर फिक्स्ड झोडिॲक ' हा एक उत्कृष्ट निबंध इंग्रजींत लिहून त्यांत त्यांनीं रेवती पक्षाचे आरंभस्थान वैजयंती हेंच निरयन पंचांगाचें आरंभस्थान कसें आहे हें सिद्ध करून दाखविलें आहे. यानंतर ' सर्वानंदकरण ' हा ग्रंथ त्यांनीं संस्कृत भाषेंत लिहिला. दशांश व कोष्टकांशिवाय दृक्तुल्य सूक्ष्म गणिताचा ग्रहलाघवाच्या तऱ्हेवर लिहिलेला हा ज्योतिष ग्रंथ सन १९३२ पासून काशी हिंदु विश्वविद्यालयानें आचार्यपरीक्षेकरितां नेमिलेला आहे. या ग्रंथाच्या आभ्यासानंतर नॉटिकलची आवश्यकता भासत नाहीं. 'सर्वानंदलाघव' ही याच ग्रंथाची मराठी भाषांतरासह प्रसिद्ध केलेली कृति होय. या ग्रंथानुसार पंचांग तयार केल्यास तें शुद्ध वेधानुसारी होतें खरें; परंतु एकंदर सबंध वर्षाचें पंचांग त्यावरून तयार करण्यास कठिण जातें म्हणून ग्रहलाघवी पद्धतीच्या पंचांगाला उपयोगी पडणारी अशी तिथिचिंतामणीसारिणी आहे किंवा केतकी पद्धतीच्या पंचांगासाठीं जशी वैजयंतीसारिणी आहे तशीच २३ अयनांशाच्या सूक्ष्म ग्रहलाघवी पंचांगाकरितां व शुद्ध पंचांगाकरितां एक सारिणी तयार करावी असें वाटून प्रि. आपटे यांनीं नंतर ' पंचांगचिंतामणि म्हणजेच शुद्ध पंचांगसारिणी ' हा ग्रंथ तयार केला आहे. इतर सारिण्यांवरून तयार केलेल्या त्या त्या पंचांगांच्या तिथिकालांत घटका-दीड घटकापर्यंतचें अंतर नेहमीं आढळून येतें पण या शुद्ध पंचागसारिणीनें तयार केलेल्या तिथ्यादिकांच्या कालांत अगदींच थोडें अंतर पडत असून पंचांग वर्तविण्याची पद्धति अवगत असणाऱ्याला तिच्यावरून साधारणपणें दोन आठवड्यांत सबंध वर्षाचें पंचांग सहज तयार करतां येईल असा आपला विश्वास प्रि. आपटे यांनीं यांत स्पष्टपणें प्रकट केला आहे.

प्रस्तुत सारिणीचा उपयोग कसा करावा हें या ग्रंथाच्या आरंभीं दिलेल्या १९ संस्कृत श्लोकांमध्यें प्रथम सांगण्यांत आलें असून नंतर त्याचेंच मराठींत सोदाहरण विवरण करण्यांत आलें आहे व मग शके १८२६ पासून पुढील सालांचीं पंचांगें तयार करण्याला उपयुक्त अशीं कोष्टकें देण्यांत आलीं आहेत. तसेंच तत्पूर्वीच्या वर्षांचीं पंचांगें करावयाचीं झाल्यास तीं कशीं करावीं याचेंही दिग्दर्शन केलें गेलें आहे व शेवटीं अभ्यासार्थ कांहीं उदाहरणें दिलेलीं आहेत. यावरून पंचांगाच्या अभ्यासकांकरितां हा ग्रंथ किती उपयुक्त झा`ला आहे. हें कोणासही सहज दिसून येईल. हस्तसामुद्रिक हा ज्योतिषशास्त्राचाच एक अंगभूत विषय आहे. या विषयावर इंदूरचे रंगाचार्य पुराणिक यांनीं बऱ्याच वर्षांपूर्वी ‘ सामुद्रिक ’ नांवाचें पुस्तक लिहिलें असल्याचें समजतें सबब त्याचाही येथें नामनिर्देश करणें अवश्य आहे. मध्य-भारतांत याशिवाय आणखी कांहीं ज्योतिषविषयक ग्रंथ निर्माण झाले असल्याचें आढळत नाहीं.

### गणित शास्त्रविषयक ग्रंथ

ज्योतिषानंतर गणितशास्त्राकडे वळणें इष्ट होईल. तत्त्वतः पाहूं जातां गणितशास्त्रांत भारतवर्षानें पूर्व काळीं जो नांवलौकिक मिळविला होता तो मात्र पुढें फार काळपावेतों टिकून राहिला नाहीं. अलीकडे इंग्रजी अंमलापासून शिक्षणक्रमांत गणितशास्त्राला जरी बरेंच प्राधान्य दिलें गेलें आहे तरी तें शास्त्र इंग्रजी ग्रंथांच्या आधारेंच शिकविलें जातें त्यामुळें देशी भाषेंत गणितावर विशेष अशी ग्रंथनिर्मिति अद्याप-पावेतों झालेली नाहीं व जी काय झालेली आहे ती प्रायः शाळेंतील विद्यार्थ्यांसाठींच आहे. मध्यभारतांतील गणितावरील असें पहिलें मराठी पुस्तक म्हटलें म्हणजे ग्वाल्हेरचे साठे यांनीं सन १८८४ मध्यें प्रसिद्ध केलेलें ‘ अंकगणित ’ हें होय. या ‘ अंकगणिता ’ चे दोन भाग आहेत, असें सांगतात. यानंतर रा. सा. बाळकृष्ण आत्माराम गुप्ते

यांचे आर. बर्केटच्या कर्तव्यभूमिति ग्रंथांवरून अनुवादिलेले असे ' कर्तव्यभूमितीची प्रवेशिका ' ' कर्तव्यभूमिति ' व कर्तव्य अथवा ' शिल्पकलोपयोगी भूमिति ' असे तीन ग्रंथ प्रसिद्ध झाले. ग्वाल्हेरचे रामचंद्र हरि दिवेकर यांचा ' कुट्टक गणित ' हा अद्वितीय ग्रंथही याच सुमारास बाहेर पडला, असें ह्मणतात; परंतु तो आमच्या पाहण्यांत आला नाहीं. कुट्टक हें बीजगणिताचेंच एक प्रकरण असून तें भारतीयांच्या गणितासंबंधांतील बुद्धिकौशल्याचें एक उत्कृष्ट चिन्ह आहे. दिवेकरांचा हा ग्रंथ अद्वितीय असला तरी तो विशेष प्रसिद्धीस आलेला मात्र दिसत नाहीं. पुढें सन १८९६ मध्यें ग्वाल्हेरचे आनंदराव बाजी केंगे व लक्ष्मण रघुनाथ महाजन यांनीं मिळून लिहिलेलें ' देशी संस्थानांतील जमाखर्च पद्धति ' हें पुस्तक प्रसिद्ध झालें. संस्थानी जमाखर्च शिकणाऱ्यांना हें पुस्तक उत्तम मार्गदर्शक आहे. यानंतर अलीकडे सन १९३४ मध्यें गोविंद बळवंत मार्कोडे यांचें ' प्राचीन भारतीयांची गणितशास्त्रांतील प्रगति ' हें लहानसेंच पण उत्कृष्ट पुस्तक प्रसिद्ध झालें. सन १९१५ मध्यें कलकत्ता येथील ' मॉडर्न रिव्ह्यु ' या सुविख्यात इंग्रजी मासिकांत प्रो. नलिन बिहारी मित्र यांचा ' एन्शंट हिंदूज नॉलेज ऑफ अरिथमेटिक ' व 'अलजिब्रा' असे दोन लेख प्रकाशित झाले होते त्यांचेच मार्कोडे यांनीं मराठींत अनुवाद करून ते ' महाराष्ट्र साहित्य पत्रिकें ' तून प्रसिद्ध केले होते. प्रस्तुत पुस्तक हें त्यांचेंच संयुक्त पुनर्मुद्रण होय. या पुस्तकांत भारतीयांच्या अंकगणित व बीजगणित शास्त्रांतील प्रगतीचा इतिहास तत्त्वतः इतिहासस्वरूपांतच संशोधन करून पुढें मांडलेला आहे. मूळ अंकगणित व बीजगणित हीं दोन्ही शास्त्रें भारतीयांनींच निर्मिलेलीं असून भारतीयांपासून अरबांमार्फत गणिताचा व ग्रीकांमार्फत बीजगणिताचा प्रसार पाश्चात्य राष्ट्रांत, किंबहुना साऱ्या जगांत, झालेला आहे, ही गोष्ट अनेक प्रमाणें देऊन या पुस्तकांत सिद्ध करण्यांत आलेली आहे.

**संपत्तिशास्त्रविषयक ग्रंथ**

संपत्तिशास्त्र याला प्रथम लक्ष्मीशास्त्र व नंतर अर्थशास्त्र अशीं नांवें दिलीं गेलीं असल्याचें आढळून येतें. इंग्रजींतील वेल्थ (wealth) या शब्दाचे हे सर्व पर्याय होत. या शास्त्रांत द्रव्योत्पादक अशा व्यापार, उद्यम, कृषि, सृष्टि वगैरे विषयांसंबंधीं ज्ञानांचा अंतर्भाव होतो. मध्यभारतांत या संपत्तिशास्त्रावर जी ग्रंथनिर्मिति आतांपावेतों झालेली आहे ती प्रायः किरकोळ स्वरूपाची आहे. ' संपत्तिशास्त्राविषयीं चार गोष्टी ' हें या विषयावरील पहिलें पुस्तक सन १८८४ मध्यें प्रसिद्ध झालें असून तें नारायण विनायक गणपुले यांनीं मिसेस फॉसेटच्या इंग्रजी ग्रंथावरून तयार केलेलें आहे. गणपुले यांचें हें पुस्तक जरी लहान असलें तरी तें बरेंच उपयुक्त असें आहे. अप्रतिबंध व्यापार, श्रमविभाग, पैसा व त्याचा उपयोग आणि परदेशी व्यापार असे या पुस्तकाचे चार विभाग केले आहेत व एकंदर विवेचनही सुबोध करण्याची पराकाष्टा केली आहे; परंतु भाषादोष मात्र यांत विपुल राहिले आहेत. ' विविधज्ञानविस्तार ' (पुस्तक १७ अंक ११ व १२ मधून या पुस्तकाचें विस्तृत परीक्षण आलें होतें. सन १८८८ मध्यें कोल्हापुरच्या ट्रेनिंग स्कूलचे माजी हेडमास्तर गुंडो नारायण मुजुमदार यांनीं ' अर्थशास्त्रतत्त्वादर्श ' नांवाचा ग्रंथ लिहिला. त्या कामीं त्यांना गणपुले यांच्या या पुस्तकाचा उपयोग झाला असल्याचें त्या ग्रंथांत उल्लेखिलेलें आहे. गणपुल्यांच्या सदर पुस्तकानंतर उज्जयिनीच्या माधव कॉलेजचे भूतपूर्व प्रिंसिपाल बापूजी नारायण ढेकणे यांचें ' जमीन सुधारणा ' या नांवाचें कृषिविषयक एक पुस्तक प्रसिद्ध झालें असल्याचें समजतें; परंतु तें आमच्या पाहण्यांत आलें नाहीं. यानंतर सन १९२८ मध्यें ग्वाल्हेर संस्थानचे ॲग्रिकल्चर मेंबर रा. ब. कॅ. बापूराव पवार यांनीं लिहिलेलें ' ग्वाल्हेर संस्थानांत लागवडीकरितां मिळणाऱ्या जमिनीसंबंधीं माहिती ' हें पुस्तक प्रसिद्ध

झालें. ग्वाल्हेर दरबारनें संवत् १९८० मध्यें आपल्या संस्थानांतील पडित जमिनींत लागवड होऊन वसाहत वाढावी या उद्देशानें चक ब्लॉकचा नवीन कायदा तयार केला. त्या कायद्यानें शेतकऱ्यांस व जमीनदारांस बऱ्याच सहुलती ठेविण्यांत आल्या. त्यांचा फायदा लोकांकडून मोठ्या प्रमाणांत घेतला जाण्याकरितां संस्थानांतल्या एकंदर जमिनीची माहिती सर्वांस होणें इष्ट असल्यानें रा. ब. कॅ. पवार यांनीं प्रस्तुत पुस्तक मुद्दाम लिहिलें असून यांत त्यांनीं जिल्हेवारची तशी माहिती तपशीलवार थोडक्यांत दिली आहे. पुढें सन १९३५ मध्यें रामराव जोतिराव शिंदे यांचें 'शेतकऱ्यांचा कैवारी' हें पुस्तक प्रसिद्ध झालें. नांवाप्रमाणेंच या पुस्तकांत शेतकऱ्यांचा कैवार घेतला गेलेला आहे. शेतकऱ्यांच्या शोचनीय सद्य:स्थितीवर प्रकाश पाडून सरकार व कार्यकर्ते यांनीं त्यांची स्थिति सुधारणें किती व कसें इष्ट आहे याची शिंदे यांनीं यांत केलेली मीमांसा उद्बोधक आहे व तसेंच सुसंघटित ग्रामोद्धार–कार्याची त्यांनीं रेखाटलेली रूपरेषाही मननीय आहे. प्रो. मोरो केशव दामले यांचा 'सृष्टिशास्त्र' या नांवाचा एक द्विभाग ग्रंथ प्रसिद्ध असल्याचें समजतें त्याचाही समावेश याच सदरांत केला पाहिजे. सदरचा ग्रंथ आमच्या पाहण्यांत आला नाहीं.

### तर्कशास्त्रविषयक ग्रंथ

इंग्रजींत ज्याला लॉजिक असें म्हणतात त्यालाच संस्कृतमध्यें न्याय अशी संज्ञा आहे; परंतु या न्यायांत लॉजिकबरोबर मेटॅफिजिक्सचाही अंतर्भाव झालेला आहे व षड्दर्शनांत त्याची गणना केली गेलेली आहे. अर्थात् हा विषय तत्त्वज्ञानाचाच एक भाग आहे. वास्तविक या न्याय शब्दाचे योग्यता, नियम, निकाल, फिर्याद, म्हणी वगैरे अनेक लाक्षणिक अर्थ संस्कृतांत प्रचलित आहेत. हा त्याचा संदिग्धपणा लक्षांत घेऊनच न्यायशास्त्राला विशिष्टार्थी तर्कशास्त्र असें

नवें नांव आधुनिक मराठी पंडितांनीं दिलेलें आहे, तें योग्यच आहे. कारण न्याय शब्द तेथें अनुमानार्थी आहे व 'नीयते अनेन इति न्यायः' म्हणजे मानवी मन एखाद्या अनुमानाकडे नेलें जातें तो न्याय असा व्युत्पत्तीवरून त्या शब्दाचा तर्क हा अर्थ बरोबर निघतोही. भारतवर्षांत या तर्कशास्त्राचा किंबहुना सर्व दर्शनशास्त्रांचा प्रणेता गौतम ऋषि हा होय. संस्कृतांत या शास्त्रावर झालेली ग्रंथनिर्मिति पुष्कळ मोठी आहे. ग्रीक राष्ट्रांतही या शास्त्राचा उदय बऱ्याच काळापूर्वी झाला. अरिस्टॉटल हा तेथील तर्कशास्त्राचा जनक मानला जातो. ग्रीक पंडितांनींही या शास्त्रावर विपुल ग्रंथरचना केलेली आहे. डिडक्शन म्हणजे निगमन व इन्डक्शन म्हणजे विगमन अशा तर्कशास्त्राच्या दोन शाखा आहेत. हल्लीं आपल्याकडे या शास्त्राचा अभ्यास बहुशः कॉलेजांतील विद्यार्थ्यांकडूनच त्यांच्या इच्छेनुसार होतो व त्यासाठीं इंग्रजींतील ग्रंथांचा उपयोग केला जातो म्हणून मराठींत या शास्त्रावर अद्यापपावेतों फारशी ग्रंथरचना झालेली नाहीं. मध्यभारतांत या विषयावर प्रो. मोरो केशव दामले यांनीं लिहिलेले 'न्यायशास्त्र—निगमन' व 'न्यायशास्त्र—विगमन' असे दोन ग्रंथ सन १९०१—०२ मध्यें प्रसिद्ध झाले आहेत. हे ग्रंथ भाषांतररूप नसून इंग्रजींतील डिडक्टिव्ह व इन्डक्टिव्ह लॉजिकवरील ग्रंथांच्या आधारें रचिलेले आहेत व त्यांतील प्रतिपादनपद्धति, परिभाषा वगैरे गोष्टींकडे पाहतां ते सर्वथा मराठींतील लॉजिकचे टेक्स्ट बुक म्हणून शोभण्यासारखे आहेत.

### मुद्राविज्ञानशास्त्रविषयक ग्रंथ

मुद्राविज्ञान अथवा मानवस्वभावदर्शन हें शास्त्र आपणांस नवें वाटत असलें तरी आपल्या प्राचीन भारतीय विद्वानांच्या सर्वग्राही बुद्धीनें त्याचेंही थोडेफार आकलन केलें होतें हें त्यांच्या 'यत्राकृतिस्तत्र गुणा वसंति', 'आकार सदृशप्रज्ञः' इत्यादि सुप्रसिद्ध वचनांवरून कळून

येतें; परंतु या विषयावर स्वतंत्र अशी ग्रंथरचना झालेली मात्र आढळत नाहीं. मराठींतही या विषयावर आतांपावेतों एकच ग्रंथ निर्माण झाला आहे व तो इंदूरचे सुविख्यात डॉ. श्रीधर नारायण शारंगपाणी यांचा सन १९३५ मध्यें प्रसिद्ध झालेला 'मुद्राविज्ञान अथवा मानव-स्वभाव–दर्शनशास्त्र' हा होय. या ग्रंथाची मूळ उभारणी फिला-डेलफिया येथील मुद्राविज्ञानशास्त्रसंपन्न मि. स्टँटन यांच्या एतद्विषयक अमेरिकन ज्ञानकोशावरून झालेली आहे; तथापि त्यांत इतर पाश्चात्य व पौर्वात्य देशांतील शारीरिक आणि भौतिक शास्त्रें यांचेही बऱ्याच ठिकाणीं आधार घेतलेले आहेत. सिद्धांत व संप्रदाय असे डॉक्टर साहेबांनीं आपल्या ग्रंथाचे दोन भाग केले असून त्यांत मनुष्याच्या चर्येवरून व एकंदर शरीराकृतीवरून त्याचें स्वभाववैशिष्ट्य, मानसिक गुणधर्म आणि वैयक्तिक बुद्धिमत्ता हे कसे ओळखावेत याची सविस्तर माहिती दिली आहे. हें शास्त्र अद्याप सर्वमान्य झालें नाहीं व पूर्णत्वासही पोंचलेलें नाहीं. अजून तें प्रयोगावस्थेंतच आहे. अस्तु. डॉक्टरसाहेबांच्या या उक्त ग्रंथानें मराठींत खरोखरच एका नवीन् शास्त्रीय ग्रंथाची भर पडली असून कोणत्याही माणसाचें अंतरंग व गुणवैशिष्ट्य यांविषयीं अनुमान काढण्यास जिज्ञासूंना एक मनोरंजक साधन प्राप्त झालें आहे. मराठींतील या ग्रंथाचें आजचें अद्वितीयत्व मध्यभारतास केव्हांही अभिमानास्पदच आहे !

## परलोकविद्याविषयक ग्रंथ

परलोकगत मनुष्यांचे आत्मे त्यांच्या देहाप्रमाणें पंचत्व पावत नाहींत. ते विदेही होऊन परलोकांत वास करीत असतात. कधींकधीं स्वेच्छेनुसार याही लोकांत ते अदृश्य रूपानें मधूनमधून भ्रमण करावयास येतात व श्राद्धपक्षास अन्नग्रहण करतात वगैरे गोष्टींवर आपणां भारतीयांची श्रद्धा सनातन काळापासून आहे; परंतु परलोकगत आत्म्यांशीं संभाषण करतां येतें असें त्यांस सांगितलें तर त्या गोष्टीवर

मात्र त्यांची श्रद्धा बसत नाहीं! तसें सांगणाऱ्याचा ते उपहास ऊर्फ टवाळी करूं लागतात! मृतांच्या आत्म्यांशीं संभाषण करतां येतें व तसें करणें हीच परलोकविद्या होय, असें परलोकविद्याविशारद प्रतिपादितात. या विद्येचा विशेष अभ्यास व प्रचार पाश्चात्य पंडितांनीं गेल्या पाऊणशें वर्षांपासून नेटानें चालविला आहे. त्यांत सर वुइल्यम क्रुक्स, सर ऑलिव्हर लॉज, मेजर-जनरल सर आल्फ्रेड टर्नर, सर ऑर्थर कॉनन डॉइल प्रभृति कित्येक विचक्षण शास्त्रज्ञांचीं नांवें प्रामुख्यानें उच्चारलीं जातात. आपल्या भारतवर्षांत शिशिरकुमार घोष व विश्वनाथ दामोदर ऋषि हे दोघे या विद्येचे एकनिष्ठ अभ्यासक, उपासक व प्रचारक ह्मणून प्रसिद्ध आहेत. थिऑसफीच्या वाङ्मयांतही या विषयाचें थोडेंफार प्रतिपादन केलें गेलें असल्याचें आढळतें व डेहराडूनहून 'परलोक' नांवाचें एक स्वतंत्र हिंदी मासिकही बरेच दिवसांपासून निघत असल्याचें समजतें. या विद्येच्या अभ्यासकांचें व प्रचारकांचें मृतात्म्यांशीं संभाषण करण्याचें मुख्य साधन ह्मणजे प्लँचेट हें होय. ऋषि यांनीं या विद्येच्या प्रचारासाठीं परलोकविद्याश्रम नांवाची एक संस्था मुंबईस काढली आहे. त्या संस्थेमार्फत ते प्लँचेटवर प्रत्यक्ष प्रयोग करून, व्याख्यानें देऊन आणि पुस्तकें व पत्रकें प्रसिद्ध करून परलोकविद्येचा प्रचार करीत असतात; परंतु अजून या विद्येवर लोकांची पाहिजे तशी श्रद्धा बसत नाहीं. ही कांहींतरी ठग विद्या आहे असेच उद्गार त्यांच्या तोंडून उपहासपूर्वक निघतात! असो. तें कांहींही असलें तरी एवढें मात्र खरें कीं, ऋषि प्रभृतींचे हे प्रयत्न सर्व लोकांच्या मनांत एक प्रकारचें कुतूहल उत्पन्न करून विचारोत्तेजक झाले आहेत. पाश्चात्य राष्ट्रांत या परलोकविद्येवर बरीच ग्रंथनिर्मिति झाली आहे; परंतु तशी भारतवर्षांत कोणत्याही भाषेंत अद्यापपावेतों झालेली नाहीं. मराठी भाषेंत तर आमच्या माहिती-प्रमाणें या विषयावर दोनच ग्रंथ निर्माण झालेले आहेत व ते दोन्ही

मध्यभारतांतच होत! यांपैकीं पहिला ग्रंथ ' सुभद्रा अथवा मरणोत्तर जीवन ' हा आहे. हा ग्रंथ स्वतः ऋषि यांनींच इंदुरास न्यायाधीश असतांना सन १९२३ मध्यें लिहिलेला आहे. या ग्रंथाचे शोध, परलोक विद्येचा इतिहास, मरणोत्तर मानवी अस्तित्व, संवाद करण्याचीं साधनें, परलोक वर्णन, प्रमाणभूत संदेश, बालकांची स्थिति, फायदे, स्मरणीय मुद्दे, मनोरंजक संदेश, आक्षेप निरसन असे अकरा भाग करून त्यांत वाचकांचीं मनें आकर्षून घेऊन त्यांची परलोकविद्येवर हळुहळू श्रद्धा बसत जाईल अशा प्रकारें माहिती दिली आहे. यानंतर दुसरा ग्रंथ ' रमा अथवा परलोकात्मे ' हा सन १९३२ मध्यें प्रसिद्ध झाला. याचे लेखक महेश्वरचे वकील गजानन बाळकृष्ण साठे हे होत. परिचय व प्रारंभ, निराशा, विश्वास, टवाळांची टवाळी, मानवी सामर्थ्य, कांहीं अनुभव, भास, दृश्यें अथवा दृष्टांत आणि परलोकात्म्यांशीं संभाषणाचे प्रकार व रीति असे या ग्रंथाचें आठ भाग किंवा प्रकरणें पाडलेलीं आहेत व त्यांत लेखकानें पूर्वी आपण परलोकविद्येची टवाळी करणारे असतांना पुढें ती विद्या जाणण्याची जिज्ञासा आपल्या ठायीं कशी उत्पन्न झाली, तिच्यासंबंधीं आपण किती व कसे प्रयत्न केले, मध्यंतरीं आपलें मन हेलकावे खाऊन आशा –निराशा, श्रद्धा–अश्रद्धा यांच्याकडे घटकोघटकीं कसें वळूं लागलें व शेवटीं अनुभवांमुळें या विद्येवर आपली श्रद्धा कशी जडली यांचा साग्र वृत्तांत या ग्रंथांत निवेदन केलेला आहे. या दोन्ही ग्रंथांची निर्मिति उभयतां लेखकांच्या पत्नीवियोगानंतर स्वतःच्या तळमळणाऱ्या आत्म्याची शांति होण्याच्या निमित्तानें झालेली आहे व त्यांतील एक लेखक न्यायाधीश एल्.एल्. बी. व दुसरा वकील अशा प्रकारें सर्वथा कायदेपंडित आहेत, हें येथें विशेषत्वानें सांगण्यासारखें आहे! अस्तु. त्यांच्या ग्रंथांनीं परलोक विद्येविषयींच्या वाचकांच्या सर्व संदेहांचे निरसन होऊन मन सश्रद्ध न झालें तरी तिच्यासंबंधीं वाढती जिज्ञासा

त्यांस लागून घटकाभर मनोरंजनाचा लाभ मात्र झाल्यावांचून राहणार नाहीं !

### यंत्रशास्त्रविषयक ग्रंथ

यंत्रशास्त्रावर आतांपावेतों मध्यभारतांत फारसें वाङ्मय निर्माण झालेलें नाहीं. फक्त तीनच पुस्तकें काय तीं प्रसिद्ध झालीं आहेत. त्यांपैकीं 'लोहमार्ग आणि आगगाडी' व 'विद्युन्मार्ग अथवा तारायंत्र' हीं दोन पुस्तकें अनुक्रमें सन १८८० व १८८७ मध्यें त्या वेळचे सनावद येथील स्टेशन मास्तर विष्णु चिमणाजी कर्वे यांनीं लिहिलीं. हीं दोन्हीं पुस्तकें त्यांनीं मूळ अनेक इंग्रजी ग्रंथांवरून तयार केलीं आहेत व त्यासाठीं नवीन शास्त्रीय परिभाषा उपयोजिली आहे. त्यांचें पारिभाषिक शब्द मुख्यत: संस्कृत, मराठी व ऊर्दू या तीन भाषांतून घेतलेले दिसतात. पहिल्या 'लोहमार्ग आणि आगगाडी' या पुस्तकांत आगगाडीचा सोपपत्तिक इतिहास प्रश्नोत्तररूपानें दिला गेला असून यंत्रासंबंधाची माहिती उदाहरणें व आकृति यांच्या द्वारें निवेदन केली गेली आहे व त्याबरोबरच यंत्रापघात आणि त्या अपघातांपासून होणाऱ्या दुखापतींचे तात्कालिक उपायही सांगितले गेले आहेत. शिवाय हिंदुस्थानच्या तत्कालीन रेलवेचें कोष्टक, जगांतील रेलवेचें कोष्टक आणि पारिभाषिक शब्दांचा कोश हीं शेवटीं देण्यांत आलीं आहेत. एकंदरींत आगगाडीचें सम्यक् ज्ञान वाचकांस सुलभतेनें होईल अशी या पुस्तकाची रचना कर्वे यांनीं केली आहे. दुसरें पुस्तक 'विद्युन्मार्ग अथवा तारायंत्र' यांत बातम्या पाठविण्याकरितां विद्युल्लतेचा उपयोग कसा करतात याची सांगोपांग माहिती दिलेली असून त्याची रचना अगदीं पहिल्या पुस्तकाप्रमाणेंच केलेली आहे. हें पुस्तक तयार करण्याच्या अगोदर स्वतः कर्वे यांनीं ता. २८ सप्टेंबर सन १८८३ रोजीं इंदूरचे अधिपति श्रीमंत द्वितीय तुकोजीराव होळकर यांस मराठी तारायंत्राचा एक यशस्वी प्रयोग करून दाखविला

होता. त्या प्रयोगाची हकीगत त्यावेळीं इंदूरहून निघणाऱ्या ' रेलवे समाचार ' नामक पत्रांत प्रसिद्ध झाली होती. तो प्रयोग पाहून महाराज संतुष्ट झाले व त्यांनीं कर्वे यांच्या पद्धतीनें आपल्या राज्यांत प्रथम बडवायपासून महेश्वरपर्यंत मराठी तारायंत्र काढण्याचा विचार केला; परंतु तो विचार पुढें कांहीं कारणामुळें कृतींत परिणत झाला नाहीं. यानंतर मध्यभारतांतील यंत्रशास्त्रावरील तिसरें पुस्तक ' बोलके चित्रपट ' हें सन १९३२ मध्यें प्रसिद्ध झालें. तें इंदूर येथील रा. कों. फाटक यांनीं लिहिलें आहे. त्यांत बोलक्या चित्रपटासंबंधींची शास्त्रीय सोपपत्तिक माहिती थोडक्यांत देण्यांत आली आहे. याच फाटकांनीं पुढें सीताबर्डी—नागपूरहून ' चलित् सृष्टि ' नामक एक चित्रपटविषयक मासिकही कांहीं दिवस चालविलें होतें. उज्जयिनीचे कवि धुंडिराज कृष्ण अष्टेवाले यांचे चिरंजीव गोविंदराव हे जर्मनींतून चित्रपट कलेचें प्रात्यक्षिक शिक्षण संपादून परत आले असून ते लवकरच या कलेवर एक शास्त्रीय ग्रंथ लिहिणार आहेत असें ऐकतों, सबब त्या गोष्टीचाही येथें उल्लेख करून ठेवणें अप्रस्तुत होणार नाहीं.

### संगीत शास्त्रविषयक ग्रंथ

संगीत शास्त्राच्या गायन व वादन या दोन्ही अंगांवर मध्यभारतांत इंदूरचे भास्कर गणेश भिडे व ग्वाल्हेरचे गायकशिरोमणि कृष्णराव शंकर पंडित या केवळ दोघांच प्रख्यात संगीताध्यापकांनीं अध्यापनपर असे लहानलहान बरेच ग्रंथ लिहिले आहेत व ते सर्व तज्ञांकडून प्रशंसिले जाऊन अभ्यासकांनाही अत्युपयुक्त ठरले आहेत. त्या ग्रंथांचा नुसतां नामनिर्देश केल्यानेंच त्यांचे विषय कळून येण्यासारखे आहेत. ' संगीत शास्त्र प्रवेश ', संगीत मार्गदीपिका ', ' सशास्त्र गायन-वादन शिक्षक ' ( १९२८ ), ' संगीत नाट्यविनोद ', ' रागरूपावलि ', ' शास्त्रीय गायन-वादन प्रवेशिका ' (१९२०), ' राग गीत प्रवेशिका ' (१९२०), ' स्वर राग प्रवेशिका ', ' तालकाल

प्रवेशिका' (१९२०) व 'तबला गाईड' (१९२४) असे दहा ग्रंथ भिडे यांनीं लिहिले असून 'संगीत प्रवेश—भाग १ व २', 'संगीत आलाप संचारी', 'संगीत सरगमसार', 'हार्मोनियम शिक्षक-भाग १ व २' व 'सतार जलतरंग शिक्षक' असे सात ग्रंथ पंडित यांनीं लिहिले आहेत. पंडितांच्या ग्रंथांत ग्वाल्हेरच्या जुन्या प्रसिद्ध खानदानी घराण्यांतील ख्याल, चिजा, तराणे, टप्पे वगैरे निवडक प्रकार देण्यांत आले आहेत व ते ग्रंथ अलाहाबाद विश्वविद्यालयानें अभ्यासक्रमांत नेमिले आहेत. भिड्यांच्या ग्रंथांचाही बराच प्रचार झालेला आहे. भारताचार्य चिंतामण विनायक वैद्य हे संगीतांत तज्ञ असून त्यांनीं ग्वाल्हेर येथें असतांना सतारीच्या गतीवर एक ग्रंथ लिहिला होता; पण तो कोठें गहाळ झाल्यानें प्रसिद्ध होऊं शकला नाहीं असें ह्मणतात.

## रत्नोपरत्नविषयक ग्रंथ

मौल्यवान् अशा विविध रत्नोपरत्नांविषयीं माहिती देणारा असा आतांपावेतों एकच द्विभाग ग्रंथ मध्यभारतांत निर्माण झालेला आहे तो ह्मणजे इंदूरचे आण्णाजी बल्लाळ बापट वैद्य यांचा 'रसरत्नमाला' हा होय. या ग्रंथाचा पहिला भाग सन १८८८ मध्यें प्रसिद्ध होऊन दुसरा सन १८८९ मध्यें प्रसिद्ध झाला आहे. दुसऱ्या भागांत रत्नोपरत्नांबरोबर विषोपविषांचेंही शोधन आणि मारण यांचे अनेक प्रकार सांगितले आहेत व कृत्रिम रत्नें तयार करण्याचे कांहीं सोपे प्रयोगही दिले आहेत. शिवाय रासायनिक औषधांची अनुपानांसह माहितीही मध्येंच घातली आहे. एकंदरींत लेखकानें हा ग्रंथ आपल्या वैद्यकी व्यवसायाला सर्वथा साजेसाच तयार केला आहे; परंतु हा ग्रंथ स्वतंत्र नाहीं. मूळ अन्य संस्कृत ग्रंथांतील श्लोक व त्यांच्या खालीं त्यांचा अर्थ अशी या ग्रंथाची रचना केलेली आहे.

## सूपशास्त्रविषयक ग्रंथ

सूपशास्त्रावरही मध्यभारतांत एक ग्रंथ प्रसिद्ध झाला आहे व

तोही अण्णाजी बल्लाळ बापट यांनींच लिहिलेला आहे. या ग्रंथाचें नांव 'पाक चंद्रिका' असें असून तो सन १८८६ मध्यें प्रकाशित झाला आहे. बापट यांनीं आपली वैद्यकी याही ग्रंथांत प्रकट केली आहे. रोग्यांस उपयुक्त अशीं अनेक प्रकारचीं पथ्यकर अन्नें व धातुपौष्टिक अप्रसिद्ध पक्वान्नें यांचीच अधिक माहिती या ग्रंथांत त्यांनीं देऊन कोणत्या रोग्यानें कोणते पदार्थ सेवन करावे व पथ्यें सांभाळावीं ह्मणजे त्यायोगें रोग दूर होण्यास मदत होते हे विशद करून सांगितलें आहे. हा ग्रंथ देखील अस्वतंत्र आहे. मूळ अन्य संस्कृत ग्रंथांतील श्लोक व त्याखालीं त्यांचा अर्थ अशीच याचीही रचना करण्यांत आलेली आहे.

## हुन्नर व कलाकौशल्यविषयक ग्रंथ

हुन्नर व कलाकौशल्यविषयक वाङ्मय मध्यभारतांत फारसें निर्माण झालेलें नाहीं. फक्त पांचच पुस्तकें काय तीं या विषयावर आतांपावेतों निर्माण झालेलीं आहेत. त्यांपैकीं 'हिंदुस्थान देशांतील कारागिरीचें वर्णन', 'हिंदुस्थानच्या उद्योगपर कला' व 'पश्चिम हिंदुस्थानांतील हुन्नर' हीं पुस्तकें रा. सा. बाळकृष्ण आत्माराम गुप्ते यांनीं इंदुरास असतांना लिहिलेलीं आहेत. यांतलीं पहिलीं दोन पुस्तकें सन १८८९ मध्यें प्रसिद्ध झालीं व तिसरें सन १८९१ मध्यें प्रसिद्ध झालें. पहिलें पुस्तक माधवराव नामजोशी यांनीं गुप्ते यांच्याकडून मुद्दाम लिहविलें होतें. या तिन्ही पुस्तकांवरून भारतवर्षांतील निरनिराळ्या कारागिरींसंबंधीं व हुन्नरांसंबंधीं उपयुक्त अशी बरीच माहिती मिळते. 'पश्चिम हिंदुस्थानांतील हुन्नर हा निबंध स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध होण्यापूर्वी लेखरूपानें 'विविधज्ञानविस्तारांतून' क्रमशः प्रसिद्ध झाला होता. यांत ऐतिहासिक माहिती देतांना कांहीं ठिकाणीं प्रमादही घडले आहेत. उदाहरणार्थ प्राचीन पद्मावती नगरी ह्मणजे आधुनिक नाशिक शहर असें त्यांत ह्मटलें आहे; परंतु नाशिकचें प्राचीन नांव पद्मावती

नसून पद्मनगर होतें. अस्तु. पुढें एतद्विषयक चौथें पुस्तक 'महेश्वरी लुगडीं' या नांवानें सन १९३२ मध्यें महेश्वरच्या गव्हर्मेंट वीव्हिंग डेमॉन्स्ट्रेशन फॅक्टरीचे सुपरिंटेंडेंट बी. के. देशपांडे यांनीं लिहून प्रसिद्ध केलें असल्याचें समजतें; परंतु तें आमच्या पाहण्यांत आलें नाहीं. नंतर पांचवें पुस्तक 'कलाकौशल्य' हें अलीकडे सन १९३५ मध्यें प्रसिद्ध झालें. हल्लीं धार येथें असलेले महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध शिल्पकार रघुनाथ कृष्ण फडके यांनीं हें पुस्तक लिहिलें आहे व त्यांत त्यांनीं सन १९३५ मध्यें हिंदुस्थानचे सार्वभौम बादशहा पंचम जॉर्ज यांच्या ज्युबिलीनिमित्त धार येथें जें कलाकौशल्याचें सुंदर प्रदर्शन भरविण्यांत आलें होतें तें पाहून आपणास जे विचार सुचले ते पुढें मांडिले आहेत. यांतील प्रायः सर्वच विचार कलाभ्यासकांस व कलाभिज्ञांस मननीय आहेत.

## अवांतर पुस्तकें

होळकरशाहींत व देशास संस्थानांत कायदेकानू आणि राज्य-व्यवस्था यांच्यासंबंधांत कांहीं लहानमोठीं पुस्तकें मराठींत तयार केलीं गेलीं आहेत, ही गोष्ट येथें निर्देशिणें अवश्य आहे. अशा पुस्तकांपैकीं होळकरशाहींतील 'रेव्हेन्यु सरक्युलरें', 'पोलिस ह्यांडबुक' 'सायर ह्यांडबुक', 'देहझाडा', 'बरलाई, खजराणा व डकाचा जहागिरींचे रिपोर्ट' वगैरे पुस्तकें महत्वाचीं आहेत.

## बालोपयोगी शास्त्रीय वाङ्मय

मध्यभारतांतील बालोपयोगी शास्त्रीय वाङ्मय ह्मटलें ह्मणजे वासुदेव गोविंद आपटे यांनीं इंदुरास असतांना लिहिलेलीं 'मनी आणि मोत्या' (१९१६), 'मुळांचा विविधज्ञानसंग्रह' (१९१७), 'मुलांची करमणूक—भाग १' (१९१७), व 'बालोद्यान पद्धति' (१९१८) हीं पुस्तकें व इंदुरच्या महाराजा शिवाजीराव मराठी मिडल स्कूलचे सायन्स टीचर विश्वनाथ सांवळाराम माकोडे यांनीं

लिहिलेलें 'सुलभ पदार्थविज्ञान' (१९३१) हे द्विभाग पुस्तक एवढेंच होय. यांतील 'मनी आणि मोत्या' या पुस्तकांत प्राणी-शास्त्राची माहिती दिलेली असून 'मुलांचा विविधज्ञानसंग्रह' या पुस्तकांत वाङ्मय, धर्म, नीति, उद्योग, व्यवहार वगैरे बरोबर भौतिक शास्त्राची माहिती विशेषत्वानें दिलेली आहे. आपटे यांचीं हीं सर्वच पुस्तकें मुलांना शास्त्रीय ज्ञानाचा सामान्य परिचय सुलभतेनें करून देणारीं आहेत. माकोडे यांचें 'सुलभपदार्थ विज्ञान' हें द्विभाग पुस्तक होळकर सरकार पुस्तक मालेंतून प्रसिद्ध झालें असून तें होळकर संस्थानांतील सरकारी शाळाखात्यानें चवथ्या व पांचव्या इयत्तांकरितां नेमलेल्या अभ्यासक्रमानुसार लिहिलेलें आहे व आतांपावेतोंच्या अनुभवावरून तें विद्यार्थ्यांस उपयुक्त असल्याचेंही दिसून येत आहे.

मध्यभारतांतील आतांपावेतोंचें शास्त्रीय व कलाविषयक वाङ्मय एवढेंच होय. या वाङ्मयांतील कांहीं ग्रंथ कसे अद्वितीय व वैशिष्ट्य-पूर्ण आहेत, हें योग्य स्थळीं दाखविण्यांत आलेंच आहे, त्यावरून मध्यभारतीय लेखकांच्या एतद्विषयक कामगिरीची परीक्षा कोणासही सहज होण्यासारखी आहे.

## प्रकरण ११ वें

# नियतकालिकें

सन १८६१ पासून १९३६ पावेतों मध्यभारतांत निर्माण झालेल्या विविध विषयांवरील वाङ्मयाचा येथवर परिचय करून देण्यांत आला, आतां नियतकालिकांचा परिचय करून द्यावयाचा राहिला आहे त्याकडे वळूं. वास्तविक आपल्या भारतवर्षांत नियतकालिकांचें बीज मूळ पाश्चात्य लोकांनीं रोंविलेलें आहे. लोकवार्ता, लोकशिक्षण व लोकमतनिदर्शन हें नियतकालिकांचें प्रथम मुख्य उद्दिष्ट कार्य होतें; परंतु पुढें त्यांतूनच हळुहळूं विविध शाखा फुटून हल्लीं नियतकालिकांचें कार्यक्षेत्र केवढें विस्तृत झालें आहे व त्यांचा प्रभावही राजसत्तेवर आणि समाजसत्तेवर कसा प्रस्थापित होत आहे, हें येथें विशद करून सांगण्याची आवश्यकता नाहीं. या नियतकालिकांचें 'वृत्तपत्र' व 'मासिकं' अशीं दोन मुख्य अंगें होत. नंतर त्यांपासून दैनिक, अर्धसाप्ताहिक, साप्ताहिक, पाक्षिक असे 'वृत्तपत्रा'चे आणि अर्धमासिक ऊर्फ पाक्षिक, द्वैमासिक, त्रैमासिक, षण्मासिक व वार्षिक असे 'मासिका'चे प्रकार अस्तित्वांत आले. हे सर्व प्रकार आपल्या मराठींत अस्तित्वांत आले असून त्यांतील कांहीं प्रकार मध्यभारतांतही

आजपावेतों अस्तित्वांत आलेले आहेत. त्या सर्वांचा आतां येथें परिचय करून देऊं.

### वृत्तपत्रें

प्रथम आपण वृत्तपत्रांकडे वळूं. महाराष्ट्रांतील किंबहुना मराठींतील पहिलें वृत्तपत्र म्हणजे गोविंद विठ्ठल कुंटे ऊर्फ भाऊ महाजन व बाळ गंगाधर शास्त्री जांभेकर यांनीं मिळून मुंबईस काढलेलें ' दर्पण ' हें साप्ताहिक होय. या ' दर्पणा ' चा पहिला अंक ता. ६ जानेवारी सन १८३२ रोजीं प्रसिद्ध झाला. हें अर्धें इंग्रजींत व अर्धें मराठींत निघत असे. मध्यभारतांतील पहिलें वृत्तपत्र ' माळवा अखबार ' हें त्यानंतर १७ वर्षांनीं इंदूरहून निघालें व त्याचा पहिला अंक ता. ६ मार्च सन १८४९ रोजीं प्रसिद्ध झाला. त्यावेळीं इंदुरास ' सर्व सुधारणांची जनयित्री ' म्हणविणारी श्रीमंत द्वितीय तुकोजीराव होळकरांची कारकीर्द चालू होती. ' माळवा अखबार ' साप्ताहिक असून तें दर मंगळवारीं प्रसिद्ध होत असे. त्याचे चालक रामशास्त्री नांवाचे एक गृहस्थ होते. वासुदेव गुरुजी यांच्या शिळाप्रेसवर त्याची छपाई होत असून तें मुख्यतः उर्दूमिश्रित हिंदी भाषेंत निघत होतें; तथापि त्यांतून मराठी मजकूर मधून मधून येत असे, असें म्हणतात. मध्यभारतांतील प्रमुख संस्थानांचे इतिहास व बातम्या यांना या साप्ताहिकांत प्रधान स्थान दिलें जाई. सन १८५७ च्या बंडाच्या विश्वसनीय अशा पुष्कळ बातम्या यांत प्रसिद्ध झाल्या होत्या. हें साप्ताहिक पुढें केव्हां बंद पडलें याचा शोध लागत नाहीं; तथापि तें चालू असतांनाच इंदुरहून ' पूर्ण चंद्रोदय ' नांवाचें दुसरें शुद्ध मराठी साप्ताहिक सन १८६१ मध्यें निघालें. हें साप्ताहिक दर शुक्रवारीं प्रसिद्ध होत असे. त्याच्याविषयीं अधिक माहिती आम्हास उपलब्ध झाली नाहीं; तथापि तें सन १८६५ पावेतों अस्तित्वांत होतें, असा शोध लागतो. पुढें धारेहून हरिभाऊ टिळक यांचें ' वृत्तधारा ' व देवासहून कृष्णाजी गणेश

अत्रे यांचें 'वृत्तलहरी' हीं साप्ताहिकें जवळजवळ एकाच वेळीं सुरू झालीं. 'वृत्तधारा' आमच्या पाहण्यांत आली नाहीं; परंतु 'वृत्तलहरी' चे सर्व अंक आम्हास उपलब्ध झाले. या 'वृत्तलहरीं' त स्थानिक व मध्यभारतांतील ठिकठिकाणच्या बातम्या, देवास उभय पातींतील राज्यकारभारावर टीका, चालू कादंबरी, लघुनिबंध वगैरे विषय येत असत व मधूनमधून इंग्रजी लेखही त्यांत दिले जात असत. त्याचा पहिला अंक सोमवार ता. २ ऑगस्ट सन १८७५ रोजीं प्रसिद्ध होऊन शेवटचा अंक सोमवार ता. १९ जून सन १८७६ रोजीं निघाला. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचे सहाध्यायी, फर्डे इंग्रजी लेखक व वक्ते आणि 'मनोरमा' या सुप्रसिद्ध मराठी नाटकाचे कर्ते महादेव बाळकृष्ण चितळे ऊर्फ बापूसाहेब भाजेकर हे या 'वृत्तलहरी'चे मुख्य संपादकीय सूत्रचालक असून बळवंतराव बापूजी बिडवई यांचाही त्यांत कांहीं दिवस भाग होता. या साप्ताहिकाची छपाई मुद्दाम त्याच्यासाठीं काढलेल्या सत्यसागर नांवाच्या शिळाप्रेसवर होत असे. पुढें सन १८७७ मध्यें इंदुरास रेलवे आल्यावर कांहीं दिवसांनीं रेलवेंतील कामगार मंडळींनीं तेथें आपलें एक मंडळ स्थापन केलें. त्या मंडळाच्या विद्यमानें सन १८८२ मध्यें 'रेलवे समाचार' नांवाचें एक साप्ताहिक इंदूरहून सुरू झालें. तें तीनचार वर्षें चांगलें चाललें असें म्हणतात. आम्हास या साप्ताहिकाचे अंक उपलब्ध झाले नाहींत. नंतर सन १८८८ मध्यें ग्वाल्हेर येथें सद्विचारिणी सभा स्थापन होऊन त्या सभेनें आपलें 'सद्विचार' नामक साप्ताहिक काढलें. हें साप्ताहिक शिळा प्रेसवर छापलें जात असे. सुमारें ३ वर्षें तें अनियमितपणेंच निघत राहून पुढें नोव्हेंबर सन १९०० पासून त्याचें मासिकांत रूपांतर झालें. अनंत कृष्णशास्त्री द्रविड हे या साप्ताहिकाचे संचालक होते व त्यांत निबंध, चुटके, संस्कृत व मराठी कविता, समस्यापूर्ति, मनोरंजक हकीगती इ. विषय दिले जात होते. जुलै सन १९०५ पासून

ग्वाल्हेरहून 'जयाजी प्रताप' हें संस्थानी साप्ताहिक सुरू झालें. तें ग्वाल्हेरी हिंदी भाषेंत अजूनपावेतों उत्तम रीतीनें चालत आलें आहे. त्यांत मराठी लेख, कविता वगैरे अधूनमधून प्रसिद्ध होत असतात. नंतर इंदूरहून जानेवारी सन १९१६ पासून 'मल्लारि मार्तंड विजय' निघाला व तो सन १९२३ पावेतों चालला. या साप्ताहिकाचे मराठी व हिंदी असे दोन निरनिराळे विभाग होते व त्यांतून इंग्रजी लेखांनाहीं मधूनमधून स्थान दिलें जात होतें. प्रथम वासुदेव गोविंद आपटे, नंतर विनायक सीताराम सरवटे व शेवटीं वासुदेव वामन ठाकुर असे याचे तीन मुख्य संपादक झाले. हे तिन्ही संपादक कसलेले मराठी लेखक ह्मणून प्रसिद्ध असल्यामुळें 'मल्लारि मार्तंड विजया'चे पहिल्या अंकापासून तो शेवटच्या अंकापावेतों सर्वच अंक उत्तम निघाले. इंदूर संस्थानांतील सरकारी व इतर बातम्या, हिंदुस्थानांतील व जगांतील मोठमोठ्या घडामोडी, प्रासंगिक स्फुट लेख व सामाजिक, औद्योगिक आणि शैक्षणिक विषयांवर निबंध, कविता, गोष्टी, स्थलवर्णनें वगैरेमुळें हें साप्ताहिक वाचकांस उपयुक्त व चटकदार वाटत असे. केशव नारायण डांगे, राजाराम दौलत गडकरी, रामचंद्र नारायण कुळकर्णी, प्रो. दत्तात्रय महादेव बोरगांवकर, सौ. सुमतीबाई वायंगणकर वगैरे मध्यभारतीय साहित्यिक मंडळी याच साप्ताहिकांतून प्रथम पुढें आली. सौ. सुमतीबाई वायंगणकर यांचा जुन्या व्रतास नवीन वळण व जी. एन्. शास्त्री यांचा सर्व्हिस : ऑफ रिलिजन या दोन लेखांनीं सदर साप्ताहिकाच्या कीर्तीत चांगली भर घातली होती. तसेंच नागपंचमी अंक (१९१७) व श्रीमंत सरकार सवाई तुकोजीराव होळकर यांच्या ३१ व्या वाढदिवसानिमित्त स्पेशल अंक (१९२०) हे त्याचे दोन विशेषांकही उत्तम निघाले होते. पुढें देवास धाकट्या पार्तीतून पूर्वीं मासिक ह्मणून निघणारें 'मार्तंड' ता. ७ जून सन १९२५ पासून साप्ताहिक ह्मणून निघूं लागलें, तें अद्यापपर्यंत चालू आहे.

प्रथम यांत मराठी मजकूर जास्त येत असे व हिंदी मजकूर थोडा येत असे; परंतु देवास धाकट्या पातीची राज्यभाषा ग्वाल्हेरी स्वरूपाची हिंदी झाल्यापासून त्याच्या उलट प्रकार झाला आहे व हल्लीं तर हें 'मार्तंड' साप्ताहिक जवळ जवळ हिंदीच बनलें आहे. डॉ. शंकर रामचंद्र ओक, सिद्धनाथ वासुदेव त्रिवेदी, रामराव ज्योतिराव शिंदे, ठा. लक्ष्मणसिंह चौधरी, पुनः डॉ. शंकर रामचंद्र ओक व आतां पूर्णचंद्र शर्मा अशी 'मार्तंडा'ची संपादक–परंपरा आहे. संस्थानांतील व इतर ठिकाणच्या बातम्या, चळवळी, घडामोडी, लघुकथा, निबंध, कविता वगैरे सर्व विषयांना 'मार्तंडां'तून स्थान दिलें जातें. देवास धाकट्या पातीचे सरकार श्रीमंत सदाशिवराव पवार खासे साहेब महाराज हे स्वतःही त्यांतून मधूनमधून कांहीं ना कांहीं लिहीत असतात. आतांपावेतों या 'मार्तंडा'नें तीनचार विशेषांक काढले आहेत. सन १९२७ पासून देवास मोठ्या पातींतही 'श्रीशिवाजी' नांवाचें साप्ताहिक सुरू झालें; परंतु हें साप्ताहिक नवीन नसून मुंबईच्या दामोदर सांवळाराम आणि मंडळीच्या थोडे दिवस चालून बंद पडलेल्या 'श्रीशिवाजी' साप्ताहिकाचाच पुनरावतार होता. याचा पहिला अंक ता. २२ आक्टोबर सन १९२७ रोजीं प्रसिद्ध झाला व शेवटचा अंक ता. २२ ऑक्टोबर सन १९३१ रोजीं निघाला. देवास मोठी पाती संस्थानानेंच हें साप्ताहिक चालविलें होतें व त्याचीं मुख्य संपादकीय सूत्रें कृष्णाजी गंगाधर कवचाळे यांच्याकडे सोंपविलीं होतीं. मराठी व हिंदी असे त्याचे दोन स्वतंत्र विभाग होते. स्थानिक व माळव्यांतील महत्त्वाच्या बातम्या, जागतिक घडामोडी, प्रचलित राजकारण, समाजकारण व वाङ्मय यांची उद्बोधक माहिती आणि गोष्टी, कविता, चरित्रें, स्थलवर्णनपर लेख, ऐतिहासिक संशोधन इत्याद्यनेक विषय या साप्ताहिकांतून येत असत. मालव- विशेषांक (१९२८) व भागवत विशेषांक (१९२८) असे दोन विशेषांकही

या साप्ताहिकाचे निघाले होते. भाषा शुद्ध व चटकदार आणि मांडणी आकर्षक यामुळें हें साप्ताहिक महाराष्ट्रांतील विद्वानां-कडूनही प्रशंसिलें गेलें होतें.

अस्तु. मध्यभारतांत आमच्या माहितीप्रमाणें आतांपावेतों निघालेलीं हीं एवढींच वृत्तपत्रें होत. यांशिवाय 'सत्यबोधिनी' (१८८५) या नांवाचें ब्रह्मसमाजाचें एक मुखपत्र इंदूरहून कांहीं दिवस चाललें होतें असें ऐकतों. या वृत्तपत्रांत वाटल्यास मध्यभारतां-तील प्रत्येक लहानमोठ्या संस्थानांच्या निघणाऱ्या गॅझेटांपैकीं कांहीं दिवसांपूर्वी मराठींत निघणाऱ्या देवास उभय पातींच्या गॅझेटांचा समावेश करतां येण्यासारखा आहे.

### मासिकें

आतां 'मासिका' कडे वळूं. या 'मासिका' चे पाक्षिक, मासिक व त्रैमासिक असे तीनच प्रकार आजपावेतों मध्यभारतांत अस्तित्वांत आले आहेत. त्या तिन्हींची मिळून प्रत्यक्ष संख्या मोजूं जातां ती पाक्षिक १, मासिकें १० व त्रैमासिकें ३ अशी १४ होते. 'इंग्रजी-मराठी शालापत्रक' हें मध्यभारतांतलें एकमेव पाक्षिक इंदूरहून सप्टेंबर सन १९२६ पासून त्रिंबक महादेव देवधर वांईकर मास्तर यांनीं विद्यार्थ्यांकरितां सुरूं केलें परंतु या पाक्षिकाचे ७-८ च अंक निघून तें बंद पडलें. विद्यार्थ्यांस सर्व प्रकारें उपयुक्त होतील असे लहानलहान लेख या पाक्षिकांत दिले जात असत. हें पाक्षिक अधिक काळ नेटानें चालविलें गेलें असतें तर कदाचित् त्याला उज्वल भविष्यही लाभलें असतें. मासिकांत 'काव्यारविंद' हें मध्यभारताचें अगदीं पहिलें मासिक सन १८९५ मध्यें ग्वाल्हेरहून निघालें. त्याचे संपादक गणेश नारायण कर्वे हे होते; परंतु या मासिकाचा शिळाप्रेसवर छापलेला केवळ एकच अंक निघून पुढें तें बंद पडलें, असें म्हणतात. नंतर नोव्हेंबर सन १९०० पासून ग्वाल्हेरच्या 'सद्विचार' साप्ताहिकाचें

मासिकांत रूपांतर होऊन तें जानेवारी सन १९०१ पावेतों चाललें. अर्थात् त्याचे मोजके तीनच अंक प्रसिद्ध झाले यानंतर उज्जयिनीहून जानेवारी सन १९०० पासून 'वैदिकधर्म' नांवाचें मासिक सुरू झालें. हें मासिक काढण्याची मूळ कल्पना बळवंतराव कमळाकर माकोडे यांची असून त्याची संपादकीय जबाबदारीही त्यांनीं आपल्या-कडेच घेतली होती व व्यवस्थापकाचें कार्य विनायक गणेश डोंगरे कुंभराजकर यांच्यावर सोंपविलें होतें. परंतु या मासिकाचे मोजके पांच अंक निघाल्यावर माकोडे यांचें देहावसान झालें. वैदिक धर्माविषयींची विविध माहिती, सत्पुरुषांचीं चरित्रें, पुण्यस्थानांचीं वर्णनें, पौराणिक कथा, व्रतादिकांची माहिती, धार्मिक वृत्त इत्यादि गोष्टी या मासिकां-तून प्रसिद्ध करण्याचें माकोडे यांनीं योजिलें होतें व त्याप्रमाणें पांच अंक त्यांनीं काढलेही होते स्पेन्सरच्या अज्ञेयवादावर सुंदर खंडनपर लेख त्यांनीं मुद्दाम या मासिकासाठीं लिहिला होता तो लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांना अतिशय आवडला. माकोडे यांच्या पश्चात् 'वैदिक धर्मा'चें संपादकत्व लोकमान्यांच्या सूचनेप्रमाणें डोंगरे यांनीं शंकर दाजीशास्त्री पदे यांच्याकडे दिलें. पदे यांनीं 'वैदिक-धर्मा'चे पहिल्या वर्षाचे अंक पुरते झाल्यावर दुसऱ्या वर्षाच्या आरंभापासून त्याचें 'स्वधर्म' असें नामांतर केलें व मूळ धोरणांतही थोडा बदल केला; परंतु लोकांस व स्वतः व्यवस्थापकांस तें फारसें रुचलें नाहीं. त्यामुळें 'स्वधर्मा'चे सहा महिन्यांत जेमतेम तीन अंक निघाल्यावर पदे यांना या मासिकाचा संबंध सोडावा लागला. नंतर कांहीं दिवस मासिक बंद राहून पुन: ऑक्टोबर सन १९०२ पासून 'वैदिकधर्म' या पूर्वीच्याच नांवानें तें उज्जयिनीच्या ऐवजीं इंदूरहून नव्या (अज्ञात) संपादकाकडून नव्या जोमानें चालू करण्यांत आलें; परंतु तें नियमितपणें मात्र चालू शकलें नाहीं. जून सन १९०३ पर्यंत त्याचे कसेबसे तीनच अंक निघून शेवटीं तें

कायमचें बंद पडलें. पुढें सन १९१८ मध्यें ग्वाल्हेरहून चांदोरकर यांनीं ' विजय ' नांवाचें मासिक चालू केलें. महाराष्ट्रांतील प्रसिद्ध कवि व नाटककार सदाशिव अनंत शुक्ल ऊर्फ कुमुदबांधव व भास्कर रामचंद्र भालेराव हेही या मासिकाच्या संपादक मंडळांत होते, असें ह्मणतात. सन १९२२ पावेतों हें मासिक चाललें. यांत कविता, निबंध, लघुकथा, विनोदी चुटके, व्यापार व उद्योगधंद्यांसंबंधीं माहिती, कूट प्रश्न वगैरे मनोरंजक विषय येत असत. हें मासिक विद्यार्थ्यांच्याच विशेष आवडीचें होतें. पुढें सन १९१९ मध्यें इंदूरहून सीताराम बळवंत बोंद्रे यांनीं ' विविध ' नांवाचें मासिक काढलें. यांत कविता, चरित्रें व चटकदार लघु निबंध दिले जात असत. अवघे सात अंक निघाल्यावर वर्गणीदारांच्या अभावीं हें मासिक बंद पडलें. या ' विविध ' मासिकाच्या पाठोपाठच आक्टोबर सन १९१९ पासून इंदूरहून ' चंद्रप्रभा ' नांवाचें एक मासिक चंद्रावती महिला विद्यालयाच्या विद्यमानें सुरू झालें. " चंद्रप्रभा हरुनियां श्रम बालिकांचें । देतें सुखास, रमवी मन नित्य त्यांचें " असा या ' चंद्रप्रभा ' मासिकावर श्लोकार्ध दिलेला असे. तो ' चंद्रप्रभे ' च्या विद्यार्थिनी–वाचकांस यथार्थ वाटल्यावांचून रहात नसे ! यांतले लेख व कविता प्रायः आटोपशीर व सर्वदृष्ट्या सुंदर असत. सन १९२७ पावेतों हें मासिक चालू होतें. ' चंद्रप्रभे ' नंतर मार्च सन १९२३ पासून देवास धाकट्या पातीचा ' मार्तंड ' उदयास आला व तो मे सन १९२५ पावेतों अगदीं नियामितपणें प्रकाशित होत राहिला. डॉ. शंकर रामचंद्र ओक यांनीं या मासिकाचें संपादन उत्कृष्ट रीतीनें करून तें चांगलें नांवारूपास आणलें होतें. माळव्यांतील व त्यांतून देवास येथील लेखक व कवि यांच्या कृतींनाच प्रस्तुत मासिकांत प्राधान्येंकरून स्थान दिलें जात असे, त्यामुळें इकडील लोकांना वाङ्मयसेवेची गोडी हळुहळूं लागली. डॉ. शंकर विश्राम सावंत,

त्र्यंबक रामचंद्र आवटे, चिंतामण गणेश ओक, श्रीधर लक्ष्मण धर्माधिकारी या लेखक व कवि मंडळीस 'मार्तंडा'नेंच पुढें आणलें. नंतर एप्रिल सन १९२४ पासून इंदूरहून 'आत्मबोध' मासिक सुरूं झालें. तें अद्यापपर्यंत नियमितपणें निघत आहे. श्रीमाधवनाथ महाराज चित्रकूटकर यांच्या सांप्रदायी मंडळीनें हें मासिक चालविलें असून त्याचें संपादकत्व पुरुषोत्तम गणेश खांडेकर यांचेकडे दिलें आहे. या मासिकाचा प्रत्येक वर्षाचा पहिला अंक विशेषांकाच्या स्वरूपांत मोठा निघत असतो. धार्मिक व आध्यात्मिक लेख, कविता, साधु-संतांचीं चरित्रें व यात्रावर्णनपर लेख या मासिकांतून मुख्यतः येत असतात. त्यांतल्या आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या लेखांपैकीं गंगासुतांनीं लिहिलेलीं अनेक संतचरित्रें, प्रो. अनंत वामन वाकणकर यांचे दासबोधावरील निबंध व वामनबुवा ब्रह्मचारी यांचें हिमालयांतील माझ्या चारी धाम यात्रा हे लेख उत्कृष्ट होत. पुढें मे सन १९३१ पासून ग्वाल्हेरहून 'हितचिंतक' मासिक निघालें व तें सन १९३४ पावेतों चाललें. याचे संपादक रघुनाथ विष्णु शिरढोणकर हे असून यांत लोकाभिरुचीस उतरणारे विविध विषयांवरील लेख, कविता, लघुकथा, चरित्रें वगैरे येत असत. उत्तर हिंदुस्थानांतील महाराष्ट्रि-यांचें प्रातिनिधिक मराठी मासिक ह्मणून ख्याति प्राप्त करून घेण्याचा या मासिकानें यथाशक्ति प्रयत्न केला; परंतु तो आश्रयदात्यांच्या अभावीं यशस्वी होण्याचा योग दिसेना तेव्हां निराश होऊन शेवटीं शिरढोणकरांनीं 'हितचिंतक' बंद केलें व हिंदीमध्यें 'आशा' नांवाचें नवीन साप्ताहिक जोमानें सुरूं केलें; पण तेथें देखील दुर्दैव आडवें येऊन त्यांचा तोही प्रयत्न लवकरच निष्फळ झाला. 'हित-चिंतका'चे सन १९३३ मध्यें खास पानिपत अंक व खास शिंदे अंक असे दोन विशेषांक प्रसिद्ध करण्यांत आले होते. त्या दोन्ही अंकांत महाराष्ट्रांतील व बृहन्महाराष्ट्रांतील नांवाजलेल्या मोठमोठ्या

इतिहाससंशोधकांचे महत्त्वाचे लेख आल्यानें ते खरोखरच उत्कृष्ट निघाले. मध्यभारतांतील आमच्या माहितीचीं हीं एवढींच मासिकें होत. यांशिवाय ' ज्योतिर्विद्याभूषण ' नांवाचें एक मासिक बडवाणीहून निघत असल्याचा निर्देश ' मराठी वाङ्मयसूचीं ' त केलेला आहे; पण त्याच्याविषयींची अधिक माहिती त्या सूचींत किंवा अन्यत्र आह्मांस मिळाली नाहीं. अस्तु. आतां त्रैमासिकांकडे वळतां त्यांतील पहिलें त्रैमासिक ' विद्यार्थी ' हें असल्याचें आढळतें. हें त्रैमासिक इंदूरहून प्रो. शांताराम अनंत देसाई यांनीं जानेवारी सन १९०७ पासून सुरूं केलें व आक्टोबर सन १९१३ पर्यंत योग्य रीतीनें चालविलें. याच्या प्रत्येक अंकांत धर्म व तत्त्वज्ञानविषयक तीनतीन चारचार मोठमोठ्या चालू लेखमाला देण्यांत येत असत व त्या सर्व प्रो. देसाई हेच लिहीत असत. या सर्व लेखमाला पुढें पुस्तकरूपांत प्रसिद्ध झाल्या असून त्यांचा परिचय मागें करून देण्यांत आला आहे. हें त्रैमासिक साधारण वाचकांच्या उपयोगाचें नसल्यानें साहजिकच त्याचे वर्गणीदार आरंभापासून अल्पसंख्यच होते. शेवटींशेवटीं या मासिकांतून अर्धा मराठी व अर्धा इंग्रजी मजकूर दिला जात असे. ऑक्टोबर सन १९२० पासून मराठा शिक्षण परिषदेच्या सल्लागार मंडळानें ' मराठा-मंडळ ' हें त्रैमासिक ग्वाल्हेरहून सुरूं केलें. त्याचे व्यवस्थापक शंकरराव विठ्ठलराव कदम कातरणीकर हे होते. जुलै सन १९२१ पावेतों त्याचे चार अंक निघाल्यावर तें पुढें कायमचें बंद पडल्याचें दिसतें. या त्रैमासिकांतून कर्नल (नंतर जनरल) नानासाहेब शिंदे यांचा पानपतच्या घनघोर संग्रामाचा युद्धशास्त्रदृष्ट्या विचार हा विस्तृत लेख प्रसिद्ध झाला होता. तो माहितीपूर्ण व वाचनीय असा आहे. यानंतर सप्टेंबर सन १९२९ ( भाद्रपद शके १८५१ ) पासून ' मालव साहित्य ' हें त्रैमासिक इंदूर महाराष्ट्र साहित्य सभेतर्फे सुरूं झालें. तें अद्यापपर्यंत चालूं आहे. या त्रैमासिकासाठीं प्रथम विनायक सीताराम सरवटे,

प्रो. वामन गोपाळ ऊर्ध्वरेषे, प्रो. लक्ष्मण बाळकृष्ण देव व विनायक हरि आपटे या चौघांजणांचें संपादक मंडळ नेमिलें गेलें होतें. नंतर प्रो. वामन गोपाळ ऊर्ध्वरेषे व विनायक हरि आपटे हे दोघे त्याचे संपादक झाले आणि पुढें थोड्या दिवसांनीं सीताराम काशीनाथ देव यांचीही त्या दोघांबरोबर आणखी योजना करण्यांत आली. या त्रैमासिकांतील लेख व कविता भारदस्त आणि उच्च विचारप्रवर्तक असून मध्यभारतांतील प्राय: सर्वच साहित्यिकांच्या कृति त्याच्यांतून प्रसिद्ध होत असतात. शिवाय बाहेरील साहित्यिकांच्या लेखांनाही त्यांतून स्थान दिलें जात असतें. आतांपावेतों यांतून जेवढे लेख प्रसिद्ध झाले आहेत त्यांतील प्रो. चिंतामण विनायक जोशी यांचा मराठी वाङ्मयाचा परिचय, प्रो. अ. स. अळतेकर यांचा प्राचीन हिंदु विद्यापीठें, मा. रा. ओक यांचा उत्तर हिंदुस्थानांतील विश्वविद्यालयें, सरदार मा. वि. किबे यांचा मराठी साहित्य य सभ्यता, का. कृ. लेले यांचा माळव्यांतील मुसलमानी सत्तेचा इतिहास व परमारकुलमणि धाराधीश महाराजाधिराज भोजदेव यांची साहित्यसेवा या लेखांचा येथें निर्देश करणें अवश्य आहे. या 'मालव साहित्या' नें सन १९३४ मध्यें ३०० पानांचा मोठा इंदूर विशेषांकही प्रसिद्ध केला. या विशेषांकांत तज्ज्ञ लेखकांचे इंदूर विषयींचे विविध माहितीनें भरलेले अनेक लेख, इंदूरशीं संबंध असलेल्या इतर निरनिराळ्या व्यक्तींचीं व स्थळांचीं चित्रें, कविता, लघुकथा, पुस्तकपरीक्षणें इत्याद्यनेक विषय देऊन त्यास सर्वांगसुंदरता आणलेली आहे.

### अवांतर नियतकालिकें

वरील नियतकालिकांशिवाय जीं इतर नियतकालिकें मध्यभारतांत आतांपावेतों निघालीं त्यांचाही येथें निर्देश करणें अवश्य आहे. अशा नियतकालिकांत ग्वाल्हेरचे 'व्हिक्टोरिया कॉलेज मॅगेझिन', उज्जयिनचें 'माधव कॉलेज मॅगेझिन', इंदूरचे 'होळकर कॉलेज मॅगेझिन'

(सन १९१५ पासून चालू) व 'ख्रिश्चन कॉलेज बुलेटिन' (सन १९१८ पासून चालू) हीं प्रमुख होत. कारण या सर्वांतल्या मराठी विभागांचें संपादन बव्हंशीं चांगलें असतें. त्यांशिवाय इंदूरहून 'धर्म-शिक्षणमाला' व 'धर्मप्रकाश' अशा दोन मासिक स्वरूपाच्या मालाही अनुक्रमें सन १९३० व १९३१ मध्यें निघाल्या होत्या; परंतु त्यांचे दोनदोनच अंक निघून त्या पुढें बंद पडल्या. पहिल्या मालेचे प्रकाशक रामचंद्र हयग्रीव मणूरकर व दुसऱ्याचे अच्युतराव भीमराव क्षीरसागर हे होते.

मध्यभारताशीं संबंध असलेल्या किंवा आलेल्या अशा साहित्यि-कांनींहीं इतरत्र राहून काढलेल्या नियतकालिकांचादेखील येथें जातां-जातां नामनिर्देश करणें अप्रस्तुत होणार नाहीं. अशा साहित्यिकांत वासुदेव गोविंद आपटे यांची आठवण अगदीं पहिल्यानें होते. त्यांच्या पुण्याहून नांवाजलेल्या 'आनंदा'चा जन्म ऑगस्ट सन १९०६ मध्यें इंदुरास झाला व मधूनमधून 'आनंद' इंदुराहूनही निघत राहिला असें ह्मणतात. तत्पूर्वी मुंबईहून रा. सा. बाळकृष्ण आत्माराम गुप्ते यांनीं 'कायस्थ प्रभूच्या इतिहासाचीं साधनें' (१८८१–१८८५), सदाशिव आत्माराम केळकर यांनीं 'ज्ञानदीप' (सप्टेंबर सन १८८४ -जानेवारी सन १८८५) व जगन्नाथ रावजी दुल्लु यांनीं 'विद्यावर्ष' (१८९७) हीं मासिकें चालविलीं होतीं आणि पुण्याहून श्रीनिवास त्र्यंबक द्रविड यांनीं 'विद्याविनोद' (आक्टोबर सन १८९८–ऑगस्ट सन १९०१) मासिक काढलें होतें. पुढें मुंबईहून वासुदेव वामन ठाकुर यांनीं 'श्रीसारस्वत' (ऑगस्ट-नोव्हेंबर सन १९१२) व काशीहून रामचंद्र बळवंत डोंगरे यांनीं 'योगरहस्य' (सन १९१३) हीं मासिकें चालविलीं. मुंबईचें केशव सीताराम ठाकरे यांचा देवासशीं थोडाफार संबंध असल्यानें त्यांच्या 'प्रबोधना' (१९२२) चाही येथें उल्लेख करणें अनवश्यक होणार नाहीं. प्रो. परशुराम नारायण

पाटणकर यांनीं काशीहून 'धर्मसंगति' (१९२४) ही संस्कृत मासिक पत्रिका व शिवचंद्र बलदेव भारतिया यांनीं कलकत्त्याहून 'वैश्योपकारक' (१९०४) हें हिंदी मासिक चालविलें असल्याचेंही येथें नमूद करावेसें वाटतें.

अस्तु. येथवर परिचय करून देण्यांत आलेल्या खास मध्यभारतांतील एकंदर नियतकालिकांची संख्या पाहूं जातां ती गेल्या ७५ वर्षांत २५ पावेतों पोहोंचलीं असल्याचें दिसून येतें; परंतु तीं नियतकालिकें प्रायः अल्पजीवी ठरून त्यांतील आज केवळ तीनच अस्तित्व धरून रहावींत व त्यांचेही संसार जेमतेमच चालावेत, ही गोष्ट मध्यभारतीय मराठी भाषा-भाषीयांस खरोखरच कमीपणा आणणारी आहे. सदर गोष्टीवर आम्हीं मागें एकदां खेद प्रकट केला असतां त्यावर एका विद्वानानें, मध्यभारत हा भिन्नभिन्न देशी संस्थानिकांचा देश आहे अर्थात् येथील अस्थिर वातावरणांत नियतकालिकांचीं रोपटीं अधिक काळपावेतों जीव धरूं शकत नाहींत, असें उत्तर दिलें होतें. या उत्तरांत बरेंच तथ्य असलें तरी तशाही वातावरणांत आक्षेपार्ह बाबी सोडून व दुसऱ्या अनेक उद्बोधक विषयांनीं नियतकालिकांना बाळसें आणून तीं लोकाश्रयावर उत्तम प्रकारें जगवितां येतील, असा विश्वास बाळगणें आमच्या मतें कांहींच हरकत नाहीं.

---

# उपसंहार

## ग्रंथनिर्मितीचें सिंहावलोकन

मध्यभारतांतील गेल्या उण्यापुऱ्या ७५ वर्षांमधील मराठी वाङ्मयाचा परिचय करून देण्याचें संकल्पित कार्य येथें संपलें. या कालांत इकडील लेखकांनीं व कवींनीं विविध विषयांवर ग्रंथनिर्मिति करून आणि राजे लोकांनीं व धनिकांनीं तत्संबंधीं सदैव सक्रिय सहानुभूति प्रकट करीत राहून एकंदर मराठी वाङ्मयाच्या वाढीस किती व कसा हातभार लाविला आहे, याची कल्पना सदर परिचयावरून कोणासही सहज करतां येईल. वास्तविक मध्यभारत अगोदरच महाराष्ट्रापासून दूर आहे व येथें प्रचलित असलेल्या विविध भाषांच्या गराड्यांत मराठी भाषेला मिळालेला वांव अगदींच परिमित आहे तरीही तशा परिस्थितींत दोनशें–अडीचशें वर्षांपूर्वी महाराष्ट्रांतून दिग्विजयार्थ बाहेर पडलेल्या मराठा वीरांच्या संतानांनीं या प्रदेशावर 'स्वराज्या'चीं अवशेषरूप अशीं आपलीं संस्थानें अद्यावत् कायम राखून त्यांच्या छत्रछायेखालीं स्वसंस्कृतीबरोबरच स्वभाषेचेंही पिढ्यानुपिढ्या अखंड संवर्धन चालविलेलें आहे, त्याकडे

महाराष्ट्रानें तत्त्वत: कोणत्या दृष्टीनें पहावयास पाहिजे हें येथें सांगण्याची आवश्यकता नाहीं. मध्यभारतीय मराठी साहित्यिकांच्या या कार्यानें केव्हांही महाराष्ट्राच्या लौकिकांत थोडीबहुत भर पडतच आहे; परंतु त्याशिवाय विक्रम, भोज, कालिदास आदींनीं ज्या मध्यभारतांतर्गत मालव देशाचा 'सरस्वतीभू' ह्मणून लौकिक पूर्वीपासून दिगंत विख्यात करून ठेविलेला आहे तोही राखण्याचें श्रेय कांहीं अंशीं त्या साहित्यिकांनीं यामुळें अनायासें लाभत आहे, याचा येथें अभिमानानें निर्देश करणें जरूर आहे.

मध्यभारतीय मराठी साहित्यिकांनीं आजवर निर्मिलेल्या एकंदर ग्रंथांची संख्या पाहूं जातां ती ५०० पेक्षां अधिक असल्याचें सहज दिसून येईल. या ग्रंथनिर्मितीचें दश वार्षिक विषयवार प्रगतीचें प्रमाणही कळण्याची जिज्ञासा कोणास होणें संभवनीय आहे ह्मणून त्यासंबंधाचें एक कोष्टक परिशिष्टरूपानें या पुस्तकास मुद्दाम जोडलें आहे व तसेंच ग्रंथ आणि ग्रंथकार या दोन्हींच्या पृथक् पृथक् सूच्याही शेवटीं दिल्या आहेत; परंतु या सर्व गोष्टी मध्यभारतीय वाङ्मयाचें स्थूल दर्शन करविणाऱ्या आहेत, त्याचें विशेषत्व जाणण्यास मात्र त्या वाङ्मयाचें प्रत्यक्ष सिंहावलोकनच करावें लागेल. हें सिंहावलोकन अर्थात् एकेक विषय घेऊन त्यांतील प्रमुख ग्रंथ व ग्रंथकार यांच्या निर्देशावरून करतां येईल. त्याप्रमाणें प्रथम भाषा व साहित्य या विषयाकडे वळतां सकृद्दर्शनींच कुळकर्णी यांचें 'भाषासौंदर्यशास्त्र' हें 'मराठी भाषेची घटना' कर्ते जोशी यांनीं प्रशंसिलेलें लघु पुस्तक पुढें उभें राहतें व त्याच्या पाठोपाठ इतिहासाचार्य राजवाडे यांनाही मान्य झालेलें प्रो. पाटणकर यांच्या 'मराठी भाषेच्या माहेराच्या सिंहावलोकना' कडे मन आकृष्ट होतें. यानंतर अलीकडच्या काळचे दादोबा पांडुरंग असें ज्यांना निःसंकोचपणें ह्मणतां येईल त्या प्रो. दामल्यांचें 'शास्त्रीय मराठी व्याकरण', अटेरकरांचा 'एकाक्षरी

कोश' व काळेल्यांचा 'राजकोश' हे सर्व मराठींत खरोखरच अद्वितीय असलेले ग्रंथ एकामागून एक समोर दिसूं लागतात व त्याबरोबर साहित्यशास्त्रावरील ज्यांचा दृढ व्यासंग सर्वपरिचित होता त्या बळवंतराव माकोड्यांचे 'रूपक प्रबोध' व 'रसप्रबोध' या ग्रंथद्वयाचें लागलेंच स्मरण होतें. माकोड्यांचे हे ग्रंथद्वय ह्मणजे मराठी साहित्य शारदेचे सुंदर अलंकारच होत. या सुचलेल्या अलंकाराच्या उपमेवरून माकोड्यांनीं मागें १८९३-९४ मध्यें साहित्यांतील 'अलंकार' या विषयावर 'ज्ञानसंग्रह' मासिकांतून लिंहिलेल्या निबंधाचीही ओघानें आठवण होते. प्रत्यक्ष रा. ब. विष्णु मोरेश्वर महाजनी व रा. सा. गणेश जनार्दन आगाशे या विद्वच्छ्रेष्ठांनीं सदर निबंधाची प्रशंसा केली होती. यानंतर 'कला आणि नीति' व 'नीति आणि कलोपासना' हीं केव्हांहीं स्मृतीपुढें ताजींच राहणारीं कला-नीति वादावरील अनुक्रमें कविवर्य तांबे व कवीश्वर यांचीं पुस्तकें पुढें दिसूं लागतात. या पुस्तकांनीं केवळ मध्यभारतीय मराठी साहित्यालाच नव्हें तर, एकंदर मराठी साहित्यालाही चिरविभूषित केलें आहे. यांतल्या कवीश्वरांच्या पुस्तकानें कला—नीति वादांतील दोन्ही पक्षांचा परामर्ष घेऊन जो स्पष्ट व समतोल निर्णय दिला आहे, त्यांतील व्यवहारदृष्टीनें असलेले कांहीं मतभेद वर्ज्य करून, महाराष्ट्रांतील विद्यमान् प्रमुख विद्वानांनीं त्यास मान्यत्व दिलेलें आहे, हें सर्वश्रुतच आहे! अर्थात् त्याच्याविषयीं येथें अधिक कांहीं सांगण्याची आवश्यकता नाहीं. यापुढें कथा वाङ्मयाकडे वळून पाहतां त्यांतील अद्भुतरम्य कादंबऱ्यांपैकीं डांगेवाले यांचें 'बालपिशाची' व सौ. कमलाबाईसाहेब किबे यांची 'राजकुमारी'; ऐतिहासिक कादंबऱ्यांपैकीं बर्वे यांची 'ठगाची जबानी', आपटे यांची 'मूर्तिमंत देशाभिमान', सहस्रबुद्धे यांची 'अमृतपुलिन' व डॉ. ओक यांची 'विक्रमाच्या उज्जयिनींत!'; आणि सामाजिक कादंबऱ्यांपैकीं आपटे यांच्या

'दुःखाअंतीं सुख', 'नवयुग', विलक्षण भोळेपणा' व 'माणिक बाग'; गोरे यांची 'भग्नहृदया', इनामदार यांची 'खरी लोकसेवा' व दांडेकर यांची 'चंद्रकांताचा चांद झाला!' या सर्व कादंबऱ्या आपआपल्यापरी वैशिष्ट्यपूर्ण असून त्यांनीं बरीच लोकप्रियता संपादिली आहे. भागवतांच्या 'झीनात महाल' ची ही येथें एका विशेष उद्देशानें आठवण देणें जरूर आहे. पूर्वीं सरकार जमा (Proscribed) झालेल्या मराठी पुस्तकांत तीही सरकार जमा झालेली आहे व अजून तिच्यावरील बंदी उठलेली नाहीं! कथा वाङ्मयानंतर नाट्य वाङ्मयाकडे वळतां त्यांत अद्भुतरम्य नाटकांपैकीं रा. ब. नीळकंठराव कीर्तन्यांचें 'टॅपेस्ट' व बऱ्याचें 'हिंमतबहाद्दर'; पौराणिक नाटकांपैकीं बेडकरांचें 'ब्रह्मकुमारी'; ऐतिहासिक नाटकांपैकीं भारताचार्य वैद्यांचें 'संयोगिता' व सामाजिक नाटकांपैकीं प्रो. बोरगांवकरांचें 'शांति-स्वरूप' हीं नाटकें मध्य-भारताचें नांव राखणारीं आहेत. माधवराव लेले यांनीं कांहीं प्रमुख संस्कृत नाटकांवर लिहिलेले 'सार व विचार' नामक निबंध, तसेंच प्रो. ऊर्ध्वरेषे यांचा 'स्वप्नवासवदत्ता' वरील निबंध आणि रहाळ-करांचें 'शाकुंतल-सौंदर्य' हें पुस्तक यांना मराठी वाङ्मयाच्या या प्रांतांत मानाचें स्थान मिळावें यांत नवल नाहीं! पुढें काव्य वाङ्मयाकडे दृष्टि फेंकतां त्यांत स्तुति-भक्तिपर व पौराणिक काव्यांपैकीं अंधकवि गोळे यांचें 'शिवस्तुति', प्रो. मोडक यांचें 'शीलनाथ-अष्टोत्तरी' आणि भोपटकरांचें 'चौपाई रामायण'; उपदेशपर काव्यांपैकीं अभंग यांचें 'मनास बोध'; ऐतिहासिक काव्यांपैकीं जोशी करकंबकरांचें 'थोरले मल्हारराव होळकर सुभेदार यांजवरील काव्य' व समर्थ-दासांचें 'यशवंत गीत' आणि शोकपर काव्यांपैकीं टुल्लु यांचीं 'मातृविरह' व 'प्रिया विरह' हीं काव्यें उल्लेखनीय असून पांढर-करांचें मराठी 'माघ काव्य' ही उत्कृष्ट भाषांतराचा नमुना म्हणून

निर्देशनीय आहे. काळेल्यांच्या ‘ वाग्वसंता ’ नें व सरवट्यांच्या ‘ वाग्विहारा ’ नें तर रसिकांचें चित्त खात्रीनें प्रसन्न होईल आणि आपट्यांच्या ‘ माले ’ चा व रहाळकरांच्या ‘ पुष्पांजली ’ चा स्वीकार ते अगदीं प्रेमपुरःसर करतील. उज्जयिनीच्या महाराष्ट्र वाङ्मय मंडळाची ‘ मालविका ’ त्यांना रिझवील व कुळकर्ण्यांचा ‘ मानस-निर्ष्यंद ’ संतृप्त करील. तांब्याच्या कवितेविषयीं तर अधिक सांगावयालाच नको. रसिकांना वेड लावणारीं त्यांचीं भावगीतें ह्मणजे महाराष्ट्र शारदेचा एक नितांत सुंदर व अनर्घ्य असा अलंकारच होय ! हंसांचे तुकाराम, मोरोपंत व वामन या नामांकित संतकवींच्या कवितांवरील निबंध व रहाळकरांनीं केशवसुतांच्या कवितेचें केलेलें मार्मिक आणि रसग्राही समालोचन विद्वदादरास पात्र ठरलेले सर्वश्रुतच आहे. यानंतर ऐतिहासिक वाङ्मय विचारांत घेतां त्यांत वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध अशा काशीनाथपंत लेल्यांची कामगिरी सकृद्दर्शनीं समोर दिसूं लागते ! त्यांचे धार संस्थानचे प्राचीन व अर्वाचीन इतिहास किती मोलाचे आहेत हें आज कोणत्याही भारतीय इतिहासकारांस माळव्याविषयीं लिहितांना लेले यांच्या पुस्तकांच्या हटकून घ्याव्या लागणाऱ्या आधारांवरून सुस्पष्ट होतें. माधवराव लेले यांचीं ‘ भोपाळ संस्थानचा इतिहास ’, ‘ राजतरंगिणी ’ व ‘ अकबर बादशहाचें चरित्र ’ हीं भाषांतरित पुस्तकेंही उपयुक्त ठरलीं आहेत. ‘ देवी श्रीअहल्याबाई ’ हें पुरुषोत्तमांनीं लिहिलेलें चरित्र सर्व चरित्रलेखकांस आदर्श ह्मणून पुढें ठेवण्यासारखें झालें असल्याचें भारताचार्य वैद्य यांनीं ह्मटलें आहे, तें कोणासही यथार्थच वाटेल. बाळकृष्णपंत देवांची मार्मिक दृष्टि, इतिहासाचा सखोल अभ्यास व चरित्रें आकर्षक रीतीनें लिहिण्याची विशिष्ट पद्धति यांच्या योगानें त्यांचें नांव मराठी वाङ्मयांत चिरस्मृत राहील. त्यांचीं लहानमोठीं सर्वच चरित्र-पुस्तकें उत्कृष्ट ह्मणून प्रशंसिलीं गेलीं आहेत. ते उत्तम टीकाकारही होते.

त्यांचे टीकात्मक लेख विचारांनीं भरलेले असत. विष्णुशास्त्री चिपळुणकरांवरील त्यांचें टीकास्त्र, 'मराठी रियासती' तील (मध्यविभाग ४) आनंदीबाईच्या गुन्हेगारी प्रकरणांतील विधानांचें खंडन वगैरे त्यांचे टीका लेख याबद्दलची खात्री पटविणारे आहेत. त्यांच्या विचारांशीं ज्यांचा मतभेद असे अशा व्यक्तींनादेखील त्यांच्या विद्वत्ता व मार्मिकता या गुणांबद्दल आदर वाटे. अनंत नारायण भागवत यांचा इतिहासलेखनाचा दांडगा व्यासंग प्रसिद्धच आहे. त्यांचीं 'होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें' व सरदार फाळके यांचीं 'शिंदेशाही इतिहासाचीं साधनें' भावी इतिहासकारांस केव्हांही अत्युपयुक्त ठरतील. सौ. कमलाबाईसाहेब किबे यांच्या 'सीता चरित्रा' नें तर मराठी वाङ्मयांतील पौराणिक व्यक्तिचरित्रांच्या सदरांत एका चांगल्या पुस्तकाची भर पडली आहे. अशीच भर संत कवींच्या चरित्रांच्या सदरांत केशवराव केळकरांच्या 'श्री तुकाराम महाराज' या ग्रंथानें पडली आहे. यापुढें प्रवासवर्णन व स्थलवर्णनविषयक वाङ्मयाकडे वळतां त्यांत भागवतांचें 'तीर्थयात्राप्रबंध', प्रो. चव्हाण यांचें 'काश्मिरी फुलांची पखरण', डोंगरे यांचें 'उज्जयिनी मार्गदर्शिका' व मातृभूमि कार्यालयाचें 'ग्वाल्हेर' हीं पुस्तकें चटकन् पुढें दिसूं लागतात. सदरचीं चाऱ्हीं पुस्तकें आपापल्यापरी चांगलीं आहेत. या उपरांत धर्म, नीति, समाज व शिक्षण विषयक वाङ्मय पाहूं जातां त्यांत बळवंतराव माकोडे यांचें 'वैदिक धर्मविलाप', प्रो. देसाई यांचें 'ग्रीक नीतिमीमांसा', भारताचार्य वैद्य यांचें 'अबलोन्नति लेखमाला' व सरवटे यांचें 'सामाजिक वाद' हीं पुस्तकें अगदीं ठळकपणें आढळून येतात. या सर्व पुस्तकांनीं पूर्वीच ख्याति प्राप्त करून घेतली असून त्याशिवाय अलीकडचीं श्रीमंत सौ. महाराणी चंद्रावतीबाई साहेब होळकर यांचें 'सुविचार-माला' व धर्मवीर सरदार आंग्रे यांचें 'राजकुमाराचें संगोपन आणि शिक्षण' व

' आदेश ' हींही पुस्तकें विद्वानांच्या पसंतीस उतरलीं आहेत. विष्णुपंत सरवटे यांनीं ' मुलींना उपदेशाच्या चार गोष्टी ' नांवाचें एक पुस्तक लिहिलें आहे. तें लहानसें असलें तरी उत्कृष्ट आहे, असें समजतें. त्यांचे नातु विनायकराव सरवटे यांनीं लिहिललें ' आईबापांस चार शब्द ' हेंही पुस्तक चांगलें आहे. पुढें आध्यात्मिक, वेदांतपर व तत्व-ज्ञानविषयक वाङ्मयाकडे दृष्टि वळवितां त्यांत सरदार जठार यांचे ' अव्यक्त बोध ' व ' स्वानंद साम्राज्य ', डोंगरे यांचा ' अनुभवामृत ' व आठले यांचा ' श्रीदासबोध गूढार्थदीपिका ' हे ग्रंथ सकृद्दर्शनींच समोर उभे राहतात. सदरचे सर्व ग्रंथ तज्ज्ञांकडून उच्च प्रतीचे व परिशीलनार्ह म्हणून ठरले आहेत. भारतीय व पाश्चात्य तत्त्वज्ञानांचा सांगोपांग अभ्यास करून त्यांवर स्वतंत्रपणें ग्रंथ व लेख लिहिणाऱ्यांत प्रमुख स्थान मंडित करणारे व आपल्या राहणीनें आणि विचार-सरणीनें विसाव्या शतकांतील स्थितप्रज्ञ ऋषीच ह्मणून शोभणारे प्रो. देसाई यांचे तत्वज्ञानविषयक ग्रंथ तर वास्तविक मध्यभारतीय वाङ्मयाला भूषणभूतच होत ! त्यांचा विद्याव्यासंग विलक्षण दांडगा असून शारीरिक वेदना असह्य होत असल्या स्थितींतही त्यांनीं सरस्वत्याराधनेला मुळींच खळ पडूं दिला नाहीं ! सरस्वतीवर एवढी यावज्जीव अव्याज भक्ति करणारा पुरुष विरळाच सांपडतो ! राज-वाड्यांनीं महाराष्ट्रीय कार्यकर्त्या पुरुषांच्या मोजदादींत देसायांची केलेली गणना यावरून यथायोग्यच ठरतें. भागीरथीबाई वैद्य यांचा ' आनंदपदावर चौदा चवकड्यांचें राज्य ' हाही ग्रंथ येथें उल्लेखनीय आहे. यानंतर आरोग्यविषयक वाङ्मयाविषयीं विचार करतां त्यांत डॉ. तांबे व डॉ. टेंबे या दोघांची ग्रंथनिर्मिति बरीच महत्वाची व तितकीच उपयुक्तही असल्याचें निःशंकपणें म्हणतां येईल. पुढें शास्त्रीय व कलाविषयक वाङ्मयाकडे पाहतां त्यांत प्रिं. आपटे यांचें ज्योतिष-विषयक ' पंचांग चिंतामणी, ' गोविंदराव माकोडे यांचें गणितेतिहास-

संशोधनविषयक ‘ प्राचीन भारतीयांची गणित शास्त्रांतील प्रगति ’ व गणपुले यांचें अर्थशास्त्रविषयक ‘ संपत्तिशास्त्रांतील चार गोष्टी ’ हीं पुस्तकें चांगलीं असून प्रो. दामले यांचे न्यायशास्त्रविषयक ‘ निगमन ’ व ‘ विगमन ’ ग्रंथ आणि डॉ. शारंगपाणी यांचा मानव-स्वभावदर्शनशास्त्रविषयक ‘ मुद्राविज्ञान ’ ग्रंथ अगदीं अपूर्व होत. तसेंच विश्वनाथराव ऋषि परलोकविद्याशास्त्रविषयक ‘ सुभद्रा अथवा मरणोत्तर जीवन ’ व साठे यांचें ‘ रमा अथवा परलोकात्मे ’ हीं आतांपावेतोंच्या सबंध मराठी वाङ्मयांत या शास्त्रावरील दोनच पुस्तकें, असून त्यांच्याविषयीं कांहीं अधिक सांगण्याची आवश्यकता नाहीं. कर्वे यांचीं ‘ लोहमार्ग ’ व ‘ विद्युन्मार्ग ’, हीं यंत्रशास्त्रविषयक पुस्तकें पूर्वी तज्ज्ञांकडून वाखाणलीं गेलीं आहेत. धंदे व कलाविषयक वाङ्मया-कडे मात्र मध्यभारतीय लेखकांचें जावें तसें लक्ष न गेल्यानें हें सदर अद्यापपावेतों जवळजवळ रिकामेंच राहिलें आहे. असो. येथपर्यंत सर्व ग्रंथनिर्मितीचें सिंहावलोकन झालें. यानंतर अशीच नियतकालिकांकडे दृष्टि वळवावयास पाहिजे; परंतु मध्यभारतीय नियतकालिकांची कामगिरी आमच्या मतें तितकीशी डोळ्यांत भरण्या-सारखी झालेली नाहीं सबब त्यासंबंधांत येथें मौनच स्वीकारणें बरें.

## नियतकालिकांतील वाङ्मय

मध्यभारतांतील मराठी वाङ्मयाचा परिचय पूर्ण होण्यास इकडील वाङ्मयसेवकांच्या नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेल्या वाङ्मया-विषयींही चार शब्द लिहिणें अवश्य आहे. संख्येच्या मानानें हें वाङ्मय पुष्कळच असून तें निरनिराळ्या अनेक नियतकालिकांतून प्रकाशित झालेलें आहे. सबब येथें त्यांतील ठळक वाङ्मयाचाच परामर्ष घेतल्यास पुरेसें होईल. हा परामर्ष आमच्या पूर्व पद्धतीप्रमाणें विषयवार घेतला जाण्याची तादृश आवश्यकता नसल्यानें फक्त त्याचे पद्य व गद्य असे दोन विभाग पाडून ती घेऊं. मध्यभारतांतील

नियतकालिकांतल्या पद्य वाङ्मयांत रामचंद्र कृष्ण वैद्य ऊर्फ वनवासी यांच्या कृति प्रथम दृष्टीपुढें उभ्या राहतात. बालकवि त्र्यंबक बापूजी ठोमरे हे जुन्या मराठी कवींच्या कवितेचा अभ्यास करण्यासाठीं मुद्दाम ज्यांच्या सान्निध्यांत कांहीं दिवस राहिले होते ते कीर्तनकार कवि वनवासी हेच होत आपल्याकडे ऐतिहासिक कीर्तनाचा पायंडा या वनवासींनींच पाडला. त्यांचीं स्वरचित सिंहगड विजय, शिवाजी व जयसिंग यांची भेट, राणी पद्मिनी, झांशीची राणी लक्ष्मीबाई इत्याद्यनेक आख्यानें अतिशय लोकप्रिय झालीं होतीं. याशिवाय त्यांनीं रचिलेलीं बरींच स्फुट व कथात्मक काव्यें 'काव्यरत्नावलीं' तून प्रसिद्ध झालीं आहेत. त्यांपैकीं हम्मीर काव्य व पानिपतचा युद्ध प्रसंग हीं दोन अतिशय सरस आहेत. या दोन्हीं काव्यांत त्यांच्या उत्कट कल्पनेचा बहर व वर्ण्यविषय मूर्तिमंत समोर उभा करण्याची हातोटी पहाण्यासारखी आहेत. वनवासींच्या कवितेचें अनुकरण करणारे त्यांचे समकालीन कवि नारायण गणेश शिरसाळकर होत. यांची कविता 'काव्यरत्नावली' शिवाय 'मनोरंजन', 'करमणूक' वगैरे मधूनही प्रसिद्ध झाली होती. पितृघातकी औरंगजेबानें दिल्लीची सलतनत बळकाविण्याकरितां रचिलेल्या कारस्थानांत त्याच्याशीं झुंज घेणारा जोधपूरचा राणा रत्नसिंह याच्या चरित्रावर शिरसाळकरांनीं लिहिलेलें श्रीमद्रत्नसिंह हें काव्य अपूर्ण जरी असलें तरी त्यांच्या एकंदर कवितांत तेंच अग्रगण्य होय! ग्वाल्हेरचे प्रो. बाळकृष्ण रामचंद्र बोकिल हेही जुने कवि आहेत व त्यांच्या प्रतिभेची सृजनक्षमता अजूनही मधूनमधून प्रत्ययास येते. 'मनोरंजनां' तून त्यांची बरीच कविता प्रसिद्ध झाली आहे. धारच्े दत्तात्रय रामचंद्र पिंगे, गजाननराव राजे, बळवंतराव भाकोडे, प्रो. पाटणकर, सीतारामपंत सरवटे, नरहर शंकर रहाळकर, रा. ब. विनायक कृष्ण मुळ्ये, कृष्णाजी गंगाधर कबचाळे व इंदुरास कालेजांत शिक्षण घेत असतांना कवि

म्हणून पुढें आलेले शांताराम विष्णु आवळसकर यांच्या कविता 'काव्यरत्नावली' तून मागें पुष्कळ आलेल्या आहेत. रा. ब. विनायकराव मुळ्ये यांचे वडील रा. ब. कृष्णराव मुळ्ये हेही उत्तम कवि होते. त्यांच्या कांहीं जुन्या कविता अलीकडे 'मालवसाहित्यां' तून प्रकाशित झाल्या आहेत. श्रीकृष्णदर्शनार्थ अनेक निर्वाणीच्या प्रयत्नांनंतर मुरलीधराची मूर्ति पुढें ठेऊन तीन दिवस सारखा अहोरात्र धांवा करणारे व तो धांवाही निष्फळ झाल्यावर शेवटीं त्या मुरलीधरासह विहिरींत उडी टाकून देह कृष्णार्पण करणारे विनायक त्र्यंबक टोकेकर हे देखील मोठे भाविक कवि होते त्यांच्या कवितेनें मध्यभारताच्या साहित्यविषयक लौकिकांत भर पडली असती. प्रौढ भाषेंत नानारसालंकारमंडित काव्यरचना करण्यांत श्रेष्ठ समजले जाणारे महाराष्ट्राचे प्रसिद्ध कवि श्रीपाद नारायण मुजुमदार हे कांहीं दिवस इंदूर संस्थानांत हतोद येथें मुन्सफ होते व याच गांवीं ते सन १९०९ मध्यें प्लेगास बळी पडले. 'सुगाल-सूत्र' व आणखीही कांहीं त्यांच्या कवितांचा जन्म हतोद येथेंच झाला होता. ऐन तारुण्यांत एकाएकीं दिवंगत झालेले देवासचे गोपाळ गंगाधर खांडेकर हे एक उत्तम कवि होते. 'मनोरंजनां' तून त्यांच्या दोन कविता मागें प्रसिद्ध झाल्या होत्या. कीर्तनकाव्यकार त्रिंबकराव सरवटे कन्नोदकर, ग्वाल्हेरचे आबासाहेब चांदवडकर, 'आरती कुंजबिहारी की' या सुप्रसिद्ध आरतीचे कर्ते बजरंगगडचे कवि श्रीधरराव व तसेंच हल्लीं हिंदीला कवटाळून बसलेले 'स्वराज्य' साप्ताहिकाचे संपादक सिद्धनाथपंत लोंढे एके काळीं मध्यभारतांत होतकरू मराठी कवि म्हणून प्रसिद्ध होते. राजाराम बाळकृष्ण खानवलकर, गोविंद बळवंत माकोडे, गंगाधर केशव शिराळकर, नारायण वासुदेव केळकर व केशव नारायण डांगे हे चांगले कवि असून त्यांच्या कविता प्रायः सर्व मराठी प्रमुख मासिकांतून प्रसिद्ध झाल्या आहेत व होतही

असतात. यांतील खानवलकरांच्या कवितांना बालवाङ्मयांत प्रमुख स्थान दिलें जातें. गणेश विष्णु जामगांवकर, रघुनाथ मार्तंड राजे, श्री. त्रिं. गलगलीकर, गोविंद यशवंत निरखे, सदाशिव श्रीकृष्ण पंडित, मा. चि. टेंभेकर, यशवंत नारायण मोघे, श्रीधर लक्ष्मण धर्माधिकारी, प्रो. बोरगांवकर, वा. रा. भाटे, स. गो. खडीकर, पुरुषोत्तम सदाशिव आरस, सौ. शांताबाई पाटेकर, सौ. सुमतीबाई वायंगणकर, सौ. इंदिराबाई सोहनी, कमलाबाई भावे, कृष्णाबाई वैशंपायन हे सर्व मध्यभारताचे उदयोन्मुख कवि-कवयित्री होत. प्रभाकर बळवंत माचवे व रामचंद्र मोरेश्वर करकरे हे कविद्वय तर हल्लीं हिंदीचेच निष्ठावंत उपासक झाले आहेत. इंदूरचे प्रो. वा. वि. भागवत हेही कवि आहेत. राजाराम दौलत गडकरी हे चांगले कवि असतांही अलीकडे मात्र त्यांची कविता कोठेंच पहावयास मिळत नाहीं, याबद्दल सखेद आश्चर्य वाटतें. सीताराम काशीनाथ देव व प्रो. रामचंद्र वामन पंतोजी यांनींही बरीच कविता रचिली आहे. आज मध्यभारताचे पुढें आलेले कवि म्हणजे रामचंद्र अनंत काळेले, यशवंत खंडेराव कुळकर्णी, विनायक हरि आपटे व गोविंद लक्ष्मण झोकरकर हे होत. या कविचतुष्टयापैकीं पहिल्या तिघांचे कवितासंग्रह प्रसिद्ध झाले असून त्यांचा यथोचित परिचय काव्य वाङ्मयाच्या प्रकरणांत पूर्वी करून देण्यांत आलाच आहे. जपानी वाङ्मयांत टांका नामक एक काव्यप्रकार आहे तो कणिका या नांवानें मराठींत प्रचारांत आणण्यासाठीं जी कवि मंडळी प्रयत्न करीत आहेत त्यांत झोकरकर यांची गणना होते. यांनीं आतांपावेतों बऱ्याच कणिका रचिल्या असून त्या मराठींतल्या अनेक प्रमुख नियतकालिकांतून प्रकाशित झाल्या आहेत व होत आहेत. यांच्या कवितेंत करुणरस विशेष असतो व त्यांतून गरिबांच्या व प्रेमविव्हलांच्या मनःस्थितींचीं रेखाटलेलीं चित्रें मोठीं हृदयस्पर्शी असतात. विश्वनाथ रामचंद्र

डोंगरे, बाळकृष्ण नारायण पेंढरकर व भालचंद्र राजाराम लोवलेकर या तरुण उदयोन्मुख कवींच्या हातून पुढेंमागें मध्यभारताच्या पद्य भांडारांत चांगली भर पडण्याची आशा आहे. अशी आशा या कवींच्या बरोबरीचे परंतु अनेक प्रमुख नियतकालिकांतून अल्पावधींत पुष्कळ काव्यरचना करून पुढें आलेले गोपाळ गोविंद वावीकर यांच्याकडून विशेष होती; पण ती त्यांच्या अकाल निधनानें निष्फळ झाली, याबद्दल वाईट वाटल्यावांचून रहात नाहीं.

आतां गद्य वाङ्मयाकडे वळतां त्यांत सर्वांत प्रथम लक्ष्मी आणि सरस्वती यांचा सारखा वरदहस्त ज्यांच्या शिरांवर आहे असें किबे दांपत्य डोळ्यांपुढें दिसूं लागतें. सरदार माधवराव विनायक किबे व सौ. कमलाबाईसाहेब किबे यांची साहित्यसेवा सुप्रसिद्धच आहे. सरदार किबेसाहेब हे महाराष्ट्र साहित्य परिषदेचे अनेक वर्षांपासून एक खंबीर आधारस्तंभ आहेत. मराठी वाङ्मयांतील त्यांचे लंकेच्या शोधावरील लेख व त्याशिवाय खास मराठी साहित्याच्या उन्नत्यर्थ विधायक कामगिरी करण्याच्या मार्गांची दिशा दाखविणारे विविध लेख फार महत्त्वाचे आहेत. सौ. कमलाबाईसाहेब किबे यांचें लिखाण तर बरेंच मोठें आहे. त्यांपैकीं ' विविधज्ञानविस्तारां ' तील संसारचित्रें, मराठी कादंबऱ्यांची दिशा व बालोपयोगी साहित्य; ' चित्रमय-जगतां ' तील स्त्रियांचे अलंकार आणि ' मालव साहित्यां ' तील स्त्रिया व मीरा हे लेख विशेष मार्मिक व उद्बोधक आहेत. त्यांच्या कन्या सौ. सुशीलाबाई यांच्या ठायींही असलेली साहित्यसेवेची गोडी ' मालवसाहित्यां ' तून प्रकाशित झालेल्या ' लग्नाचा बाजार ' या कादंबरीच्या परीक्षणावरून उघड दिसतें. ' रागिणी ', ' बंधमुक्ता ', ' बाळूताई धडा घे ', ' ब्राह्मणकन्या ', अटकेपार ' वगैरे अलीकडच्या लोकप्रिय कादंबऱ्यांची प्रो. ना. बा. पराडकर यांनीं केलेलीं परीक्षणें चांगलीं असून डॉ. दिवेकर यांनीं ' सदाफुली ' चें केलेलें परीक्षणही

सुंदर आहे. प्रो. बोरगांवकर यांनीं 'भावबंधन' नाटकावर एक समालोचनपर लेख लिहिला होता त्याचीही येथें आठवण साहजिकपणें होते. डॉ. दिवेकरांनीं दाखविलेली भीष्माची भयंकर भूल व चार्वाक या टोपण नांवाखालीं प्रिं. गोखले यांनीं मांडलेली दुर्योधनाची फिर्याद यांचें विस्मरण तर केव्हांहीं होणें शक्य नाहीं. अमेरिकेसारख्या दूर देशीं राहूनदेखील प्रिं. गोखले व त्यांच्या पत्नी सौ. उमाबाई हीं उभयतां आपल्या मातृभाषेविषयीं नितांत आदर बाळगून निरनिराळ्या मराठी नियतकालिकांतून नेहमीं लेख लिहित असतात याबद्दल त्यांचें अभिनंदनच केलें पाहिजे. माधवराव लेल्यांनीं मध्यंतरीं 'विविधज्ञानविस्तारां'तून श्रीमद्भागवताच्या दशमस्कंधाचे सार व विचार लिहिण्यास सुरूवात केली होती; पण तें काम पुढें अर्धवटच राहिलें. बाळकृष्णपंत देवांच्या भगवद्गीतेंतील बुद्ध्या व श्रीमंत महाराणी चंद्रावतीबाईसाहेब होळकर यांचे भगवद्गीतेवरील विचार हे लेख कोणास उद्बोधक होणार नाहींत? उज्जयिनीचे दत्तात्रय विनायक टोककर यांचा 'पुरुषार्थ' मासिकाच्या श्रीमद्भगवद्गीतांकांतून प्रसिद्ध झालेला वैदिक मीमांसेवरील लेख वाचनीय आहे. इंदूरचे बाळशास्त्री भट्ट यांनींही मागें 'पुरुषार्थ' मासिकांतून भारतीय युद्धकालनिर्णयावर एक लेख लिहिला होता. त्या लेखांतील विधानें पुष्कळ तर्कशुद्ध आहेत. कालिदास व विक्रमादित्य यांच्या कालनिर्णयासंबंधीं काशीनाथपंत लेले यांचा विस्तृत निबंध व त्यास प्रिं. गोविंदराव आपटे यांनीं जोडलेली पुस्ती यांपासून विद्वानांच्या विचारास बरीच चालना मिळाली आहे. लेले यांचा भोजदेवाच्या साहित्यसेवेवरील लेख व माळव्याच्या इतिहासाचें सिंहावलोकन नांवाचा लेख माहिती-पूर्ण आहेत. या लेखांबरोबरच माळव्याचीं ऐतिहासिक स्थित्यंतरें आणि मराठी साहित्य या नारायणराव वैद्यांच्या लेखाची आठवण होते. कचचाळे यांनीं माळव्याच्या प्राचीन राजधान्या व प्राचीन राजवंश

या दोन लेखमाला अनुक्रमें 'सहविचार' व 'मालवसाहित्य' या त्रैमासिकांतून लिहिल्या असून माळव्याच्या इतिहासासंबंधीं निरनिराळ्या नियतकालिकांतून विविध स्फुट लेख लिहिले आहेत. भास्कर रामचंद्र भालेराव यांचा इतिहास संशोधनाचा व्यासंग तर सर्वपरिचितच आहे. उत्तरहिंदुस्थानांतील मराठी साहित्य व साहित्यभक्त, उत्तरहिंदुस्थानांतील प्राचीन मराठी सारस्वत, भारतीय इतिहासाचीं साधनें व संशोधनकार्याचें सिंहावलोकन वगैरे त्यांचे लेख त्यांच्या लौकिकास साजेसे आहेत. साहित्यसम्राट् नरसिंह चिंतामण केळकर यांच्या 'मराठे व इंग्रज' या ग्रंथाचें त्यांनीं मार्मिक परीक्षण केलें असून 'मराठ्यांचे श्रेष्ठत्व' हें पुस्तक लिहिलें असल्याचें समजतें. दामोदर बळवंत दांडेकर हेही हल्लीं माळव्याच्या व विशेषतः होळकरांच्या इतिहासाविषयीं माहिती मिळवित आहेत. 'मालवसाहित्या'च्या इंदूर विशेषांकांत त्यांनीं इंदूरचे ऐतिहासिकदृष्ट्या केलेलें अल्प विवेचन वाचनीय आहे. रघुनाथराव शिरढोणकर यांनींहीं कांहीं ऐतिहासिक लेख लिहिले आहेत. थोर पुरुषांचीं लक्षणें व चरित्रांत विषयनायकाच्या गुणवर्णनाबरोबर त्याचें दोषदर्शन करावें कीं नाहीं ? हे बाळकृष्णपंत देवांचे लेख होतकरू चरित्रलेखकांस उत्तम मार्गदर्शक आहेत. या देवांचे चिरंजीव प्रो. लक्ष्मणराव बाळकृष्ण देव हेही चांगले चरित्रलेखक आहेत. त्यांनीं 'मालवसाहित्यां'तून सर आशुतोष मुकरजी व भाऊसाहेब रेशीमवाले यांचीं चरित्रें लिहिलीं होतीं व बाळकृष्णपंतांचेंही अपूर्ण चरित्र दिलें होतें. विष्णुपंत लेल्यांचा राजकवि भूषण व प्रो. वाकणकर यांचा मैनाबाई पवारांचें चरित्र हे दोन्ही लेख माहितीपूर्ण आहेत. महेश्वरचे म. रा. उपासनी यांनीं थोडे दिवसांपूर्वी 'महाराष्ट्र शारदा' मासिकांतून माळव्यांतील कांहीं अर्वाचीन साहित्यिकांसंबंधीं परिचयात्मक लेख लिहिले होते तें सर्व चांगले असून विल्यम रॅम्से, हेन्री मॉयसा, मायकेल फॅरेडे वगैरे

पाश्चात्य प्रथितयश रसायनशास्त्रज्ञांचीं प्रो. वा. वि. भागवत यांनीं लिहिलेलीं चरित्रेंही वाचण्यासारखीं आहेत. नाशिकचे सुप्रसिद्ध मीमांसक पं. श्रीधर शास्त्री वारेकृत 'श्री याज्ञवल्क्य चरित्र' या पुस्तकाच्या कामीं दत्तात्रय विनायक टोककर यांनीं मिळविलेल्या बहुमोल माहितीचाही येथें उल्लेख करणें जरूर आहे. प्रो. डी. बी. देवधर यांचा 'चित्रमयजगतां'तील नेपाळ यात्रावर्णन व गोविंद नानाजी नांदेडकर यांचा मेंर्दाकुंडचा प्रवास हे लेख आणि गणेश शंकर गंध्ये बार-एट्-लॉ व विद्याधरपंत ओक, आय. सी. एस्. यांचीं विलायतचीं पत्रें अत्यत हृदयंगम होत. वामनबुवा ब्रह्मचारी यांच्या 'आत्मबोध' मासिकांतील चारी धाम यात्रेसंबंधाच्या लेखमालेचा निर्देश पूर्वीं एके ठिकाणीं करण्यांत आलाच आहे. विश्वनाथपंत देव यांनीं मागें 'विविधज्ञान विस्तारां'तून धीरसिंह अथवा एका योध्यानें केलेला देहयज्ञ ही एक सुंदर ऐतिहासिक कथा लिहिली होती. 'मनोरंजनां'तूनही त्यांच्या कांहीं गोष्टी प्रसिद्ध झाल्या होत्या. माधवराव लेल्यांनीं सुलभ रोमन ऐतिहासिक गोष्टी 'विविधज्ञानविस्तारां' तून दिल्या असून हरिभाऊ आपट्यांच्या 'करमणुकीं'त पूर्वीं इंदूरच्या V नामक अज्ञात लेखकानें एकदोन सामाजिक गोष्टी लिहिल्या होत्या. श्रीनिवासराव गोरे यांच्या अनेक गोष्टी महाराष्ट्रांतील प्रमुख मासिकांतून प्रसिद्ध झाल्या आहेत व होत आहेत. अलीकडे कवि काळेले, प्रो. अ. म. जोशी, विश्वनाथ रामचंद्र डोंगरें, निशिकांत खानोलकर, म. रा. उपासनी, हरिहर गोपाळ चिंचणीकर, स. शं. केळकर वगैरे तरुण मंडळी लघुकथा लेखक ह्मणून पुढें येत आहेत. गोविंदराव झोकरकर यांनींही मागें कांहीं लघुकथा व नाट्यछटा लिहिल्या होत्या. चार पांच वर्षांपूर्वी 'प्रतिभा' मासिकानें राम गणेश गडकरी यांच्या नाटकांवर बक्षिसासाठीं निबंध मागविले होते, त्यांत म. रा. उपासनी यांनीं लिहिलेला निबंध सर्वोत्कृष्ट ठरून त्यास पहिलें बक्षिस मिळालें

व तो निबंध 'प्रतिभे' तून प्रकाशितही झाला, हें येथें नमूद करणें अवश्य आहे. गोदूताई केतकर व दत्तात्रय विनायक टोकेकर यांचे नाटकांत काव्याचें स्थान या विषयावरचे लेख आणि डॉ. दिवेकर, नागेश कृष्ण ओक व कवि काळेले यांचे आधुनिक काव्याच्या स्वरूपाच्या इष्टानिष्टतेसंबंधींचे लेख मोठे मार्मिक असून केशवराव डांगे व नारायणराव केळकर यांनीं वर्तविलेलीं आधुनिक मराठी काव्याचीं भवितव्यें कवि मंडळानें लक्षांत बाळगण्यासारखीं आहेत. शिराळकरांचा तांब्यांच्या राष्ट्रीय कवितेवरील लेख परिचायक स्वरूपाचे असले तरी चांगले आहेत. प्रभाकरपंत माचवे यांचा साहित्यांतील ललितकला भाव, प्रिं. आपटे यांचा शास्त्रीय वाङ्मयाची वाढ करण्याच्या मार्गांतील अडचणी व त्या दूर करण्याचे उपाय आणि प्रो. भागवत यांचा शास्त्रीय विषयाची परिभाषा या तिन्ही लेखांतील विचार सर्वांस पटतील असेच आहेत. 'सावित्रीचे कथानक' व 'भस्मासुर' हीं आख्यानांचीं पुस्तकें लिहिणारे वि. स. घाटे यांचे कीर्तन संस्थेविषयींचे लेख किती आस्थापूर्वक लिहिलेले असतात हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. गजाननराव कवीश्वर यांचे कला-नीति वादावरील लेख व पुरुषोत्तम यांचा सुख आणि दुःख, विश्वनाथ हरिहर शास्त्री द्रविड यांचा सुखदुःखमीमांसा, प्रिं. ताटके यांचा सुखाचा शोध व प्रो. वामन बळवंत श्रीखंडे यांचा तत्वज्ञानाचें अध्ययन हे सर्व लेख श्रेष्ठ प्रतीचे असून प्रो. देसाई यांच्या तत्वज्ञान व वेदांत विषयांवरील व्यासंग व अधिकार यांचा परिचय पूर्वी करून दिलाच आहे. मागें 'लोकशिक्षण' मासिकांतून 'एका शिष्या' नें त्यांचें विस्तृत चरित्र लिहिलें होतें. त्यांत त्यानें एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, प्रो. देसाई यांनीं 'हिबर्ट जर्नल' नामक प्रसिद्ध त्रैमासिकासाठीं एक इंग्रजी लेख धाडला होता तो त्या त्रैमासिकाच्या संपादकास अतिशय आवडून त्याबद्दल त्यानें मोबदला म्हणून अडीचशें

रुपये प्रोफेसरसाहेबांकडे तावडतोब पाठवून पुनः लेख देण्यासाठीं आग्रह केला होता. अलीकडे नागेशराव ओकांनीं मनुष्य अमर असल्यासंबंधांत निरनिराळ्या मासिकांतून लिहिलेले लेख नवीन विचारांनीं भरलेले असून ते मोठे मननीय आहेत. प्रो. सत्यबोध बाळकृष्ण हुदलीकर हे इंदूर येथें नोकरीस असतांना त्यांनीं व त्यांच्या विदुषी पत्नी सौ. सुलोचनाबाई हुदलीकर यांनीं कांहीं लेख लिहिले होते. त्यांपैकीं प्रो. हुदलीकर यांचा आर्थिक भूस्तरशास्त्र व सुलोचनाबाई यांचा घरगुती वनस्पतीविषयीं चार शब्द हे 'मल्लारि मार्तंड विजया'च्या सन १९१७ च्या नागपंचमीच्या विशेषांकांत प्रसिद्ध झालेले लेख चांगले आहेत. असाच चिं. म. टेंबे यांचा फुलांसंबंधीं कांहीं विचार नामक एक लेख 'मल्लारिमार्तंड विजया'च्या नोव्हेंबर सन १९२० च्या स्पेशल अंकांत प्रसिद्ध झाला होता. माधवराव लेले यांचा उसाची लागवड व साखर करण्याची कृति आणि नरसिंह हरि जोशी यांचा ग्वाल्हेरची शेती हेही लेख येथें उल्लेखनीय आहेत. डॉ. बळवंत नारायण देव यांचा जीवनशास्त्राच्या शिक्षणाचें व्यावहारिक महत्त्व व डॉ. श्रीनिवासपंत गोसावी यांचा जंतुशास्त्र हे लेखही महत्त्वाचे होत. सौ. सरलाबाई नाईक या इंदुरास असतांना त्यांनीं तेथून आपला लेखन व्यवसाय थोडाबहुत तरी चालू ठेविला होता; परंतु 'रावबहादुर पर्वत्या'चे कर्ते बॅ. हरिश्चंद्र आनंदराव तालचेरकर यांनीं तर इंदुरास आल्यापासून मराठी वाङ्मयावर सारखा रोषच ठेविलेला दिसतो. कारण त्यांचे इंदूरहून कांहीं इंग्रजी लेख मात्र प्रसिद्ध झालेले आढळतात; पण मराठी एकही लेख आढळत नाहीं! यापूर्वी असेच माधव चंद्रोबा, अण्णासाहेब किर्लोस्कर व बाळकृष्ण संतुराम गडकरी हे इंदुरास नोकरी वगैरेच्या निमित्तानें असतांना साहित्यसेवेच्या बाबतींत निष्क्रियच राहिलेले दिसतात. श्रीनिवास त्र्यंबक द्रविड यांचे कायद्याचें राज्य व इंदूरचे न्यायशासन हे लेख बरे असून सीताराम

नारायण गवारीकर यांचा शक्तीवीण दरिद्रता हा लेखही चांगला आहे. श्रीकृष्ण वामन पंतवैद्य यांचे विमानासंबंधींचे लेख व डॉ. दिवेकर यांचा आकाशाकडे पाहून महिना कसा ओळखावा हा लेख जितके मनोरंजक तितकेच महत्त्वाचे आहेत. पुरुषोत्तम केशव ऊर्फ भाई कोतवाल यांचा बाल शिक्षेसंबंधीं कौंट टालस्टॉयचे विचार हा लेख, प्रो. पाटणकर यांचे शिशुशिक्षणावरचे निबंध, रामचंद्रराव मणूरकर यांचा विलायती वर्तमान पत्रांचा इतिहास व नारायणराव वैद्य यांचा सन १९१६–१७ सालांतील मराठींतल्या प्रमुख मासिकांचें पर्यालोचन या लेखांचा येथें जाताजातां उल्लेख करणें अत्यावश्यक होय. हल्लीं मराठी वाचकांस सुपरिचित झालेल्या केशवराव डांगे यांच्या लेखणीचें बहुप्रसवत्व तर केव्हांही प्रशंसनीयच आहे. त्यांचे निरनिराळ्या विषयांवर लेख प्रायः सर्वच मराठी नियतकालिकांत नेहमीं येत असतात.

मध्यभारतांतील लेखकांच्या व कवींच्या नियतकालिकांतील कृतींचें हें एक प्रकारचें धांवतें समालोचनच केलेलें आहे. अल्पावधींत अधिकांत अधिक असा प्रदेश दृष्टीच्या टप्प्यांत आणण्याच्या हेतूनें मनुष्य जेव्हां मुद्दाम उंच स्थळीं जाऊन पाहूं लागतो तेव्हां त्याच्या नजरेत भूपृष्ठावरील सभोंवतालचीं भव्य व विशाल असणारीं तेवढींच दृश्यें भरतात व अत्यंत दर्शनीय अशा कित्येक वस्तु केवळ त्यांच्या लघुत्वामुळें दृष्टींतून सुटून जातात तसाच प्रकार या समालोचनांत होऊन आणखीही ज्यांच्या कृतींचा उल्लेख करणें वस्तुतः अवश्य होतें अशांचा निर्देश करणें राहून गेलें असणें संभवनीय आहे. यासाठीं तशा साहित्यिकांची त्याबद्दल आधींच येथें क्षमा मागून ठेवितों.

### वाङ्मयीन संस्था

वैयक्तिक प्रयत्नांखेरीज संघांच्या द्वारें मराठी वाङ्मयसंवर्धनाच्या कार्यास हातभार लावणाऱ्या कांहीं संस्थाही मध्यभारतांत निर्माण

झाल्या आहेत त्यांतील कांहीं प्रमुख संस्थांचा येथें त्रोटक परिचय करून देणें अवश्य आहे.

'महाराष्ट्र साहित्य सभा इंदूर'– या संस्थेची स्थापना सन १९१५ मध्यें दि. ब. खांडेकर यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या सार्वजनिक सभेंत झाली व सरदार माधवराव विनायक किबे, न्यायमूर्ति दामोदर विनायक कीर्तने, रा. ब. विनायक कृष्ण मुळ्ये, डॉ. श्रीधर नारायण देव, बाळकृष्ण नारायण देव, नरहर शंकर रहाळकर, डॉ. टेंबे, प्रो. श्रीखंडे वगैरे मंडळींनीं तिला सर्व प्रकारें जीवन घालून उर्जितावस्थेस आणलें. सन १९१७ व १९३५ मध्यें अनुक्रमें रा. सा. गणेश जनार्दन आगाशे व श्रीमंत राजे भवानराव पंतप्रातिनिधि सं. औंध यांच्या अध्यक्षतेखालीं इंदुरास झालेलीं महाराष्ट्र साहित्य संमेलनाचीं अधिवेशनें याच सभेच्या प्रयत्नांनीं घडून आलीं. तसेंच सन १९२६ मध्यें या सभेनें कविवर्य तांबे यांच्या अध्यक्षतेखालीं पहिलें मराठी कविसंमेलन इंदुरास भरविलें. मध्य भारतीय मराठी साहित्य संमेलनाचा उगम सदरच्या कवि संमेलनापासूनच झालेला आहे, हें येथें निर्देशिणें अवश्य आहे. 'सभे'नें एक ग्रंथालय काढलें असून 'माळव्यांतील अर्वाचीन कवि', 'सुमनहार' व 'मराठी निवडक कविता' हीं पुस्तकें प्रकाशित केलीं आहेत. तसेंच 'मालव साहित्य' हें नियतकालिकही चालविलें आहे. व्याख्यानमाला व इंदुरास येणाऱ्या मोठमोठ्या व्यक्तींचीं व्याख्यानें या गोष्टी तर 'सभे' द्वारें नेहमींच चालू असतात. 'सभे'नें आपल्या मालकीची इमारत अलीकडेच केली असून तिची सांपत्तिक स्थितीही बरी आहे.

'मराठी ग्रंथोत्तेजक मंडळ इंदूर' –श्रीमंत महाराज तुकोजीराव होळकर यांनीं सन १९१७ मध्यें इंदुरास झालेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या अधिवेशन प्रसंगीं महाराष्ट्र साहित्य परिषदेला दहा हजार रुपयांची उदार देणगी दिली व मराठी भाषेंत उत्तमोत्तम ग्रंथरचना

होत जाण्याकरितां ग्रंथकर्त्यांना योग्य उत्तेजन मिळत रहावें म्हणून आपल्या राज्यांत ' मराठी ग्रंथोत्तेजक मंडळ ' नवीन स्थापन करून त्यास वार्षिक रु. २५०० ची नेमणूक करून दिली. सदर रकमेचा विनियोग ' मंडळा' नें ' होळकर सरकार ग्रंथमाला ' चालविणें व ग्रंथकारांस ग्रंथांच्या योग्यतेप्रमाणें पुरस्कार देणें या दोन मार्गांनीं सुरू केला. सन १९३१ मध्यें इंदूर संस्थानच्या एकंदर खर्चांत जी काटकसर करण्यांत आली त्यांत ' मंडळा' ची वार्षिक नेमणूक रु. २५०० च्या ऐवजी रु. १००० करण्यांत आली व नंतर सन १९३३ मध्यें ती कांहीं काळाकरितां बंद ठेवण्यांत आली. ती अद्यापपावेतों बंदच आहे. ' मंडळा ' कडून आतांपावेतों ' होळकर सरकार ग्रंथमाले ' मधून २९ ग्रंथ प्रकाशित झाले असून सुमारें ८०० ग्रंथकारांस २५००० रुपये पुरस्कार म्हणून मिळाले आहेत, यावरून ' मंडळानें आपलें ' ग्रंथोत्तेजक ' नांव खरोखरच सार्थ करून दाखविलें आहे, असें म्हणणें अवास्तविक होणार नाहीं !

' श्रीनाथ कार्यप्रवर्तक मंडळ इंदूर '—या संस्थेची स्थापना श्रीमंत सरदार किबे साहेब यांच्या प्रयत्नानें सन १९२४ मध्यें झाली. श्री माधवनाथ महाराज संस्थान चित्रकूट यांचा संप्रदाय वाढविण्याचें कार्य ही संस्था तनमनधनानें करीत असते. या संस्थेनें साहित्यिक कामगिरीही चांगली चालविली आहे. तिचें ' आत्मबोध ' मासिक सन १९२४ पासून अद्यापपर्यंत नियमानें चालू असून श्री माधवनाथ महाराजांची लहानमोठीं गद्य-पद्य चरित्रें व इतर सांप्रदायिक ग्रंथही तिनें प्रसिद्ध केले आहेत.

' तरुण महाराष्ट्र मंडळ ', ' प्रतिभा मंडळ ' वगैरे अन्य संस्थाही इंदुरास आपापल्या शक्तीप्रमाणें साहित्योपासना करीत आहेत. या सर्व संस्था प्रायः कॉलेजांतील साहित्यभक्त तरुण विद्यार्थ्यांनीं चालविलेल्या असून त्यांचीं हस्तलिखित मासिकें, थोरथोर दिवंगत व्यक्तींचे

स्मृतिदिन, प्रचलित विवाद्य विषयांवर उद्बोधक वादविवाद व व्याख्यानें हीं कार्यें निःसंशय प्रशंसनीय आहेत.

'ऑथर्स पॅट्रनेज फंड ग्वाल्हेर'—ही संस्था ग्वाल्हेर दरबारनें इंदूरच्या ग्रंथोत्तेजस मंडळाच्याच तत्त्वावर कांहीं वर्षांपूर्वी स्थापन केली असून आतांपावेतों तिच्याकडून अनेक ग्रंथकारांना अपेक्षेबाहेर बक्षिसें मिळालीं आहेत. ग्वाल्हेर दरबारची ही कामगिरी अभिनंदनीय होय. या कामगिरीमुळें आधुनिक मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत ग्वाल्हेर दरबारचें नांव केव्हांही सुवर्णाक्षरांकित होऊन राहील.

'माधव मराठी मंडळ ग्वाल्हेर'—हें मंडळ ग्वाल्हेर येथें धर्मवीर सरदार चंद्रोजीराव आंग्रे, गोविंद बळवंत माकोडे वगैरे साहित्यप्रेमी श्रीमंत व विद्वान् गृहस्थांच्या प्रयत्नानें स्थापन होऊन त्याच्या विद्यमानें तेथें सन १९२८ मध्यें महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें १३ वें अधिवेशन लोकनायक माधव श्रीहरि अणे यांच्या अध्यक्षतेखालीं झालें होतें. हल्लीं हें मंडळ अस्तित्वांत नाहीं, असें समजतें.

'मातृभूमि कार्यालय ग्वाल्हेर'—मध्यभारतांत विशेष गाजावाजा न करतां हळुहळूं भरीव कामगिरी करणारी या संस्थेसारखी दुसरी संस्था नाहीं, असें निःसंकोचपणें म्हणतां येईल. सन १९३० च्या ता. १ जानेवारीस ही संस्था ना. शि. पाठक, का. गो. पिंगळे, बा. ना. मुंडी वगैरे मंडळींच्या प्रयत्नानें स्थापन झाली असून आज तिनें एक चांगलें मराठी ग्रंथालय उघडलें आहे व पुराण वस्तूंच्या संशोधनाचें आणि संग्रहाचें कार्य सुरू करून आपलें हस्तलिखित मासिकही चालविलें आहे. 'कातन्त्र कृत्सूत्र', 'अश्वफलप्रकाश,' 'भ्रमरगीत,' 'म्हातारी आख्यान', 'दुर्घट काव्य' वगैरे दीडशें दोनशें वर्षांपूर्वीचे संस्कृत व मराठी हस्तलिखित अपूर्व ग्रंथ या संस्थेनें मिळविले आहेत व अनेक प्राचीन नाण्यांचाही मोठा संग्रह केला आहे. सन १९३५ मध्यें प्रिं. ताटके यांच्या अध्यक्षतेखालीं ग्वाल्हेर

राज्य मराठी साहित्य संमेलनाचें द्वितीय अधिवेशन या संस्थेनेंच ग्वाल्हेर येथें भरविलें होतें. या संस्थेचे वार्षिकोत्सव मोठ्या थाटानें साजरे होतात. त्यांशिवाय थोर पुरुषांचे स्मृतिदिन, प्रवचनें, व्याख्यानें, कविसंमेलनें वगैरे कार्यक्रम तिच्याकडून नेहमींच होत असतात. श्रीमंत अलिजाबहादर जिवाजीराव महाराज शिंदे यांच्या राज्याधिकार-ग्रहणाच्या शुभ प्रसंगीं या संस्थेनें 'ग्वाल्हेर' नामक एक पुस्तक प्रसिद्ध करून तें महाराजांस अर्पण केलें.

'महाराष्ट्र वाङ्मय मंडळ उज्जयिनी'—ही संस्था प्रो. ना. बा. पराडकर व माधव कॉलेजांतील इतर प्राध्यापक वर्ग यांच्या प्रयत्नानें सन १९३१ मध्यें स्थापन झाली. या संस्थेनें स्थानिक महाराष्ट्रीय मंडळींत मराठी वाङ्मयासंबंधांत अभिरुचि उत्पन्न करण्याचें कार्य उत्तम प्रकारें केलें आहे. सन १९३१ मध्यें साहित्यसम्राट् नरसिंह चिंतामण केळकर यांच्या अध्यक्षतेखालीं उज्जयिनीस मध्यभारतीय मराठी कवि संमेलनाचें द्वितीय अधिवेशन भरलें होतें तें याच संस्थेच्या विद्यमानें होय. 'मालविका' नामक एक काव्यसंग्रह या संस्थेनें प्रसिद्ध केला आहे.

'प्राच्य ग्रंथसंग्रह उज्जयिनी'—या संस्थेची स्थापना सन १९३१ मध्यें झाली. हल्लीं या संस्थेजवळ सुमारें चार हजारांवर लहानमोठे प्राचीन ग्रंथ असून त्यांतील शेंसवाशें तर अगदीं अप्रकाशित आहेत. या अप्रकाशित ग्रंथांतील पं. लक्ष्मण पांडुरंग केकरेकृत अमरकोशा-वरील महाराष्ट्री टीका, 'पदबोधिनी' नामक गीतेवरील मराठी टीका, सुवर्णरौप्यचित्रित व सटीक श्रीमद्भागवत हे ग्रंथ महत्वाचे होत. ज्ञानेश्वराचा समकालीन चांगदेव वटेश्वर यानें शके १२३४ मध्यें रचिलेला 'तत्त्वसार' हा वेदांतपर मराठी ओवीबद्ध ग्रंथ या संस्थेतर्फे सन १९३७ मध्यें प्रसिद्ध झाला आहे व तो डॉ. ह. रा. दिवेकर यांनीं संपादिला आहे.

'ज्ञानप्रसारक मंडळ देवास'—देवास मोठ्या पातीचे अधिपति श्रीमंत सरकार तुकोजीराव महाराज पवार यांनीं प्रतिवर्षी मराठींतील सर्वोत्तम ग्रंथास दोनशें रुपयांचें 'भोजराज प्राइझ' देण्याचें ठरविलें होतें त्यानिमित्त प्रस्तुत मंडळाची स्थापना सन १९२८ मध्यें करण्यांत आली होती. या मंडळाचें व प्राइझचें अस्तित्व सन १९३२ पावेतोंच राहिलें.

'शारदोपासक मंडळ देवास'—हें मंडळ सन १९१५ मध्यें स्थापन होऊन आजपावेतों त्याच्या विद्यमानें सातआठ पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत. या मंडळाचें एक हस्तलिखित त्रैमासिकही चालू आहे.

'शारदा सेवा संघ मंडलेश्वर'—या संस्थेची स्थापना भालचंद्र वासुदेव व गजानन वासुदेव कवीश्वर, म. रा. उपासनी, वि. रा. उक्कलगांवकर, ग. पां. काकिर्डे, गो. दा. निमोणकर, य. भा. गोखले प्रभृति मंडळींच्या प्रयत्नानें सन १९३३ मध्यें झाली. कवीश्वर यांचें 'नीति आणि कलोपासना' हें विद्वन्मान्य पुस्तक याच संस्थेच्या विद्यमानें प्रसिद्ध झालें आहे. या संस्थेचे वार्षिकोत्सव थाटाचे होत असतात.

ग्रंथालयें— मध्यभारतांत बहुतेक सर्व मोठ्या शहरीं सार्वजनिक ग्रंथालयें आहेत, त्यांपैकीं इंदूरचें 'इंदूर ग्रंथालय' (स्थापना सन १८५४), धारची 'व्हिक्टोरिया जनरल लायब्ररी' (स्थापना सन १८५६), लष्कर-ग्वाल्हेरची 'दि सेंट्रल लायब्ररी' (स्थापना सन १८६०), उज्जयिनी येथील 'युवराज जनरल लायब्ररी' व देवासची 'श्रीलक्ष्मीनारायण भुवन लायब्ररी' (स्थापना सन १८८०) हीं ग्रंथालयें फार मोठीं व चांगलीं आहेत.

**भावी मार्ग दिग्दर्शन:—**

मध्यभारतीय लेखकांनीं आणि कवींनीं वाङ्मयाच्या विविध प्रांतांत प्रवेश करून गेल्या ७५ वर्षांत जी कामगिरी बजाविली आहे

तिच्या येथपर्यंत विषयवार करून देण्यांत आलेल्या परिचयावरून ती किती योग्यतेची व महत्वाची आहे हें यथार्थ रीतींनें ठरविणें आतां विद्वानांकडे आहे. तिच्याविषयीं आह्मास मात्र एवढेंच सांगतां येईल कीं, वाङ्मयाच्या निर्मितीला व संवर्धनाला लागणारी परिस्थिति आणि साधनें या दोन्ही गोष्टी तितक्याशा अनुकूल नसतांनाही मध्यभारतीय लेखकांनीं व कवींनीं एवढी कामगिरी बजाविण्यांत जी तत्परता दाखविलेली आहे ती केव्हांही कौतुकास्पदच ठरेल ! या त्यांच्या कामगिरीनें वाङ्मयाचे सर्व प्रांत अद्याप सारखे संपन्न झालेले नाहींत व कांहीं तर अल्पमात्रच संपन्न झालेले आहेत. उदाहरणार्थ, हल्लीं महाराष्ट्रांत कादंबऱ्या व लघुकथा यांचा अगदीं सुकाळ झालेला आहे व अजूनदेखील त्यांचें पीक दिवसेंदिवस उदंड वाढतच चाललें आहे; परंतु मध्यभारतांत मात्र त्या प्रांतांत अद्याप शुकशुकाटच दिसून येत आहे. कथावाङ्मय हें वास्तविक आबालवृद्ध बहुसंख्यांक वाचकांच्या आवडीचें वाङ्मय होय. कारण, या कथावाङ्मयांत मानवी जीवनाचें प्रतिबिंब जितक्या विविधतेनें, वैचित्र्यानें, स्पष्टत्वानें व पूर्णपणानें दृग्गोचर होतें तितकें तें वाङ्मयाच्या इतर कोणत्याही प्रकारांत दृग्गोचर होत नाहीं. त्यामुळें साहजिकपणें वाचकवर्गाचें मन या कथावाङ्मयाकडे अधिक आकृष्ट होऊन त्यांना त्यापासून आनंद व बोध या दोहोंचा लाभ एकसमयावच्छेदेंकरून होतो व वाचनाची गोडी त्यांच्या ठायीं उत्तरोत्तर सारखी वाढतच जाते. नाट्यवाङ्मयासंबंधांतही असेंच ह्मणतां येईल; परंतु दहापंधरा वर्षांपासून चलच्चित्रपटाच्या वाढत्या प्रसारामुळें नाट्याची पिछेहाट झाली आहे. पण या गोष्टीकडे दुर्लक्ष करणें अश्रेयस्कर होय. समाजाच्या जिव्हाळ्याचे प्रचलित विषय घेऊन ते बर्नार्डशॉ, गॅल्सवर्दी प्रभृति पाश्चात्य प्रथितयश नाटककारांच्या पद्धतीनें साध्या व सहजाकर्षक नाट्यस्वरूपांत लोकांपुढें मांडले आणि

'नाट्यं लोकानुचरितम्' हें सूत्र पाळलें तर मराठी नाटकांना चलच्चित्रपटांच्या बोगद्यांतून पार पडण्यास अत्यंत आशादायक असा भविष्यकाळ ठेविलेला आहे हें अगदीं निश्चित समजावें. वास्तविक मध्यभारतीय लेखकांनीं आतांपावेतों कथा व नाट्य या दोन्ही प्रांतांत जें कार्य करून दाखविलें आहे त्यापेक्षां पुष्कळ अधिक कार्य त्यांनीं यापुढें विशेष उत्साहानें करावयास पाहिजे आहे आणि या बाबतींत मध्यभारताची सारी भिस्त तरुण सुशिक्षित पिढीवरच आहे. हल्लीं आपणांस कथा आणि नाट्य वाङ्मयांत तंत्र आणि भाषा या दोन्ही दृष्टींनीं बऱ्याच सुधारणा घडून आल्या असल्याचें दिसून येतें. त्या सुधारणा कांहीं अयोग्य नाहींत; तथापि त्यांत सदभिरुचि व सुसंस्कृति या दोन्ही गोष्टी अबाधित राखण्याच्या बाबतींत योग्य ती खबरदारी लेखकांनीं घेतली पाहिजे; कारण कोणत्याही कृतीचें विधायकत्व त्यांतील विकारांपेक्षां विचारांच्याच सोज्वलतेवर विशेषें करून अवलंबून असतें आणि विचारप्रधान कृतीच समाजास उपकारक ठरून जगांत चिरस्थायी होऊन बसतात, ही गोष्ट कित्येक वर्षांपूर्वीं निर्माण झालेल्या पण अजूनही 'कादंबरी'तील गंधर्वकन्यांप्रमाणें अविकृत स्थितींत अक्षय कीर्तियौवन उपभोगणाऱ्या एश्चायलस्, साफोक्लीज, युरिपिडीज, स्कॉट, डिकेन्स, थॅकरे, रेनॉल्ड्स, गॅल्सवर्दी, टॉलस्टॉय, हार्डी, गोल्डस्मिथ, शेक्स्पियर, मोलियर आदि पाश्चात्य साहित्यिकांच्या व बाण, कालिदास, भवभूति, शूद्रक प्रभृति भारतीय साहित्यिकांच्या ललित कृति पाहून कोणास पटणार नाहीं? परंतु अलीकडे निर्माण होणाऱ्या ललित कृति प्रायः अल्पजीवी असतात. त्यांत मूळ जीवच थोडा असतो. आणि त्यांतील बऱ्याचशा तर गोकाकी फळांप्रमाणें तावदानी कपाटांत प्रदर्शनार्थ ठेवण्याच्या शोभेच्या वस्तूच म्हणण्याच्या योग्यतेच्या असतात. मानवी जीवन यथार्थरीतीनें व्यक्त करणें व प्रगत करणें हीं ध्येयें आपल्यापुढें असा-

वयास पाहिजेत, ही गोष्ट त्या कृतीनिर्मात्यांच्या गांवींही नसतें. पुस्तकाचें बाह्यांग उत्तम रीतीनें सजवून वाचकांची निव्वळ कशीतरी करमणूक करण्याएवढें अंतरंग आकर्षक ठेविलें म्हणजे आपली कृति सार्थकीं लागेल, असें तें समजतात. अर्थात् तें अनुचित होय. अस्तु. काव्याच्या प्रांतांतील मध्यभारतीय कवींची कामगिरी पूर्वीपासून चांगली आहे व हल्लींही तरुण पिढी मध्यभारतास भूषणभूत असलेल्या कविवर्य तांब्यांचा संप्रदाय चालवून आपल्या प्रांताचा पूर्वलौकिक राखण्यांत दक्षता दाखवित आहे; तथापि तिच्याकडून निपजणारें काव्यवाङ्मय समाजाला कितपत उपयुक्त होऊन टिकणारें आहे व मराठीच्या शाश्वत काव्यसंपदेंत त्यानें कितीशी भर पडणार आहे याची चिकित्सा येथें न केलेलीच बरी व ती चिकित्सा करण्याचें हें स्थानही पण नाहीं. जुन्या वाङ्मयाविषयीं पूर्ण तिट्कारा मानून केवळ उथळ ज्ञान, थोडा अभ्यास व अल्प अनुभव अशा तुटपुंज्या भांडवलावरच नवीन तरूण पिढी आपला काव्यप्रपंच थाटत असते, तें सर्वथैव अनिष्ट आहे, हें येथें सुचाविणें अवश्य वाटतें. वास्तविक हल्लींची आपली काव्यरचना पाश्चात्य वळणावर आहे. कॉलरिजनें रणशिंग फुकल्याबरोबर जुन्या संप्रदायाच्या कवींना ज्याप्रमाणें आपल्या सारंग्यांना गवसण्या घालाव्या लागल्या त्याप्रमाणें केशवसुतांनीं तुतारी फुंकल्याबरोबर तिच्या नादांत जुन्या संप्रदायाच्या मराठी कवींच्या कवितांचा नाद लोपूं लागला व आधुनिक कविमंडळ कॉलरिजच्या गूढात्मक, ब्राउनिंगच्या प्रवृत्तिपर, टेनिसनच्या तात्विक, वर्ड्स्वर्थच्या गंभीर, अर्नोल्डच्या गोष्टीरूप, शेलेच्या नवकल्पनांचे ताटवे उत्पन्न करणाऱ्या आणि बायरनच्या मनाचें वादळ दर्शविणाऱ्या कवितांचें अनुकरण करूं लागलें. तें अनुकरण आधुनिक कविमंडळाच्या पहिल्या पिढीला बऱ्याच यशस्वी रीतीनें साधतां आलें; पण हल्लींच्या पिढीला मात्र तेंही बरोबर साधत नाहीं, असें खेदानें म्हणावें लागतें.

हृदयकंप हा कवितेचा उगम असून सहानुकंप हा तिचा हेतु आहे, असें पाश्चात्य पंडित प्रतिपादितात तें खरें आहे. आमच्या मतें तर काव्याची शब्दशक्ति ही एक प्रकारें संजीवनि विद्याच आहे. तिचा कानांत प्रवेश होतांच शुक्राचार्यांच्या संजीवनीप्रमाणें ती सहृदयाच्या सुप्त किंवा चैतन्यलुप्त मनाला एकदम जागृति आणते व हर्षशोकादि नानाप्रकारच्या वृत्ति चाळवून शेवटीं सुखसंवेदना उत्पन्न करते. विद्यमान कवींनीं ही कवितेची मातब्बरी लक्षांत घेतली पाहिजे व तेवढी शक्तिक्षमता आपल्या कवितेंत आणली पाहिजे. इतिहासाच्या प्रांतांतील मध्यभारतीय लेखकांच्या मागील पिढीची कामगिरी मध्यभारताला जेवढी भूषणावह आहे तेवढीच ती महाराष्ट्राला आदरणीय आहे. तरुण पिढींत इतिहासाविषयीं कांहीं कमी आस्था नाहीं. किंबहुना, मध्यम व उच्च शिक्षणांत हा विषय अंतर्भूत असल्यानें त्याच्याविषयीं तरुण पिढींत वाढती ज्ञानपिपासा दिसून येते; तथापि पर्याप्त ज्ञान संपादून ग्रंथनिर्मिति करण्याचें सामर्थ्य तिच्या ठायीं फारसें दिसून येत नाहीं, ही स्थिति शोचनीय आहे. मध्यभारतीय तरुण पिढींतील लेखकांना आपल्या मध्यभारताच्याच इतिहासलेखनाचें कार्य हातीं घेतां येण्यासारखें आहे. कारण, मध्यभारत हा भारतवर्षाचा अतिशय सुपीक व सधन असा मध्यवर्ती प्रदेश असून तो विद्याकलादि सर्वच बाबतींत पुरातन काळापासून प्रख्यात आहे. नार्मदीय ह्मणविली जाणारी येथील संस्कृति पुष्कळच प्राचीन आहे; पण ती आज पूर्ण अंधकारांत आहे. तसेंच येथें घडून आलेल्या अनेक राज्यक्रांत्यांमुळें प्रत्येक शतकाचा इतिहासही मनोरंजक व बोधप्रद बनला आहे; तोही अजूनपावेतों संगतवार असा लिहिला गेलेला नाहीं. वास्तविक येथल्या प्राचीन इतिहासाचीं साधनें रानोमाळ हवीं तितकीं दिसून येतील व त्रेतायुगांत शिळेची बोलकी अहल्या झाली तशीं तीं मूक साधनेंही आपल्या कर्मकथा बोलूं

लागतील; परंतु त्यांच्या उद्धारासाठीं अगोदर संशोधक रामचंद्रांचें पाऊल पुढें पडावयास पाहिजे! प्राचीन इतिहासाप्रमाणें अर्वाचीन इतिहासाचींही बरींचशीं साधनें आज विद्यमान असून त्यांतील कांहीं उजेडांत व कांहीं अंधकारांत आहेत. त्यांच्यासाठीं देखील चिकित्सक संकलनकर्त्यांनीं कटिबद्ध होणें जरूर आहे. सुदैवानें शिंदे, होळकर व धारकर पवार यांचें लक्ष आपापल्या संस्थानांच्या इतिहासाकडे वळून तत्संबंधीं प्रत्यक्ष कार्यही त्यांच्याकडून सुरू झालेलें आहे. मध्यभारतांतील इतर संस्थानिकांनींदेखील त्यांचें इतउत्तर अनुकरण करणें उचित होईल व त्या योगानें इतिहासभक्त लेखकांनाही कार्य करून दाखविण्यास बरेंच क्षेत्र मिळेल. या बाबतींत लेखकांनीं थुसिडायडीज, प्लूटार्क, गिबन, रेनन, बॉरचेल, रूसो, मेकॉले, महामहोपाध्याय गौरीशंकर ओझा, डॉ. सर रामकृष्ण गोपाळ भांडारकर, इतिहासाचार्य राजवाडे, भारताचार्य चिंतामणराव वैद्य, वासुदेव वामनशास्त्री खरे, रियासतकार सरदेसाई, रा. ब. पारसनीस प्रभृतींचीं कार्यें आदर्श ह्मणून समोर ठेवण्यासारखीं आहेत. स्थळवर्णन व प्रवासवर्णनविषयक वाङ्मयाच्या प्रांतांत तर अजून एकंदर मराठी वाङ्मयांतच पुष्कळ भर पडावयास पाहिजे आहे. यासाठीं मध्यभारतीय लेखकांना या प्रांतांत कार्य करून दाखविण्यास बराच वाव आहे. खास मध्यभारतांतच सृष्टिसौंदर्यानें विनटलेलीं व इतिहासानें मंडित झालेलीं अशीं कित्येक दर्शनीय स्थळें आहेत त्यांचा नुसतां वृत्तांत चौकसपणानें व संशोधनपूर्वक त्यांनीं दिल्यास मोठी कामगिरी बजाविल्याचें श्रेय त्यांस लाभण्यासारखें आहे. उत्तम रीतीनें लिहिलें गेल्यास स्थळाचें किंवा प्रवासाचें वृत्त पुष्कळदां कादंबऱ्या व नाटकें यांहूनही वाचकांचें मन अधिक रिझवूं शकतें. गेटीचा इटलींतील प्रवास, मार्कट्वेनचे प्रवासवर्णनपर ग्रंथ व प्रिं. भाटे यांचे ग्रंथ विशेष लोकप्रिय होण्याचें हेंच मुख्यतः कारण होय. धर्म, नीति, समाज, शिक्षण

विषयक वाङ्मयाच्या व अध्यात्म, वेदांत आणि तत्वज्ञान विषयक वाङ्मयाच्या प्रांतांत मध्यभारतांतील मागील पिढींतल्या लेखकांनीं जी कामगिरी बजाविली आहे ती बहुतांशीं विद्वानांच्या आदरास पात्र झालेली आहे; परंतु अलीकडे मराठीमध्यें या एकंदर प्रांतांतील ग्रंथोत्पत्तीची वाढ बरीच खुंटल्यासारखी झाली आहे. असे ग्रंथ सामान्य लोकांस समजण्यास कठिण असतात त्यामुळें त्यांचा प्रसार किंवा खप फारसा होत नाहीं, हें खरें आहे व त्याबरोबरच प्राचीन ऋषिमुनींनीं व त्यानंतरच्या साधुसंतांनीं व विद्वानांनीं या विषयांवर जन्मभर व्यासंग करून अतिशय मूल्यवान् अशी बरीच ग्रंथनिर्मिति अगोदर करून ठेविली आहे, हेंही कांहीं खोटें नाहीं; तथापि बहुजन समाजास सहज समजतील व गोडी लावतील अशा पद्धतीनें या विषयांवर आणखी ग्रंथनिर्मिति होणें जरूर आहे व त्यांत आतां कालमानानुसार पाश्चात्य ज्ञानाचा, तत्त्वांचा, प्रमेयांचा व विचारांचा साधकबाधक दृष्टीनें अंतर्भाव होणेंही इष्ट आहे. ॲरिस्टॉटल, कार्लाईल, ॲडम स्मिथ, स्पेन्सर, कांट, गेटी, हेगेल, चेस्टर फील्ड, मॉटेन या पाश्चात्य विद्वानांप्रमाणें श्रीमदाद्य शंकराचार्य. श्रीमन्मध्वाचार्य, श्रीविद्यारण्य स्वामी, स्वामी रामकृष्ण परमहंस, स्वामी रामतीर्थ, स्वामी विवेकानंद, लो. बाळ गंगाधर टिळक, प्रो. चिंताण गंगाधर भानु, प्रो. वामन मल्हार जोशी, गोविंदसुत या आपल्याकडील मंडळींचे ग्रंथ भावी ग्रंथकारांस अभ्यासयोग्य व मार्गदर्शक आहेत. आरोग्यविषयक वाङ्मयाच्या प्रांतांत मध्यभारतीय लेखक अजून बरोबर पुढें धजलेलेच नाहींत, असें दिसून येतें. खास महाराष्ट्रांतदेखील या वाङ्मयाची निपज बरीच व्हावयास पाहिजे आहे. शारीर शास्त्र, इंद्रिय विज्ञान, रोगनिदान, शस्त्रवैद्यक, आरोग्य, व्यायाम, आहारविहार वगैरे या विषयाचीं अनेक अंगेंउपांगें आहेत. त्या सर्वांवर भारतीय व भारतीयेतर शोधांचा व ज्ञानांचा चिकित्सापूर्वक अभ्यास होऊन सुबोध

असे ग्रंथ लिहिले गेले पाहिजेत. शास्त्रीय व कलाविषयक वाङ्मयाच्या प्रांतांतही मध्यभारतीय लेखकांना अजून बरेंच पुढें सरावयास पाहिजे आहे. वराहमिहिर, ब्रम्हगुप्त, कोपर्निकस, गॅलिलिओ, न्यूटन, एडिसन वगैरे मंडळींनीं आपलें जन्म शास्त्रीय शोध लावण्यांत व शास्त्रीय ग्रंथ रचण्यांत घालविले, त्यांचा कित्ता सर्वांनीं डोळ्यापुढें ठेविला पाहिजे व प्रो. जगदीशचंद्र बोस, प्रो. रामन्, प्रो. भिसे यांच्यासारखे पुरुष आपल्यांत अधिकाधिक निर्माण झाले पाहिजेत. राष्ट्राची खरी उन्नति होण्यास शास्त्र व कला यांचाच पाया मुख्यत्वेंकरून लागतो, हें जगांतील पूर्वकालीन व विद्यमान अशा कोणत्याही इतर राष्ट्राच्याच काय पण प्रत्यक्ष आपल्या भारतवर्षाच्याच प्राचीन इतिहासाकडे पाहतां दिसून येतें. यासाठीं शास्त्र व कला विषयक उपयुक्त व बहुविध वाङ्मय जितकें निर्माण होऊं शकेल तितकें तें प्रोत्साहनपूर्वक तयार करविणें इष्ट होईल.

अस्तु. मध्यभारतीय लेखकांनीं व कवींनीं महाराष्ट्रापासून दूर असलेल्या या परप्रांतांत आतांपावेतों मराठी भाषा आस्थापूर्वक जोपासून वाङ्मयनिर्मितीचें जें कार्य यथामति व यथाशक्ति करून दाखविलें आहे त्यांतील गुणांकडे पाहतां व येथील लक्ष्मी-सरस्वतीमधील अन्यत्र क्वचित् आढळणारें पूर्वापर सख्य आजही अबाधित असलेलें लक्षांत घेतां मध्यभारतीय मराठी वाङ्मयाला उज्वल भविष्यकाळ आहे, असें गोड भाकित कोणीही वर्तवील. हें भाकित भगवती शारदेच्या कृपाप्रसादानें खरें ठरो व त्या द्वारें अखिल मराठी वाङ्मयभांडारांत मध्यभारताकडून विविध ग्रंथरत्नांची आणखी बहुमोल भर पडो, असें मनःपूर्वक चिंतीत लेखणीस विराम देतो.



# मध्यभारतीय ग्रंथनिर्मितीचें दशवार्षिक प्रगतीचें कोष्टक.

| क्रमांक | वर्ष निर्देश | भाषा व साहित्य विषयक वाङ्मय | कथा वाङ्मय | नाट्य वाङ्मय | काव्य वाङ्मय | ऐतिहासिक वाङ्मय | प्रवास वर्णनात्मक वाङ्मय | धर्मादि विषयक वाङ्मय | अध्यात्मिक व इतर वाङ्मय | आरोग्य विषयक वाङ्मय | शास्त्रीय वाङ्मय |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | १८६१-७० | ० | ० | ० | ० | १ | १ | १ | ० | ० | ० |
| २ | १८७१-८० | १ | १ | १ | २ | १ | ० | ० | ० | ० | ० |
| ३ | १८८१-९० | ३ | ३ | २ | १३ | १२ | १२ | ६ | ० | ४ | ७ |
| ४ | १८९१-१९०० | ३ | ४ | ६ | १३ | ११ | ३ | ४ | १२ | १ | ८ |
| ५ | १९०१-१० | ३ | १८ | १७ | २२ | १५ | १ | ६ | ५ | २ | १३ |
| ६ | १९११-२० | ३ | १० | ६ | २४ | १५ | ० | ११ | ३ | ९ | ९ |
| ७ | १९२१-३० | २ | ६ | ६ | ३५ | १९ | ११ | १२ | ४ | ६ | ६ |
| ८ | १९३१-३६ | ८ | ४ | ८ | ३२ | १२ | ६ | ८ | १२ | १२ | १४ |

# सन १९३७ पासून जुलै १९३८ अखेर
# प्रसिद्ध झालेलीं कांहीं पुस्तकें.



श्रीराम कथासार ( १९३८ )–महादेव बळवंत माहुलीकर.

अंतर्नाद अर्थात् माझीं सुनीतें ( १९३७ )–ना. वा केळकर.

ग्वाल्हेर राज्यांतील मराठी संस्कृतीचा ऱ्हास (१९३७)–आर. व्ही. दाते.

चंद्रचूड दफ्तरापैकीं निवडक उतारे (१९३७)–केशव बळवंत डोंगरे.

तानमालिका ( १९३७ )–राजाभय्या पूंछवाले.

नरवीर तानाजी मालुसरे ( १९३८ )–यशवंत खंडेराव कुळकर्णी.

मराठी कादंबरी : तंत्र आणि विकास ( १९३८)–प्रो. प्र. वा बापट व प्रो. ना. वा. गोडबोले.

मराठी साहित्य समालोचन ( १९३८ )–विनायक सीताराम सरवटे.

वेडापिसा ( १९३६ )–डॉ. न. का. घारपुरे.

शिवाजी आणि नेपोलियन (१९३८)–डॉ. श्रीधर रामचंद्र देसाई.

संगीत साध्वीरत्न ( १९३८ )–यशवंत खंडेराव कुळकर्णी.

स्वल्पविराम ( १९३७ ) रघुनाथ कृष्ण फडके.

नाट्य-पराग ( १९३८ )–प्रो. बा. गु. चव्हाण व प्रो. सोहोनी.

जगदंबा ( १९३८ ) भाईसाहेब कोतवाल.

# मध्यभारतीय लेखक सूचि.

[ या सूचींत खास मध्यभारतीय लेखकांशिवाय महाराष्ट्रांतील ज्या लेखकांनीं मध्यभारतांत वास्तव्य करून इकडे ग्रंथ लिहिले किंवा प्रसिद्ध केले त्यांचाही समावेश करण्यांत आला आहे. नांवांपुढील आंकडे पानांचे आहेत. ]

# मध्यभारतीय ग्रंथ व नियतकालिक

# सूचि.

[ यांत कांहीं ग्रंथांच्या व नियतकालिकांच्या नामारंभी असलेलें 'श्री' हें अक्षर वगळण्यांत आलें आहे. ]

# इतर व्यक्ति सूचि.

[ यांत केवळ विशेष महत्वाच्याच व्यक्तींचा समावेश करण्यांत आला आहे. ]

---

# इतर ग्रंथ नियतकालिकें व संस्था यांची सूचि.

[ यांत केवळ विशेष महत्वाचे ग्रंथ व मध्यभारतीय नियतकालिकें आणि संस्था यांचाच समावेश करण्यांत आला आहे. ]

